खंड दोन

# होळकरशाहीचा इतिहास

इ. स. १७९७ ते १८८६ पर्यंत

संपादक
वा. वा. ठाकूर
सुधारित आवृत्तीचे संपादक
डॉ. देवीदास पोटे







महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

खंड दोन

# होळकरशाहीचा इतिहास

इ. स. १७९७ ते १८८६

संपादक

वा. वा. ठाकूर

दुसऱ्या सुधारित आवृत्तीचे संपादक

डॉ. देवीदास पोटे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई

➢ **पुस्तकाचे नाव** : होळकरशाहीचा इतिहास : खंड दोन
इ.स. १७९७ ते १८८६
Holkarshahicha Itihas Volume-Two
1797 to 1886 A.D.

➢ **पहिल्या आवृत्तीचे संपादक** : वा. वा. ठाकूर

➢ **दुसऱ्या सुधारित आवृत्तीचे संपादक** : डॉ. देवीदास पोटे

➢ **प्रथमावृत्ती** : १९४६

➢ **दुसरी सुधारित आवृत्ती** : २०२१

➢ **प्रकाशक** :

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रवींद्र नाट्यमंदिर इमारत, दुसरा मजला,
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार,
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.



➢ **मुखपृष्ठ** : सतीश भावसार

➢ **मुद्रक** :

व्यवस्थापक,
शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,
मुंबई ४०० ००४.

➢ **किंमत** : रुपये ५६९/-

# अध्यक्षांचे मनोगत

छत्रपती शिवरायांनी हिंदवी स्वराज्याचे तोरण उभारले. लोककल्याणाचा आदर्श घालून दिलेल्या या राजाच्या लढवय्या शिलेदार-मावळ्यांनी पुढें अटकेपार स्वराज्याचा विस्तार केला. त्यात होते महाराजांचे मराठी सरदार शिंदे, घोरपडे, निंबाळकर, दाभाडे, गायकवाड आणि इंदूरचे होळकर. या होळकरशाहीचा इतिहास हा आधुनिक भारताच्या इतिहासातील एक महत्त्वाचा कालखंड होता. होळकर रियासत ही अखिल मराठेशाहीचे एक महत्त्वाचे अंग आणि आधारस्तंभ होती. होळकरशाहीत मल्हारराव होळकर आणि अहिल्याबाई होळकर यांचे कार्य ऐतिहासिक महत्त्वाचे आहे. त्यात अहिल्याबाईंचा शासनकाळ हा तर होळकरशाहीचा सुवर्णकाळच मानला जातो.

सर्वसामान्य कुटुंबात जन्मलेल्या अहिल्याबाई एका वैभवशाली होळकर राज्याच्या स्वामिनी बनल्या. त्या शूर लढवय्या, चांगल्या रणनीतीज्ञ आणि न्यायी वृत्तीच्या होत्या. त्यांच्या जीवनात आलेली अनेक संकटे, दु:खाला त्यांना सामोरे जावे लागले; पण प्रजेच्या कल्याणात आणि सेवेतच आपला मोक्ष आहे, हे ओळखून त्यांनी आयुष्यभर जनहिताची असंख्य कामे केली. अन्यायाची त्यांना चीड होती. त्यांनी धर्माचरण आणि राजकारणाची सुयोग्य सांगड घातली. कर्तव्यनिष्ठा, धर्मनिरपेक्षता आणि सात्त्विकता या गुणवैशिष्ट्यांमुळे त्या केवळ राजमाता न राहता पुण्यश्लोक लोकमाता ठरल्या. अत्यंत साधे निर्मळ जीवन आणि पराकोटीचे दातृत्व ही त्यांची जगावेगळी ओळख होती. काश्मीर ते कन्याकुमारी अन् द्वारका ते पूर्वेकडच्या देशभरातील अनेक मंदिरे, तीर्थस्थळे, नदीकाठ, धर्मशाळा, पिण्याच्या पाण्याचे हौद, विहीरी-बारवा त्यांनी बांधल्या, जगावेगळ्या दानशूरत्वाने देशभरात आपला कायमस्वरूपांचा ठसा उमटविणाऱ्या त्या

एकमेव महाराणी आहेत. या देशात अनेक राजे-रजवाड्यांनी आपापल्या राज्यात लोकोपयोगी कामे केली आहेत, हा इतिहास आहे; पण स्वत:च्या राज्याबाहेर देशभर जनसेवेची पाणपोई उभारणाऱ्या एकमेव अहिल्याबाईच होत्या. हिंदुस्थानच्या अनेक राजघराण्याच्या इतिहासात जनकल्याणाची कामे केल्याचा इतिहास बघायला मिळतो; पण आपल्या राज्याबाहेर सर्व जाती-धर्माच्या स्थळांच्या जीर्णोद्धारासाठी मदत केलेंल्या अहिल्याबाईच दिसून येतात.

इंदूरच्या होळकर घराण्याचे मल्हारराव होळकर संस्थापक होते. त्यानंतर अहिल्याबाईंचा सुवर्णकाळ येतो. त्यांच्यानंतर यशवंतराव होळकरांनी हा वारसा सांभाळला. हा इ. स.१६९३ पासूनचा हा दोनशे वर्षांचा इतिहास आहे. भारताच्या इतिहासातील होळकरशाहीचा इतिहास हा आपला एक सांस्कृतिक वारसा आहे. तो एकत्रित स्वरूपात पुनर्प्रकाशित करावा यासाठी आमचे मित्र डॉ. देवीदास पोटे हे प्रयत्न करत आहेत, ही गोष्ट माहीत असल्याने हे काम करण्याची संधी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास द्या, अशी विनंती मी त्यांना केली. आणि त्यांनी ती स्वीकारून 'होळकरशाहीचा समग्र इतिहास' या प्रकल्पासाठी रात्रंदिवस झोकून देऊन काम केलें. माणसाने ठरविले आणि नियोजनपूर्वक ध्यास घेतला की, ते काम वेळीच पूर्ण होऊ शकते, हा अनुभव डॉ. देवीदास पोटे यांच्या कामातून दिसून आला. केवळ दीड वर्षात एकहाती दहा खंड करणे, हे अवघड नाही, हे त्यांनी या दहा खंडातील सुमारे पाच हजार पानांच्या बृहद प्रकल्पाच्या उदाहरणातून दाखवून दिले आहे.

या समग्र इतिहासाचे प्रकाशन साहित्य आणि संस्कृती मंडळाचा अध्यक्ष म्हणून माझ्या काळात होत असलेले दुसरे महत्त्वाचे काम आहे. असेंच पहिले मोठे काम म्हणजे महाराष्ट्राचे वाङ्मयमहर्षी गुरुवर्य कृष्णराव अर्जुन केळूसकर यांचे बारा खंड तयार झाले आहेत. 'होळकरशाहीचा समग्र इतिहास' या प्रकल्पात पूर्वप्रकाशित खंडांचे लेखक तसेच प्रशासक आणि दूरदृष्टी असलेल्या दानशूर अहिल्याबाईंच्या अनोख्या पर्वाची ओळख सर्वांना होणार आहे.

या प्रकल्पातील पहिल्या दोन खंडांमध्ये होळकरशाहीचा इतिहास आला आहे. श्री. वा. वा. ठाकूर हे इंदूर येथील इतिहास विभागाचे प्रमुख गाढे अभ्यासक होते. त्यांनी इ.स. १९४४ आणि १९४६ साली 'होळकरशाहीचा इतिहास' हे खंड प्रकाशित केलें. यातील पहिल्या खंडात त्यांनी होळकर राज्यकर्त्यांची कारकीर्द, त्यांचे परस्परसंबंध, सामाजिक-सांस्कृतिक योगदान, लोकाभिमुख नीति या गोष्टींचे सखोल विवेचन केलें आहे. इ.स.१६९३ ते १८८६ असा दोनशे वर्षांचा होळकरशाहीचा इतिहास या ग्रंथात मांडला आहे. छत्रपती शिवरायांनी आपल्या प्रदेशात विद्या, तीर्थस्थाने पुनरुज्जीवित करून महाराष्ट्र धर्म प्रस्थापित केला. अहिल्याबाईंनी या पुढे एक पाऊल टाकून अवघा भारतखंड हे माझेच घर आहे, अशी जबाबदारी स्वीकारून तीस वर्षांच्या राजवटीत लोकहितांची आणि संस्कृती

संवर्धनाची शेकडो कामे करून भारतीय संस्कृतीचा प्रवाह पुन्हा वाहता केला, असे संपादकांनी प्रतिपादन केले, हे या खंडांतून पानोपानी दिसून येते.

अहिल्याबाईंच्या निर्वाणानंतरच्या इ.स. १७९५ ने १८८६ पर्यंतचा इतिहास दुसऱ्या खंडात आला आहे. यात सवाई माधवरावांच्या पश्चात होळकरांची हालाखी, श्रीमंत यशवंतरावांचा कालखंड, त्यांना सोबत्यांशी कराव्या लागलेल्या लढाईपासून इंग्रजाची युद्ध आणि तहापर्यंतचा इतिहास आलेला आहे. यानंतरचा यशवंतराव महाराजांचे परतंत्र, दुसऱ्या मल्हाररावांच्या कारकीर्दीचा इतिहास आला आहे. उर्वरित भागात द्वितीय श्रीमंत तुकोजीराव होळकरांच्या कारकीर्दीतील चढउतारापर्यंतचा सविस्तर इतिहास या खंडात बघायला मिळतो. एका समर्थ स्त्रीने राज्यकारभार समर्थपणे सांभाळून सुप्रशासनासोबत लोककल्याण आणि लोकहितकारी कामांची सांगड घालून केलेंले काम हा आपला अनमोल वारसा आहे. हे सगळे अक्षरधन प्रकाशित करताना महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास आनंद होत आहे. होळकरशाहीचा इतिहास या पूर्व प्रकाशित ग्रंथाचे लेखक-संपादक श्री. वा. वा. ठाकूर आणि या प्रकल्पासाठी संपादक डॉ. देवीदास पोटे यांना मदत करणाऱ्या सर्व मित्रांचे आभार.

**बाबा भांड**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई

मुंबई, दि. १० जुलै २०१८

# प्रस्तावना

शिवरायांच्या  हिंदवी स्वराज्याचा विस्तार पेशव्यांच्या काळात झाला. या कार्यात अनेक सरदार आणि अनेक घराणी यांचे महत्त्वाचे योगदान आहे. मराठेशाहीचा हा इतिहास घडविणाऱ्या घराण्यांपैकीं एक म्हणजे इंदूरचे होळकर घराणे.

''होळकरशाहीचा इतिहास'' या विषयावरील दोन खंड श्री. वा. वा. ठाकूर यांनी लिहिले आहेत. या दोन्ही खंडांतून त्यांनी होळकर रियासतीच्या इतिहासाचा सविस्तर आढावा घेतला आहे. होळकर राज्यकर्त्यांची राजकीय कारकीर्द, त्यातील परस्पर संबंध त्यांचे सामाजिक, सांस्कृतिक योगदान, त्यांची लोकाभिमुख नीती यांचे अतिशय सखोल विवेचन त्यांनी केलें आहे. इ. स. १६९३ ते इ. स. १८८६ असा १९० वर्षांच्या इतिहासाच्या पट त्यांनी मांडला आहे.

इतिहास लेखनाबाबत प्रसिद्ध संशोधक इतिहासाचार्य वि. का. राजवाडे म्हणतात, ''इतिहास लेखन केवळ गतकाळातील घटनांची केवळ नोंद करणे हे नाही तर त्यात समकालीन संस्था व समाज यांचे विवेचन आले पाहिजे. ते पूर्वग्रहविरहित असले पाहिजे.

मानव समाजाच्या चरित्रात राजकारणाव्यतिरिक्त धर्म, आचार, विद्या, व्यापार वगैरे अनेक विषयातील घडामोडी होत असतात. त्यांचा समावेश इतिहासात होणे गरजेचे आहे. 'भूतकाळात जे घडले त्याचे चरित्र म्हणजे इति-ह-आस' ही इतिहासाची व्याख्या अधिक योग्य आहे. मानवी इतिहास काळ व स्थळ यांनी बद्ध झाला आहे. काळ, स्थळ, व्यक्ती या त्रयींची सांगड घालणे हे इतिहासाचे काम आहे. या ऐतिहासिक घटनांचे निवेदन अथवा स्पष्टीकरण भाष्य, अग्रक्रम अथवा निर्भर्त्सना करण्याची कांहीं आवश्यकता नसते. इतिहास

भूतकाळातील वृत्ताचा विश्वसनीय सारांश देतो. नीतीशास्त्र त्यात उत्तमत्व वा अधमत्व ठरविते. इतिहासाचे खरे स्वरूप म्हणतात, ते हेच.''

(राजवाडे लेखसंग्रह खंड १६, राजवाडे संशोधन मंडळ,
धुळे, १९४७, पृष्ठ २२०)

राजवाडे यांचे इतिहासासंबंधीचे विचार फ्रेंच इतिहासकार व्हॉल्टेर अथवा रोमचा इतिहासकार गिबन यांच्या विचारांशी मिळतेजुळते आहेत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी इतिहासाबाबत लिहिताना म्हटले आहे,

''A historian ought to be exact, sincere and impartial; free from passion, unbiased by interest, fear, resentment or affection; and faithful to the truth, which is the mother of history, the preserves of great actions, the enemy of oblivision, the witness of the past, the director of the future.''

(Dr. B. R. Ambedkar, Writings and Speeches)

याबाबत इतिहास संशोधिका प्रा. बांबुरकर म्हणतात,

इतिहासलेखन हे माणसाचे बौद्धिक अपत्य आहे. मानवी जीवनाशी निगडित कोणत्याही प्रश्नाचा वेध घेताना ऐतिहासिक दृष्टीचाच अवलंब करावा लागतो. त्या अर्थाने इतिहास ही भूतकाळाची कहाणी असली तरी ती वर्तमानाची निकड आहे. गतकाळच्या विश्लेषणातून मानवी जीवनाचा वर्तमान सुकर होतो. तसेच हे विश्लेषण भविष्याचेही दिग्दर्शन करू शकते.

(इतिहासातील नवे प्रवाह, संपादक प्रा. जास्वंदी बांबुरकर,
डायमंड पब्लिकेशन, पुणे, २०१४)

मराठ्यांच्या इतिहासाच्या बाबतीत नीळकंठ जनार्दन कीर्तने, न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे, काशिनाथ नारायण साने, वासुदेवशास्त्री खरे, दत्तात्रय बळवंत पारसनीस, वि. का. राजवाडे, रियासतकार गो. स. सरदेसाई यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहे. माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन, ग्रँट डफ या परदेशी इतिहासकारांनीही मराठ्यांच्या इतिहासावर लिहिले आहे. पण त्यांच्या लिखाणाची दिशा अनेक ठिकाणी चुकीची वा मूल्यमापन पूर्वग्रहदूषित आहे. याबाबत लोकमान्य टिळक यांनी आपले निरीक्षण नोंदविले आहे. ते म्हणतात,

''परदेशी इतिहासकारांचे अँगल आफ व्हिजन'' (angle of vision) वा पहाण्याची दृष्टी वेगळी असते. त्यामुळेच ग्रँट डफच्या मराठ्यांच्या इतिहासाविषयी आकलनात अनेक चुका झाल्या आहेत. क्कचितप्रसंगी त्याने विपर्यासही केला आहे. जिंकलेल्या लोकांच्या इतिहासाची, त्यांच्या पूर्वीच्या वैभवाची, आठवणींची काळजी जेत्यांनी काय म्हणून वाहावी? आपल्या स्वतःच्या गरजा काय, उणीवा काय, आपले गतवैभव हरवले याची जाणीव आपणास जशी असते तशी इतरांस कुठून असणार? तात्पर्य, कोणत्याही उदयोन्मुख राष्ट्राला इतिहासाचे संशोधन करणे हे पहिले काम असते.''

वा. वा. ठाकूर हे होळकर दरबारात इतिहास विभागाचे प्रमुख होते. त्यामुळे होळकरशाहीबाबतची ऐतिहासिक कागदपत्रे त्यांना सहजपणे उपलब्ध झाली. 'इतिहास' या विषयाचे जे सर्वमान्य निकष आहेत त्या निकषांना त्यांचे लेखन पूर्णपणे उतरले आहे असें दिसून येते. श्री. ठाकूर यांची शैली ओघवती असून मूळ, कागदपत्रे ऐतिहासिक वास्तवाच्या पद्धतीने तपासून त्यांनी आपले लेखन केलें आहे याचा पदोपदी प्रत्यय येतो.

होळकरशाहीचा पाया रोवला मल्हारराव होळकरांनी. ते होळकर राज्याचे मूळ पुरूष. त्यांनी माळव्यात इंदूरला होळकरांचे राज्य निर्माण केलें आणि अनेक परींनी आपल्या राज्याची घडी नीट बसविली. मल्हारराव हे मराठेशाहीचे आधारस्तंभ होते. त्यांनी आपल्या कारकीर्दीत ५२ लढाया लढल्या आणि त्या सर्वांमध्ये यश मिळविले. मराठेशाहीच्या उत्कर्षात मल्हारराव आणि होळकरशाही यांचे योगदान महत्त्वपूर्ण आहे.

याला अपवाद पानिपतच्या युद्धाचा. पानिपतच्या युद्धातील पराभवाची अनेक कारणे आहेत. उत्तरेकडील मोहिमांचा अनुभव नसलेले नेतृत्व, उत्तरेचा अनुभव असलेल्या प्रमुख सरदारांना युद्धविषयक निर्णयप्रक्रियेत सहभागी करून न घेण्याचे धोरण, तीर्थयात्रेच्या उद्देशाने आलेले आणि युद्धात कुठल्याही कामाचे नसलेले यात्रेकरू, उत्तरेचा परिसर व हवामान यांच्या अभ्यासात राहिलेल्या उणीवा, ज्येष्ठांची उपेक्षा आणि अवमान करण्याची नेतृत्वाची प्रवृत्ती, अतिरिक्त आत्मविश्वास, सैन्यात दुसऱ्या, तिसऱ्या फळीचा अभाव अशा अनेक कारणांमुळे पानिपतच्या युद्धात मराठ्यांना दारूण पराभव पत्करावा लागला, हे ऐतिहासिक वास्तव आहे. एक लाख बांगडी फुटली असें इतिहासकारांनी याबाबत वर्णन केलें आहे.

मल्हाररावांनी होळकरशाहीचा पाया मजबूत बनविला होता. त्यावर सर्व बाजूंनी कळस चढविला तो अहिल्याबाई होळकर यांनी. प्रशासन, शेती, पाणी, न्याय, धार्मिक बाबी, परराष्ट्रसंबंध, युद्धनीती अशा अनेकविध बाबतीत अहिल्याबाईंनी सर्वदूर सुधारणा केल्या. आपल्या राज्यात स्थैर्य, शांतता आणि प्रजाहित या बाबी त्यांनी महत्त्वाच्या मानल्या. लोकांना पुत्रवत मानणारी ही एकमेव महाराणी. शिवरायांचा लोककल्याणकारी राज्याचा वारसा त्यांनी समर्थपणे पुढे चालविला. आपल्या राज्याच्या परिघाबाहेर भरतखंडात ठिकठिकाणी लोकहिताची कामे करून त्याची व्याप्ती त्यांनी आणखी कितीतरी पटींनी वाढविली. संत ज्ञानदेवांच्या पसायदानातील विश्वात्मक विचार अहिल्याबाईंनी आपल्या विविधांगी लोकहितकारी कार्याच्या स्वरूपात अंमलात आणला असें निश्चितपणे म्हणता येते. अहिल्याबाईंचे राज्य ''आदर्श'' या संकल्पनेच्या कसोटीला पुरेपूर उतरणारे होते असें मत अनेक इतिहासकांरानी आणि अभ्यासकांनी नोंदविले आहे. अहिल्याबाईंचा शासनकाळ हा होळकरशाहीचा सुवर्णकाळ होता, यात तिळमात्रही संदेह नाही.

तत्कालीन सेंट्रल इंडियाचा गव्हर्नर सर जान मालकम याने अहिल्याबाईंच्या मृत्युनंतर महेश्वरला भेट दिली. तिथल्या कारभाऱ्यांकडून त्याने अहिल्याबाईसंबंधीची सर्व बारीकसारीक माहिती मिळविली. संबंधित कागदपत्रें अभ्यासिली. त्याने आपल्या मध्य भारतातल्या

कारकीर्दीवर आधारित "A memoir of Central India including Malwa" हा ग्रंथ लिहिला आहे. अहिल्याबाईंचा राज्यकारभार, त्यांचे व्यक्तिमत्त्व याबाबत त्याने लिहिले आहे. तो म्हणतो,

"A life of Ahilyabai forms too proud an echo in the History of House of Holkars to be slightly passed over."

अहिल्याबाईंच्या कारकीर्दीचे वर्णन डॉ. ॲनी बेझंट यांनी मार्मिक आणि नेमक्या शब्दांत केलें आहे. त्या म्हणतात,

Ahilyabai was a great ruler of Indore. She encouraged all within her realm to do their best. Merchants produced their finest cloths, trade flourished, the farmers were at peace, and oppression ceased, for each case that came to the Queen's notice was dealt with severely. She loved to see her people prosper, and to watch the fine cities grow, and to know that here subjects were not afraid to display their wealth, lest the ruler should snatch it from them. Far and wide the roads were planted with shady trees, and wells were made, and rest-houses for travellers. The poor, the homeless the orphaned were all helped acording to their needs. The Bhils, who had long been the torment of all caravans, were routed from their mountains, fastnesses, and persuaded to settle down as honest farmers. Hindu and Musalman alike reverenced the famous Queen and prayed for her long life. Her last great sorrow was when her daughter became a Sati upon the death of Yaswant Rao. Ahilyabai was seventy years old when her long and splendid life closed. Indore long mourned its noble Queen, happy had been her reign, and her memory is cherished with deep reverence unto this day.

- Dr. Annie Besant

(Children of the Mother Land, Page 290-291)

अहिल्याबाईंचे प्रशासन हे भारतीय इतिहासातील एक अनोखे पर्व होते. राजाला देवाचा अंश मानणे ही आपली परंपरागत धारणा आहे. पण राज्यकर्त्यांमधले देवत्व वा देवाचा अंश प्रत्यक्ष अनुभवाला येणे ही बाब अहिल्याबाईंच्या चारित्र्याने ठळकपणे प्रत्ययाला आली.

यशवंतराव होळकर यांचा काळ राजकीय धामधुमीचा होता. त्यांनी होळकरशाहीला बुडण्यापासून वाचविले. खरंतर पेशवाई इंग्रजाच्या ताब्यात जाण्यापासून वाचावी यासाठी त्यांनी आटोकाट प्रयत्न केलें. पण त्यांच्याविषयी पेशवे आणि शिंदे याच्या मनात प्रचंड गैरसमज भरलेला होता. हा गैरसमज दूर करणे आणि सर्वांचा समन्वय राखणे हे राज्यप्रमुख

म्हणून पेशव्यांचे कर्तव्य होते. पण त्यांनी आपसातील समज-गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न न करता, होळकरांची बाजू ऐकून न घेता एककल्लीपणाचे वर्तन केलें आणि चुकीच्या सल्लागारांच्या नादी लागून इंग्रजांसारखा घातक शत्रू जवळ केला. परिणामी शिवरायांनी निर्माण केलेंले स्वराज्य आणि मराठेशाहीची सत्ता अंतर्धान पावली. पेशव्यांनी आपल्या हाताने मराठा राज्य इंग्रजांच्या स्वाधीन केलें.

यशवंतरावांनी इंग्रजांच्या विरुद्ध युद्ध छेडताना भारतातील सर्व संस्थानांना मदतीसाठी आवाहन केलें. एकत्र लढलो तर इंग्रजांसारखा बलवान शत्रूही पराभूत करता येईल हे परोपरीने समजावले. शेवटी यशवंतरावांनी एकट्याने इंग्रज सत्तेविरुद्ध एल्गार पुकारला होता. पण अखेर त्यांचे प्रयत्न अपुरे ठरले. त्यांना इंग्रजांशी तह करावा लागला. इंग्रजांनी यशवंतरावांचे होळकरांचा राजा हे पद मान्य केलें. खरंतर होळकरशाहीचा प्रमुख म्हणून पेशव्यांनी मान्यता द्यावी एवढीच यशवंतरावांची पेशव्यांकडून अपेक्षा होती. वा. वा. ठाकूर म्हणतात,

''चिरा चिऱ्याचे जागीं बसवावा'' ही यशवंतराव महाराजांची इच्छा होती. ती पेशव्यांच्या हातून पूर्ण न होतां इंग्रज कंपनी सरकारकडून पूर्ण झाली. पेशव्यांनीं संधी गमावली.

(खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण ९ वें, पृष्ठ ११२)

अहिल्याबाईंच्यानंतर त्यांची सर्व धार्मिक कृत्ये पुढे व्यवस्थित चालावीत अशी यशवंतरावांची इच्छा होती. अहिल्याबाईंविषयी त्यांना नितांत आदर होता. भारमलदादा होळकर यांना अहिल्याबाईंच्या छत्रीविषयी त्यांनी लिहिलेले पत्र यासंदर्भात पहाण्याजोगे आहे.

''अ. नं. २० **श्री**

ता. १६ आक्टोबर इसवी सन १७९९

श्रीमंत यशवंतराव होळकर यांजकडून भारमल होळकरांस. विशेष कैलासवासी तीर्थरूप मातोश्री बाईसाहेब (अहिल्याबाई) ह्यांचे छत्रीचा कारखाना चालू करावयाविशी तुम्हास विजयादशमीचे दिवशी पत्र लिहून रवाना केलें आहे ते पावलेच असेल. हल्लीं भूधर गजाधर (मिस्तरी) याजला पाठवून हे पत्र लेखन केलें असें. तरी तुम्ही जागा पूर्वपश्चिम दक्षिणउत्तर मोजून छत्रीचे स्थलापासून राजश्री रामराव अप्पाजीचे हवेलीपर्यंत पाया धरून खिडकीचे सुमारें शिवघाटाचा बेत ठेऊन बाकीच्या पायांत देऊन व बाग, नगारखाना करावा. श्रीकाशीविश्वेश्वराचे देवालयाबरोबर जमीनीची भोये बांधून जाल्यानंतर पुढे देवालयाचे काम चालेल. कामाचा नक्षा ही भूधराने येथें समजावून तिकडे घेऊन आला आहे. तुम्ही तेथील सोईने पाहून काम चांगले मातोश्रीसाहेबांचे लौकिकाप्रमाणे ज्यात कांहीं कसर न राहता जो पाहील तो मान डोलावेल असें करावे. सिद्धीस नेणार त्यांचे पुण्य आहे. आमचे लक्ष त्यांचे चरणीं अंतःकरणपूर्वक आहे. त्यापक्षी त्यांच्या आशीर्वादेकरून सर्व घडेल. भूधर पूर्वीपासून सरकारचे पदरचा आहे. त्यांस काम त्याचे हाते घेऊन कारखानियाचा बंदोबस्त चांगला राहून

काम सत्वर चालते करणें. खर्चाची योजनाही मागाहून केली जाईल. रा. छ. १६ जमादिलावल. सु।। मयातेन व अलफ. कळावे बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तबसुद.''

(खंड चार, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र नं. २०, ता. १६ आक्टोबर १७९९, पृ. १८-१९)

इ. स. १८०९-१० या वर्षीच्या इंग्रजांच्या पत्रव्यवहारातून असें दिसते की यशवंतरावांनी आपल्या दूतामार्फत इराणमधील तेहरान शहरातून फ्रेंच सरकारशी पत्रव्यवहार केला होता. ही बाब इंग्रजांच्या लक्षात आली आणि त्यांच्या काळजात धडकी भरली. त्यांनी त्वरेने इंदूर दरबाराला समजावणीची पत्रें दिली. यशवंतराव महाराजांचा, शत्रूचा शत्रू तो आपला मित्र, या न्यायाने परदेशी मदत मिळविण्याचा प्रयत्न यशस्वी झाला नाही.

(खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण १० वें, पृष्ठ १२५)

यशवंतरावांच्या काळात होळकरशाहीची घातलेली पायशुद्ध इमारत अनेक अंतर्बाह्य संकटांना तोंड देऊन तगली. प्रसिद्ध इतिहासकार रियासतकार गो. स. सरदेसाई यांनी यशवंतरावांच्या कामगिरीचे समालोचन करताना म्हटले आहे,

''मराठेशाहीच्या अत्यंत विपन्नावस्थेत यशंवतराव होळकर हा एक मोठा हिराच अल्पकाळ चमकून गेला. आणि या हिऱ्यानें आपल्या तेजानें त्या काळातील निबिड अंधार किंचितकाल दूर सारला. त्या वेळीं त्याच्या तोडीचा दुसरा सेनानायक मराठ्यांकडे नव्हता. अंतःकरणाचा उदार, गरीबांचा कनवाळू, हाताखालच्या मंडळींस जिवापाड जपणारा, स्वतःच्या सुखाविषयीं अत्यंत निरिच्छ, पण समरांगणीं कर्दनकाळ असें यशवंतरावांसारखे पुरुष आपणास आपल्या इतिहासात कितीसे दाखविता येतील? त्यांच्या अंगीं दोषही होते, पण आम्हां मानवात निर्दोष असा कोण मिळेल? दोषांवर पांघरूण घालून गुणांचा उपयोग राष्ट्रकार्याकडे करून घेणारा चतुर चालक महाराष्ट्रास लाभला नाही म्हणून यशवंतरावांसारख्यांच्या कर्तबगारीचे चीज झाले नाही.''

होळकर रियासतीत अहिल्याबाईंच्यानंतर स्त्रियांनी राज्यकारभार सांभाळण्याची परंपरा पुढे सुरू राहिली. यशवंतराव होळकर यांच्या कारकीर्दीत तुळसाबाई होळकर यांचे उदाहरण ठळकपणे सांगता येईल. तुळसाबाईने यशवंतराव महाराजांच्या हयातीत त्यांच्या आजारपणाच्या काळात (इ.स. १८०९ ते १८११) आणि त्यांच्या मृत्युनंतर इ. स. १८११ ते १८१७ म्हणजे तिच्या मृत्युपर्यंत (२० डिसेंबर १८१७) लाडाबाईचा मुलगा मल्हारराव याच्या नांवें राज्यकारभार चालविला. ''तुळसाबाई जशी देखणी होतीं तशीच ती हुशार होतीं. तिच्या ठिकाणीं धैर्य, करारीपणा असें आणखी गुण होते,'' असें तिचे वर्णन सुप्रसिद्ध साहित्यिक प्रा. न. र. फाटक यांनी केले आहे. (श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, दुसरी आवृत्ती, २०१९, पृ. १४१) इंग्रजांच्या सत्तेविरुद्ध यशवंतरावांनंतर तुळसाबाईने चिवटपणे लढा दिला. त्यामुळे साहजिकच तुळसाबाई ही इंग्रज सत्तेची प्रथम क्रमांकाची शत्रू बनली होती. रणांगणावर तिला हरवणे कठीण झाले. मग इंग्रज अधिकारी सर जान मालकम याने तुळसाबाईला बदनाम करण्याचे षडयंत्र रचले. सांगीवांगीच्या माहितीवरून तुळसाबाई

ही यशवंतरावांची पत्नी नव्हती तर रखेल होती, ती बदफैली होती अशा प्रकारचा हीन अपप्रचार करण्यापर्यंत त्याची मजल गेली. एखाद्याला रणांगणावर पराभूत करता येत नसेल तर त्याला बदनाम करावे (Defeat or Defame) ही कुटील नीती इंग्रजांनी तुळसाबाईच्या बाबतीत अवलंबिली.

तुळसाबाईची राज्यकारभारावर चांगली पकड होती. होळकरांच्या मुलखात भीमाबाई (कृष्णाबाईंची कन्या) हिने चालविलेल्या उपद्रवाबाबत तिने प्रत्यक्ष आपल्या कन्येलाही जाब विचारला. यावरून नात्यागोत्याचा विचार बाजूला ठेवून राज्याविषयी असलेली तिची निष्ठा प्रकट होते. भीमाबाईला तिने पाठविलेले पत्र असें :

''अ. नं. १४४ **श्री म्हाळसाकांत**

१ जुलै १८१७

तुळसाबाई होळकर यांजकडून चि. भीमाबाई बुळे यांस विशेष : तुम्ही सरंजामासुद्धां नावडा तावडीवर मुक्काम करून राहिला. शिबंदीचे कोचवाणीत आपल्यामुळे राजश्री भारमल होळकर याजला संस्थानीं लिहून त्याजपाशीं ऐवज मागता म्हणोन समजण्यात आले. ऐसीयासी तुम्ही सरंजाम घेऊन पवाराचे महालीं गेला, त्यामुळे पवाराकडील बापू रघुनाथ तालुके चोळीकडे येऊन तेथील वरबादी करून सरंजामासुद्धा बारद्वारीसी मुक्काम करून संस्थानावर रुख दिला. पेशजी एकवेळ येऊन महालची नुकसानी केली. पुन्हा आता तुम्हाकडून त्याचे पारपत्य न होता अधिक उपद्रवाचे मात्र कारण केल्यात विशेष काय? इकडून तुमचा उपद्रव व तिकडून त्याचा. दोन्हीकडून संस्थानचे जागाची खराबी. भारमल होळकर संस्थानीं, तेथील मर्यादा राहील यात कल्याण. ती गोष्ट मनात न आणतां त्याजला कोचवण करणे हे चांगले नाही. इतःपर संस्थानी व सरकार बिजागड येथे काडीमात्र तोशीस लागू न पावता पत्र पावतांच कूच करून चिखलद्याकडे जाणें. यावर संस्थानीं कांहीं एक उपसर्ग न लागतां पुन्हा ये विसी लिहिणें न पडे ते करावे. र।। छ. २५ साबान बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

(टीप : विठ्ठलराव कानगो महेश्वरकर यांचे दफ्तर. यशवंतराव महाराज वारल्यावर मल्हारराव अल्पवयी असें जाणून भीमाबाई बुळे, धारचा मुरारराव पवार यांनी थोडेसे स्वतंत्रपणे होळकरशाही मुलखात दंगे आरंभिले होते. त्यास अनुलक्षून हे तुळसाबाई हिचे भीमाबाईस ताकीद-पत्र आहे.)

तुळसाबाईच्या मृत्युनंतर भीमाबाईने इंग्रजांशी लढा दिला. भीमाबाई ही यशवंतरावांची कन्या. तिने वडिलांच्या मार्गदर्शनाखाली तलवारबाजी, घोडेस्वारी यांचे शिक्षण घेतले होते. आपल्या पित्याप्रमाणेंच ती इंग्रज सत्तेची कट्टर शत्रू होती. इंग्रजांना आपल्या राज्याच्या सीमेबाहेरच नव्हे तर देशाबाहेर घालवावे हाच एक ध्यास तिच्या मनात सतत जागृत होता. इंग्रजांबरोबर झालेल्या महदपूर येथील लढाईत तिथे असामान्य

शौर्य गाजविले. या लढाईत इंग्रज सेनापती कॅप्टन टॉड, रायन, विकर्स हेही भीमाबाईच्या पराक्रमाने दिपून गेले. इंग्रजांना या लढाईत माघार घ्यावी लागली. यशवंतराव, तुळसाबाई आणि भीमाबाई यांच्या इंग्रज सत्तेविरूद्धच्या संघर्षाने इ.स. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाची पायाभरणी वा पार्श्वभूमी तयार करण्याचे काम केलें असें उपलब्ध ऐतिहासिक कागदपत्रें आणि घटनाक्रम यावरून निश्चितपणे म्हणता येईल.

भीमाबाई युद्धनीतीबरोबरच राज्यकारभारातही कुशल होती. तिने आपले पिता यशवंतराव यांना लिहिलेल्या पत्रावरून तिच्या या गुणवैशिष्ट्यांचा प्रत्यय येतो.

अ. नं. ७० **श्री**

जेष्ठ शुद्ध १२ ता. ८ जून इसवी सन १८०५

श्रीमंत भीमाबाई बुळे यांचे आपले वडिलांस, (म्हणजे महाराज यशवंतराव होळकरांस) पत्र. मुक्काम चेनपुरा नजीक जोधपुर मारवाडहून. विशेष. वडिली छ २६ व छ २७ माहे सफरची पत्रें पाठविली ते छ८ रविलावली पावून लेखनार्थ अवगत जाहला. त्याची उत्तरे येणेंप्रमाणें.

१ सोबती यांच्या भेटी जाहल्यावर मेवाड प्रांतीं उभयतांनीं जावे असें बोलणेंत आले त्यावरून तुम्हास कृष्णगडचे सुमारें यावयाविशीं लिहिले होते. मागून मसलतीचे अन्वयें शत्रूकडील जाबसाल एकेदेठी लागल्याखेरीज बोलो देणें ठीक नाही, असें समजून येणें महकूफ करून दोन जोड्या रवाना केल्या. त्या पावल्याच असतील. त्याप्रमाणें करणें म्हणोन आज्ञा. ऐसियासि आगोदरील पत्रांची उत्तरें पाठवून सिद्धताही केली होती. मागून महकुफीची पत्रें आली त्यावरून स्थिरता केली. पुढें जशी आज्ञा येईल तैसे केलें जाईल. कलम

२ घाणेरियाचे जमियतीविशीं अगोदर पत्रें पाठविली होती तेथें गुजारा चालून निरवाह घडत असल्यास राहिली तरी चिंता नाही. तेथें गुजारा होत नसल्यास परस्थलीं राहून बखेडा करावा हे चांगले नाही. अर्जुन पलटन व शिलेदार याची रवानगी करणे. पुढें तुम्हास बोलावून घेणें तेव्हां आणखी फौज पाठविली जाईल म्हणोन आज्ञा ऐसियासि. आगोदर वडिलीं पत्रें पाठविली ते येताच येथून राजश्री आप्पाजी परशराम यांजला रवाना करून चिरंजीव चेनसिंग यांस वडिलांचे आज्ञेप्रमाणें दोहीं वकिलांची रवानगी करावयाविशीं पत्रें लिहून दिल्ही. मशारनिल्हे तेथें गेल्यावर राजाजीकडील कारभारी राजश्री साहेबचंद यांनीं महालोभ दाखवून ठेऊन घेतले आलीकडे घाणेरियाचा ठाकूर चेनसिंगाचे बहादुरीने भेटून जागा सोडून निघोन गेला. ठाणे राजाचे कायम झाले. तेव्हां परदेशी फौजेस निरोप देतात आपलेही फौजेचा जाल्या दिवसांचा निर्गम करून देऊन पलटन व शिलेदार यांजला मेडत्यावरून स्वारीत रवाना करून देऊन चेनसिंगानीं येथें यावे ऐसे

ठेरावून राजाजींनी आपले कारभारी यांस पत्र लिहून पाठविले. येथूनही चेनसिंगास पत्र सदरू अन्वयें लिहून त्याजकडील कारकुन रा. बाबाजी रामचंद्र यांची रवानगी केली. तेथील जाबसाल तुटक जाहला. तेव्हां निष्कारण जमियत ठेऊन घेऊन बखेडा करावा हे चांगले नाही. शिलेदार व अर्जुन पलटणचे लोकांत आळा बसोन अथवा रीतभात मर्यादा कांहीं राहिलीच नाही. याजकरितां रवाना करावयाविशीं लिहिलें आहे. तेथें घडेल तैसे मागाहून लिहून पाठऊं.
कलम

३ येथील संस्थानिकास घरची मसलत उभी राहून दिडवाणे ठाणें घेऊन दौलतपुरी यांस मोर्चे लाविले. हे वर्तमान येताच त्यांनीं आपली फौज रवाना करून आपल्याकडीलही फौज रा.जिवलालसिंग याजकडून जावी याअन्वयें येथें बोलून त्यांनी आपले खलिते व आमची पत्रें घेऊन वडिलांकडे दोन तीन रवानग्या लगट केल्या. ते पत्र पावल्यावर घरोब्याचे रीतिनें ते किती जपतात तेव्हां आपण उपराळा करावा हे उचित जाणोन रा.कृष्णाजी महाडिक यांची कंपूसह रवानगीकरून राजश्री जिवलाल सिंग यांजकडे राजश्री बलवंत साबाजी यांजला पाठवून इकडे खलित्यांचे जाब व आमचे पत्राची उत्तरें पाठविली. ते आल्यापूर्वीच सेखावटीतील जमियत आली होती. त्याची व राजाजींचे जमियतीची लढाई होऊन सेखावटीची जमियत सिकस्त खाऊन निघोन गेली. दिडवाणेस ठाणे यांचे कायम जाले. यांची फौज तिकडेच आहे. तूर्त आपले फौजेचे प्रयोजन नाही. काम लागल्यास बोलावून घेऊ. परवानगीचा अक्षेप न घेत अशी आज्ञा असावी. याअन्वयें येथें बोलण्यात आणून वडिलांचे खलित्याचा जाब लिहून रवाना केला. त्याअन्वयें येथून ही राजश्री कृष्णाजी महाडिक व जिवलालसिंग व बळवंतराव साबाजी यांजला जेथील तेथेंच असावे याभावी पत्रें लिहून रवाना केली. वडिलींही तेथून लिहावे. कलम

४ तेथील प्रासंगिक मजकूर लिहिला तो समजला. आजपर्यंत इंगळे यांजकडील ऐवज वसूल होऊन पुढील बेत कूच मुक्कामाचा ठरला असेल त्याप्रमाणें लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. कलम

५ रामपुरियास पेस्तर साल ऐवजीं वरात तीन लक्षांची कोठारी यांचे नांवें करून पाठविली ते पावली. गिरमाचे विद्यमाने महालीं रवाना करून तगादा लावितो ऐवज येईल तैसे लिहून पाठऊं. कलम

६ येथील सर्व मंडळी लहानथोर कुशलरूप आहेत. वडिली काळजी न करिता तिकडील साद्यंत लेखन करीत असावे. कलम

७ चौकी पाहारियाचा जाबता वर्दीप्रमाणे यथास्थित आहे. कलम

एकूण सात कलमें मनन करून उत्तराची आज्ञा केली पाहिजे. सेवेशी श्रुत होय

हे विज्ञापना.

पैवस्त छ २० रविलावल सन १२१५ फसली.

(खंड चार, होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें, पत्र क्र. ६८, पृष्ठ ४८-५०)

भीमाबाईनंतरही राज्यकारभार सांभाळण्याची परंपरा थांबली नाही. नंतरच्या काळातही स्त्रिया राजकारण, प्रशासन, धार्मिक कृत्ये यात लक्ष घालीत, कारभारी लोक त्यांस वचकत, हे दिसून येते. धर्मकृत्यात राजपुरुष, राजस्त्रिया व त्यांचे सल्लागार तात्काळ लक्ष घालीत. श्री क्षेत्र महेश्वरी देवावर मद्याभिषेक झाला हे कळताच त्याची दुरुस्ती लगेच झाली. इंग्रज अधिकारीही महत्त्वाच्या बाबतीत घरातील कर्त्या स्त्रीचा सल्ला घेत ही बाब श्रीमंत कृष्णाबाई मासाहेब यांच्या बाबतीत हामिलटनसाहेबांनी अवलंबिली होती. याबाबतीत श्री. ठाकूर यांनी केलेंली नोंद महत्त्वाची आहे. ते म्हणतात,

''तसेच महत्त्वाच्या बाबतीत श्रीमंत कृष्णाबाई मासाहेब यांचा सल्ला घेण्याची पद्धत हामिलटनसाहेबांनीं ठेविली होती. विशेषतः ज्या प्रकरणात फणशांचा कांहीं संबंध आणि तोही घरगुती बाबतीत उद्‌भवे तेव्हां मासाहेबांचा सल्ला घेण्यास रेसिडेंटसाहेब विसरत नसत. हा सल्ला राज्यकारभाराचे धोरण ठरवितांना रेसिडंटसाहेबांस अनेक वेळीं उपयोगी पडला.''

(खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण १९ वें, पृष्ठ २४६)

कृष्णाबाईसंबंधीचा आणखी एक उल्लेख त्यांच्या सर्वमान्य व्यक्तिमत्त्वाचे स्वरूप प्रकट करतो.

''मासाहेब लोकप्रिय होत्या. लष्करांत काय किंवा लोकांत काय त्यांच्याबद्दलचा आदर मोठा होता. श्रावणमासची दक्षिणा वाटण्याचा प्रघात होळकर राजवटींत पुरातनाचा होता. एक श्रावणमासांत असा प्रसंग गुदरला कीं, वाड्यांत अतोनात गर्दी जमली. चेंगराचेंगरी झाली. अनेकांस दुखापती झाल्या. त्यामुळें मासाहेबांस दोनचार दिवस अन्न गेलें नाहीं. आजारी लोकांचे शुश्रुषेस स्वतः लागल्या. अनाथ बायांस व पोरांस द्रव्यसहाय केलें. श्री देवी अहिल्याबाईसाहेबांचा दानधर्म अव्याहत चालावा याबद्दल त्या फार दक्ष असत.''

(खंड दोन, होळकरशाहीच्या इतिहास, प्रकरण १९ वें, पृष्ठ २४८)

होळकरशाही ही मराठेशाहीचे एक महत्त्वाचे अंग होती. मराठा साम्राज्याचा एक आधारस्तंभ होती. इ. स. १८१८ मध्ये पेशवाई अस्तंगत झाली. त्यावेळी होळकरशाहीवरही अनेक संकटांची मालिका होती. पण विठ्ठल महादेव किबे उर्फ तात्या जोग यांनी होळकरशाहीचे राज्य सावरले आणि अहिल्याबाईंनंतर घसरलेल्या राज्यकारभारात लक्षणीय सुधारणा केल्या. श्री. वा. वा. ठाकूर याबाबत म्हणतात,

''होळकर राजवट मराठेशाहीचे एक विशिष्ट अंग म्हणून जन्मास आली. एक शतकभर ती कामगिरी यथाशक्ती व यथामती बजावली. या राजवटीची अंगें व उपांगें आपण पाहिली. शास्ता कोणी न राहिल्यामुळें बजबजपुरी माजली. ही झाली घरची स्थिती. मराठेशाहीचे प्रमुख चालक कर्तव्यपराङ्मुख झाले. त्या शाहीच्या इतर अंगांतूनही पूर्वीचे तेज राहिलें

नाही. मुख्य ''पेशवाई'' अस्तंगत झाली. त्यावेळीं होळकरशाहीही अस्तंगतच व्हायची. पण पूर्व पुण्य उभे राहून कालानुरूप (तात्या जोग यांच्या रूपात) योग्य कर्ता पुरुष पुढें उभा राहिला आणि पडती इमारत त्यानें सावरून धरली. इतकेच नव्हे; तिच्यात डागडुजी करून नवजीवन ओतले. सारांश, होळकर राजवटीचे गंडांतर दूर करणारा तो धन्वंतरीच भेटला असें म्हणतां येईल.''

(खंड दोन, होळकरशाहीच्या इतिहास, प्रकरण १६ वें, पृष्ठ २०२)

हिंदू-मुसलमान हा प्रश्न तत्कालीन राजवटीत नव्हता. हा प्रश्न राज्यकर्ते तत्परतेने आणि योग्य प्रकारे हाताळीत. धार्मिक विधींच्या बाबतीतही विधी, अनुष्ठान करणाऱ्या ब्राह्मणांच्या चारित्र्याबद्दल काटेकोर कटाक्ष असें. पुढील उताऱ्यावरून ही बाब स्पष्ट होईल.

''हिंदू-मुसलमानांचा मंदिर-मसजिदीबद्दलचा प्रश्न मिटवलेला आहे. अनुष्ठानें, दान, इनाम, आरोग्यसंपादन इत्यादि धार्मिक वृत्तीची अनेक अंगे दिसून येतात. अनुष्ठानाकडे असलेले ब्राम्हण सदाचारी असावे याबद्दल कटाक्ष.''

असाच एक उल्लेख श्रीमंत पंतप्रधान पाहिले बाजीरावसाहेब यांचेही पत्रात आहे. तसेच, अनुष्ठानाचे ब्राम्हणाची बदली दरमहा करावी असाही उल्लेख आहे. हेतू हा की सर्व ब्राम्हणांचे पालन-पोषण होऊन, वशिल्यास आळा पडावा.''

(खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण १६ वें, पृष्ठ २०६)

हरीराव होळकर यांच्या कारकीर्दीत दुय्यम प्रतीच्या अधिकारावर माणसे नेमण्याचा प्रघात इ. स. १८४० पासून सुरू झाला. नेमणूक करताना अधिकाऱ्यांच्या नेमणूक पत्रातच आपले काम इमानदारीने, चोखपणे करण्याचा आणि कुठल्याही प्रकारचा गैरव्यवहार वा भ्रष्टाचार न करण्याचा इशारा असें. ही बाब वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे. या नेमणूक पत्रांमधील कांहीं वाक्ये पहाण्याजोगी आहेत.

१. दरमहाशिवाय कोणतेही गोष्टींचा मतलब न ठेवितां तुम्ही लिहिण्याचे काम बहुत दुरुस्त ठेवून मुकदम्याचे कामाचे कागदपत्राचे बहुत हुशारीनें करीत जाणें. (ता. १९-७-१८४०)
२. शहरचे चोरीचा बंदोबस्त चांगला ठेऊन कामकाजांत रिश्वत कोणाकडून न घेतां, दरमाहाशिवाय कोणतेही गोष्टीची गरज न ठेवता अंमल करणें. (ता. १९-७-१८४०)
३. तुम्ही मुनशीगिरीचे काम हुशारीनें व खबरदारीनें करीत जाणें बेमुनासिब कामापासून दूर राहणें. तनखेशिवाय कोणे गोष्टीची दरकार न ठेवितां सदरीं लिहिल्याप्रमाणें आमलांत आणावे. (ता. ६-१२-१८४०)
४. दफ्तरची दुरुस्ती ठेऊन काम करीत जाणें. तनखेशिवाय कोणतेही गोष्टीची गरज ठेऊं नये. गफलत व सुस्ती न ठेवितां काम करीत जाणें. (ता. १-२-१८४१)

इ. स. १७०८ हे मराठ्यांच्या इतिहासातील महत्त्वाचे वर्ष आहे. औरंगजेबाच्या

मृत्युनंतर मोगल सत्ता खिळखिळी झाली. शिवाजी महाराजांनी स्वराज्यात हिंदुपदपातशाही निर्माण केली. इ. स. १७१८ मध्ये मराठ्यांनी नर्मदा ओलांडून दिल्ली गाठली. मोगलाईचा ऱ्हास आणि मराठ्यांचा उत्कर्ष हे एकाच काळात घडले. मोगल राजवटीने त्रस्त झालेल्या भरतखंडातील लोकांना नव्या विशाल दृष्टीच्या राजशक्तीची गरज होती. ती शिवरायांच्या रुपाने लाभली. शिवरायांना संत तुकाराम, समर्थ रामदास या संतांच्या आध्यात्मिक विचारांचा वारसा लाभला होता. ही भौतिक आणि आध्यात्मिक दृष्टी एकमेकांना पूरक झाली. शिवरायांच्या या परंपरेचे उत्तरेकडील वारसदार म्हणजे होळकर राजवटीचे आद्य पुरुष मल्हारराव होळकर होत. मल्हाररावांचे उत्तरेकडील कार्य म्हणजे शिवरायांच्या हिंदवी संस्कृतीचे विस्तारीत रुप होय.

''मल्हाररावांनीं घालून दिलेला पाया पुढील राजकर्त्यांनीं किती वर्धिष्णु केला याचे विवेचन म्हणजेच भारतीय इतिहासात होळकरांचे स्थान ठरविणें होय,'' असे मत वा. वा. ठाकूर यांनी व्यक्त केले आहे. मल्हाररावांच्या कार्याचे मर्म उलगडून सांगताना ते म्हणतात,

''मल्हारजींचा पाय नेहमी रिकेबीत असें. जमिनीवरील लढायांत आणि समुद्रावरील लढायात त्यांनीं क्षात्रतेज चांगलेच चमकविले. पण ते केवळ आडदांड लढवय्ये नव्हते. मनसुब्यांचे कार्यास त्वरेस मोल आहे'' हे जाणून उमजून ते उत्तम मुत्सद्दीही झाले होते. योद्धा आणि मुत्सद्दी या गुणांनीं अलंकृत झालेले मल्हारजी हे लहानाथोरांचे सर्वतोमुखीं ''भीष्माचार्य'' झाले होते.''

(खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण २९ वें, पृ. ३६८-३६९)

मल्हाररावांचा हा वारसा अहिल्याबाईंनी आपल्या पवित्र चारित्र्याने, मुत्सद्दीपणाने आणि सत्त्वशील प्रवृत्तीने समर्थपणे पुढें चालविला. लोकांनी त्यांना ''देवी'' अशी उपाधी उत्स्फूर्तपणे दिली.

छत्रपती शिवाजी महाराजांनी मराठ्यांच्या अंमलाखालील प्रदेशात विद्या, तीर्थस्थाने पुनरुज्जीवित केली आणि महाराष्ट्र धर्म प्रस्थापित केला. अहिल्याबाईंनी त्यापुढें पाऊल टाकले. आपल्या राज्याबरोबरच 'अवघा भरतखंड हे माझे घर' असें समजून भारतात सहाशे वर्षांच्या परकी आक्रमणाने हिंदु संस्कृतीत जे दौर्बल्य आले होते ते आपल्या तीस वर्षांच्या राजवटीत शांततेच्या मार्गाने दूर केलें. अनेकविध लोकहिताची आणि संस्कृतीसंवर्धक कामे करून भारतीय संस्कृतीचा प्रवाह पुन्हा वाहता केला.

वा. वा. ठाकूर यांनी म्हटले आहे,

''हें विश्वचि माझे घर'' ही ज्ञानेश्वरांची वाणी मातोश्रींच्या वृत्तींत बाणल्यामुळें त्यांनीं ''धर्म'' म्हणून जे काम केलें ते आधुनिक भाषेत सांगांवयाचे तर नॅशनल रिलीजन, रॅशनल रिलीजन आणि युनिर्व्हसल ब्रदरहूड ह्या सर्व शब्दांत प्रविष्ट होऊन आणखी कांहीं उरतेच. जीजस खाईस्ट यांच्या शब्दात, ''ब्लेसड् आर द पीस मेकर्स (Blessed are the peace makers.)''

(खंड एक, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण २५ वें, पृ. २२२)

अर्थशास्त्रात सकळ राष्ट्रीय उत्पन्न ही एक संकल्पना आहे. मात्र यापेक्षा वेगळी अशी 'ग्रॉस नॅशनल हॅपिनेस ही संकल्पना अलीकडे मांडली जावू लागली आहे. राष्ट्राच्या एकूण लोकसंख्येचे सामूहिक सुख आणि कल्याण यांचे शास्त्रीयदृष्ट्या मोजमाप करून ही संकल्पना त्या राष्ट्रात कितपत रुजली आहे याबाबतचा विचार म्हणजे 'ग्रॉस नॅशनल हॅपिनेस'. हा दृष्टीकोन देशाच्या प्रगतीकडे समग्रतेने आणि मानवतावादी नजरेने पाहतो.

या प्रगतीच्या वा विकासाच्या विचारात शाश्वत, संतुलित, सर्वसमावेशक सामाजिक नि आर्थिक विकास, पर्यावरणाचे रक्षण, संस्कृतीची जपणूक, सुशासन, मानसिक नि शारीरिक आरोग्य, वेळेचा सदुपयोग, शैक्षणिक विकास अशा अनेक बाबींचा समावेश आहे. या बाबी जिथे साध्य होतात त्या देशातील लोकांच्या चेहऱ्यावर सुख आणि आनंद दिसतो. समाजाच्या वर्तनातून, कृतीतून तो व्यक्त होतो. सारांशाने सांगायचे तर लोकांना परिपूर्ण जगण्याचे खरे सूत्र सापडले आहे, असें म्हणता येते.

या सर्व बाबी २५० वर्षांपूर्वी अहिल्याबाई होळकर यांच्या राज्यात अस्तित्वात होत्या आणि 'ग्रॉस नॅशनल हॅपिनेस' या संकल्पनेतील सुख आणि आनंद त्यांच्या राज्यात, लोकमानसात होता असें निश्चितपणे म्हणता येते. अहिल्याबाईंच्या काळात ही संकल्पना आजच्या परिभाषेत माहीत नसेलही पण तिचे अस्तित्व मात्र सर्व परींनी होते, यात तिळमात्रही संदेह नाही.

''अहिल्याबाईंनंतर तुकोजीराव, प्रथम यशवंतराव, तुळसाबाई, भीमाबाई, कृष्णाबाई, हरीराव, दुसरे तुकोजीराव आणि नंतरच्या राज्यकर्त्यांनी प्रजेचे मायबाप (guardian of the people) ही भूमिका जबाबदारीने निभावली. आपल्या राज्यापुरता विचार न करता अखिल भरतखंडाची सेवा केली, असें निश्चितपणे म्हणता येते. म्हणूनच ''हिंदुस्थानच्या इतिहासात होळकर राजघराण्याचे स्थान उच्च व अढळ आहे.'' हे वा. वा. ठाकूर यांचे उद्गार अगदी सार्थ वाटतात.

न्यायमूर्ती म. गो. रानडे यांनी होळकर रियासतीच्या राजवटीबाबत, विशेषतः द्वितीय तुकोजीराव यांच्या कारकीर्दीबद्दल गौरवोद्गार काढले आहेत. त्यांनी तुकोजीरावांच्या प्रशासकीय शिस्तीची तारीफ करतानाच त्यात कोणती भर घातली पाहिजे याबाबतही स्पष्ट दिग्दर्शन केलें आहे.

''(१) जनतेस मान्य व जबाबदारीची जाणीव असलेला असाच कारभारी (दिवाण) असावा. (२) मंत्रिमंडळ असावे. यात सर्व खात्यांचे मुख्य मुख्य अधिकारी तर असावेच, पण त्यांचे जोडीस जनतेचे पुढारीही बसावेत. (३) जमीन-महसूल व इतर उत्पन्नाच्या बाबी त्या त्या शास्त्रांच्या तत्त्वानुसार ठरविल्या जाव्या. (४) खासगी व दौलत या बाबी अलग अलग विवेकपूर्वक ठरवून द्याव्या. (५) मुलकी, लष्करी, न्यायदान व अंमजबाजवणी ही खाती एकमेकांपासून अलग व स्वतंत्र असावीत. या खात्यातील अधिकारी नेमावयाचे ते संस्थानांतील प्रजाजनांपैकीं असून त्यांच्या परीक्षा घेतलेल्या असाव्यात. (६) कायदे

लिखित, प्रसिद्ध केलेंले असावे. (७) वार्षिक जमाखर्च प्रसिद्ध होऊन जाहीर झाले पाहिजेत. (८) सरदार, जहागिरदार, इत्यादि वरिष्ठ वर्गाचे हक्क, मानमरातब राखण्याकडे लक्ष व पाळण्याचे धोरण असावे. राज्याशी जडलेले त्यांचे हितसंबंध अबाधित राखण्याचे ध्येय व धोरणे असावीत. (९) स्थानिक पंचायती, जूरर्स, म्युनिसिपालिट्या व तालुका यांच्या दैनंदिन चालणाऱ्या कारभारात जनतेस चढता-वाढता अधिकार सुप्रत करावा. (१०) या मार्गाचा अवलंब केल्याने प्रजेचा संतोष व आबादी तर लाभेलच पण राजकारणाच्या व्यावहारिक शिक्षणाचा प्रसार होऊन जनतेस इष्ट व हितकारक स्वातंत्र्य लाभत जाईल, हा मोठाच उत्कर्ष होईल. (११) हा मार्ग चोखाळल्याने एतद्देशीय राज्ये ब्रिटिश राज्यास मार्गदर्शक तर होतीलच. पण एकंदर भारतवर्षाचे सौभाग्य वाढविण्याचे श्रेय संपादतील यात संशय नाही.'' (खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण २९ वें, पृ. ३७२-३७३)

मंदसोरच्या तहाने (ता. ६ जानेवारी १८१८) हिंदुस्थानातील राजकीय चित्र पूर्ण बदलून गेले. युद्धाचे, सैन्याचे अधिकार इंग्रज सरकारच्या हाती गेले. इथल्या राजवटी इंग्रजांच्या अधिपत्याखाली आल्या. त्यांचे स्वातंत्र्याचे अधिकार नाहीसे झाले.

वा. वा. ठाकूर यांनी या स्थितीचे वर्णन करताना म्हटले आहे,

''एका शतकांत म्हणजे इ. स. १७१८ ते १८१८ या काळात जे कांहीं कमावले होते, जी घटना अंतर्बाह्य घडवून आणली होती ती आता येथें विराम पावली. बुद्धीची आशा आणि दिशा खुंटली. हा या तहाचा परिणाम झाला.''

(खंड दोन, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण १४ वें, पृ. १७६)

होळकरशाहीच्या इतिहासाचा पट सूत्ररुपाने असा मांडता येईल :

मल्हारराव : स्थापना, पायाभरणी
अहिल्याबाई : सुसंघटित, प्रगत लोकाभिमुखी राज्य
तुकोजीराव : उतरता आलेख
यशवंतराव : स्वातंत्र्यवीर, अस्तित्त्वाची लढाई
दुसरे तुकोजीराव : आधुनिक सुधारणा

होळकरशाहीच्या इतिहासाचा मागोवा घेताना एक महत्त्वाची बाब अधोरेखित होते, ती म्हणजे हिंदवी स्वराज्याचे संस्थापक छत्रपती शिवरायांचा युद्धनीतीविषयक वारसा मल्हारराव होळकर यांनी पुढे चालवला तर लोकल्याणकारी प्रशासनाचा वारसा अहिल्याबाई होळकर यांनी पुढे चालवला. छत्रपतींचा 'गनिमी कावा' ही युद्धनीती समर्थपणे राबवली ती फक्त मल्हाररावांनी. 'रयतेचे राज्य' असें शिवरायांनी म्हटले आणि 'हे राज्य व्हावे ही श्रींची इच्छा' अशा शब्दात त्यांनी आपल्या राज्याला ईश्वरी अधिष्ठान दिले. अहिल्याबाईंनीही 'लोकांचे राज्य' ही कल्पना राबवून आपले राज्य शिवशंकराला अर्पण केलें आणि राज्यावर तुळशीपत्र ठेवून निर्मम भावनेने राज्यकारभार सांभाळला.

श्री. वा. वा. ठाकूर म्हणतात,

''मातोश्रीसाहेबांची कारकीर्द अधिक स्वस्थतेची होती. शांतता आणि सुराज्य यांनीं लक्ष्मीची प्राप्ती करून दिली असेच म्हणणें रास्त होईल. तीस वर्षाच्या कारकीर्दीत हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं दुष्काळ पडण्याचा उल्लेख कागदोपत्रीं सापडतो. मेजर ल्युअर्ड साहेबांनी मध्य हिंदुस्थानासंबंधीं जें टिपण तयार तयार केले होतें त्यांत त्याच कालांत व कारकीर्दीत राजपुताना व बुंदेलखंड येथें दुष्काळ पडण्याचा उल्लेख केलेला आहे. मात्र मातोश्रीसाहेबांच्या कारकीर्दीत या तीस वर्षांच्या कारकीर्दीत कोठेंही दुष्काळ पडल्याचा उल्लेख नाही. हा दुष्काळ ओला असू शकेल तसाच कोरडाही असूं शकतो.''

(खंड एक, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण २३ वें, पृ. १८२)

आदर्श राज्याचे सर्व घटक अहिल्याबाईंच्या राज्यकारभारात होते. श्री. वा. वा. ठाकूर यांच्या उद्‌गारातून ही बाब ठळकपणे अधोरेखित होते. ते म्हणतात,

''आजूबाजूस सर्व भारतखंडभर लढाया व अशांततेचे वारे वाहत असतां आपल्या प्रजेस त्यांनीं सुखशांतीची छाया दिली. विद्वानांस आश्रय दिला. कलावंतांस पोशिलें, प्रजेस न्याय दिला व निश्चिंत केलें. अधिकारी वर्गास दबावांत ठेविलें व वरचढ होऊं दिलें नाहीं.''

(खंड एक, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण २९ वें, पृ. २९६)

आपल्या परंपरेनुसार राज्यकर्त्याच्या ठायी सर्वधर्मसमभाव असावा, हे तत्त्व सर्वमान्य झालेले आहे. या बाबत लिहिताना वा. वा. ठाकूर यांनी म्हटलंय,

''राज्यकर्ती व्यक्ती सर्व धर्मांस, सर्व पंथांस आणि सर्व सांप्रदायांस समदृष्टीनें पाहणारी असावी हे आर्य राजनीतीचे एक अंग आहे. सम्राट अशोक, विक्रमादित्य, हर्षवर्धन, छत्रपती शिवाजी महाराज यांनीं याप्रमाणें वागणूक ठेवली. समानदृष्टीनें धर्मसंरक्षण व संवर्धन हे आर्य राजनीतिचे एक अंग. अहिल्या मातोश्रींनीं ते अंग यथासांग पाळिलें.''

(खंड एक, होळकरशाहीचा इतिहास, प्रकरण २५ वें, पृ. २१८-२१९)

हा सर्वधर्मसमभाव हे अहिल्याबाईंच्या राज्यकारभाराचे महत्त्वाचे अंग होते. शिवरायांच्या धर्मातीत विचारांचा वारसा खऱ्या अर्थाने पुढे चालवला, वृद्धिंगत केला तो फक्त अहिल्याबाईंनीच. मराठेशाहीच्या वाटचालीत छत्रपती शिवराय ते देवी अहिल्याबाई ही एक महत्त्वपूर्ण सुवर्णरेखा आहे.

अडीचशे वर्षांपूर्वी स्त्रियांचे समाजातील स्थान दुय्यम स्वरूपांचे होते. त्यांना घरातून बाहेर पडण्याचीही परवानगी नव्हती. चूल आणि मूल हेच त्यांच्या आयुष्याचे भागधेय होते. अशा काळात तीस वर्षे एका स्त्रीने राज्यकारभार सांभाळणे हे भारताच्या इतिहासातील एक अतिशय आगळेवेगळे उदाहरण होते. राजा वा राणीला राज्यप्रमुख म्हणून आदर, सन्मान असणे ही बाब नेहमीची आहे. पण आपल्याच हयातीत लोकांनी राज्याच्या राणीला 'देवी' मानणे ही घटना दुर्मीळ आहे. म्हणूनच अहिल्याबाईंच्या लोककल्याणकारी आणि लोकहितकारी कामाची कीर्ती अवघ्या भरतखंडात आणि परदेशातही पोहोचली होती.

होळकरशाहीतील प्रमुख राज्यकर्ते मल्हारराव होळकर, अहिल्याबाई होळकर आणि यशवंतराव होळकर यांच्या कारकीर्दींचे योग्य मूल्यमापन ठाकूर यांनी केलें आहे. होळकरशाहीचे संस्थापक मल्हारराव, कल्याणकारी प्रशासक अहिल्याबाई आणि होळकरशाहीला शत्रूच्या घशात जाता जाता वाचविणारे यशवंतराव यांचे चित्रण अतिशय प्रभावी आणि मर्मग्राही आहे.

शिवरायांच्या हिंदवी स्वराज्याचा विस्तार म्हणजे हिंदुस्थानात पसरलेले मराठा सत्तेचे साम्राज्य. मल्हारराव यांची निष्ठा पेशव्यांच्या गादीशी म्हणजे पर्यायाने शिवरायांच्या शिवशाहीशी होती. पण थोरले बाजीराव आणि थोरले माधवराव यांचा अपवाद वगळता पेशव्यांना शिवशाहीतील सर्वस्पर्शी लोकाभिमुख व लोककल्याणकारी राज्याच्या धोरणाचा विसर पडला आणि त्यामुळेच अखेर पेशवाईचा अंत झाला.

खरं तर शिवरायांच्या इतकेच कणखर आणि सत्त्वशील व्यक्तिमत्त्व अहिल्याबाईंच्या रूपाने समोर असताना पेशव्यांनी त्यापासून बोध न घेता आपली स्वामीत्वाची भूमिकाच अधिक बजावली. पेशवाईने शिवशाही आणि होळकरशाहीची तत्त्वे अवलंबिली असती तर पेशवाईचा वा मराठा सत्तेचा अंमल हिंदुस्थानात आणखी किमान शंभर वर्षे तरी राहिला असता, असे म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाही.

धार्मिक कर्मकांडे, व्रतवैकल्ये यांचा अतिरेक, गृहकलह, जीवघेणे राजकारण, स्वार्थी मनसुबे, अखेरच्या पर्वातील आत्यंतिक विलासीपणा, बेजबाबदारपणा या सर्वांचा एकत्रित परिणाम म्हणजे पेशवाईची अखेर. हा शेवट पेशवाईचा होता म्हणजे पर्यायाने मराठा सत्तेचा होता. मराठा सत्तेच्या इतिहासात इ. स. १८१८ हे वर्ष काळेकुट्ट होते. छत्रपती शिवरायांनी इ. स. १६४६ मध्ये स्थापन केलेंले हिंदवी स्वराज्य एकशे बहात्तर वर्षांनी म्हणजे इ. स. १८१८ मध्ये लयाला गेले.

न्यायमूर्ती रानडे, यदुनाथ सरकार, गो. स. सरदेसाई या इतिहासकारांनी मराठेशाहीच्या इतिहासाबाबत मौलिक लेखन केलें आहे. होळकरशाहीचे इतिहासलेखक सर्वश्री वा. वा. ठाकूर, द. ब. पारसनीस, अ. ना. भागवत, य. न. केळकर, का. ना. साने या सर्वांनी होळकरशाहीच्या इतिहासाबाबत अनेक परींनी लेखन केलें आहे. यात राजकीय इतिहास, इतिहासाची साधने (पत्रसंग्रह), बातमीपत्रे, कैफियती आदी विविध विषयांचा समावेश आहे.

श्री. वा. वा. ठाकूर यांची भाषा ओघवती आहे. होळकर रियासतीतील मल्हारराव, यशवंतराव, अहिल्याबाई आणि दुसरे तुकोजीराव यांच्या कारकीर्दीचा आढावा त्यांनी सविस्तरपणे घेतला आहे. आपल्या निवेदनाच्या पुष्ठ्यर्थ त्यांनी अनेक उदाहरणे दिली आहेत. ''मल्हारराव आणि होळकर राज्यकर्त्यांचे बहुमुखी कर्तृत्व म्हणजे हिंदुस्थानच्या पुनर्घटनेचे कार्य होय'', हे वा. वा. ठाकूर यांनी प्रतिपादन केलेले ऐतिहासिक वास्तव अतिशय यथार्थ आणि महत्त्वपूर्ण आहे. काळाचे विश्लेषण करताना त्यांनी कालखंड पाडले आहेत. मल्हाररावांची कारकीर्द म्हणजे विजयकाल, अहिल्याबाईंची कारकीर्द म्हणजे विनयकाळ, यशवंतरावांची कारकीर्द म्हणजे संघर्षकाळ, द्वितीय मल्हारराव होळकर, मार्तंडराव होळकर,

हरीराव होळकर आणि खंडेराव होळकर यांच्या कारकीर्दी म्हणजे विराम काळ आणि द्वितीय तुकोजीराव होळकर यांची कारकीर्द म्हणजे विक्रम काळ असे प्रमुख कालखंड त्यांनी अधोरेखित केले आहेत.

श्री. वा. वा. ठाकूर यांनी हा ग्रंथ लिहिताना होळकरांचा पत्रव्यवहार, होळकर सरकारचे हुजूर फडणीसी दप्तर, हुजूर चिटणीसी दप्तर, सरदार मंडलोई, कानगो, चंद्रचूड यांची दप्तरे, महेश्वर दरबारची बातमीपत्रें, होळकरांची कैफियत ही बखर, गो. स. सरदेसाई कृत मराठी रियासत, खरेशास्त्रीकृत ऐतिहासिक संग्रह, इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांचे ऐतिहासिक ग्रंथ, पुणे दरबारचे रेकॉर्ड आदी कागदपत्रें आणि संदर्भग्रंथ यांचा अभ्यास केला होता. त्याबरोबरच डॉ. फ्रेझर, मेजर ई बेल, लिऑन ब्लीज, जस्टीस किंकेड आदी परदेशी अभ्यासक आणि इतिहासकारांच्या लेखनाचा मागोवा घेतला होता. बॉम्बे गॅझेटियर, ज्ञानकोष, चॅरिटेबल स्ट्रस्ट, देवस्थान लिस्ट असें अनेक कागदपत्र त्यांनी अभ्यासले होते.

या खंडांचे संपादन करतांना या पूर्वसूरींच्या विचारांचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे.

ऐतिहासिक कागदपत्रांमध्ये फारसी, उर्दू, पोर्तुगीज, कन्नड आणि इंग्रजी शब्द येतात. त्यामुळे ती भाषा भेसळयुक्त होते. मूळ मराठी शब्द अपभ्रंश स्वरूपात लिहिलेले असतात. त्यामुळे ती भाषा समजून घेणे अवघड जाते. या ग्रंथातही तत्कालीन भाषेचा आविष्कार झाला आहे. त्यात मराठीबरोबरच हिंदी, उर्दू, फारसी, हिंदी आदी भाषांतील शब्द येतात. यातील मराठी भाषा हिंदी वळणाची असून मराठीवर हिंदी भाषेचा पगडा आहे, याच्या खुणा जागोजाग दिसतात. निवेदनाचा मूळ ढाचा कायम ठेवला आहे. द्विरूक्ती झालेल्या आणि अन्य आवश्यक ठिकाणी शब्द आणि व्याकरणदृष्ट्या योग्य ते व आवश्यक ते किरकोळ बदल केले आहेत. अभ्यासाच्या दृष्टीने अधिक सोयीस्कर व्हावे म्हणून भाग पहिला व भाग दुसरा एकत्र करून प्रकरण क्रमांक सलग घेतले आहेत. मूळ ग्रंथांत नसलेली विविध प्रकारची माहिती परिशिष्टांच्या रूपाने दिली आहे. याशिवाय आकलनाच्या सुलभतेकरिता शब्दार्थ/टीपा, संदर्भग्रंथ सूची अशा विशेष बाबी जोडल्या आहेत.

होळकरशाहीच्या इतिहासाचे दोन खंड अनुक्रमे इ. स. १९४४ आणि इ. स. १९४६ या वर्षी होळकर सरकारांच्या कारकीर्दीत इंदूर येथून प्रसिद्ध झाले होते. त्यानंतर दीर्घ कालावधी उलटला आहे. या ग्रंथांच्या प्रती ठरावीक लोकांकडेच होत्या. बहुसंख्य अभ्यासकांना या ग्रंथांची उणीव जाणवत होती. या नवीन आवृत्तीमुळे ही मोठी उणीव दूर होईल असा विश्वास वाटतो.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष श्री. बाबा भांड यांनी होळकरशाहीच्या समग्र इतिहासाचा प्रकल्प संपादनासाठी माझ्याकडे सोपविला त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. या ग्रंथांचे आवश्यक त्या ठिकाणी संपादन करून हे काम विहित कालवधीत पूर्ण करता आले याबाबत समाधान वाटते. या कामी अनेक नामवंत इतिहासकार, अभ्यासक, संशोधक, प्रकाशक, रसिक आणि सुहृद यांचे अनेक परींचे सहकार्य लाभले, हे

कृतज्ञतापूर्वक नमूद करतो.

मा. जयसिंगराव पवार (कोल्हापूर), प्रा. सु. प्र. कुलकर्णी, डॉ. लीला गोविलकर (अहमदनगर), प्रा. ना. ग. काळे, राजेंद्र लाळगे, सुनील मतकर, सुभाष वाघमारे, विठ्ठलराव गावडे (इंदूर), वसंत महेश्वरकर (महेश्वर), रामभाऊ लांडे (अंबड, जि. जालना), डॉ. सुधीर तारे, डॉ. दिलीप बलसेकर, रवीन्द्र लाड, प्रतापराव पाटील, मुकुंद सराफ (मुंबई), डॉ. अरुणचंद्र पाठक, डॉ. गिरीश मांडके (पुणे) यांचे अनमोल सहकार्य लाभले. या सर्वांचे मनःपूर्वक आभार.

ज्येष्ठ साहित्यिक, इतिहासकार आणि अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांच्याबरोबर वेळोवेळी झालेल्या चर्चेचा आणि मार्गदर्शनाचा या ग्रंथांच्या संपादन कार्यात विशेष उपयोग झाला हे कृतज्ञतापूर्वक नमूद करणे आवश्यक आहे. त्यांचे मन:पूर्वक आभार.

पूर्वसूरींचे ऋण कृतज्ञतापूर्वक मान्य करून या आवृत्तीचे संपादन करताना आनंद आणि समाधान वाटले. इ. स. १९४४-१९४६ नंतर जवळजवळ ७५ वर्षांनंतर होळकरांचा इतिहास प्रसिद्ध होतो आहे. या ग्रंथामुळे दुर्मीळतेची मोठी उणीव दूर होऊन इतिहास संशोधक, अभ्यासक आणि रसिक यांना हा ग्रंथ उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

**डॉ. देवीदास पोटे**

मुंबई, दि. ३१ मे २०१८ संपादक

# अ नु क्र म णि का

# होळकरशाहीचा इतिहास

# भाग २ रा

## (इ. स. १७९७–१८८६)

---

## होळकर सरकारांच्या आज्ञेने प्रसिद्ध झाला



*Statements of facts and figures or opinion expressed by the author in the publication are not to be taken as an indication of any authority, sanction or commitment on the part of His Highness the Maharaja Holkar's Government.*

---


## संपादक – वा. वा. ठाकूर, बी.ए.



## इ.स. १९४६

---

होळकर गव्हर्नमेंट प्रेस, इंदूर



**श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकर**

शासन काळ : इ. स. १८४४ - १८८६

### प्रकरण १ लें

# अहिल्याबाईंच्या निर्वाणानंतर

## आगस्ट इ. स. १७९५ ते आगस्ट १७९७

मागील खंडात शेवटल्या प्रकरणांत पुण्यश्लोक श्रीअहिल्यादेवींचा श्रावण वद्य १४ रोजीं (म्हणजे इंग्रजी तारीख १३ आगस्ट इ. स. १७९५) काळ जाहला हें आलेंच आहे. त्या वेळीं सुभेदार तुकोजीराव व त्यांचे पुत्र, सर्व पुण्यास होते. सुभेदारांनीं आपले वडील चिरंजीव काशीराव यांस महेश्वर संस्थानचे बंदोबस्तास रवाना केलें. महेश्वरीं आल्यावर त्यांनी जखिऱ्याची व जामदारखान्याची वगैरे मोजदाद करून याद्या सुभेदारांकडे रवाना केल्या. या याद्या आजमितीस उपलब्ध नाहींत. त्या झाल्यास ''पैशाचा पाठपुरावा मातोश्रीसाहेबांनीं केला नाही'' ह्या आरोपांचा निकाल लागला असता. मातोश्रीसाहेबांच्या निधनानंतर दीड-दोन महिन्यांच्या अंतरांगत श्रीमंत पंत प्रतिनिधी सवाई माधवरावसाहेब शके १७१७ आश्विन शुद्ध १४ (इ. स. १७९५) रोजीं देवलोक झाले. या दोन मृत्यूंमुळें मराठी साम्राज्यावर मोठाच प्रसंग आला. इंदुरास त्याचप्रमाणें पुण्यास अस्वस्थता, धामधूम, कारस्थानें यांची एकच गर्दी उडाली आणि त्यांचे परिणाम इंदूर संस्थानावर व मराठी साम्राज्यावर घडून आले आणि ते व्ययरूपी होते हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

पुण्यास जाण्यासाठीं निघण्यापूर्वीच सुभेदार तुकोजीरावांनीं ''हे पाय पुनः कधीं दिसतील'' असें म्हटलें होतें. दिवसानुदिवस त्यांची स्वतःची प्रकृती परतंत्र होत चालली होती. आतां मातोश्रीसाहेबांच्या निधनानंतर चिंता दुणावली. राज्याची व्यवस्था कशी करावी, गादीचा मालक कोणास करावें इत्यादि अनेक प्रश्न त्यांच्यापुढें उभें राहिले. ते खर्ड्याच्या

लढाईस निघण्यापूर्वी, गादीची नाही, तथापि कामकाजाची व्यवस्था थोडीबहुत मातोश्रीसाहेबांनीं लावून दिली होती. हें मागें प्रथम खंडांत आलेच आहे. रामराव अप्पाजी यांस मातोश्रीसाहेब सल्ला मसलतीत घेत असत. अखेरच्या दिवसांत मातोश्रीसाहेबांनीं त्यांस दरबारचे दरखदार केलें होतें. त्यांस ''म्हाळसाकांत'' (पत्रावर श्रीच्याशेजारीं) व शेवटीं ''देवावे'' हे निशाण करावयाची आज्ञा केली होती. या कामाबद्दलचा दरख इ. स. १७९८ त ठरला. तो येणेंप्रमाणें (१) सरकारी महाल व सरंजामी, पागा व कारखाने, हशमी लोक, वगैरे यांजपासोन दर शेकडा रुपये २ याप्रमाणें घेत जावे. इतलाखी शिलेदार वगैरे यांजपासून दर वरातीस रु. २ शिरस्तेप्रमाणें घेत जावे. हा दरख मातोश्रीसाहेबांच्या पश्चात ठरला हे स्पष्टच आहे. ह्यापूर्वी रामराव अप्पाजी पळसीकर हे ''पुरातन सरकार पदरचे'' असेंच होते. तसेच ते पेशवे सरकारचेही पुरातन पदरचे होते.'' आता दरखदार बनल्यानें त्यांचे महत्त्व वाढले. ता. २० सप्टेंबर १७९५ रोजीं सुभेदार तुकोजीरावांनीं पळसीकरांस लिहिलेलें पत्र : ''चिरंजीव काशीराव यांस. ज्याचे काम त्याचे हातें घेऊन कारभार तुम्हांस घेऊन करण्याविषयी समक्ष आज्ञा करून चिरंजीवांस लिहिण्यांत आलें आहे आणि हल्लीं लेखन केलें असें. तरी तुम्ही करून जो कारभार तेथें कर्तव्य, त्याजविशीं, अगोदर सरकारांत लिहून आज्ञा करीत जाणे. येथील आज्ञेखेरीज कोठील मामल्याची घालमेल अथवा लहानमोठे कामाची बदली अगर वरात एकरूप न करणें. पेशजीपासून कागदपत्र पुरता करणें. तो राजश्री बाबाजी अनंत करीत आल्याप्रमाणें करतील. तुम्ही त्यात मन न घालितां, आपले ओहद्याचे काम व तेथील कारभार करून होईल वर्तमान दर पै लिहीत जाणें.'' या आज्ञेप्रमाणें पळसीकरांकडून काम होईना. बोभाट पुण्यापर्यंत गेला. त्यावर अनेक पत्रें पळसीकरांस गेली. त्यातील मजकूर येणेंप्रमाणें (२) परगणे देपाळपूर येथील घालमेली केली. परगणे इंदूर व रामपुरा आदिकरून दरोबस्त महालांच्या घालमेली करणार. परगणे जावरे येथील भागवतांकडील सरंजाम सरकारांत जप्त आहे. याजमुळें भागवत रदबदल करितात त्यांचें एकूण मोकळिकींविशीं त्यांशीं बोलतां म्हणून विदित जहालें. ऐशीयास येथून लिहिण्यांत येईल तितकेच करून असावे अशी आज्ञा असतां जो जसें समजावितों तसें त्याचें ऐकून केलें व करणार ही गोष्ट सर्वथैव चांगली नाहीं.'' दुसरें एका पत्रांत सुभेदार लिहितात. (३) मामले ज्याचे त्याजकडेस कायम राखून कोणापासोन पैसा न घेतां फक्त खजिन्याचा खर्च सनदी वगैरे व अन्नसत्र आदिकरून चालवून, भिल्लांनीं त्या प्रांतीं दंगा केला आहे. त्यांचें पारिपत्य करून बंदोबस्त करणें. (ता. ८ आक्टोबर इ. स. १७९५) (४) पळसीकरांबरोबर कारभार करणारे बाळाजी कृष्ण यांस तुकोजीरावांनी याच सुमारास लिहिले ते : इतःपर तुम्ही कारभारात एकरूप न जातां जुने कागदपत्राचें काम लागल्यास चिरंजीवास माहीत करून देत जाणें. उभयतांनीं जो कारभार कर्तव्य तो समजावून घेऊन चिरंजीवास समजावून कोणेविशी शब्द न ये, सरकार नुकसान न होय, अशा चालीनें करीत जाणें.'' या दोन तीन उताऱ्यांवरून महेश्वरी मातोश्रीसाहेबांच्या पश्चात दोन चार महिन्यांतच स्थिती किती बिघडली होती हें स्पष्ट होईल.

पुण्यास श्रीमंत सवाई माधवराव निवर्तल्यावर गादीचा प्रश्न नाजूक होऊन बसला. नानांच्या मतें सवाई माधवरावांच्या पत्नीच्या मांडीवर दत्तक देऊन कारभार चालवावा. यांस सुभेदार तुकोजीराव यांची संमती पडली. पटवर्धन आदि मंडळी बाजीरावांकडे वळली. तडजोड म्हणून नानांनीं बाजीरावांचे बंधू चिमाजी अप्पांचें नांव दत्तक म्हणून सुचविलें; पण या सूचनेस शास्त्रांची आडकाठी आली. सारांश, गादी पुण्यास रिकामीच होती असें म्हणतां येईल. यावेळीं सुभेदारांची प्रकृती खालावत चालली होती. तेव्हां जवळच्या मंडळींत खंडो महादेव व पाराशर दादाजी यांस सल्ला विचारली. ''सांप्रत काळीं शरीराची दशा या प्रकारची. घटकेचें शाश्वत नाहीं दौलतीची अव्यवस्थिता या प्रकारची. तेव्हां पुढें दौलतीचें ओझें कोणाचे माथां द्यावें.'' दोन पोरे दोन प्रकाराची. उभयतांनीं विनंती केली कीं, दौलतीचें थाडगें कायम ठेवून चार जुनी माणसें वडिलांचे व आपले हातचीं जनलाज मनलाज धरून काशीराव होळकर वागवील. वरकड प्रसर झाल्यावर जुने माणसांस देशांतर करावें लागेल.'' तेव्हां तुकोजीराव यांनीं आनंदराव माधव निस्बत बुळें यांस महेश्वरास काशीराव होळकर यांस पुण्यास घेऊन येण्याकरितां पाठविलें. त्याचवेळीं पळसीकरांस सुभेदारांनीं पत्र दिलें त्यातील मजकूर येणेंप्रमाणें: ''हुजरातजागा व पागापथकें व हशमी, शागीर्दपेशा यांचे समजाविसीचा व दुदरनेक फरांसिस याचे रोजमुऱ्याचा ऐवज देणें. तुम्ही यादी व पत्रार्थ मनन करून त्या ऐवजाची तोडमोड मामलेदारची पत राखून काढणें. चिरंजीव राजश्री काशीराव इकडे यावयाचें करतील. मागें किल्ल्याचा (महेश्वराचे) वगैरे जाबता राखणें यांस माहितगार आणि आळ्याचा माणूस पाहिजे. चिरंजीव भारमल होळकर यांचा तेथें हबशी वगैरे माणसांत आळा पेशजीपासून आहे. याजकरितां त्यांजला हाताखालीं ठेवून किल्ल्याचे चौकीपहाऱ्यांचा वगैरे बंदोबस्त त्याजकडे सांगून तुम्हीही वरचेवर देखरेख करीत जाणें.''

या पत्राप्रमाणें महेश्वरची व्यवस्था लावण्यांत व पुण्याची तयारी करण्यांत कांहीं महिने लोटले. महेश्वरीं काशीरावास पुत्र जाहला. त्या उत्सवांत कांहीं महिने लोटले. ''पुत्रोत्सव बाईसाहेबांचे कीर्तीकृतीप्रमाणें महेश्वरास काशीराव यांनी केला. तिकडे पुणें सुभेदारांनींही तसेंच केलें. जोशी, शास्त्री व पदरचीं माणसें यांजला गांव, इनाम पालख्या सुभेदारांनीं वाटल्या.'' यावर काशीरावांनी ''चौ-पांच महिन्यांनीं वडिलांचे पायापाशीं येऊन दाखल होतों.'' अशा निरोपासह आनंदराव माधव यांस पुण्यास परत पाठविले. इकडे येतों असें म्हटले तरी समजाविशीचे काम सोपें नव्हतें. दिवस भराभर जाऊं लागले. तिकडे सुभेदारांची प्रकृती वार्धक्याने आणि नवीन उद्भवलेल्या ज्वरानें गलितगात्र होत चालली. तारीख १०-४-१९९६ रोजींच्या पत्रांत ''चिरंजीवाचे निघणें पत्र पावताच होय ते करणें'' असें पळसीकरांस कळविले. तरीपण इ. स. १७९६ च्या अखरेपर्यंत काशीरावांस महेश्वर सोडतां येईना. बोराडे, लांबहाते, बारगळ, यांस तेथील कामें तशीच ठेवून चिरंजीवास उचलून घेऊन येणें,'' अशा ताकिदीनें महेश्वरीं पाठविले. मंडळी निघाली. मनमाडचें मुक्कामी आल्यावर डेरे उभे होत आहेत, तोंच सुभेदारांची प्रकृती केवळ आसन्नकाळास प्राप्त होऊन पत्रें आलीं कीं ''जेवीत असाल तर पाणी येथें येऊन प्यावें.''

काशीराव येतांच सवाई मल्हारराव सामोरे गेले. बापू होळकर व भिकाजी होळकर जवळ होतेच. यशवंतराव यांनीं तुकोजीरावांच्या या दुखण्यांत सेवा फार केली. काशीराव आलेले पाहून सुभेदारांनी अगोदरचा बेत होता त्याप्रमाणें वस्त्रांची तयारी करून ठेवलीच होती. दिवाण, फडणीस, वगैरे या सर्वांदेखतां काशीराव होळकर यांस सुभेदारांनीं वस्त्रें पुणें मुक्कामीं दिली. (जानेवारी इ. स. १७९७). ते समयीं सवाई मल्हारराव यांनीं हात जोडून सुभेदारांस विनंती केली, ''मजला आज्ञा काय ?'' सुभेदारांनीं म्हटले ''काशीराव यांस माझे ठिकाणी मोजून चाकरी कर तो तुजला आज्ञा करील.'' काशीराव गादीस कुर्निसात करून गादीवर बसले. बंधुवर्ग मंडळी दरखदारबरोबरच होते. सवाई मल्हारराव काशीराव यांस कुर्निसात करून उठून चालले. कोणाचेंही न ऐकतां आपले गोटांत जाऊन राहिले. निराळा गोट जाहला आणि होळकरशाहींत भाऊबंदकी सुरू झाली.

नेहमीच्या पद्धतीप्रमाणें होळकरांस जी वस्त्रें यावयाची तीं पुणें दरबाराकडून यावयाचीं असा क्रम चालत आला होता. सुभेदार मालेराव व सुभेदार तुकोजीराव यांस वस्त्रें पुण्याहून आली होतीं हें त्या त्या प्रकरणांत नमूद केलें आहेच. गादी रिकामी होतांच जरूर तितका कालावधी घेऊन पुणें दरबार हीं वस्त्रें देत असें. काशींरावांस सुभेदार तुकोजीरावांनीं सन १७९६ च्या अखेरीस वस्त्रें दिली आणि पेशव्यांकडून ती वस्त्रें (सुभेदारीची) ता. २९ इ. स. १७९७ त मिळालीं. या वेळी सुभेदार तुकोजीराव हयात होते आणि आपल्या हयातींतच हा कारभार आपले मनाजोगा झालेला पाहून त्यांस थोडा आरामही वाटला.

बाजीरावसाहेब गादीवर स्थिर झाल्यावर होळकरांच्या सुभेदारीचे वस्त्रांचा प्रश्न त्यांजपुढें आला. तेव्हां नानांचें मत पडलें कीं सरदारीचीं वस्त्रें, काशीराव वडील असले तरी वेडसर असल्यामुळे त्यांस न देतां मल्हाररावास द्यावी. पण शिंदे आणि बाजीरावसाहेब ह्यांच्या मनातून होळकरांचे घराणे नानांचे पक्षांतून काढून आपल्या ताब्यांत ठेवावे असें असल्यामुळें श्रीमंतांनीं काशीरावासच सरदारीची वस्त्रें दिली व त्यांची बक्षीगिरी म्हणजे सैन्याचा अधिकार बापू होळकारास. याप्रमाणें होळकरशाहीची अधिकारसूत्रें काशीरावांचे हातांत गेली. पेशव्यांस व शिंद्यांस समाधान झाले कीं नाना हतबल आपोआप झाले.

श्रीमंत सुभेदार काशीराव होळकर यांस व बापू होळकर यांस प्रसंगीं जी वस्त्रें अर्पण झाली त्यांची यादी खालीलप्रमाणें.

१२ श्रीमंत सुभेदार काशीराव बाळासाहेब यांस वस्त्रें ५: तिवट हैदर पैठणी १, शेला १, हिरवी पैठणी १, किनखाप १, महमुद्या जोड २, भूषणें ३, शिरपेंच १, मोत्यांची कंठी १, जीगा ढाल १, तलवार १, हत्ती १, घोडा १, एकूण नग (प्रकार) बारा.

७ बापूजी होळकर यांस ५ वस्त्रें व १ कंठी मोत्यांची, १ शिरपेंच, एकूण सात

........

१९

पुण्यास हा वस्त्रांचा समारंभ झाला. सवाई मल्हारराव रूसून स्वतंत्र गोटांत दिवस काढीत होते. तिकडे महेश्वरीं पळसीकर कसा व काय कारभार करीत होते व यजमानांची त्यांस पत्रें कशी जात जात होती हे वर आलेच आहे. आता एका अनुभविक स्थानिक कारभाऱ्यांचे सरकारी कागदातील मजकूर आम्ही खाली देतो.

''श्रीमंत सौभाग्यवती आनंदीबाई सुभेदार (काशीरावांचे कुटुंब) एका दो दिवसांनीं श्रीजेजुरीचे यात्रेस जाऊन देवदर्शन घेऊन आल्या म्हणजे सौभाग्यवती भागाबाई (काशीरावांची कन्या) सुद्धां त्यांची रवानगी तेथें करावी ऐसा बेत आहे. एका दो दिवसांत रवानगी होईल. गोविंदराव गायकवाड यांचा समेट अद्याप होत नाही. खायाखर्चाचा ताण व लोक, राजकारणें करितात, येथें यांतच निशिष्ट दौलत मोठी. धनी कारभारी काळजी करितात. आळा मिळून पैसा तो दिसेना. शेवट कोणते थरास जाईल तो जावो. राजकारणें नित्य नवी तेव्हां लिहावें काय? आपली तेथील अडचण येविषयीं यावत् शक्य यजमानांसीं बोलण्याचें तितके बोलतों. तेही काळजी करतात. परंतु कोठें जागा नाहीं. दरोबस्त महालचा ऐवज खाऊन चुकले. तेथील पागा हुजूरात पलटणें हाका मारतात. धरण्याशी गांठ, चंदी नाहीं. पत्रांतील आपले घरचा घोळ. यामुळें देतों घेतों अशी अवघ्यांचीं बोलणीं आहेत. (ता. १३-२-९७)

या स्थितीचे दर्शक पत्र खुद्द सुभेदार काशीरावांचे नाना फडणीसांस गेलेलें आम्ही खालीं देतों. ''आमचे तीर्थरूपांचा वृद्धापकाळ. शरीर बहुत क्षीण. याजमुळें दौलतींत बैदा होऊन खराबींत बहुत आली. कोणेप्रकारें बंदोबस्त न होय. त्यांस वडिलांचे ठिकाणीं आपण आहांत. आमचे सरदारीतील बैदा मोडून दौलतीचा बंदोबस्त यथास्थित होऊन सरकारचीं चाकरी घडेल, अशी व्यवस्था आपण करून देऊन दौलत नांदवावी. आपण ज्याप्रमाणें व्यवस्था करून देतील त्याअन्वयें वर्तणूक करूं. आज्ञेत अंतर करूं तरी आम्हांस श्रीकुलस्वामीची व वडिलांचे पायांची शपथ असें.'' (ता. १९ जुलाई इसवी इ. स. १७९७)

या पत्राचा फारसा उपयोग झाला नाहीं. स्वतः नानांचें स्थान स्थिर नव्हतें याची जशी नानांस जाणीव होती तशीच मल्हाररावांच्या संबंधीं आपण केलेंली खटपट मालकांस कितपत मानवली याचीही जाणीव नानांस होतीच. याच सुमारास दिवसेंदिवस तुकोजीरावांची तब्येत खालावत जाऊन श्रावण वद्य ८ मंगळवारीं (ता. १५-८-१७९७) ते देवलोक झाले. त्यावेळीं सुभेदार काशीरावांनीं महेश्वरास पळसीकरांस पत्र पाठविले तें. ''ईश्वरे मोठा अनर्थ केला. हे वर्तमान तिकडे भिल्ल भूमे वगैरेच्या नजरा ठिकाणीं राहणार नाहींत येविषयींचा बंदोबस्त झाला पाहिजे. तरी तुम्ही धैर्य धरून तिकडील बंदोबस्त कोणेविषयीं कमी पडूं न देतां माहलोमाहलीं मामलेदारांस दिलजमाईचीं पत्रें लिहून हुशारीनें राहून वर्तमान वरचेवर लिहित जाणें.'' याचप्रमाणें महेश्वर संस्थानचे कामगार भारमल होळकर यांसही तिकडील बंदोबस्त ठेवण्याबद्दल सुभेदार काशीरावांनीं पत्र लिहिलें.

सुभेदार तुकोजीरावांचे अशौच्यांतच भाऊबंदकी जन्मास आली. त्यांची क्रिया काशीरावांनीं वेगळी केली व सवाई मल्हाररावांनीं एकेच ठिकाणीं (पुणें) वेगळी केली, त्याचप्रमाणें सपिंड्यासही दोन झाल्या.

तुकोजीराव सुभेदारांचे इहलोकीचें कार्य येथें संपलें. या चरित्रांतील मुख्य बाबींचा आतापर्यंत उल्लेख ठिकठिकाणीं मागील व या खंडात आलाच आहे. तरी पण सिंहावलोकन करून त्यांच्या कामगिरीचा आढावा घेणें जरूर आहे आणि तो आम्ही यथामती खालीं देतों.

सरकारी कागदांत तुकोजीरावांचा पहिला उल्लेख इ. स. १७५० त येतो; म्हणजे नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीचे प्रारंभासच ते पुढें येतात. मल्हारराव हे सुभेदार झाले होते त्यांच्या हाताखाली तुकोजीराव वाढत होते; आणि इ. स. १७५० च्या सुमारास त्यांच्या हातून कांहीं भरीव चाकरी घडली असणार. त्यांस मिळालेल्या बहालीचा उल्लेख मागें आलेलाच आहे. इ. स. १७६० त अहमदनगर जिल्ह्यांत कोळ्यांनीं मोठी बंडाळी केली होती. तिचा मोड तुकोजीरावांनीं शिताफीने केल्याचा उल्लेख त्या जिल्ह्याच्या ग्याझिटियरमध्यें केलेला आहे. इ. स. १७७० त नवलासिंगाचे बाजूनें उत्तर हिंदुस्थानांत फ्रेंच सेनापती लढत असतां तुकोजीरावांनीं त्याच्यावर विजय संपादिला. इ. स. १७७३ त फत्तरगढ येथें एकटेंच असतां विजयी झाले. पण लढाईत मिळवलेली लूट बरोबरीच्या सरदारांत (''सोबत्यांत'') सामायिक वाटून दिली. इ. स. १७९७ त बापू होळकरांच्या तळेगांवच्या तडफीमुळें इंग्रज मागें हटले. पेशव्यांनी दरबार भरविला. ''चाकरानें नौकरी केली. त्याचा इतका बडेजाव कशास?'' हें तुकोजीरावांचे बोलणे त्यांच्या स्वभावाचें दर्शक आहे. बापू होळकरांचा उल्लेख, त्यांची दरबारांतील नम्र वागणूक, ही होळकरांस जितकी भूषणास्पद आहेत तितकीच त्या दरबारांतील नानांची वृत्ती व वाणी पुणें दरबारांस शोभणारी आहेत. इ. स. १७८१ त कलकत्याहून मुद्दाम धाडलेला सेनापती गोडार्ड घाटावरून पनवेलपर्यंत हटतो, याचें बरेंचसे श्रेय होळकरांना आहे. इ. स. १७८७ त टिपूस पाठविलेलें उत्तर तुकोजीरावांच्या स्वाभिमानाचें दर्शक आहे आणि त्यावेळेस जो तह घडून आला त्यांचें सर्व श्रेय तुकोजीरावांकडेसच आहे. इ. स. १७९० त मेडत्याची लढाई झाली, रजपूत चीत झाले, त्यांस जबरदस्त दहशत बसली. त्या लढाईचा डिबाईन या शिंद्यांचे लष्करी अधिकाऱ्यानें शिंद्यांकडे जो अहवाल सादर केला त्या अहवालांत तो स्पष्ट लिहितो कीं, ''होळकरांचे सैन्य जितक्या निकरानें लढलें तितक्या निकराने लढलें नसतें तर हा विजय मिळाला नसता.'' या ठळक ठळक गोष्टींचा आम्ही उल्लेख केला आहे. तुकोजीरावांचे सर्व आयुष्य रणांगणावरच गेले आहे. त्यांच्या स्वभावातील निरनिराळ्या बाजू निदर्शनास येण्यास वरील उल्लेखांचा उपयोग होणारा आहे. त्यांचे धैर्य, स्वामीसेवा व सरळ स्वभाव ही स्पष्टपणें दिसतात. तसेंच कोणतेंही काम अंगांवर घेऊन धडाडीनें तडीस लावणें त्यांच्या स्वभावांत नव्हतें. म्हणून लालसोट व लाखेरीत त्यांची दूरदृष्टी नव्हती. मल्हाररावांच्या हाताखालीं ते वाढले, पण सुभेदारांची धडाडी तुकोजीरावांत उतरली नाहीं. त्याप्रमाणें सुभेदारांची करडी जमाखर्ची नजर तुकोजीरावांत मुळींच उतरली नव्हती. त्यामुळे खर्चाचा पेंच त्यांस जन्मभर भोंवला.

सुभेदार मल्हाररावांची न्यायनिष्ठुरता सूनबाईपासोन तों खालपर्यंत जाज्वल्य होती. तो गुण तुकोजीरावांत नसल्यामुळें घरींदारीं आबदाब दोन्हींही नष्टप्राय झाले. अहिल्याबाईंसंबंधी

तुकोजीरावांचा आदर अनुकरणीय तर खरा, पण त्यांत विवेक, कर्तबगारी आणि धोरण ह्यांचे मिश्रण नसल्यामुळें ती भावभक्ती निष्प्रभ झाली. तीस वर्षे पेशवाईच्या कारभारांत रणांगणावर राबून होळकरशाहीस म्हणण्यासारखा लाभ झाला नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. असें होण्यांत तुकोजीरावांचा बिनहिशेबी स्वभाव जितका कारणीभूत दिसतो त्याहूनही मुख्य दरबारांतील वागणूक समतोल नव्हती हेंही विशेष कारण होतें. शिंद्यांनीं दिलेल्या सनदा अपूर्ण म्हणून होळकरांनीं परत केल्या; शिंद्यांनीं त्या सनदा दप्तरदाखल केल्या आणि या प्रकरणावर पुणें दरबार मूग गिळून बसलें. त्याचाच निकाल केला असता तर हिंगण्यांच्या वकीलीची जरूरीच उरली नसती. सारांश, तुकोजीराव हे शिपाईगडी जन्मभर राबले आणि दाबांतच निघून गेले. होळकरशाहीच्या प्रगतीस हातभार लागला नाहीं. मिळविले कांहीं फारसें नाहीं, मात्र होळकरांच्या आनुवांशिक औदार्याचा झरा त्यांचे हातूनही देणग्या, इनामें व जहागिरी या रूपानें मात्र वाहता राहिला.

त्यांच्या पश्चात काशीराव हे गादीचे मालक झाले. त्यांचे सावत्र भाऊ सवाई मल्हारराव सवता सुभा उभा करून भांबुर्ड्यास राहिले. त्यांनीं खानदेशांत महालनिहाय फौजा पाठवून दंगा करून महाल खराब केलें. ''नंदुरबार, सुलतानपूर, अंबाड वगैरे जागा धूळधुमासा करून दिल्या, येणेंकरून पागा, पीलखाना वगैरे कारखाने दामदस्त बरबाद जाहले.'' मल्हाररावांनीं बोलणें लाविलें कीं, ''माझे हातून मुखत्यारीनें काम घेतील तरी काशीरावांचा हुकूम मजवर आणि माझा हुकूम दौलतीवर; परंतु बापू होळकर याजला काढून द्यावें म्हणजे मी सर्वोपरी अनुकूल'' ही झाली मनोवृत्ती सवाई मल्हाररावांची; आणि पेशवे दरबारांत नानांची मेहरनजर यांच्याकडे. काशीराव शरीराने आणि मनानें व्यंग, बापू होळकर त्यांचा बक्षी; आणि बापू व मल्हाररावांचे हाडवैर. काशीरावांना हाती धरलें पेशवे व शिंद्यांनी. दोघांचाही हेतू आपआपल्या स्वार्थसंपादणीनें नानांस निर्बल करून टाकावें. तेव्हां दोघा बंधूंमध्यें तडजोडीचा मार्ग किंवा मार्ग काढणारा कोणीच कुठें राहिला नाहीं. काशीरावांच्या भोवतीं जमलेल्या कंपूने काशीरावांस सल्ला दिला कीं, शिंद्यांचेच मदतीनें मल्हाररावांचा कांटा काढून टाकावा. काशीरावांची संमती पडली आणि त्याप्रमाणें मध्यस्थ मंडळ शिंद्यांकडे जाऊन पोहोचले. पांच लाखांची बोली जाहली. शिंद्यांस तें हवेंच होतें. पैसा आणि प्राबल्य घरीं चालत आली.

माळव्यांत शिंदे यांच्या मुलखाशेजारीं होळकरांचा मुलूख होता व आहेही. उभयतांच्या सरहद्दी एकमेकांस भिडलेल्या होत्या. तेव्हां होळकरांचे हे भिडलेले परगणे आपणांस लाभावें असा लोभ दौलतराव शिंद्यांस असणे साहजिक होतें. पण न्याय व नीतीस अनुसरून खचित नव्हतें आणि या लोभानें काशीरावांकडचें आलेले आमंत्रण शिंद्यानें पत्करलें. मध्यस्थ पडलेल्या मंडळीनें वेगळें बोलणें केलें कीं, ''हस्तगत न होतां, तैसाही प्रकार (मारण्याचा) झाल्यास चिंता नाहीं.'' सारांश, मराठेशाहींत ''ध चा मा'' हा दुसऱ्यांदा झाला. या कटांत बापू होळकर पुढारी होते. त्यांचे व मल्हाररावांचें वैर फार दिवसांचे होते. मल्हाररावांनीं त्यांच्यावर व पाराशर दादाजींवर एकदां जीवावरचा प्रसंग आणिला होता. आतां बापूनें

संधी साधली. बापूचा हा बेत जरी काशीरावांस माहीत नसला तरी बापूचा पाठपुरावा करण्याचा आणि त्याच्याच ओंजळीनें पाणी पिण्याचा काशीरावांचा परिपाठ. मल्हाररावांचे बाजूस विठोजी आणि यशवंतराव हे काशीरावांचे सापत्न बंधु. खर्ड्याचे लढाईचे वेळीं यशवंतराव होळकर हे ऐंशीं पागेच्या स्वारांच्या जमावानिशीं होते. हे स्वार निजामाविरूद्ध लढण्यासाठी होते. त्या स्वारांचीं तनखा मागण्याकरितां यशवंतराव हे काशीराव यांजकडे गेले. काशीरावांनी अळंटळं चालविले. यशवंतरावांच्या तगाद्यानें काशीराव शेवटीं जेरीस आले. त्यांनीं अरब लोकांस सांगून पाठविले कीं, ''यशवंतराव होळकर यांजला गराडा द्यावा.'' यावेळीं यशवंतराव गराड्यांत सापडले. ही गोष्ट त्यावेळीं तुकोजीरावांचे कानावर गेली. तुकोजीराव यांनीं काशीरावांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. काशीरावांनीं जाब पाठविला कीं, ''जर आपण यशवंतराव यांस जामीन व्हाल तर मी त्यांस सोडीन.'' तेव्हां गोविंदपंत गानू दिवाण खासगी यांनीं आपली जामीनकी दिली. काशीरावांनीं यशवंतराव यांजला सोडून दिले. ही मागील जाणीव बुजली नव्हती. काशीरावांचे विरूद्ध मल्हाररावांस यशवंतराव आतां येऊन मिळाले. सारांश, होळकरशाहींत आतां दोन पक्ष समोरासमोर उभे राहिले, एक पक्ष सुभेदार काशीरावांचा; त्यांच्या प्रभावळींत बापू होळकर, चिमाजी बुळे व रघुपत खंडेराव, हा एक पक्ष. दुसऱ्या बाजूस सवाई मल्हारराव व त्यांचे सापत्नबंधु यशवंतराव व विठुजी. हे पक्ष बनत असतांच बजाबा म्हणजे तुकोजीरावांचे पुणें येथील वकीलांचे चिरंजीव हे रघुपत खंडेराव यांच्या दरम्यानगिरीनें काशीरावांशीं समेटाचें बोलणें चालवीत होते.

मल्हाररावांजवळ हजार बाराशांचा जमाव होता. त्याचे पदरीं यावेळीं एक लाख्या बारगीर नावांचा शूरगडी होता. त्याच्या उमद्या स्वभावामुळें बरेच शूरगडी त्यांच्या भोवतीं जमले होते. त्या सर्वांचा सल्ला पडला कीं, ''या प्रदेशात राहणें योग्य नाही. दृढनिश्चय करून देश हस्तगत करण्यास हिमतीनें आपली कंबर चांगली बांधावी आणि या कामीं आपला बाहुटा उभारावा. पूर्वीपासून आपलेकडे देश आहे आणि नवीन देश काबीज करून या सर्व प्रदेशाची चांगली व्यवस्था केली तर काशीरावांस गादीवरून दूर करणें हें काय मोठेसे आहे?'' याप्रमाणें सल्ला पडतांच कांहीं अनुयायी खानदेशांत गेले व शामराव महाडिक हे माळव्याकडे वळले.

याप्रमाणें मल्हाररावानें उचल करतांच काशीरावांचा दौलतरावामागें प्रेश जोराचा लागला. खानदेशांत मल्हाररावांची माणसें गेलीं होती. त्यांच्या निजामाशीं सरहद्दीमुळें तंटा उपस्थित झाला. त्यांनीं मल्हाररावांकडे मदत मागितली व ती त्यांनीं पाठविली; पण तितक्याच मानाने मल्हारराव उघडे पडले. विरूद्ध पक्षास ही बातमी लागताच त्यांनीं मल्हाररावांच्या गैरसावधपणाचा फायदा घेतला. ''लष्कर आवळून कांहीं फौज पलटणें बंदोबस्तास ठेवून पलटणांचा परीघ पहाडाभोंवतीं केला. मुझफरखानास मोहऱ्यावर पाठविले. तलवार चालली. चाळीस पन्नास मनुष्यें होळकरांकडील व शिंद्यांकडील ठार व जखमी झालीं. खासा मल्हारराव होळकर यांस तरवारीच्या जखम व तीराची जखम व गोळी लागून

ठार जाहले. होळकरांचा मुडदा दहनास काशीराव यांनीं नेला. मल्हाररावांकडील सैन्यानें तलवार बंदुका भाल्याच्या लढाईत फार शौर्य दाखविलें.'' यावेळीं मल्हाररावांस चौदा जखमा झाल्या होत्या. त्यांची पत्नी पांच महिन्यांची गरोदर होती. त्याचप्रमाणें तुकोजीरावांच्या पश्चांत एक महिन्याचे आंतच गृहकलहाग्नीनें राजघराण्यांतील एक शूर, धाडसी, होतकरू तरूणाचा बळी घेतला आणि ही जी कलहाग्नीची ज्योत एकदा पेटली ती येथेंच थांबली नाही.

सवाई मल्हारराव हे तुकोजीरावांचे औरस द्वितीय चिरंजीव होत. तुकोजीरावांनंतर गादीवर आपला हक्क आहे असें ते प्रतिपादीत. त्यांचा मुद्दा असा होता कीं काशीराव वडील खरे तथापि त्यांचा जन्म तुकोजीरावांस सुभेदारीची वस्त्रें मिळण्यापूर्वीच झाला होता व आपला स्वतःचा जन्म वडिलांस वस्त्रें झाल्यावर झाला, म्हणून गादीचा वारसा आपल्याकडे आहे. पण हें त्यांचे म्हणणें निष्फळ झाले. ते स्वभावानें जसे धाडसी व उदारवृत्तीचे होते, तितकेच उपद्व्यापीही होते. त्यामुळे त्यांस जिवश्चकंठश्च मित्र मिळाले, तसेंच त्यांचे शत्रुही हाडवैरी झाले; आणि ते अकालींच निधन पावले.

पुण्यास जेथें सुभेदार तुकोजीरावांचे दहन झालें त्याच स्थळीं दोन शिवलिंगें स्थापन झालीं, ती ह्या पितापुत्रांची होत. पुणें येथें होळकर पुलाजवळ जी छत्री आहे तींत ही लिंगें आहेत. त्या छत्रीचा बंदोबस्त इंदूर दरबाराकडून होतो.

मल्हाररावांच्या मृत्यूनंतर शिंदे दरबारांतील एका अनुभविक सरदारानें मालकाची भेट घेतली. होळकरांचा व शिंद्यांचा पूर्वापार संबंध कसा होता याचा पाढा त्यानें यजमानापुढें वाचला, पाठी व पुढें नजर फेकणे हें किती आवश्यक आहे याची जाणीव करून दिली आणि शेवटीं रामशास्त्री प्रभुण्यांप्रमाणें दहशतही घातली कीं आमच्या म्हणण्याप्रमाणें वागावयाचें नसेल तर आम्ही देशांतरीं जातों. दौलतराव वळले. पश्चात्ताप प्रदर्शित केला. होळकर-शिंद्यांच्या भेटी झाल्या आणि दिलसफाई झाली.

सारांश, हा कलहाग्नि विझला असें दिसूं लागलें; आणि पुनश्च शांतता स्थापित होईल यात शंकाच नाही असें वाटूं लागतें तोंच शिंदेशाहींत सर्जेरावीं सुरू झाली. श्रीमंत यशवंतराव होळकर रानावनांतून भटकूं लागले; आणि मुख्य दरबारांत शिंदे, पेशवे आणि नाना यांचा कोणाचा कोणास मेळ बसेना, असा प्रकार होऊन बसला. या सर्व प्रकरणाचे परिणाम एकंदर मराठी साम्राज्यास व निरनिराळ्या शाहींस कसे व किती भोंवले हें आतां पुढील प्रकरणांत पाहावयाचें आहे.



**प्रकरण २ रें**

# सवाई मल्हाररावांचे पश्चात होळकरांची हलाखी
## सप्टेंबर इ. स. १७९७ ते मार्च १८००

मागील प्रकरणांत, अविधवा नवमीचें दिवशी सवाई मल्हाररावांवर शिंद्यांनीं अचानक छापा घालून त्यांस यमलोकीं पाठविले हें वर आलेंच आहे. काशीरावांचे पक्षास आंता हायसें वाटूं लागलें. शिंद्यांस होळकरशाही आपल्या दाबाखालीं आली म्हणून हर्ष वाटला. होळकरांना, विशेषतः विठूजी व यशवंतराव यांस तसेंच मल्हाररावांची पत्नी जयाबाई यांस आधार कोठेच उरला नाही. ''सुपातले हसतात आणि आधणांतले रडतात'' असाच प्रकार आतां होळकर घराण्याचा झाला. तो येणेंप्रमाणें:

मल्हाररावांची (पहिली) बायको सती गेली. यशवंतरावांची मुलगी भीमाबाई तिची आई व जयाबाई आणि यमुनाबाई हीं सर्व शत्रूंच्या हातीं लागलीं. जयाबाईस यावेळीं कांहीं दिवस गेले होते. मल्हाररावांच्या पश्चात शिंदे आणि काशीराव यांनीं त्यांचा गोट लुटून त्यांची जमियत उधळून टाकली. त्यावेळीं मल्हाररावांना सामील झालेले त्यांचे सापत्न बंधू विठूजी आणि यशंवतराव हे वाट फुटली तिकडे निघून गेले. त्यांच्या बायका आणि लहान-लहान मुले ही सर्व काशीराव यांचे हातीं लागलीं. जयाबाई या गरोदर होत्या. त्यांस पुढें पुत्र झाला. त्यांचे नांव खंडेराव असें ठेविलें. या सर्वांस सुभेदार काशीराव यांनीं आपल्या ताब्यांत घेऊन पुण्यासच कैदेंत ठेविले आणि त्या सर्वांवर त्यांची वक्रदृष्टी होती. जयाबाईस आपल्या दीराचा स्वभाव माहित होता. तेथून तिनें निसटून पुणें शहरांत वसती केली. तो प्रकार येणेंप्रमाणें: ''या बाईस स्वतंत्र डेरा देऊन चौकी पाहऱ्याचा काशीरावांकडून जाप्ता

होता. तेव्हां मल्हार शामजी दिम्मत होळकर निस्बत कापडनीस तुकोजीबाबांचे लोभांतील असामी, नाना फडणीस मेणवलीस निघून गेले होते, तेथून फौज बोलण्याविषयीं पैका द्यावयाविषयीचा करार ठरला त्याचे जाबसालांत व ऐवज आणण्यांत मल्हार शामजी होते. त्यांनीं जयाबाईशीं संधान लावून तुम्ही ठिकाणाहून निघून मुठा नदी उतरून यावें म्हणजे तुम्हास घेऊन जाऊं. या संधानावर एके दिवशीं त्यांचा जाबता नदीपार ठेऊन इकडे बाईस सूचना झाली. बाई पुण्यांत दाखल झाली. ती पुण्यास पोचल्यावर मल्हार शामजी यांनीं खर्चाचा वगैरे बंदोबस्त ठेऊन दिला.'' (**होळकरांची कैफियत, संपादक य. न. केळकर)**

ही झाली राजघराण्यातील स्त्रियांची हकीगत. आतां पुरूषांकडे वळूं. मराठ्यांच्या सर्व सैन्यास योग्य प्रेरणा देऊन त्यांस परमुलखांत स्वारीस न्यावें व तिकडे परभारें पोट भरून देशांत पैका आणावा अशा वृत्तीचा कर्तृत्ववान पुरूष कोणीही महाराष्ट्रांत उरला नव्हता. दौलतीचे धनी पेशवे, होळकर आणि शिंदे यांस फौजा डोईजड झाल्या होत्या. बाकी तुंबल्यामुळें धरणीपारणीं हा नित्याचा क्रम होऊन बसला होता. सारांश, बेबंदशाही आणि ''बळी तो कान पिळी'' याचेच उदोउदो होत होते. बेकार झालेले शिपाईगडी जो खायला घालील त्याचेंच नोकर बनायास लागले आणि बंडाळीची धामधूम जिकडे तिकडे गाजून राहिली. अशाचपैकीं काशीरावांचा सरदार मालजी गावडे हा दहा हजार लुटारू शिलेदार गोळा करून खानदेश लुटीत होता. जिवाजी यशवंत यानें गोदेच्या तीरास लुटालुटीचा भयंकर अनर्थ केला होता. विठूजी होळकरांनीं अशीच बेकार मंडळी हाती धरून मंगळवेढे, करकंब, पंढरपूर या बाजूस स्वारी काढली आणि सर्वदूर जाहीर केलें कीं आपण अमृतराव पेशव्यांचे सरदार आहोंत. आपली फौज ही त्यांचीच फौज आहे. किल्ले, कोट, ठाणीं जेवढी घेतली त्यावर विठुजीनें अमृतरावांचें निशाण चढविले. याप्रमाणें पुण्याहुन निघून सोलापुरापर्यंत विठूजीनें कूच केलें. सोलापूरच्या किल्लेदारानें बाजीरावसाहेबांचा अभिमान धरला, तेव्हां लढाईचा प्रसंग उद्‌भवला. होळकरांबरोबर चार हजार फौज होती, किल्लेदारास आबा काळे व पानशे तोफाफौजेसह येऊन मिळाले. चार घटका गोळागोळी झाल्यावर विठूजींनीं हल्ला करून पानशे व काळे यांची फौज मोडून पिटून लाविली व त्यांच्या तोफा हिसकावून घेतल्या. सोलापूरकरानें बराच वेळ नेटाने लढाई दिली, परंतु सोबत्यांची दुर्दशा पाहिल्यावर त्यांस मागें फिरावें लागलें. त्यांच्या मागोमाग विठूजी होळकर गांवांत शिरले आणि पेठ लुटून फस्त केली. ती खंडणी मिळाली ती घेऊन सोलापुराहून ते निघाले. ते करकंबेस आले व तेथें रुपये तेवीस हजार खंडणी घेतली (**ऐतिहासिक लेखसंग्रह पत्र नं. ५८६९ ता. १८-११-१८००**) त्यानंतर विठूजींचीं स्वारी संकरगांवीं गेली तेथून इ. स. १८०१ च्या जानेवारीस वाफगांवास जाऊन पुण्यास दहा बारा कोसांचे अंतराने मुक्काम केला. त्यांचा मनसबा होता कीं खानदेशांत जाऊन मालजी गावडे यांच्या सल्ल्यानें कार्यास लागावें.

अमृतराव पेशव्यांची बाजू विठूजी होळकरांनीं घेतलेली पाहून बाजीरावसाहेब पेशवे यांचे मन अस्वस्थ झालें. विठूजीचा मोड बापू गोखल्यांखेरीज कोणाच्यानें व्हावयाचा नाहीं

असें समजून गोखल्यांस त्यांनीं कर्नाटकातून बोलावून घेतलें आणि होळकरांची मसलत त्यांजवर सोपविलीं. ता. २७ एप्रिल रोजीं गोखल्यांनी विठूजीस कैद करून सरकारांत पाठविलें. ''सरकारवाड्यांत पोंहचतांच बेडी तोडून मार मारला. दोनशें कमच्या मारून लागलीच हत्तीच्या पायास बांधून ओढविला. दुसरें दिवशीं कारभारी येऊन मूठमाती द्यावयास परवानगी द्यावी म्हणोन अर्ज केला. त्यावरून आज्ञा जाहली. बायको सहगमन करणार होती. तिला आज्ञा जाहली नाहीं. बायको व पुत्र यांस कैदेत ठेविलें.''

जयाबाई दिराच्या नजरकैदेंतून निसटल्या आणि पुणें शहरांत येऊन राहिल्या हे वर सांगितलेंच आहे. पण येथेंही भाऊबंदकी आलीच. बाईस खंडेराव नांवाचा पुत्र होता त्यांस मारण्याकरिता सुभेदार काशीरावांनीं दोन तीनशें मारेकरी पाठविले, त्यांस बाईच्या लोकांनीं पराजित करून हुसकून लाविलें. तथापि पुनः तसा प्रसंग आल्यास आपली मजबूती असावी म्हणून बाईनें दोनशें अरब चाकरीस ठेविले आणि जास्त सावधपणानें राहूं लागली. **(ऐ. ले. स. नं. ६४४०)**

याप्रमाणें सुभेदार तुकोजीरावांचे पश्चात मल्हारराव हे भाऊबंदकी आणि सोबत्याचा द्वेषाग्नी यांस बळी पडले. दुसरें चिरंजीव विठूजी हे यजमानांच्या क्रोधाग्नीस बळी पडले. दोघेही शूर पण शूरत्व व्ययांत गेले. काशीराव नावांचें धनी, शिंद्यांचे हातांत बाहुलें होऊन बसले. शिंद्यांनीं आणि यजमानांनीं पंधरा लाखांच्या वराता केल्या. या वरातीच्या ''पेठ्यांत महेश्वर व स्वारी व दरखदार मंडळी आदिकरून कशाचाही भ्रम न राहतां, दारोदार पंचाईत होऊन आबताब कांहीं राहिला नाही. रोजरोजीना, खुराक, आणखीही देणें घेणे मिळून एकूण चाळीस लक्षांचा भरणा झाला. शिंद्यांचे हिशोबीं पांच चार लक्ष बाकी काढून तगादा चाललाच होता. पैशांकरितां पुण्यास सर्जेराव घाटगे आणि त्यांचा कंपू यांजवर जसा कहर केला तसा सुभेदार काशीराव यांजवरही केला. ही स्थिती झाली गादीवर असणाऱ्या सुभेदार काशीरावांची.'' बुडत्याचा पाय खोलांत म्हणतात त्याप्रमाणें काशीरावांस दुर्बुद्धी होऊन पोरक्या पुतण्यावर घाव घालण्यापर्यंत त्यांची मजल गेली हे वर आलेच आहे. राजघराण्यांतील स्त्रिया, मुले ही एक तर शिंद्यांच्या, नाहींतर खुद्द मालकांच्या नजरकैदेत. इतकी हलाखी सर्वतोपरी चारी बाजूंनीं मातोश्रीसाहेबांच्या पश्चात चार पांच वर्षांत उडाली, हे सांगणें देखील मोठ्या कष्टाचें होतें. ज्यांच्यावर प्रसंग गुदरला त्यांची मनःस्थिती कल्पनेनेच ताडावयाची आहे.

राहतां राहिले यशवंतराव. त्यांची हकीगत आतां पाहावयाची आहे. तत्पूर्वी ह्या दोन तीन वर्षांतील राज्यकारभार व लोकस्थिती हीहीं अवलोकनांत घेणें इष्ट आहे. सरकारी दप्तरांतील कांहीं लेखांचा मथितार्थ देत आहोंत. त्यावरून तत्कालीन स्थिती चांगली लक्षांत येईल. प्रथम खंडात, व्यापारी पेठा कशा बसविल्या, त्यांचे संरक्षण व संवर्धन सरकारांनीं व अधिकारी वर्गांनीं कसे केलें हे वर्णिलें आहे. सोबतच्या लेखांकांत याच पेठांची कळा पूर्ववत राहिली नाही असें जरी दिसून येतें तरी पूर्वकाळाची जाणीव जिवंत होती. राजकारभाऱ्याचा अगदीं उच्चशिखरावर वादळ उभें राहिलें होतें; आणि त्यामुळें सहज कल्पना येऊन जातें कीं सगळाच गाडा उलथापालथा झाला असणार असें अनुमान निघणें

साहजिकच आहे. पण परंपरा ही देखील एक बाजू विचारांत घेण्यासारखी आहे. या कालची जी पत्रें उपलब्ध आहेत त्यापैकीं कांहीं पत्रांचा सारांश खाली देत आहोत; व होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें म्हणून भाग प्रसिद्ध झाले आहेत, त्यांतील पत्रांवरून निष्कर्ष निघतो तोः

(१) **ता. २२–३–१७९७**. तीर्थरूप मावशीबाई (हरकुबाई थोरले सुभेदारांची उपस्त्री) इकडे आल्यामुळें कस्बे इंदूर व महेश्वर येथील शेट, सावकार, वाणी, उदमी उदासीन जाहले. तशांत जागोजाग भिल्ला भामराचे उपसर्ग लागतात यामुळें लोक आंदेशे करितात म्हणोन हुजूर समजलें. तरी रयतेचे मनांत कोणतेही विषयी संदेह न ये तें करून शहराचे जापते यथास्थित ठेवून, उदीम व्यापार पूर्ववत करणें म्हणोन खातरजमा करणें. म्हणोन. (भारमलदादांस पत्र)

(२) **ता. २४–४–९७ रामराव अप्पाजींस पत्र सुभेदार काशीराव यांजकडून**ः सावतमल कोठारी सावकार यांजपासून अडचणीचे प्रसंगीं कर्जावू ऐवज घेऊन जामदारखाना शिलकी ऐवजी मुकुंद जिवाजी यांजवर रदकर्ज वराता रुपये एक लक्ष नव्याण्णव हजार देऊन, तेथील खर्चास यापैकीं एक पैसाही न घेतां दरोबस्त सावकाराकडे भरणा करणें. यात वळवावळव केल्यास पतींत अंतर पडेल व पुढें कोणी खातें जपणार नाही. तुमचे खर्चाची ओढ आहे हें न कळावें ऐसें नाहीं. त्याची सरबरा होऊन जाईल. मतलब, सावकाराचे ऐवजांत वेध पडूं नये.

(३) **१०–९–९७ रामराव अप्पाजीस पत्र** : तुकोजीराव यांजकडून तोफखान्याकडील शेखजी कारागीर तोफा ओतावयाकरितां पाठविला आहे. त्याजला सरंजामाचा मेळ नन्हेखांकडील इंदूरी तोफ आहे ती महेश्वरीं आणून तिजला फोडून धात व महेश्वरपैकीं दससलाम तोफ आहे ती फोडून दोन्ही तोफांची धात कारागिराकडे देऊन कोळसे वगैरे जिन्नस याचा मेळ लावून देणें आणि तोफा चांगल्या सुरेख जलदी ओतविणें म्हणोन.

(४) **ता. २८–११९७ अंताजी बापूजी कमाविसदार चांदवड यांस सुभेदार काशीराव होळकर यांजकडून ताकीदपत्र** : श्रीक्षेत्र त्र्यंबक येथें श्रीकुशावर्तापाशीं सरकारांतून नगारखाना व गंगेस अभिषेक पूजाअर्चा नैवेद्य व ब्राह्मण भोजन मल्हारराव रामचंद्र निस्बत सरकार, व्यास यांचे विद्यमानें नेमणूक रु. २२०० साल दरसाल देत जाणें मजरा पडतील. म्हणोन.

(५) **ता. २४–१–१७९८ बातमीदार लिहितो** : काल रंगपंचमीस श्रीमंतांनीं वाड्यांत रंग करून सर्वांस बोलविले होतें. सोबती व आपले यजमानही गेले होते. रंग गुलाल, नाच, दोन प्रहरापासोन अस्तमानपर्यंत झाला व येथील प्रकार विलक्षण झाला. महेश्वरच सर्वांची स्थिती कशी राखील तो राखो. सर्वत्र मंडळीचे नांवें मनस्वी आंख (पट्टीचे रुपये) आज तिसरें प्रहरीं दिवाण कारभारी यांस पुढें घालून नेले. तेही रात्रभर तेथेंच होते. याद झाली. तगादे होणार, त्यामुळें राजश्री गोविंदराव रघुनाथ गानू गांवांत होते. त्यांनीं पुत्रासहित स्थलांतर केलें. येथील प्रकार कोणतेही प्रकारे सोईचा दिसत नाही. थोडेच लिहिलें यांत फार समजावें.

(६) **ता. १०–६–१७९८ रा. बाळाजीपंतास संताजी होळकरांकडून पत्र** : कसबे

खरगोण येथील बनारसीदास सेठ, देवीदास निहालचंद वगैरे विषयीं गैरवाका सजावून त्यांचे स्त्रियांचे पोटीं संतान नाही. सबब निवारसी माल सरकारांत घ्यावा म्हणोन ह्यापूर्वी कै. मातोश्रीसाहेबांस कोणी समजावले. परंतु त्यांस ते समयीं समजाविणारास लक्षपूर्वक ताकीद करून एक पैचाही आभिलाष न धरितां सावकाराचे लौकिकावर दृष्टी ठेऊन समक्ष बोलावून तुमचे पैक्याची दुराशा सरकारांस करावयाची नाही, तुम्ही आपले प्रीत्यर्थ खर्च करून सुखे नांदावें. म्हणोन बहुमान देऊन बिदा केलें. म्हणोन.

(७) **ता. १२–७–९८ रामराव अप्पाजीचे पत्र बाबाजीचे नांवें** : सोबत्यांचे (शिंद्यांचे) गृहकृत्यामुळें विश्वांत अत्यंत त्रास झाला. अशा अन्यायाकरितां श्रीमंतांस साह्य होणें प्राप्त झाले. देशचे महालीं ''सोबत्यांकडील फौजेचे मनस्वी बोभाट रोखे वगैरे पहायास आले. तरी आपल्या जिल्ह्यास कोठें उपसर्ग न लागे तें करावें, म्हणोन.

(८) **ता. ३१–८–९८ मैराळ गणेश याचे पत्र बाबाजीस** : मुक्काम ब्राह्मणगांवाहून. श्रीमंत यशवंतराव होळकर बागेंत रा. नारायणराव अप्पाजवळ आहेत. त्यांची मर्जी ब्राह्मणगांव घ्यावे व रेवा उत्तर तीराची घाटबंदी करावी, कारण, पवारांनीं केली आहेः परंतु काम चालत नाहीं. गोवर्धन भील दोन चारशें माणसें जमवून शेतमळ्यापलीकडे आहे. अशी स्थिती आहे. आम्हांस कोठेंच ठिकाण नाही. तरी पागा शेपन्नास माणसें तरी पाठवावीं. म्हणोन.

(९) **रा. बाबाजी अनंत व आबाजी रणसोड यांस संताजी होळकरांकडून पत्र :** (ता. १४–११–९८) राजश्री यशवंतराव होळकर यांनी पवारास शामील होऊन देपाळपुरास उपद्रव देऊन ठाणें घेतलें, याकरितां कांहीं सरंजाम सिद्ध करून आळ्याचा माणूस पाठवून बंदोबस्त करावा. म्हणोन वगैरे.

(१०) **ता. १७–१२–१७९८ राजश्री नाना फडणीस यांचे नांवें पत्र** : राजश्री यशवंतराव होळकर यांजकडून कै. मातोश्री बाईसाहेब यांचे मागें संस्थान महेश्वर येथील धर्मकृत्य वगैरे यथास्थित चालावे ऐसीयासी श्री. मातोश्री बाईसाहेबांचे मानस होतें. येविसीं तीर्थस्वरूप संताजीबाबा होळकर यांस समक्ष आज्ञा केली ''आपल्या पदरचीं माणसे यांचे चालत आल्याप्रमाणें धर्मकृत्यांत न्यून न पडू देतां श्रीमंतांचे चरणांसी लक्ष ठेऊन यथासांग स्वामी सेवा घडोन दौलतीचे कल्याण होणेंविषयीं कमी न पडो'' ऐसें बोलून देह विसर्जन केला. नंतर कांहीं दिवस चाललें. मध्यें नाना प्रकारचे बखेडे पडोन सर्व राहिल्यामुळें हल्लीं धर्मकृत्य व लोक वगैरेबद्दल कैलासवासी ह्यांचे आज्ञेवर लक्ष ठेवून राजश्री भारमल होळकर यांजकडे संस्थानचें काम सांगून खर्चास खरगोण व नागलवाडी, ब्राह्मणगांव व महेश्वर हे चार महाल नेमणूक करून देऊन रवानगी केली. ते महेश्वरी गेल्यावर पूर्ववत्प्रमाणें धर्मकृत्य चालतें होऊन व पुढें चालावें, रयत व सावकार यांचीं खातरजमा करून चालवणें यात पुढें वेध न पडावा हें आपल्याकडे आहे. रवाना छ. १९ माहे रजब.

(११) **ता. ९–२–१७९९** मीरखान पठाण जमादार हेडेकर सिलेदार सरकारांत नोकर आहेत त्यांचे सालिना बोलीचा ठराव होऊन. इ. स. १२०८ फसली, (इ. स. १७९८).

१५९०० जातीचा ठराव. रुपये

८००० खाशांस  १२०० अहमदखान  २००० गुलामीखान  १००० हत्तीखर्च

१२०० शेरदानखां  १२०० महंमदपील  १३०० पालख्या  २ बद्दल. एकूण खर्च

खेरीज स्वार हजरीस येतील त्यांची बोली सालिना दरअसामीस रु. ८०० प्रमाणें दिले जातील. पाउणशें रूपयांचे खालीं घोडे हजेरीस लागू होणार नाहींत. पाऊणशें रुपयांचे कमी येईल तसे वजा केली जातील. चाकरी इमानें इतबारे करावी वगैरे.

(१२) **इ. स. १८०१**. कबुलायत श्रीमंत खंडेराव महाराज होळकर निस्बत यशवंतराव होळकर कबुलायत असालतखां किफायतखां साकीन रामपुर टोंक प्रांत रोहिलखंड सिलेदार सेवेशी चाकरीस हजर असो. सालिना बोली रुपये २००० चाकरी स्वदेशी, परदेशी इमानेंइतबारें करीत जाऊं. साहेबांचे पायांशी अंतर करणार नाही. फंदफितुर केल्यास सरकारचे गुन्हेगार म्हणोन वगैरे.

(१३) **ता. १२–८–१७९९** फूलन फरांसिस जप्ती सावेर यांस खंडेराव होळकरांकडून कीं जप्तीचा हुकूम झाला त्याप्रमाणें खासगीचे गांव खेरीज करून तामिली करावी. खासगीची वहिवाट रा. भारमल होळकर यांजकडे आहे.

(१४) **ता. ३१–१२–१७९९** श्री. यशवंतराव होळकरांकडून भारमल होळकर यांना कीं, जेतकर्ण मंडलोई इंदूर यांनीं स्वारींत येऊन विदित केलें कीं मौजेमजकूरचे गांव खासगीकडे आहेत. तेथील आमचे दस्तुरीची वहिवाट चालून जिरायती जमीन पेशजीपासून चालत आली आहे. असें असतां नवीन अंमलदार आले आहेत ते सरकारपत्रांची अपेक्षा घेतात. त्यांजला आज्ञा झाली पाहिजे. म्हणोन त्यावरून हे पत्र लेखन केलें असें. तरी तुम्ही मजकूर समजून मंडलोई यांजकडोन खासगीचे गांवांत हक्क व वहिवाट पूर्वीपासून चालत आली असेल तिजला दिक्कत न करितां पुढें चालविणे म्हणोन.

(१५) **इ. स. १७९९** श्री. खंडेराव होळकरांकडूंन अमृतराव महाडिक कमाविसदार देपाळपूर यांस. खासगीचे गांवांत तुम्ही कोणें प्रकारें दखल देऊ नये. खासगीची वहिवाट राजश्री भारमल होळकर यांजकडे सांगितली आहे. खासगीचे लावणी उगवणीचा बंदोबस्त ते करतील. म्हणोन.

सुभेदार श्रीमंत काशीराव हे तीन चार वर्षे पुण्यासच राहिले ते शिंद्यांचे अगदीं मुठीत गेलें. ती मगरमिठी होळकर घराण्याला आणि संस्थानाला अगदी प्राणांतिकच होऊन बसली. सरकार तिजोरीवर जवळजवळ अर्धे कोटीचें ओझें येऊन पडले या ओझ्याचा परिणाम वरील पत्रांत स्पष्टच दिसतो आहे. तथापि राज्यकारभाराचे सूत्र पहिल्या दोन कारकीर्दीत व्यवस्थित लावून दिलें असल्यामुळे ती घडी जीव धरून होती. अधिकारी मंडळ त्या तालमींत वाढले असल्यामुळें शिस्तीच्या खुणा जीव धरून होत्या. खासगीचा व दौलतीचा संबंध कसा होता हे ह्या पत्रांवरून कळून येईल. तसेंच समजून उमजून अगर अज्ञानानें चुकी झाल्यास ती दुरूस्त करण्याचाही मार्ग राज्ययंत्रांत अजून शिल्लक होता हेंही दृग्गोचर होतें. तसेच राज्यकारभाराची लष्करी बाजू ध्यानीं येईल दूर प्रांतांतील स्वाऱ्या ऊर्फ मुलूखगिरी

या तीन वर्षांच्या मुदतीत न होतां घरांतच स्वाऱ्या शिकाऱ्या होत होत्या. त्यांचे स्वरूप चांगलें दृष्टोत्पत्तीस येते. एकंदर कारभारांत, निदान खाली तरी शिस्त चांगली नांदत होती, हें दिसून येईल. दानधर्म व औदार्य यांचा ओघ अगदीच वाळून गेला नव्हता. थोरल्या माधवराव पेशव्यांनीं मृत्युसमयीं आपली मनीषा कलमबंदी करून दिल्ही होती. मातोश्रीसाहेबांनीं थोड्या शब्दांत आपली शेवटली इच्छा प्रदर्शित केलेली दहाव्या पत्रांकावरून दिसून येईल. पत्रांक पांच पुण्याची स्थिती दर्शवितो. मुख्य स्थानीं किती कोलाहल जाहला होता हें त्या पत्रावरून अजमावितां येईल. सारांश, मातोश्रीसाहेबांच्या पश्चात जी स्थिती उदभवली. तिचे विहंगमदृष्ट्या अवलोकन केल्यास असें दिसून येतें कीं राज्यकारभाराचा अगदी वरचा भाग निर्बल होऊन बसला होता. सरंजामी सरदार तटस्थ राहिले होते. पिढीजात नोकर आपलें वळण आपापल्यापुरते वळवीत होते. वेळप्रसंगी स्पष्टवक्तेपणा बाहेर उमटे. तळमळ होई पण ती लेखणीबाहेर पडेना. व्यापारी उदमी अस्वस्थ होऊन राहिले होते. मथितार्थ हाच कीं वटवृक्षाचा बुंधा व मधला भाग रसानें भरलेला होता. वृक्ष मात्र जीर्ण होत चालला होता. अशा स्थितींत या वृक्षाचे संरक्षण, संवर्धन व संगोपन कोण करणार? असा प्रश्न विचारी मनास साहजिकच उद्‌भवणार. ज्यांनीं हा वृक्ष प्रथम लाविला त्या पेशवे सरकारांचा तत्कालीन वंशज या वृक्षावरतीच उठला. ज्या घराण्यानें या वृक्षाची लागवड केली आणि शेजारीं आपल्या ''सोबत्यांसही'' नांदावयास घर करूं दिले. तोच सोबती या वृक्षावर घाव घालण्यास सज्ज झाला अशी परिस्थिती असतां, बाहेरून न दिसणारा पण आंत घवघवीत असलेला कोम पुढें सरसावला आणि त्या वृक्षास टवटवी आली. हा कोम दुसरा कोणीही नसून रणशूर यशवंतराव महाराज होळकर होत. त्यांच्याच कारभाराकडे आतां पुढील प्रकरणांत वळूं या.



# होळकरशाहीचा इतिहास

## संघर्ष काळ

## स्वातंत्र्यवीर यशवंतराव होळकर

**इ. स. १७९७ ते १८११ पर्यंत**



**''स्वराज्यांत जलचरांचा प्रसार विशेष झाला.
त्यांस चोंहोकडून पायबंद देऊन हारीस आणावे.''**

**प्रकरण ३ रें**

# श्रीमंत यशवंतराव होळकर
## इ. स. १७९७ ते १८११

यशवंतराव होळकर इ. स. १७९७ च्या ''मल्हारगर्दीतून'' कसेबसे बाहेर पडले ते पुण्यास गेले. तेथून जेजुरीस पोंहचले. तेथील ''आगलावे'' आडनांवाचा देवपुजारी होता. त्याजकडून श्रीमार्तंडाची महापूजा करविली आणि त्याजकडूनच एक घोडी व चारशें रुपये घेऊन जेजुरीहून निघाले ते नागपुरकर भोसल्याकडे येऊन पोंहचले. रघुजी भोसले यांनीं ''मोठ्यांचा मूल वख्तशीर आपल्यापाशीं चालून आला. तेपक्षीं सर्वपरी बरदास्त करून आपल्यापाशी ठेविले''. हे वर्तमान पुणें मुक्कामीं सुभेदार काशीराव होळकरांस समजतांच त्यांनी पेशवे व शिंदे यांचे कानावर घालून भोसल्यास पत्रें धाडलीं कीं, ''यशवंतराव होळकर तुम्हांपाशीं पळून आला आहे. त्याजला कैद करून पुण्यास पोंहचवून द्यावें.'' ही बातमी यशवंतरावांस कळतांच ते बापू विठ्ठल प्रभू यांच्या सल्ल्यानें व साह्यानें नागपुराहून निसटले. बापू, विठ्ठल चार महिने श्रृंखलामंडित झाले व मागाहून सुटले.

यशवंतराव नागपुराहून निसटले आणि अनवाणीच पुढें निघाले. रस्त्यांत थकून भागून गेल्यामुळें ज्वारीच्या शेतांत दहापांच ताटांचे आड जाऊन बसले. एवढ्यांत एक कायस्थ घोडेस्वार रस्त्याने चालला होता. त्याजला पाहून यशवंतरावांस शंका उत्पन्न झाली. पुढें प्रश्नोत्तरें होतां भीतीचें कांहीं कारण नाहीं अशी यशवंतरावांची खात्री झाली. ''दोघेही वाटसरू झाले. यशवंतरावांनीं पांथस्थाचे मन अनुकूल करून चार कोस यानें घोड्यावर बसावें, चार कोस त्यानें बसावें, अशी सेवा चाकरी करूं लागले.'' अशा प्रकारे जो स्नेहसंबंध

जडला तो पुढें वृद्धिंगत झाला. हा पांथस्थ पुढें यशवंतरावांचे कृपेनें त्यांचा बक्षी झाला. त्याचें नांव लाला भवानीशंकर असें होतें. यानेंच यशवंतरावांची दिनचर्या लिहून ठेविली आहे तीवरून पुढील हकीगत आम्ही देतो.

हे दोघे पांथस्थ नागपुरातून निघाल्यावर पायवाटेनें चालत चालत हिंडोल्या गांवीं आले व तेथून चार कोसांवर खालोदा गांवीं पोंहोचले. प्रवासाचे गर्दीने व श्रमाने त्यांची प्रकृती अगदी अस्वस्थ होऊन गेली होती. थोडासा आराम वाटल्यावर खाण्यापिण्याच्या वस्तूंचा त्यांनीं शोध चालविला आणि शेवटीं फक्त फुटाणे आणि कांदे यांच्यावर आपली क्षुधा शमविली. रस्त्यानें प्रसंग पडेल तशा बतावण्याही करून त्यांनीं आपला रस्ता चालविला. प्रवासांत नरगांव, झरूर, बरूड हे गांव त्यांनीं गांठले. तेथें यशवंतरावांस कळलें कीं त्यांचे शोधार्थ स्वार सुटले आहेत. तेव्हां ते लगबगीने एलिचपुरास येऊन पोंहचले. रस्त्यांस भवानीशंकराने यशवंतरावांस नोकराच्या रूपानें वागवून वेळ मारून नेली. प्रवासांतही शरीराचे कष्ट आणि मनाची चिंता त्यांस सुटलीं नाहींत. सारांश, मल्हाररावांच्या मृत्यूनंतर यशवंतराव पुण्याहून जे निसटले ते रस्त्यात ज्ञातअज्ञात संकटांस तोंड देत देत दीड वर्षाने खानदेशांत येऊन पोंहचले.

खानदेशांत आल्यावर झुंझार नाईक भिल्ल याचे हटीवर ते आले. त्यांस भेटून खासगत वर्तमान सांगितलें. त्याने सर्वोपरी अंगेजनी करून त्यांस आपलेपाशीं ठेविलें. तेथें शिबंदीची कलमजारी करून पांचचारशें माणसें ठेवून सुलतानपूर, नंदुरबार, (हे महाल होळकरांचे होते) येथें लुटण्यास प्रारंभ केला. हे वर्तमान सेंधव्यास भिकाजी होळकर यांस समजल्यावर त्यांनी आनंदराव होळकर यासमागमें तीनशें स्वार व पांचशें पायदळ देऊन यशवंतराव होळकर यांस धरून आणावें या इराद्यावर रवाना केलें. त्यांची यांची एक दोन वेळ झुरमठ होऊन, येथें आपले पाय टिकत नाहींत असें समजून, तेथून झुंझार नायकास न समजतां रातवा घेऊन शेपन्नास माणसांनिसीं यशवंतराव निघाले.

बडवाणीचे आसपास गोरधन नाईकाची हटी होती तेथें जाऊन विसावा घेतला. तेव्हां गोरधन नाईकाचे पोटांत पाप उत्पन्न झाले कीं याजला हस्तगत करून सेंधव्यास पावतें करून आपण सरफराज व्हावें. ही गुणगुण कानीं येतांच यशवंतराव तेथून निघून शाबुतीनें बढवाणीस आले. बढवाणीहून गुप्त रीतीनें महेश्वरास एक फेरी मारलीः एके दिवशीं तर घोड्याचे दाण्यांतून ओंजळभर हरभरे घेऊन यशवंतरावांनीं दिवस काढला.

संताजी होळकर, भिकाजी होळकर, त्याचप्रमाणें भारमलदादा हे तिघेही यशवंतरावांच्या कामगिरीस उपदूव्याप समजत होते आणि यशवंतरावांस हस्तगत करून घेण्याबद्दल त्या तिघांचे आपआपलेपरी प्रयत्न चालू होते. पुढें तिघांसही कळलें कीं यशवंतराव धरमपुरीचे बेटांत आहेत. तेथें या तिघा होळकरांचा ससेमिरा लागतांच यशवंतरावांनीं धरमपुरी सोडली आणि ते धारेस येऊन पोंहचले.

धारेला आनंदराव पवार यांजपाशीं राहिले. ३०० माणसांचा तैनात जाप्ता केला. याच सुमारास राजेसाहेब व त्यांचे दिवाण रंगराव ओढेकर यांच्यात वैषम्य वाढून दोघेही

हातघाईवर आले. ''त्यात पवाराची जमियत, स्वार, पायदळ मिळोन १२०० व एक तोफ. रंगराव ओढेकर याचेबरोबर ३००० स्वार, पेंढारी. यांचा त्यांचा मुकाबला होऊन धारकरांचे जमियतीचे पाय उठले हा पवारांवर आलेला प्रसंग बिकट आहे असें पाहून यशवंतराव होळकर पुढें सरसावले. त्यांच्या खासगत जमियतीपैकीं पांचपन्नास माणूस भिडेवर होते, त्यांस हमराह करून तोफेंत आपले हातें बार भरून पांच गोळे मारले. तोफेपुढें जुमस न खातां रंगराव निघून उज्जेनीस गेले. आनंदराव पवार यांचा जय यशवंतराव होळकर यांचे समयसूचकतेमुळें आणि धैर्यामुळे झाला. त्यांच्या आश्रयाखालीं आणखी कांहीं दिवस धार येथें स्वस्थ राहिले. वर वर्णिलेली लढाई धारेचे ईशान्येस सात आठ कोसांवर किसोली गांवीं झाली.''

अधिकारावर आरूढ संताजी होळकर व भारमलदादा होळकर यांस यशवंतराव उपद्व्यापी दिसत तरी त्यांच्या (यशवंतरावांच्या) उद्योग, साहस, धाडस आणि कर्तृत्व या गुणास चाहणारीं अशीं कांहीं घरचीं तशींच बाहेरचींही माणसें होतीं. ती सर्व मंडळी आतांपर्यंत चाललेला खेळ पहात होतीं. धार येथील मालकांस यशवंतरावांनीं संकटमुक्त केलें ही बातमी चोहोंकडे फाकतांच यशवंतरावांस लोक येऊन मिळूं लागले. या मंडळीची नांवनिशीं : शामराव महाडिक हे पोटपाण्याची सोय पाहण्यासाठीं इंदुरास येऊन राहिले होते. बहुत हलाखींत इंदुराहून निघोन धारेस आले. त्यांनीं ''अचाटबुद्धी खेळून लक्षुमीस हात घालावा, अशा भावीं धैर्य देऊन उमेद वाढविली.'' तेव्हां यशवंतरावांनीं पवाराचे घरीं धरणें दिलें. तीन हजार रुपये बाकी निघाली ती घेऊन चार माणसांची जमियत होतांच शेंदोनशें स्वार त्या जिल्ह्यांतील नोकर ठेवून लाला भवानीशंकर, शामराव महाडिक व बाळाजी कमळाकर असें जमियतीसह निघोन देपाळपूरावर जाऊन धडकले. येथून यशवंतरावांचा नवा उपक्रम सुरू झाला. आतांपर्यंत ते येथें तेथें, हे आहे नाहीं, अशा अर्धवट स्थितीत दिवस काढीत होते. आतां जमियत जमली. धीरवान, पुढाकार घेण्यास योग्य, अशीं माणसें सज्ज झालीं आणि डोळ्यापुढें कार्यक्रम आंखून ते चालूं लागले.

देपाळपूर परगणा हा त्यांचा म्हणजे होळकरांचा होता. तरी पण त्याचें स्वामीत्व पवारांच्या जोरामुळे अगदीं लुळें झालें होतें. त्याचप्रमाणे दक्षिणेतील अंबाड वगैरे परगण्यांची स्थिती झाली होती. देपाळपूर येथें येतांच शेंसव्वाशें घोडे पागेचे व रोकड पन्नास हजारांचीं त्यांचे हाती लागली असें कैफियतकार लिहितात. हें द्रव्य हातीं येतांच त्यांनी कलमजारी सुरू केली. ह्या वाढलेल्या फौजेनिशीं शेजारी असलेला दुसरा होळकरशाही परगणा जावरा, बर्डावदा येथें ते गेले. पण तेथें त्यांस यश आलें नाहीं. तेथून ते झरवदा येथें गेले. कोठें रोकड हाती आली कीं ती तनखा वाटण्यांत उपयोगी होई. यामुळें जमियतही जिवावर उदार होऊन लढे. या मुक्कामांत असतां महदपूरच्या वाघ राजानीं यशवंतरावांशीं कृत्रिम केलें. वाघाने धान्याचा वगैरे पुरवठा केला, पण आतून माणसें बहकविण्यास कमी केलें नाही. या वेळी लाला भवानीशंकरानें प्रसंग वाचविला. रस्त्यांत जात असतां वाघाचा सूड यशवंतरावांनीं गांव बेचिराख करून टाकून, घेतला. पुढें फणशांच्या जहागिरीचे गांव तराणा

येथें यशवंतराव आले. तेथील सेवकानें आदरातिथ्याने सेवाधर्म उत्तम पाळला. प्यादे माणसें बरोबर देऊन यशवंतरावांची कायथ्यास रवानगी केली. तेथेंही सेवकानें एक हजार रुपये नजराणा देऊन, शिवाय यशवंतरावांबरोबर चाळीस स्वार नोकरीस दिले. कायथ्याहून यशवंतराव झोकर गांवाकडे गेले. रस्त्यामध्यें मिळेल तेथें सोनें व माणसे ते जमा करीतच गेले. ध्यानींमनीं शिंदे व त्यांनीं केलेंली हानीं हीं यशवंतरावांच्या डोळ्यापुढें डांचत होती. शिंद्यांचा मुलुख लागतांच मालकाचा सूड ते मुलखावर उगवूं लागले. लखबादादाच्या एका सरदाराबरोबर त्यांचे साज्यापुराकडे दोन हात झाले. पण पुढें समेट झाला. तेथून सुसनेर व सारंगपूर इकडे ते वळले.

सारंगपुरास येऊन पोहोंचतांच, आतांपर्यंत त्यांनीं केलेल्या पराक्रमाचें जणूं काय फळ म्हणूनच वजीर हुसेन, मीरघासी व मर्दानअली हे आपआपल्या जमावानिशीं आपण होऊनच येऊन यशवंतरावांस मिळाले. वजीर हुसेन हा होळकरांचा जुना नोकर होता. तो शंभर स्वारांच्या जमियतीनिशीं आणि दुसरा एक इसम साठ स्वारांनिशीं येऊन मिळाला. मेहरबानसिंग हा होळकर सरकारचे पदरचा असल्याने तोही तीनशें स्वारांनिशीं आला. जमाखान व सोबाजी हेही सारंगपुरास येऊन मिसळले. भवानीशंकराच्या मार्फत भोपाळचा अमीरखां पठाण अर्जदार झाला.

अशा मोठ्या लवाजम्यासह यशवंतराव शिंदेशाहींत वळले. सुजालपुराकडे आले आणि बेगंजपूर लुटलें. त्यांचा नांवलौकिक ऐकून त्या भागांतील नरसिंगगडच्या अधिकाऱ्यानें (नरसिंगगड हे संस्थान बुळे यांचे सरंजामातील होते) यशवंतरावांकडे चारशें स्वार, दोन हजार प्यादे, दोन हजार रुपये नगद आणि पोशाख असा नजराणा पाठवून दिला. याच वेळीं नबाब अमीरखानचा भाऊ करमदीनखान हा यशवंतरावांच्या भेटीला शंभर स्वारांनिशीं येऊन आपला बंधु अमीरखान हा आपल्या भेटीला येऊं चाहत आहे अशी त्यानें विनंती केली. पुढें सुजालपुरास अमीरखानाची भेट झाली. भेटीनंतर अमीरखानास मोठी वस्त्रें आणि हजार रुपये नगद देऊन यशवंतरावांनीं त्याचा मोठा गौरव केला. सुजालपूर महालांतून दहा हजार रुपये खंडणी घेतली आणि शिपाई लोकांचा तनखा वाटला. यशवंतरावांच्या कीर्तीमुळें जशीं बाहेरची माणसे त्यांस येऊन मिळूं लागली तशीच काशीरावांच्या दुबळेपणामुळें त्यांचा पक्ष सोडून रामसिंग पागेदार आणि कांहीं मंडळी, चारशें घोडे व पुष्कळसा असबाब घेऊन यशवंतरावांकडे वळले. त्याचप्रमाणें रामपूरचा राहणारा नजीबखान शंभर शिपाई व अकरा स्वार यांसह व कोहेलखान चाळीस स्वारांनिशीं व सदरूद्दीन शंभर स्वारांनिशीं यशवंतरावांच्या लष्करांत येऊन चाकरीस राहिले. या वेळीं अशा रीतीने त्यांच्या लष्कराची गणती सुमार दोन हजार स्वार आणि पांच हजार पायदळ इतकी झाली. यानंतर अमीरखानास यशवंतरावांनीं तैनात जाबता करून दिला. तसेंच दुसरेंही जे खांसाहेब लष्करांत प्रविष्ट झाले त्यांचे त्यांजपरी जाबते कायम केलें. ह्या जाबत्यांस तैनात जाबता असें शीर्षक आहे त्यावरून ही सर्व मंडळी नोकर आहेत हें स्पष्टच होते.

नदी उगमास अत्यंत लहान असते. पुढें तिला दोन्हीही बाजूंनीं पाट येऊन मिळतात.

त्या सर्व पाटांस पोटांत घेऊन नदी दुथडा जोमानें फोफावूं लागते; तोच प्रकार आतां यशवंतरावांच्या सैन्याचा झाला. दशकानें प्रथम मोजलेले स्वार आतां सहस्त्रावधी झाले. पायदळ त्यांत मिसळलें, जमियतदार जमियतीनें जमूं लागले, असा हा सेनासमुद्र झाला. त्याच्या जोरावर यशवंतरावांनीं शिंदेशाहींत हलकल्लोळ करून सोडला.

सुजालपुरच्या अमीनापासून सात हजार रुपये खंडणी वसूल केली; बडोदपासून चार हजार रुपये, अष्टयाहून पंधरा हजार आणि नेमावरमधून सात हजार. यांतून प्रथम फौजेची समाधानी केली. हा त्यांचा क्रम पाहून नजबअल्ली शंभर स्वारांनिशीं, रामजी गोळी आणि हाकीमखां हे साठ स्वारांसह येऊन मिळाले. तेथून यशवंतराव शिंद्यांच्या हंडिया ह्या सपंन्न शहराकडे वळले. शहरावर एका बाजूनें स्वारांनिशीं, दुसऱ्या बाजूनें पायदळानिशीं हल्ला करून गांवचा तट हस्तगत केला. हंड्यास चार दिवस मुक्काम झाला आणि अगणित लूट मिळविली. तेथून खरगोणाकडे चालले. रस्त्यांत मुंदी गांवापासोन दोन हजार वसूल केलें. सनावदच्या कमाविसदारापासून सहा हजारांचा नजराणा घेतला. खरगोण परगण्यांत एकंदर पंधरा मुक्काम झाले. तेथें मेवाडचा जाफरअलीखान हा पन्नास स्वार आणि दोनशें पायदळ घेऊन आला. खरगोणबत्तीशींत एकंदर मामल्याचे वीस हजार रुपये जमा झाले. भिकनगांवाहून निघून कसरावदेजवळ पहाडाखालीं येऊन पोंहचले. त्याच सुमारास महेश्वराच्या आसपास भिल्लांनीं बंडाळी आरंभिली. भिल्लांची बंडाळी आणि यशवंतरावांची स्वारी, या दोन्हीं गोष्टी पुण्यास सुभेदार काशीरावांच्या कानीं एकाच वेळीं जाऊन थकडल्या. तेव्हां त्यांच्या सल्लागारांत वाटाघाट सुरू झाली. ''पुण्याहून बापू होळकर यांस फौजेसह रवाना करावें हा मनोधर्म सुभेदारांचा. परंतु मुत्सद्दी यांचे मनांत बापू होळकर गेले असतां कार्यास खोट नाहीं. परंतु पुढें बापूस कोणी आकळावें.'' शेवटी नागो जिवाजीबरोबर शिलेदारांचे चारशें स्वार, चार पांचशें स्वार पागा व फूलनसाहेब निस्बत दुदरनेक (फ्रेंच लष्करीं अंमलदार) यांचे पलटण यांसह माळव्यांत बंदोबस्ताकरितां पुण्याहून रवानगी झाली.

पुण्याहून वरती येत असतां चांदवड मुक्कामीं नागोजीच्या माणसांची आणि गोडबोले निस्बत पेशवे यांच्या माणसांची कहीकबाडावरून खटखट झाली. धोंडोपंत गोडबोल्यांचा पराभव झाला. नागो जिवाजी इंदुरास दाखल झाले तों यशवंतराव कसरावदेस तळ देऊन राहिल्याचें वर्तमान त्यांस समजलें. नागोजींनीं पांचशें स्वार शिलेदारांचे बाबू पिंगळे यांजबरोबर देऊन व एक पलटण ज्यानसाहेब फिरंगी, यांसह कसरावदेवर चालून गेले. प्रथम यशवंतराव थोडेसे कचरले तेव्हां शामराव महाडिक बोलले, ''बिना एक वेळ दाती दिल्याखेरीज नक्षा जमणार नाही.'' यशवंतराव यांस धीर आला. मग मनसुबा सिध्द करून मीरखां वगैरे रिसालदार, बोलावून आणून, त्यांची खातरतसल्ली करून, हमराह केलें. इकडे नागोजींनीं पाठविलेली फौज व पलटणें कूच करून खरगोणचे सुमारें जात होती. तितक्यांत यंशवंतराव सडा घोडा राऊत दोन-अडीच हजार घेऊन पोंहचलें. पलटणेंवाले किल्ला बांधून होते. यशवंतरावांनीं घोडे घालून माणसें जाया करून ज्यानसाहेबास धरून घेतलें. सारांश, यशवंतरावांनीं कसरावद मुक्कामीं कवायती पलटणीशीं लढाई देऊन यश संपादिले.

कवायतीची झाकलेली मूठ त्यांनी उघडी करून दाखविली. खाजाअलीखान यानें भीमाप्रमाणें हल्ला केला, त्यांत त्याला सोळा जखमा झाल्या. मेहरबानसिंग हेही हिंमतीनें पुढें सरसावले. यशवंतराव ह्यांच्या हाताच्या आंगठ्यास बंदुकीच्या संगिनीची जखम झाली. असें असतांही त्यांनीं पुष्कळशा शूर लोकांस जमधर (एक प्रकारची लहानशी तरवार) आणि खंजीर यांनी जमीनदोस्त करून टाकिले. सुभेदार काशीरावांचा पक्ष पूर्ण पराभूत होऊन सैन्याची आणि पलटणांची दाणादाण झाली. त्यांच्या चार तोफा यशवंतरावांच्या हातीं आल्या. ज्यान फिरंगी इंदुराकडे परतला. ही लढाई मारल्यावर यशवंतराव महेश्वरास गेले. तेथून ते सत्वासला आले. तेथें त्यांस सात तोफा मिळाल्या. त्या दुरूस्त करून ते बडगोंदा येथें आले.

कसरावदच्या लढाईचे परिणाम फार दूरवर झाले. महेश्वरादि ठिकाणीं कारभारावर स्थिर असलेले भारमल दादासारख्यांस यशवंतराव आतां ''उपद्व्यापी'' न भासतां उद्योगी दिसूं लागले. तुलनेनें काशीरावांचा कमकुवतपणा डोळ्यापुढें स्पष्ट झाला. ही झाली स्थिती अधिकारी वर्गाची. पुण्याहून आलेले लष्कर आतां यशवंतरावांविरूद्ध न राहतां आंतून आणि बाहेरून यशवंतरावांस सामील झालें. या लढाईची कीर्ती दूरवर जाऊन त्यांच्या कार्यास आतां लोक विघातक न मानतां विधायक मानूं लागले. त्यांचा आता मुक्काम नावडातावडीस होता. मावशीबाई (हरकूबाई) यशवंतरावांस महेश्वरीं वाड्यांत घेऊन आल्या. किल्ल्यांतील शिबंदी आढेवेढें घेतांच मेहरबानसिंगाचीं हजार बाराशें माणसें किल्ल्यावर घालून चौकी पहारे जमविल्यावर यशस्वी यशवंतराव किल्ल्यावर कायमचे दाखल झाले.

महेश्वर किल्ल्यावर येणेंप्रमाणें आसन स्थिर झाल्यावर ''शुभमुहूर्त'' पाहून यशवंतराव गादीवर बसले आणि त्यांनीं कारभार आपल्या हातीं घेतला. यापुढें त्यांस केवळ यशवंतराव असें न म्हणतां आम्हीही महाराज यशवंतराव असाच नामनिर्देश करूं. महाराजांनीं बाईसाहेबांच्या जामदारखान्यातील जवाहीर वगैरे आपल्या कब्ज्यांत घेतले. तेथील कामगार लोकांस बोलावून त्यांच्याकडून तीन लाख रुपये नजराणा घेऊन त्यांचीं त्यांचीं स्थानें त्यांस बहाल केली. लढाईत ज्यांनी बहादुरी केली त्यांच्यांत सातशें पोषाख, शालजोड्या शेले, पागोटीं ज्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणें वाटली. भवानीशंकरास मोत्यांची कंठी व पालखी आणि बक्षीगिरी अर्पण केली. कांहीं अडचणीसाठीं तेंच स्थान कृष्णाजी मुकुंद यांस देण्यांत आले. अमीरखान यांस एक हत्ती, मोत्यांचा कंठा आणि पोशाख मिळाला. त्याचा भाऊ करमदीनखां यांस खिल्लत मिळाली. सादतखान यांस एक पालखी व अकराशें रूपयांचा एक गांव जहागीर मिळाला. मेहरबानसिंग यांस पोषाख दिला. फिरजाखांने लढाईचे सामान तयार ठेविलें होतें म्हणून त्यांस सरकार चाकरीत सामील करून घेतलें. या उदार देणग्यांचा परिणाम दुहेरी झाला. जुने लोक संतुष्ट झाले, नवे लोक उमेदवार होऊन पुढें सरसावले. आनंदराव पवारांचा मेहुणा, अबदुल रहिमान शहाजापुरकर व गोसाव्यांचा एक सरदार असें शेंसहस्त्रांनीं येऊन मिळाले.

कसरावदच्या लढाईंत सुभेदार काशीरावांच्या पहिल्या फौजेच्या पराभव झाला आणि ती तेथून पळाली, ती इंदुरास येऊन मुख्य फौजेस मिळाली. या सर्व फौजेवर दुदरनेक

याची आणि त्याच्या फिरंगी अंमलदाराची हुकमत चालत होती. पराभूत झालेली ती फौज येऊन मिळाल्यानंतर त्या सर्वांनी विचार करून पुनः लढाईस उभें राहण्याचा निश्चय केला. इंदुराहून नागो जिवाजी, दुदरनेक बमय फौजपलटणसुद्धां कूच करून शेमरूडचा घाट उतरून करही, आखेपुरा लुटून छकडाबावडीचे सुमारें आले. ही बातमी यशवंतराव महाराजांस कळतांच तेही महेश्वराहून सरंजामसुद्धां मुकाबल्यास निघाले. यावेळीं महाराजांजवळ सरासरी आठ हजार स्वार व पंधरा हजार पायदळ इतकी फौज होती. त्यांनीं अंदाजानें कल्पना बांधून जाम आणि शेमरूड हे दोन घाट आधींच आपल्या ताब्यांत घेऊन टाकले होते. दुदरनेक यांस फौज वगैरे जमा करण्यास फुरसतही मिळाली नाही, कारण यशवंतरावांना घाट ताब्यांत घेण्याच्या संबंधांत फार गुप्त रीतीनेंच काम करावें लागलें होतें. दुदरनेक यानें सैन्याची जमवाजमव केल्यावर नागो जिवाजींचा स्नेही नरसो पंडित यांस महाराजांच्या स्वारींत हेर म्हणून पाठविलें होतें. स्वतः दुदरनेकानें बरोबर सहा पलटणी व पुष्कळ जमियत घेऊन इंदुराहून कूच केलें. महेश्वरापासून चार कोसांवर असलेल्या चोळी गांवीं फौजेसह तळ दिला. दोन्ही सैन्यांची तेथेंच जुंपली. लढाईचे वर्णन खालीलप्रमाणें दिले आहे.

''फौजेतील जे मोठमोठे शूर सरदार व लोक लढत होते ते दोन प्रहरपर्यंत शर्थ करीत होते. महाराजांच्या दिलावर बहादूर लोकांनीं शौर्य प्रकट करून ते आपल्या शत्रूच्या पलटणीपावेतों जाऊन भिडले. दुदरनेकाच्या पलटणींतून महाराजांचे लोकांवर एकसारखीं तोफेच्या गोळ्यांची आणि बंदुकीच्या छऱ्यांची वृष्टी होत होती. त्या वृष्टींत महाराजांकडील सरदार कालेखां याचा मुलगा ठार झाला. स्वार या आगीच्या वर्षावानें अगदी संत्रस्त झाले आणि ताजेतवाने होण्याकरितां व थोडीशी विश्रांती घेण्याकरितां ते तलावाच्या कडेवर येऊन थांबले. इतक्यांत दुदरनेकचा अंमलदार विलमाट फिरंगी हा दोन तोफांनिशीं व कंपन्यांनिशीं त्यांच्या मोर्चाकडे येऊन व त्यांच्यावर मारा सुरू करून गोंधळ उडवून दिला. तोफेच्या गोळ्या व छर्रे यांच्या माऱ्यापुढें त्यांना टिकाव धरवेना. यावेळीं महाराजांनीं आपल्या लोकांस हिंमत देऊन व स्वतः शौर्य प्रगट करून जवळ आलेल्या शत्रूचा असबाब लुटून घेतला. तथापि तोफेच्या माऱ्यामुळें महाराजांचे सैन्याचा अखेर पराभव झाला. शिपाईगडी पळत सुटले तेव्हां आनंदराव पवारांचा मेहुणाही स्थिर राहूं शकला नाही. ही स्थिती महाराज यांचे लक्षांत येताच ते अमीरखान व शामराव विनायकराव यांसबरोबर घेऊन धरमपुरीस शिपायांचे तळांत येऊन दाखल झाले. पवार यांनीं महाराजांचा उत्तम पाहुणचार केला. घाटाघाटावर आपलीं माणसें ठेवून उत्तम बंदोबस्त केला.

दुदरनेक फिरंग्यानें महाराजांचे फौजेचा पराभव केल्यावर तो फौजेनिशीं महेश्वरास गेला. तेथील मौल्यवान वस्तु व निवडक जवाहीर त्यानें हस्तगत करून घेतलें. रहिवासी लोकांवर जुलूम जबरदस्ती करून तो लुटीच्या कामांत दंग झाला. यशवंतराव महाराज धरमपुरीहून दुर्जनपुरास गेले. जवळच बापू होळकरांचे फौजेचा तळ होता. महाराजांनीं छापा घालून त्यांचा सर्व असबाब जप्त केला. गोट लुटला. चाळीस घोडे आणि सोळा उंट हातीं लागले. त्यापैकीं एक घोडा अमीरखां यांस गेल्या लढाईतील पराक्रमाबद्दल बक्षीस

देऊन संतुष्ट केलें. एक घोडा शामराव महाडिकास, एक भवानीशंकरास व एक दलेलखां बारगीर यांस, असें बक्षीस दिले. तेथून ते बडगोंद्यास आले. भारमल यावेळीं त्यांच्याबरोबर होते. त्यांस खरगोण वगैरे महालाचा बंदोबस्त सांगून पाठवून दिलें. ते बडगोंद्यास असतां दुदरनेकास ते विसरले नव्हते. त्यांचे बाजारबुणगे इंदुरास होते. ते लुटण्याकरितां आपल्या फौजेतील निवडक शूर लोकांची एक टोळी तिकडे रवाना केली. या टोळीनें त्या बाजार बुणग्यांस लुटून फस्त केलें आणि दुसरा जो उपाय महाराजांनीं दुदरनेकासंबंधीं योजला होता तोही यशस्वी झाला. शेमरूड जामच्या घाटांतून ज्या रस्त्यानें दुदरनेक फिरंगी महेश्वर येथें गेला होता ते घाट व ती ठाणीं आपल्या ताब्यांत घेण्याची महाराजांनीं तजवीज केली. या कामावर कृष्णाबा बक्षी, चिमणाभाऊ व भवानीशंकर यांच्याबरोबर एक हजार स्वार व दोन हजार पायदळ अशी फौज देऊन पाठविलें. या लष्करानें दुदरनेकाचे माणसांस हाकून काढून आपले ठाणें कायम केलें. या प्रकारें इंदूरचा मार्ग बंद झाल्यानें दुदरनेक महेश्वरास कोंडला गेला. महाराजांच्या एका टोळीने इंदुरास फत्ते केली, तर दुसऱ्या टोळीने दुदरनेकास सापळ्यांत कोंडून टाकलें. याप्रमाणें बडगोंद्यास बसून महाराजांनीं शत्रूस नामोहरम केलें. इतकेंच करून महाराज थांबले नाहीत. एका बाजूस शत्रूस चीत केलें तर दुसऱ्या बाजूनें आक्रमणही सुरू केलें. तें असें.

दुदरनेकाचा बंदोबस्त करून महाराज इंदुरास आले. मुख्य ठाणें व फौजेचा तळ बडगोंद्यास ठेविला होता. यावेळीं गुजराथेतून हुरमतखां व बुलंदखां व अकबरखां वगैरे चारशें स्वारांची आणि दोन हजार पायदळांची जमियत, कृष्णाजी महाडिक व राजाकुंवर शेंसव्वाशें तर कोठे अधिक अशा जमियतीनिशीं महाराजांकडे आले. महाराज इंदुरीं असतां एका मराठे सरदाराने त्यांची बडगोंद्याची पागा लुटली. त्यांस भवानीशंकरानें पकडून कोंडून टाकिलें. सारांश, चोळीस दुदरनेकानें जरी यश संपादिलें तरी तेवढी एक बाब सोडून, यशवंतराव महाराजांची कमान चारी बाजूंनीं चढतच चाललेली तो पहात होता व ऐकत होता आणि हेंही त्यांस कळून चुकलें. इंदुरचे त्याचे स्वतःचे हात लुळे होऊन पडले आणि तो स्वतः महेश्वराच्या कोंडवाड्यांत कोंडून पडला. या सर्व गोष्टींचा विचार करून दुदरनेकानें अमीरखानाच्या दोन माणसांस महाराजांकडे शिष्टाईस पाठविले व विनवणी केली कीं, ''मी काशीरावांचे नमक खाल्लें असल्यानें मजकडून हा सर्व प्रकार आपल्या विरूद्ध घडला. ईश्वराची आपल्यावर कृपा आहे. आपण उदार अंतःकरणाचे व क्षमाशील आहांत. आतां मी आपला हितचिंतक आहें. आपल्याशीं मी स्नेहभावानें वागेन. आपण ज्या अटी घालून द्याल त्या मी अंतःकरणपूर्वक पाळीन.'' महाराजांनीं उत्तर धाडिलें कीं, ''जर तुमची मर्जी असेल आणि जर तुमच्या मनांत आमच्याशीं स्नेह ठेवण्याचा दृढ निश्चय असेल, तर कांहीं मनांत विकल्प न आणतां इकडे सरकारांत यावें. जुन्या लोकांवर कृपा ठेवावी हेंच आम्हाला पसंत असतें व असें करणे ही आमची रीत आहे.'' महाराजांनीं अमीरखानाला दुदरनेकांकडेस पाठविले. तो आल्यावर, गुणग्राही महाराजांनीं त्यांस मोठा पोषाख देऊन सन्मान केला. सारांश, सुभेदार काशीरावांचा मुख्य सेनापती आपल्या चतुर्बल सैन्यासह

यशवंतरावांचा बंदोबस्त करण्यासाठी आलेला असा, आतां यशवंतराव महाराजांस शरणचिठ्ठी लिहून देतो, त्यांचा अंकित होतो आणि उदारमनस्क यशवंतराव महाराज त्याचा बहुमानही करतात. हें खरोखरच अप्रतिम दृश्य होय.

दुदरनेक शरण आल्यावर महाराजांचा तळ दुर्जनपुरास आला. तेथून निष्कंटक झालेल्या महेश्वरास येऊन महाराज पोहोचले. येथें आल्यावर हातीं लागलेल्या द्रव्यानें त्यांनीं प्रथम फौजेचें समाधान केलें. जाहीर रीतीनें लोकांस कळविले कीं कैलासवासी द्वितीय मल्हाररावांचा अल्पवयीं मुलगा खंडेराव हा राज्याचा खरा मालक आणि आपण त्याचे मुतालिक अथवा कारभारी. खंडेरावाचे नांवाचा शिक्का त्यांनीं सर्रास चालू केला. सर्व लोकांस जीं पत्रें व ताकीदी यशवंतराव महाराजांनीं सरकारी कामासंबंधानें पाठविण्याची पद्धत सुरू केली त्यांवर श्रीमंत खंडेरावांचा शिक्का लागू लागला. अशा तऱ्हेनें गेली दोन वर्षे अनेक संकटांस तोंड देऊन आपली पूर्वापारची गादी स्थिर करून महाराज राज्यव्यवस्थेस लागले होते. त्यांनीं आपली कर्तबगारी जगताच्या निदर्शनास आणून दिली होती. अशा कर्तृत्ववान् माणसाचा उपयोग करून घेण्याचे नाना फडणविसांनीं मनांत योजिलें होतें. नाना फडणविसांचा होळकरांवर पूर्वापार पूर्ण लोभ हें तर खरेंच, पण त्या लोभात गुणग्राहकतेची भर आता पडली. नाना फडणवीसही या सुमारास मोठ्या पेचांत पडले होते. श्रीमंत बाजीरावसाहेब व आलिजाबहादुर दौलतराव शिंदे यांनीं दौलतीस व लोकांस त्राही त्राही करून सोडिलें होतें. केवळ नुसत्या बुद्धिबलानें शिंद्यांच्या बाहुबलास अडविणें नानांस शक्य दिसेना. तेव्हां यशवंतराव महाराजांचा उपयोग करून घेणे नानांस इष्ट दिसून तसे आमंत्रणही गेलें. आनंदानें यशवंतराव महाराज दक्षिणेंत येण्यास निघाले. खानदेशापर्यंत आले आणि तेथें त्यांस नानांच्या मृत्यूची दुःखद वार्ता कळली. आशेची मोठी निराशा झाली आणि ते माघारीं फिरले. याच सुमारास त्यांचे डोळ्यासही इजा (बंदुकीच्या निशाणबाजीमुळें) होऊन ते एकाक्ष झाले.

नानांच्या मृत्यूमुळें एकंदर मराठेशाहीचे किती नुकसान झाले हे परकियांनीं देखील वर्णिले आहे. नानांबरोबरच मराठ्यांतील सर्व शहाणपण व शिस्त लयास गेली असें जें त्यांनीं म्हटले आहे ते आपणांस कबूल करावें लागतें. सर्व राष्ट्रांतलाच दुवा उडून गेला. दिवा मालवला. बाजीरावांस व दौलतरावांस आता हायसे वाटू लागलें. घटकाभर त्यांस आनंदही वाटला असेल, पण तो फार वेळ टिकला नाही. यशवंतराव महाराज खानदेशातून परतले. वाढलेला अनुभव, जमलेला समुदाय आणि चालून आलेली संधी या त्रयीचा त्यांनीं पुढील सात आठ महिन्यांत शिकस्तीनें उपयोग करून घेतला हे खालील वर्णनावरून दिसून येईल.

(१) अमीरखान पठाण सरदार यांस त्यांनीं नबाब अमीरखान केलें. त्याच्या हाताखालीं एक मोठी स्वतंत्र फौज देऊन पूर्वेकडील प्रदेशातील राजेरजवाड्यांपासून खंडणी वसूल करण्याकरिता त्यांस पाठवून दिलें. अमीरखान बडगोंद्याहून निघोन देवासला आला. तेथील खंडणी वसूल करून तेथून त्यांनीं शिंदेशाहींत प्रवेश केला. आगर येथून खंड घेऊन तें

लुटलें आणि ती त्याची धाड बेरछे, सिरोंज आणि सागर या प्रांतांवर जाऊन आदळली. रस्त्यावर जें जें कांहीं लागे त्याच्यावर त्याचा हात सफा फिरे. सागरला जाऊन तेथील किल्ल्यास त्यानें वेढा दिला. तेथून त्यानें महाराजांस लिहिलें, ''जरी मी कित्येक वेळां येथून खंडणी वसूल केली आहे, तरी हें शहर लुटावें अशी माझी इच्छा आहे.'' महाराजांनीं उत्तर पाठविलें, ''जर तेथील खंडणीचा रूपया आपल्या मर्जीप्रमाणें आला असेल, तर तेथें पुनः लूट करणें व उगीच फिसाद करणें आम्हास मान्य नाहीं.'' पण ह्या चढेल गड्यानें शहराला वेढा घातलाच, मुक्काम एक महिना ठेविला. सागर हा प्रांत पेशव्यांचा. तेथील सुभेदारानें रघुजी भोंसल्याची मदत मागितली. त्यांचा सरदार बेनीसिंग त्वरेनें येऊन पोहचला. अमीरखांनें लढाईस तोंड दिलें, पण पराजित झाला. त्याचें सैन्य आधीच पळून गेलें होते. शेवटी स्वतःचा जीव बचाविण्याकरिता त्यांस राजगड किल्ल्याकडे आश्रयास पळून जावें लागलें. नोकराच्या अतिक्रमाचा दुलौंकिक यजमानांसही भोवला हे सांगांवयास नको.

(२) नजीबखान व असदबेग या दोन दुसऱ्या सरदारांबरोबर चारशें स्वार व दोन हजार पायदळ अशी फौज देऊन पश्चिमेकडे महतपूरास पाठविले. महतपूरचे विसाजी वाघांनी पूर्वी यशवंतराव महाराजांबरोबर कृत्रिम केलें होते. आतां या दोघां सरदारांनीं वाघांकडून पांच लाख रुपये खंडणी घेतली आणि पांच हत्ती व कांहीं मौल्यवान वस्तु महाराजांकरितां नजराणा म्हणून घेतल्या. पांचांपैकीं, अडीच लाख रुपये सरदारानीं महाराजांकडे छावणीत पाठवून बाकीचे पगारखातीं वाटले.

(३) स्वतः महाराज बडगोंदा येथून निघून जावरा, बडावदा या आपल्याच मुलुखांत आले. तेथून देवळें प्रतापगडाकडे खंडणीसाठीं गेले. (हे संस्थान होळकरांचे मांडलिक)

(४) महाराजांचा या ठिकाणीं मुक्काम असतांना, वजीर हुसेन यांजबरोबर हजार पंधराशें फौज देऊन तराण्यास पाठविले.

(५) शामराव महाडिक यांस चारशें स्वार पागेचे, हत्ती, डंका व निशाण देऊन रामपुरा, भानपुरा, जावरा, इत्यादि ठिकाणचा वसूल त्यांजवर सोंपविला.

(६) मेहरबानसिंग याजबरोबर दोन पलटणी व सात तोफा देऊन मेवाडकडेस त्यांस पाठविले. या मुक्कामीं बाळाराव नांवाचा सरदार एक हजार स्वार व कलबरीखान एक कंपू घेऊन महाराजांकडे आला.

(७) कुंवर हरनाथसिंग हा भोंसल्याचें कैदेंतून सुटून महाराजांस येऊन भेटला. त्याजकडे तोफखान्याचें काम सांगून महाराजांनी त्यांस पुढें वाढविलें.

(८) कारहिल हा युरोपियन भवानीशंकरमार्फत महाराजांस भेटला. महाराजांनीं पायदळाची भरती त्याजकडे सोपविली.

(९) भवानीशकर याजकडे इंदूर महालाचा मामला सोपविला. ह्याप्रमाणें चालत आलेल्या संधीचा पूर्ण उपयोग करून महाराजांनीं त्यांस मध्य हिंदूस्थानांत केंद्रस्थानीं ठेवून घेतलें. योग्य माणसांची निवड करून आठी जणांस आठ दिशांस कामगिरीवर पाठवून दिलें.

याच वेळीं सुभेदार काशीरावांचा व्याही मोत्याजी कालगावडे शिंद्यांचे मदतीनें खानदेशांत खलेल करीत होता. त्याजवर कारहिलसाहेबाची नेमणूक महाराजांनीं केली. या ठिकाणीं कारहिलसाहेबाचा पराभव झाला. सरदारांवर कामगिरी सोपवून महाराज स्वतः स्वस्थ बसले नाहींत. अंगनिशीं जी कामगिरी त्यांनी केली ती अशी.

ते प्रतापगडाहून कोट्याकडे वळले. सोंडा जिल्ह्यांत खंडणी घेतली. मार्गात दोन गढ्या लुटल्या. शिंद्यांच्या परगण्यातून खंडणी घेऊन झालमसिंगाचे झालरापाटणाला गेले. तेथून कोट्याकडे मोर्चा वळला. राजगड, पाटण येथील वार्षिक खंडणी बिनहरकत दाखल झाली. झालरापाटणाहून शिंदेशाही महालाकडे वळले. सारंगपुरास त्यांनीं फौजेचा तळ दिला. शिंद्यांच्या सुजालपुरापासून चाळीस हजार, अष्ट्याहून दीड लाख आणि सारंगपुरापासून तीस हजार वसूल केलें. भोपाळकडून छापानेर परगणा मिळविला. धारकर पवारांनीं परसाके गांवची खंडणी दिली. तेथून भेलसागंज, बासोदा, चोळी, महेश्वर करून इंदुरास इ. स. १८०० च्या अखेरीस येऊन पोंहचलें.

सारांश, इ. स. १७९८-१७९९ त यशवंतराव ''शूर पण उपद्व्यापी'' असें दिसले. शिंदे व पेशवे यांच्या खिसगणतीत ते नव्हते. उभयतांच्या रस्त्यांत हा एक कांटाच आहे असें त्यांना वाटे. पुढल्या वर्षी यशवंतराव ''बंडखोर'' दिसू लागले. त्यांस मदत करणाऱ्यांवर शिंदे, पेशवे व सुभेदार काशीराव वगैरे घरच्या व बाहेरच्या शत्रूंनीं वक्रदृष्टी वळविली. यशवंतरावांस आश्रय देणाऱ्या नागपुरकर भोसल्यांस व धारच्या पवारांस धमकी मिळाली. त्याच्या पुढल्या वर्षी यशवंतराव ''महाराज'' झाले; घरची गादी स्थिर केली. शत्रूंस अंतर्बाह्य नामोहरम केलें. घरचा बंदोबस्त करून परकियांस भीती दाखविली आणि डोईजड झालेल्या सोबत्यांस खडबडून जागें केलें. दौलतरावांस पुण्याहून हालण्यास भाग पाडलें आणि सुभेदार काशीरावांस मूग गिळून घरीं येण्यास लाविलें.

याच सुमारास शिंदेशाहींत जी प्रकरणें उपस्थित झाली त्यांचाही जितका उपयोग करून घेणें यशवंतराव महाराजांस शक्य होते तितका त्यांनीं करून घेऊन एकंदर राजकारणांत आपला दर्जा स्थिर करून तो वाढविला. तो प्रकार येणेंप्रमाणें:

कैलासवासी महादजी शिंदे उर्फ पाटीलबुवा ह्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या गादीवर दौलतराव शिंदे आले. पुण्यास बसून त्यांनीं पेशवाईची व होळकरशाहीची जी हलाखी केली तिचे थोडेंसे दिग्दर्शन आतापर्यंत आम्हीं केलें आहे. हा झाला बाहेरचा प्रकार. घरचा प्रकार पाहतां महादजीच्या राण्यांचे (भागीरथीबाई, यमुनाबाई व लक्ष्मीबाई) आणि दौलतरावांचें सूत जुळेना. बाया फौजबंद असून चार पैसे बाळगून होत्या. महादजींच्या कारकीर्दीत पुढें आलेले शेणवी सरदार बायांचे बाजूस होते. तेव्हां हा एक कंपू दौलतरावांच्या डोळ्यांत सलत होता. बायांनीं दक्षिणेंत जाऊन चांगलीच दहशत बसविली. मांडीवर कोणास तरी घेऊन दौलतीची मालकी दौलतरावांकडून काढूं अशी जाहीर घोषणा त्यांनीं केली. दक्षिणेतून निघून त्या उत्तरेंत आल्या. महाराज यशवंतरावांची कृती आणि कीर्ती त्यांच्या डोळ्यांसमोर आणि कानांवर आली तेव्हां त्यांजकडून ''आम्हाला मदत करावी, आम्हांस

अनुकूळ असावें'' असा संदेश यशवंतराव महाराजांकडे आला. त्यांनीं मदतीबद्दल यशवंतराव महाराजांस उज्जेनीच्या तोफखान्यांतून वीस तोफा आणि आपले कांहीं परगणे देण्याचें कबूल केलें.'' महाराजांनीं आपले गुरू चिमणाभाऊ यांस बायांकडेस रवाना केलें. चिमणाभाऊनें त्या बायांचा सन्मान करून त्यांच्या सेवेंत तत्पर राहिले. ह्यां सगळ्या बातम्या दौलतराव यांस कळतांच गोपाळरावभाऊ चिटणीस यांची इ. स. १८०० च्या आक्टोबरांत त्यांनीं रवानगी केली. तमाम हिंदुस्थानच्या सुभ्याचा मुख्य अधिकार त्यांस दिला. तूर्त पलटणचा एक कंपूबरोबर येऊन भाऊंनी निघावें व पंचवीस हजार फौज चाकरीस ठेवावी, बायांचे बंड मोडून टाकावें आणि यशवंतराव होळकरांस तंबी पोहचवावी इतकी कामें या चिटणिसावर सोंपविण्यांत आलीं. या स्वारीबरोबर श्रीमंतांनीं नाना पुरंधरे यांस लग्गी, डंका व जरीपटका देऊन पाठविलें. चिटणीस पुण्याहून निघून खराटीस आले. स्वारी मोठ्या घोषणेत निघाली, पण पैशांचा अभाव दोन्हीकडे. यामुळें तूर्त तरी हे अवडंबर जेथच्या तेथें थबकले. आतां दुसऱ्या बाजूनें पाहिलें तर यशवंतराव महाराजांकडे मनुष्यबल विपूल, तर बायांजवळ द्रव्य विपूल, तेव्हां हा संगम डोळ्यांत भरण्यासारखाच होता. होळकर आणि शिंदेबाया यांचे संगनमत होत होतें तों त्यांस आशाही होती कीं हिंदुस्थानांत पैका आणि माणूस दोन्हीही जबरदस्त बाळगून असणारा लखबादादा लाड आपणास येऊन मिळतील. अशी ही उत्तर हिंदुस्थानांतील स्थिती पाहून स्वतःच्या बचावासाठीं म्हणून दौलतरावांनीं इ. स. १८०० च्या नोव्हेंबरांत पुणें सोडलें. पुण्यास आणि पेशव्यांस आतां हायसें वाटलें. दौलतराव जांबापर्यंत जाऊन पोंहचले आणि उत्तरेतील आपल्या शत्रूस फोडण्यासाठीं एका कल्पनेचा उपयोग करून घेतला. आणि त्यांत ते यशस्वीही झाले. तो प्रकार येणेंप्रमाणें:

सवाई मल्हाररावांच्या मृत्यूनंतर त्यांच्या पत्नी जयाबाई ऊर्फ जीजीबाई या सुभेदार काशीरावांच्या कैदेत गेल्या. त्यावेळीं त्या गरोदर होत्या. सुभेदाराच्या दहशतीमुळें कैदेच्या–स्थानांतून त्या बाहेर पडल्या. पुण्यास कुंटे यांनीं त्यांची व्यवस्था केली. मुलगा झाला. त्याचे नांव खंडेराव. या खंडेरावावरही सुभेदारकाकांनीं (काशीरावांनीं) प्रसंग आणला. बाईनें आधीच सावध राहून अरबांस नोकर ठेविले. यामुळें आईचा व मुलाचा बचाव झाला. पुढें श्रीमंतांची आज्ञा झाली कीं एकूण एक अरब पुण्यांतून काढून टाकावे. तेव्हां खंडेरावांच्या मातोश्रीनें आपली हलाखी श्रीमंतांस कळविली. श्रीमंतांनीं मातापुत्रास शनिवारवाड्यांत ठेऊन दिले. याप्रमाणें हा होळकर वंशाचा कोम शनिवारवाड्यांत वाढत होता. दौलतराव यांनीं या मुलाची मागणी केली आणि श्रीमंतांनीही ती मान्य केली. तेव्हां इ. स. १८०० च्या डिसेंबरात खंडेराव होळकर शनिवारवाड्यांतून निघून दौलतरावाकडे पोंहचले. या देण्याघेण्यांत दोघांचेही हेतू निरनिराळे होते. पेशव्यांचा हेतू एकदाची दौलतरावाची ब्याद पुण्यांतून निघावी. दौलतरावाचा हेतू या बालकाचें आमीश पुढें करून बायांच्या कटातून यशवंतरावास फोडावें. अशा तयारीनें दौलतराव उत्तरेस निघाले. रस्त्यातून शिंदे लिहितात, ''मागें झाली गोष्ट ती झाली. याउपर तुम्ही बायांस मिळून आमच्या दौलतीमध्ये बखेडा करूं नये. मल्हाररावांचा पुत्र खंडेराव सरंजामसुद्धां दौलतीची वस्त्रें देऊन रवाना करतो.

तुम्ही बायांशी बिघाड करावा. खंडेरावांच्या नांवानें सरदारीची (होळकर दौलतीची) आणि तुमच्या नांवानें दिवाणगिरीची (मुतालकीची) वस्त्रें सरकारांतून देववितो.'' **(ऐ. ले. सं. भा. १२ पत्र नंबर ५८२८ भाग १३ पान ६८७०)**

दौलतरावांची ही जी स्वारी उत्तरेंत चालली होती त्या स्वारींत त्यांनीं सुभेदार काशीरावांसही ओढून घेतले होतें. असें म्हणण्याचें कारण, दौलतरावांबरोबर निघण्याचें त्यांनीं प्रथम टाळलें होतें. ही गोष्ट शिंद्यांनीं श्रीमंतांस कळवतांच श्रीमंतांनीं जप्तीचा हुकुम सोडिला. काशीरावांवर आधींच पंधरा लाख शिंद्यांचे चढले होते आणि त्यांत हा जप्तीचा हुकुम. तेव्हां मानापमानाची सर्व कहाणी बाजूस ठेवून काशीराव शिंद्यांबरोबर चालू लागले. पुढें एका वर्षानें जप्ती उठली.

यशवंतराव महाराजांस शिंद्यांचें वरील पत्र गेलें. मधल्या मुदतीत बायांकडील वातावरणांत फरक पडला. अगदी असाह्य स्थितीत महाराजांकडे बायांचा शब्द गेला होता. पुढें लखबादादांची मदत जवळ येतांच आणि त्यांचीं बोलणीचालणीं होतांच बायांच्या वृत्तींत अंतर पडलें. त्यांस सल्ला मिळाला कीं ''होळकरांपाशीं (यशवंतरावांशीं) कबूल केलें, त्यापैकीं एक पैसा देऊं नये. आम्हीं पोहचल्यावर जें करणे तसें करूं.'' हे शब्द फौजबंद लखबादादांचे आहेत. लखबादादांच्या पत्रानें आणि भेटीनें परिस्थितींत फरक पडला. तो रोजनिशीकार लिहितात, ''महाराजांच्या फौजेतील लोकांस बहकावून आपल्या ताब्यांतील देश जो पूर्वी बहादुरीत व शौर्यानें आला आहे, तो आपल्या ताब्यांत घ्यावा. महाराजांच्या फौजेतील कांहीं लोक जास्त पगाराचे लोभानें बायांकडेस गेलेच होते. तेव्हां आपल्या व त्या लोकांच्या सहायानें आपला प्रदेश आपल्या ताब्यांत ठेवावा असा उद्देश बायांनीं धरिला.'' बायांकडे रोज सैन्याची भरती होत आहे, आपल्याकडे ओहटी लागली आहे, बायांकडून पूर्वीप्रमाणें जाबसाल कांहींच होत नाही हे पाहून सर्व गोष्टीची शहानिशा स्वतः प्रत्यक्ष पाहून करावी असा विचार मनांत आणून महाराज बायांच्या भेटीस गेले. तेथील प्रकार येणेंप्रमाणें. ''बायांचे कारभारी यांचीं बोलणीं चढाचींच पाहिली, तेव्हां यशवंतराव महाराज स्पष्ट बोलले कीं, ''तुम्ही आम्हांस सामील केलें. सांप्रत बोलण्याचा विचार तुमचा दुसराच दृष्टीस पडला. त्यापक्षीं तुमचीं आमचीं बोलणीं व प्रमाणाच्या गोष्टी जहाल्या, त्या तुमचे तुम्हांपाशीं, आमचे आम्हापाशीं. तुम्हास कळेल तें तुम्ही करावे. आम्हास कळेल तें आम्हीं करूं. असें बोलून स्वारी लष्करांत आली. ते गेल्या बाया उज्जेनीच्या वाड्यांतून निघून उंडाशा तलावावर गेल्या. तेथें त्यांची फौज तळ देऊन पडली होती. **(होळकरांची कैफियत)**

याप्रमाणें यशवंतराव महाराज हे बायांचे शह्नांतून मोकळे होऊन आपल्या रस्त्यांस लागले. दौलतरावांचें पत्र याच सुमारास येऊन पोहोचलें. त्या पत्राचा त्यांनीं उपयोग करून घेतला. देपाळपूर परगण्यांत वेलोमटसाहेब मुक्काम करून होता. त्यांस आपलेजवळ उज्जेनीस बोलावून घेतलें. दोन दिवसांनीं महाराजांचे आज्ञेप्रमाणें त्या साहेबानें बायांचे फौजेवर ''छापा घालून तरवारी व भाल्याचे माऱ्याने फौज उधळून लावली'' तसेच

''फुलनसाहेबाचा कंपु व माखणसिंगाचा कंपु या उभयतांस ताकीद करून उंडाशाचे तलावावर बायांकडील फौज पडली आहे, त्याचे रूखे तोफा लावून गोळा सुरू केला. ज्याला सवड फावलीं तो शहरांत निघून गेला. बाया सड्या निघून लखबादादाकडे गेल्या. होळकरांनीं फौज लुटून घेतली. कांहीं बाकी राहिली नाही.''

लखबादादांनीं वरून खाली येत असतां नबाब आमीरखाचा शहापुराहून जो बाजारबुणगा येत होता तो रस्त्यांत गांठून लुटला. महाराजांचे कानावर हें येतांच ते त्या ठिकाणीं जाऊन पोहोचले आणि लखबादादाच्या माणसांस घेरा दिला. तेव्हां ते शरण आले. महाराजांनीं आपले कार्य झाले असें पाहून माणसांस सोडून दिलें. याचवेळीं दौलतरावांचे फौजबंद सरदार अंबाजी इंगळे होळकरास येऊन मिळाले. इंगळ्यांनीं कबूल केलेंली पांच लाख रुपयांची देणगी आतां आपले काम होताच भरणा केली. सन १८०१ च्या जानेवारीत बाया व लखबादादा यांचा मिलाफ होऊन त्यांचा जमाव सुमारें वीसपंचवीस हजार फौज व दहा पलटणें एवढा प्रचंड झाला होता. लखबादादानें महाराजांची कीर्ती व कृती पाहून यशवंतराव महाराजांशीं समेटानें घेतलें आणि हें बायांचें प्रकरण होळकरांपुरते तरी संपुष्टात आलें. यावेळीं दोन्ही गादीचे मालकांचा समेट होण्याचा चांगलाच रंग आला होता, पण तो फिसकटला.

शिंद्यांच्या मुलखांत यशवंतराव महाराजांनीं खंडणी वसूल केली होती. शिंदेबाया दत्तक घेण्याचा विचार राजरोस बोलूं लागल्या होत्या आणि त्या फौजबंदही होत्या. फौजेनें आणि पैक्यानें मातबर असें लखबादादा त्या बायांचे बाजूस होते. बाया आणि दादा शिंद्यांचा प्रांत आपले ताब्यांत घेऊं पहात होतें. कांहीं राजेरजवाडे त्यांस अनुकूल होते. हा सर्व प्रकार उत्तरेस राजरोस घडत असतां दौलतराव शिंदे आपल्या कर्मांत चूर होते. ते पुण्याहून जे बाहेर पडले त्यावर ते जसे जसे वरवर येऊं लागले तसतसे उत्तरेतील प्रकाराचें प्रखर स्वरूप त्यांच्या ध्यानीं येऊं लागलें. यशवंतराव हे यशवंतराव महाराज झाले होते आणि हे महाराज बायांस मिळत आहेत तेव्हां दौलतराव आपल्या दौलतीसंबंधांत साशंक झाले आणि यशवंतराव महाराजांस बायांपासून फोडण्यासाठी तीन कलमाचें पत्र त्यांनीं पाठविले ते वर दिलेच आहे. मात्रा लागू पडली. यशवंतराव महाराज अलग झाले. महाराजांस आपण केलेंल्या कर्तृत्वावर पेशव्यांचा मोर्तबशिक्का पाहिजे होता आणि तो मिळवून देण्याचे अभिवचन आपले पत्रांत दौलतरावांनीं दिलेंच होतें. याप्रमाणें दोघाही सोबत्यांचे कार्य घडत येत चाललें होतें आणि त्यामुळें झालेल्या गोष्टी विसरून पूर्वीचे सख्य पुनश्च स्थापण्याचा सुयोग दिसूं लागला होता. येवढ्यांत पुण्यास श्रीमंतांनीं विठूजीराव होळकरांसंबंधात धरलेली अमानुष वृत्ती व तिची बातमी यशवंतराव महाराजांचे कानीं आली. तेव्हां तर दौलतरावांनीं कबूल केलेली मदत मिळणे शक्य नाही आणि मागणेंही इष्ट नाहीं अशी यशवंतराव महाराजांची खात्री झाली; आणि आपला इष्ट मार्ग आपणच आक्रमला पाहिजे अशी खात्री होऊन ते त्या मार्गास लागले. महाराजांनीं महेश्वराचे वगैरे सर्व घाट व पायउतार सर्व बंद करून टाकले आणि शिंद्यांची राजधानी उज्जेनी तिच्याकडे आपला मोर्चा फिरविला.

''होळकरांच्या पेंढाऱ्यांनीं नर्मदेअलीकडे येऊन अजंट्याच्या घाटापर्यंत मुलूख मारून ताराज केला. शिंदे बऱ्हाणपुरास चार सहा महिने मुक्काम करून नंतर नर्मदेपलीकडे माळव्यांत आपल्या मुलखात जाण्याचा जो विचार करूं लागले, तो यशवंतराव महाराज पन्नास हजार फौजेनिशीं त्यांची वाट आडवून समोर लढाईस उभे राहिले **(ऐ. ले. सं. भा. १३ वा)**

पेरन, पिंगळे आणि आत्माराम तांबोळी वगैरे शिंद्यांचे सरदार त्या प्रांतीं होते. त्यांच्या हातून बाया आणि दादा यांचा बंदोबस्त होई. यशवंतराव महाराजांस अशीही शंका आलीं कीं आपल्या बंधुच्या अमानुष मरणात शिंद्यांचीही पुण्याई खर्ची पडली असावी. या सर्व विचारांनीं त्यांची शिंद्यांचे प्रदेशांत धामधूम व लुटालूट जोरानें सुरू केली. तेव्हां इ. स. १८०१ चे मे महिन्यांत शिंद्यांनीं बऱ्हाणपुराहून पुढें सरकून नर्मदा दक्षिणतीरीं येऊन धूळकोटावर मुक्काम केला. जूनच्या प्रारंभीं त्यांची चार पलटणें, चार हजार स्वार अशी पहिली टोळी नदीपार गेली. कर्नल जान, हेसिंग जोर फिरंगी जुरूशफिरंगी हा मुख्य अंमलदार असून तांबोळी, बक्षी व सदाशिव महादेव हे सरदार होते. यशवंतराव महाराजांच्या फौजेनें नर्मदेच्या उत्तरेकडील मार्ग आडवून धरला होता. तेव्हां कर्नल जान हेसिंग एकदम त्यांच्यावर चालून गेला आणि यशवंतराव महाराज त्याला आंत ओढीत आणणेकरितां उज्जेनीच्या रोखाने हटूं लागले. याउपर पिछाडीहून देवजी गवळी, गोपाळराव चिटणवीस, बक्षी, रामचंद्र भास्कर व सदाशिव महादेव हे दोन टोळ्या करून दौलतरावांचे आज्ञेनें हेसिंगच्या मदतीस निघाले.

दोघां सोबत्यांच्या बाहुबलाबद्दल आणि बुद्धिबलाबद्दल येथें विचार केला म्हणजे या प्रसंगाचे भविष्य अजमावितां येईल. प्रत्यक्ष डोळ्याने पाहून बातमीदार लिहितो. ''बरोबर फौज मराठी जुजबी आहे. खाशाजवळही (दौलतरावाजवळ) सामान पोक्त नाहीं. त्याची खर्चाची ओढ पडली. तोडजोड करून नर्मदापार व्हावयाजोगे लोकांची समजूत करावी या विचारांत आहेत. सावकार जवळ होते, गारद होऊन उठून गेले. कारभारी, मुत्सद्दी व फौज बेदिल जाहली आहे. मुख्याजवळ बातमीचा विचार अगदीच नाहीं''.

यशवंतराव महाराज गेल्या दोन तीन वर्षांच्या अनुभवानें युद्धकलेंत अष्टपैलु झाले होते. याच काळांत दौलतराव शिंदे पुण्यास गादीवर बसून काड्या मोडण्याचें काम करीत होते. यशवंतराव महाराज उदार हातानें व उदार अंतःकरणानें पैसा खेळवून लोकांचीं अंतःकरणे आकर्षित करीत होते. दौलतरावांनीं पुण्यास लोकांस पिळून दौलत मिळविली पण तितकीच लोकांचीं अंतःकरणें दुखविली. यशवंतराव महाराज विधायक कार्यात पडून बुद्धिसामर्थ्य लोकांच्या नजरेस आणून देत होतें तर दौलतरावांची सगळी बुद्धी विनाशक कार्यात गुरफटून गेली होती. बाहुबलाकडे पाहतां यशवंतराव महाराजांकडे लोक स्वतः येत होते तर दौलतरावांकडील माणसे बेदिल झाली होती. असें हे दोन पक्ष युद्धास समोरासमोर उभे राहिले आहेत. भवितव्य तर दिसतेच आहे. पण प्रसंगानें यशवंतराव महाराजांची जी कर्तबगारी बाहेर पडली तिचें वर्णन आतां करावयाचे आहे.

याचप्रसंगीं अनपेक्षित रस्त्यानेंही यशवंतराव महाराजांस मदत येऊन पोहचली. अंबोजी

इंगळे यांचे दहा बारा महालांतून खंडणी आली. (२) काशीरावांच्या पलटणीतून-दुदरनेक हा पूर्वीच आला होता. त्याच्याद्वारें फुलनपोप्याम वगैरे नवीन अधिकारी आणि लष्करांत चांगली तय्यारी झाली. (३) महतपूरचे विसाजी वाघ राजे यांनीं पूर्वी महाराजांबरोबर कृत्रिम केलें होतें. त्याच्या मृत्यूची बातमी कळतांच महाराज तिकडे वळले. फते केली. तींत जवाहीर आणि मोहरा अगणित प्राप्त झाल्या. सुमारें पांचशें घोडे, चार हत्ती आणि इतर मुबलग सामान त्यांस मिळाले. (४) खुद शिंद्यांच्या मांडलिकांकडून बहुत खंडण्या आल्या. (५) मंदोसराहून पन्नास हजार रुपये खंडणी व नजराणा वसूल ह्याप्रमाणें सर्व बाजूंनीं समृद्ध होऊन महाराजांनी शिंद्यांची राजधानी चारी बाजूनें सुरक्षित ठेविली होती. अशा स्थितींत कर्नल हेसिंग त्यांजवर चालून आला. तेव्हां पावसाळा आला होता. लढाई सुरू झाली. फिरंगी यांस जखम लागून नामोहरम होऊन माघारें पेंढारी फिरंग्याकडील कांहीं घोडी वगैरे घेऊन परत गेले. हा प्रकार झाला माळव्याबाहेर. हेसिंग यानंतर उज्जेनीस आला. त्यावेळीं महाराजांचा मुक्काम पानबिहार येथें होता. तोंडावर असलेल्या महाराजांचे जय्यत फौजेनें बहादुरी करून कर्नलसाहेबांचे फौजेचा फन्ना उडविला. महाराजांनीं विजयासरसा आपला मुक्काम पानबिहाराहून हलवला आणि ते उज्जेनीच्या तोंडावर दोन कोसावर येऊन ठेपले आणि शत्रूच्या हृदयांत आणि उज्जेनीच्या रहिवाश्यांत धडकी भरून सोडली. याप्रमाणें पहिल्या टोळीचा निकाल लागला.

ही पहिली टोळी सोडल्यावर दौलतरावांनीं फकीरजी गाढवे, निंबाळकर आणि म्याकीनटर यांच्या हाताखाली चौथी पलटण आणि फिलोज कंपुपैकीं दुसरी फौज पाठवून दिली. ही दुसरी फौज पहिल्या टोळीच्या मागोमाग उज्जेनीच्या मार्गे लागली. मुसासतज हा सेनापती होता. ही फौज नर्मदा पार झाली ही बातमी कळतांच महाराजांनीं ''निम्मे गेले निम्मे उतरत होते'' अशा स्थितींत फौज तेथें आणली. ''त्यांची यांची लढाई झाली. दोन पलटणें होळकरांनीं लुटून टाकली. तीन पलटणें पुढें गेली होती. त्यांचे पाठीस लागले. नर्मदेपासून पलीकडे बारा कोसांवर गढीमध्यें कोंडली आहेत. दाणापाणी बंद. तोफा लाविल्या आहेत सत्वरच फडशा होईल. आत्माराम तांबोळी याचा लेक शिंद्यांकडे येत होता. त्यांस बारीमध्ये कोंडला आहे. शिंद्यांकडील फौज हटून माघारी आली हे खराबीचें वर्तमान शिंद्यांस समजतांच ते धुळकोटाहून दोन कोस मागें गेले.''

नर्मदेच्या खालीं राहून अलीजाबहादूर दौलतराव शिंदे यांनीं ज्या दोन टोळ्या एकामागून एक पाठविल्या त्यांची वाताहात कशी व किती झाली हे आतांपर्यंत आपण पाहिले. या नंतर तिसरीही टोळी त्यांनीं पाठविली. तिची हकीकत आता पाहूया. यशवंतराव महाराजांनी याही टोळीवर हल्ला करण्याचें ठरवून ते दरकूच चालू लागले. ही खबर ब्राऊनरिंग साहेबांस कळतांच तो आपली फौज घेऊन महमदखां याच्या तोफखान्यास जाऊन मिळाला. महाराज यशवंतराव महाराज आपल्या कंपूसह फिलोजसाहेब वगैरेच्या पाठलागाकरितां अत्यंत तातडीनें निघोन गेले. बाजारबुणगे, अवजड अजबाब आणि पावसाळा या अडचणीस न जुमानतां महाराज सत्वासला येऊन पोंहचले. दोन्ही बाजूंनीं तोफा डागणें सुरू झालें.

लढाई चालली असतां, मुर्तीजाखान (महाराजांचा सरदार) याचा घोडा ठार झाला. शिंद्यांकडील फिलोज साहेबानें हल्ला करून होळकरांचे लष्करास पळायास लाविलें. ब्राऊनरिंग साहेबाच्या मारापुढें महाराजांची अलीगोल पलटण टिकाव धरूं शकली नाही. फिलोजसाहेब घायाळ झाला आणि त्याला अपजय आला. ही सत्वासची लढाई म्हणून प्रसिद्ध आहे. या लढाईसंबंधाने **ऐतिहासिक ले. स. भा. १३ पान ७१३६** वर खालील उल्लेख आहे.

''निंबाळकर (शिंद्यांचा सरदार) याजला भाल्याच्या व तरवारीच्या जखमा लागल्या. बक्षीसुद्धा मागती आपले मुक्कामास पूर्वस्थळास आले. ताम्रमुखांचे त्या गडबडीत खजिन्याचे दहावीस उंट गळाले.''

याप्रमाणें शिंद्यांनीं पाठविलेल्या निरनिराळ्या टोळ्यांचा नर्मदा उत्तरतीर, उज्जेनी, नेवरी आणि सत्वास या ठिकाणी महाराज होळकरांनीं पराभव केला. यांत महाराजांचे शौर्य, साहस आणि चातुर्य जगताच्या नजरेस आली. पण या यशाने फुगून न जातां आपल्या ध्येयावर दृढनिष्ठा ठेवून ते उज्जेनीकडे जोर फिरंगी याचा समाचार घेण्यास येऊन बसले. उज्जेनी ही त्यावेळी शिंद्यांची राजधानी होती. तिचें रक्षण करणें हे शिंद्यांचे काम, तर ती काबीज करणें हें होळकरांचे ध्येय. याप्रमाणें आतां पुढील कार्यक्रम सुरू झाला. आतापर्यंतच्या सर्व चकमकीं, लढाया आणि डावपेच ही भोवतीं भोवतीं घिरटया घालून होतीं. तें सगळें दूर सारून मुख्य केंद्रावरच महाराज येऊन बसले. जोर फिरंगी शहराच्या तटाचे आश्रयानें होळकरांच्या हल्ल्याचा प्रतिकार करीत होता. त्याला मैदानांत आणून त्याच्याशी निकराने दोन हात करावे हा महाराजांचे मनोदय. आपल्या फौजेचे पांच भाग महाराजांनी केलें. पांच हजार हुजरात, पांच हजार शिलेदार खाशांनीं आपलेकडे घेतले. दुसरा विभाग चिमणाजी कृष्ण, तिसरा मीरखान रोहिला, चौथा शामराव महाडिक व पांचवा सादतखान पठाण यांचे हुकुमतीत दिले. लखबादादा व शिंदे बायांचे सैन्य उज्जेनीच्या रोखानें कांहीं मजला चालूनही आले. पण ऐन लढाईचे वेळीं होळकरांस त्यांचा कांहीं फायदा झाला नाहीं. महाराजांनीं क्षिप्रेनजीक मुक्काम करून पुढें छबिन्यास कुशाबा बक्षी, कृष्णाजी महाडिक यांजला शिंद्यांच्या लष्करावर पाठविलें. त्यांची यांची गोळागोळी सुरू झाली. शिंद्यांचे फौजेचे सुमारें मोर्चेबंदी करून मीरखान वगैरे पठाणाकडील मंडळीस आज्ञा जाहली कीं अंगपाताकडून मोर्चेबंदी करावी. दुसरें दिवशीं तोफा सुरू करून पलटणच्या बाजूस पागा हुजरात, बक्षी, चिमणाजी पंत वगैरे होऊन तोफा दराबीवर भरून अंगपाताचे दरवाजाकडून मीरखांची उठावणी झाली. चहुंकडे फौजच फौज होऊन गेली. शिंद्यांचे लोक गांवांत पळून गेले. या लढाईत शिंद्यांचा फौजेचा एक मोठा अधिकारी जोजरूष फिरंगी याचे मदतीस आला होता, तो कामास आला.

लढाईच्या मैदानांत महाराजांनीं फौजेचा चांगला व्यूह रचला. मध्यंतरीं पाऊसही पडला तेव्हां तोफखाना बंद होऊन महाराजांकडील शिपाई रणमैदानावर आले आणि त्यांनीं गोळ्या, तीर, तरवारी व भाले यांचा कडकडाट करून सोडला. गोळी व तीर कांहीं वेळाने बंद

पडून शेवटीं तीक्ष्ण तरवारीच्या माऱ्यानें महाराजांस यशवंत केलें. शिंद्यांचा तोफखाना व खजाना महाराजांच्या हातीं लागला. शिंद्यांकडील सरदार चिंतो आत्माराम तांबोळी भाल्याचे जखमेनें ठार पडले. होळकरांच्या हल्ल्यापुढें जोर फिरंगी बेजोर होऊन भैरवगडच्या आश्रयास गेला. त्याच्या चार पलटणापैकीं तीन पलटणें गारद झाली. त्याच्या हाताखालीं एकंदर दहा इंग्रज ऑफिसर होते. यावर श्रीमंताचे रागाचा वा लोभाचा कांहीं एक परिणाम यशवंतराव महाराजांवर झाला नाही. त्यांनी आपला क्रम तसाच चालू ठेविला. उज्जेनी सोडून नर्मदेवर आले. शत्रूच्या तोफखान्यावर हल्ला चढविला. परंतु शिंद्यांच्या लष्कराची फळी फुटली नाही. उभयतांकडील हजारपांचशें माणूस कामास आले. शिंद्यांकडील देवजी गवळी हा नामांकित सेनापती याच लढाईत मृत्यु पावला. विशेष फायदा न होतां यशवंतराव महाराज मागें फिरले. या हल्ल्याचा परिणाम असा झाला कीं, दौलतरावांनीं आपल्याबरोबर असलेले अल्पवयी होळकरांचा मोहरा खंडेराव यांस अशीरगडच्या किल्ल्यावर पाठवून दिले आणि तेथें कडेकोट बंदोबस्त केला. दहा हजार फौज किल्ल्यावर पाठविली आणि चौदा पलटणें रामचंद्र भास्कर सरदार आणि कर्नल सदरलंड हा इंग्रजी अंमलदार यांच्या समवेत पाठवून दिली; आणि सर्जेराव घाटग्याची मार्गप्रतीक्षा करीत राहिले. घाटगेही जामाताच्या निमंत्रणास मान देऊन ''पांच पलटणें, दोन तीन हजार फौज घेऊन पुण्याहून निघाले. आगस्ट इ. स. १८०१ मध्यें बऱ्हाणपुरास येऊन पोंहचले. पुढल्याच महिन्यांत आपल्या फौजेसह नर्मदा उत्तरतीरास येऊन पोंहचले. दौलतरावांनीं पूर्वीच पुढें पाठविलेले सैन्य उतरून गेले होते. त्या सैन्यास सर्जेराव येऊन मिळाले. उज्जेनीचा अगर शिंद्यांचा मुलखाचा बचाव हें जें पूर्वीचे लष्करी धोरण होते आणि ज्यामुळें वरती वर्णन केलेंल्या तीन लढाया झाल्या होत्या, ते धोरण सर्जेरावांनीं सोडून दिले. बचावाची बाजू सोडून चढाईचें धोरण त्यांनीं अंगिकारिलें. इंदुराकडे त्यांनी आपली नजर लावली. याचा परिणाम असा झाला कीं शिंद्यांस किंवा त्यांच्या लष्करास एकच बाजू राहिली : पण होळकरांस दोन पेंच पडले. यशवंतराव महाराजांचा आतापर्यंतचा बेत शिंद्यांस त्यांच्याच मुलखांत हतबल करून टाकावयाचे आणि त्याप्रमाणें आपल्या सैन्याची व युद्ध सामुग्रीची तयारी ठेवलेली. सर्जेरावांचे आगमनामुळें युद्धास नवीनच तोंड फुटले. शिंद्यांस जुने टाकून नवीन असें कांहींच करावयाचे नव्हते. होळकरांस मात्र बसविलेली जुनी घडी उकलून नवा संसार मांडावयाचा प्रसंग आला. तो त्यांनी कसा मांडला व या दोघा सोबत्यांचे इंदूरच्या रणांगणांवर जे अद्वितीय द्वंद्व झाले ते पुढील प्रकरणांत पाहूं. सोबत्यांचे द्वंद्व म्हणून तर अद्वितीय, पण त्यात युद्धाची जी अंगे उपांगे बाहेर आली ती ही मराठ्यांच्या इतिहासांत अद्वितीयच होत.



**प्रकरण ४ थें**

# सोबत्यांशीं युद्ध

उज्जेनी आणि उज्जेनीच्या भोवतीं दौलतराव शिंद्यांचा एका मागून एक अशा तीन लढायांत पराभव झाला हें आपण मागील प्रकरणांत पाहिलेंच आहे. तेव्हां सर्जेराव घाडग्यांस त्यांनी दक्षिणेतून बोलवून घेतले. घाटग्यांनीं उत्तरेंत आल्यावर लढाईचा कार्यक्रम बदलला. उज्जेनीचे संरक्षण हें ध्येय न ठेवितां होळकरांवर त्यांचेच मुलखांत आक्रमण हे धोरण आंखून त्यांनीं इंदुराकडे मोर्चा फिरविला. या वेळेच्या दोन्ही पक्षांच्या बलाबलाबद्दल **(ऐ. ले. सं. भा. १३ पृ. ६८८३, ८४)** मध्यें खालील उल्लेख सापडतो. ''सर्जेरावानें आजपर्यंत अनेक पराक्रम केलें परंतु ते सर्व त्याने कारकून, मुत्सद्दी यांच्यावरच गाजविले होते. जातिवंत लढवय्याशीं लढण्याचा हा त्याचा पहिलाच प्रसंग होता. यशवंतराव महाराज ह्यांच्या फौजेत दुदरनेकची कवाइती पलटणें, अलीगोल, म्हणजे बिन कवाइती पायदळ, पंचवीस तीस हजार स्वार आणि शंभर दीडशें तोफा असा पोक्त लढाऊ सरंजाम होता. शिवाय लखबादादा लाड यांजकडीलही पंचवीस तीस हजार फौज सामील झाली. लष्करांतील बुणगे वगैरे जड सामान व बाया, मुले यांस हिंगलाजगड किल्ल्यावर ठेवून यशवंतराव महाराज शत्रूभोंवती सड्या स्वारीनें घिरट्या घालूं लागले.''

शिंद्यांनीं घाटग्यास बोलाविलें त्याप्रमाणेंच अंतरवेदींत असलेल्या दुसरा त्याचा फौजबंद युरोपियन सरदार यासही फौजेसह येण्याबद्दल यजमानांचें पत्र गेलें. सरदार अंबोजी इंगळे नरवर प्रांतीं होते. त्यांसही तातडीचीं पत्रें गेलीं. परंतु या दोघांपैकीं एकही आला नाही. ''खासा नर्मदापार होण्याच्या बेतांत, परंतु जमियत थोडी आणि शिवाय खर्चास

नाही, त्यामुळे लोक बेदिल होऊन बसलेले. पार होण्यास कोणीच धजत नाहीं, महर्घता बहुत.'' **(ऐ. ले. सं. भा. १३ पत्र नं. ६१४२)** ही झाली मुख्य फौजेची हकीगत. रामचंद्र भास्कर यांच्याबरोबर शिंद्यांनीं जी पांच हजार फौज व चौदा पलटणें कर्नल सदरलंडसाहेबांसह पाठविली तिचे सामान मात्र मातब्बर होतें. याप्रमाणें दोन्ही पक्षांची तयारी होती. सर्जेराव येऊन सामील झाले त्यावेळीं दोन्ही फौजांत तीस कोसाचें अंतर होतें. ह्यावर खासे शिंदे ता. २४ सप्टेंबर इ. स. १८०१ रोजीं एकदाचे हंडियाचे घाटानें प्रथम फौज नर्मदा उतरवून मागून आपणही नर्मदा उतरले आणि माळव्यांत आले. इंदूरचे सुमारें चाल केली. हें वर्तमान यशवंतराव महाराज यांस समजतांच त्यांनीं उज्जेनीहून कूच करून खजराण्यास इंदूरनजीक मुक्काम केला.

ह्या प्रसंगीं यशवंतराव महाराज यांच्याजवळ पंचवीस हजार फौज होती. शिंदे बायांकडील मराठी फौज व राजेरजवाडयांकडील पंधरा हजार फौज असा मोठाच आंकडा होता. या फौजेच्या त्यांनीं कांहीं निवडक टोळ्या केल्या.

नर्मदेच्या काठी हंडियाचे घाटीं शिंद्यांनीं कांहीं फौज ठेविली होती. हेतू हा कीं जाण्यायेण्याचा मार्ग आपल्या कब्जांत रहावा. महाराजांचा एक कामगार हजार पेंढारी घेऊन त्यांच्या तोंडावर गेला पण स्वतःच लुटला गेला. महाराजांनीं त्यांस मदत पाठविली पण त्या मदतीचा उपयोग झाला नाहीं. ज्याप्रमाणें होळकरांचे पेंढारी शिंद्यांवर चालून गेले त्याप्रमाणेंच शिंद्यांचे पेंढारी कृष्णराव महाडिकावर देवगुराड्या गांवीं चालून गेले. येथें देखील होळकरांची बाजू नरम पडली. शिंद्यांची फौज उज्जेनीहून निघाली ती इंदूरच्या रोखाने येऊं लागली. होळकरही त्यांस सामोरे गेले. आघाडीच्या झटापटी सुरू झाल्या. पांच पंचवीस माणूस जाया झाले आणि ह्या चकामकी रोज झडूं लागल्या. ता. ९ आक्टोबर रोजीं दोनी फौजांची गाठ पडून तींत गोळागोळी होऊन आपलाल्या जागा राहिले'' ता. ११ आक्टोबर रोजीं दुसरी मातब्बर लढाई झाली तीत शिंद्यांकडील दीड हजार जाया जखमी आणि होळकरांकडील तीन हजार ठार झाले.

यावेळीं महाराजांनीं भवानीशंकर बक्षी याजला इंदूर जिल्ह्याचा आणि सभोवतालच्या प्रदेशाचा बंदोबस्त ठेवण्याकरितां हिंदुस्थानी स्वारांसह इंदुरास जाण्याचा हुकुम दिला. हरनाथसिंग कुंवर याला फुलनकंपुचे जनरलीचे जागीं नेमले. फिलोरी व दुसरा एक फिरंगी कामगार यांस नजरबंदीत ठेविले. हुकमाप्रमाणें भवानीशंकर यांनीं खार घाटावर मुक्काम ठेविला. नबाब आमीरखानही या सैन्यास येऊन मिळाला. महाराजांनीं चिमणाभाऊची योजना उज्जेनीकडे करून आपण देवगुराडियाचे तळास येऊन मिळावें याप्रमाणें आपल्या सैन्याची रचना करून यशवंतराव महाराज तयारीत असतां अश्विनांतील नवरात्रात लढाईस चांगलेंच तोंड लागलें. शिंद्यांकडील छऱ्यानें होळकरांकडील तीन चार हजार माणूस जाया जखमी झालें. शिंद्यांकडील संख्या हजार दीड हजाराची होती. युद्ध नऊ दिवस सारखें चाललें होतें. बक्षी आपल्या रोजनिशीत लिहितात, ''तरवारी तोफा आणि बंदुका याचा सपाटा दोन्ही बाजूंनी चालू होता. महाराजांचे फौजेनीं शत्रूच्या फौजेचा चांगला पराभव केला नव्हता.

ब्राउनिंगसाहेबाने होळकरांचे लोकांवर छऱ्याचा मारा सुरू केला. लाचारीनें फौजेतील लोकांनीं आपलें तोंड फिरविलें. दुसऱ्या लोकांवर एका लढाईत पन्नास स्वारांनीं एकजुटीने महाराजांवर हल्ला केला त्यावेळीं महाराजांजवळ फक्त चार पांचच स्वार होते. महाराजांनीं शत्रूंच्या तरवारी म्यानासह हिसकाऊन घेऊन आपला घोडा बिनदिक्कत त्यांच्या अंगांवर घालून त्यांना तुडवीत चालले.''

पुढें जागा बदलावी असें महाराजांचे मनांत आले. बक्षी वगैरेंचा तसाच विचार पडला पण हरनाथसिंग कुंवर हटातटास पडला आणि जी लढाई सुरू झाली, ती खजराना आणि भूरी टेकडी या स्थळी मैदानांत झाली. गेल्या नऊं दिवसांत दोन्ही सैन्यांच्या चकमकी इंदूर शहराच्या आसपास तीन चार कोसांच्या टप्प्यांत होत होत्या. पुढें हिंदुस्थानी स्वारांनीं हरनाथसिंग यांस कळविलें कीं, ''शत्रूच्या पलटणीचा प्रतिकार आपल्याकडील साहेबाच्या ताब्यांत असलेल्या कंपूंनी करावा. आम्ही शत्रूकडील स्वारांशी मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें सामना करून अंगात जी बहादुरी आहे ती दाखऊं'' ह्या निश्चयानुरूप (ता. १४ आक्टोबर रोजीं सर्वांत मोठी आणि आणीबाणीची लढाई झाली. ही इंदुराजवळ झाली. म्हणून हिला इंदूरची लढाई असें म्हणतात.)

ब्राउनिंगसाहेबाची पलटण हरनाथसिंग यांच्या पलटणीशीं लढत असतांना तिनें होळकरांच्या या फौजेवर तोफेचे गोळे आणि छरे यांचा विजेप्रमाणें वर्षाव करून तिला अगदी घाबरून सोडलें. ही गोष्ट इतक्या पल्ल्यावर जाऊन पोहचली कीं हरनाथसिंगचा कंपू अगदी बरबाद झाला. हरनाथसिंगानें रणांगणावरून पलायन केलें. त्यांच्या कंपूंतील शंभरावर तोफा शत्रूच्या हाती लागल्या. होळकरांचा बाजारबुणगा शत्रूकडील पेंढारियानें लुटून फस्त केला. महाराजांनीं शौर्याने पुढें होऊन शत्रूच्या हातून चौतीस तोफा माघारीं आणल्या. हरनाथसिंगाच्या हटातटानें महाराजांवर मोठाच प्रसंग गुदरला. ही लढाई दोन दिवस चालू होती महाराजांनीं मीरखानासह जरी अतुल पराक्रम केला तरी पण आखेर हार खावी लागली आणि त्यांस जामघाटापर्यंत मागें हटावें लागलें व कुशलगड किल्ल्याचा आश्रय करावा लागला आणि कांहीं काळपर्यंत त्यांचा विजयी कार्यक्रम विराम पावला. अपजयाचीं कारणें अनेक दाखविली जातात. युरोपियन अंमलदारांत फितूर, तरूण हरनाथसिंगाचा फाजील आत्मविश्वास, लढाईचे स्थान सोडणें इत्यादि प्रमुख कारणें निरनिराळे एतद्देशीय व परकीय इतिहासकार देतात. यातील एकच खरें कारण न मानतां सर्व कारणांची आपआपसातील गुंतागुंत या लढाईचे अपजयास कारणीभूत मानावीं लागते. तरी पण अशा बिकट प्रसंगींही यशवंतराव महाराज पूर्वीही विजयी झाले; आणि यापुढेंही झाले आहेत तेव्हां या लढाईतील अपजयाची कारणमीमांसा संपली असें आम्हांस वाटत नाही. अधिक संशोधनानें अज्ञात असलेली कारणे कदाचित पुढेंही येतील. सध्यां एवढे खास कीं महाराजांवर आणि त्यांच्या राजधानीवर मोठाच प्रसंग येऊन गुदरला.

सर्जेरावांच्या ताब्यांत इंदूर शहर आलें. महाराज दूर निघून गेले आणि सर्जेरावांची दूरदृष्टी इंदूर शहराकडे वळली. दौलतराव शिंदे हे रेवेच्या पार होते ते विजयादशमीच्या

मुहूर्तानें कूच करून निघाले.

''या विजयामुळें इंदूर आणि उज्जेनी ही दोन्ही माळव्यांतील मातबर शहरें शिंद्यांचे ताब्यांत आली. तूर्तकाळीं शिंदे यांची छाप होळकरांवर पडली. यशवंतराव महाराजांस आपले शहर उघडे टाकून जामघाटापर्यंत हटत जावे लागले. **(ऐ. ले. सं. भा. १३ पृ. ६८८४)**

इंदूरच्या लोकांनीं सर्जेरावांस पंधरा लाख रुपये खंड देण्याचें जरी कबूल केलें तरीं त्यांनीं (सर्जेरावांनीं) ते मान्य केलें नाही. इंदूर येथील वाडे जाळणें, खोदणें सुरू झालें. कत्तलही त्यांत सुरू होतीच. या जाळपोळीसंबंधानें मालकमसाहेब लिहितात : पेंढारियास या कामांत सर्जेरावांनीं पूर्ण मोकळीक दिली होती. स्वतः हे सर्व देखावे पहात स्वारी रमली होती. शहरांतल्या बहुतेक विहिरींमध्ये आत्महत्येच्या द्वारें अब्रू बचावणाऱ्या अबलांचे मुखडे पडून राहिले होते. यमराजांची स्वारी एक पक्षभर शहरामधून वावरत होती. चार ते पांच हजार माणसें या पक्षमासांत इहलोक सोडून गेलीं.'' सर्जेरावांची नजर होळकरांच्या राजवाड्याकडेही वळली. तो राजवाडा त्यांनी लुटून नंतर जाळून टाकला. पाया मात्र शिल्लक राहिला.

येवढ्यानेंच तृप्त न होऊन सर्जेरावांची दृष्टी हातोद या खासगीच्या महालाकडे वळली. आपला कमाविसदार तिकडे त्यांनीं पाठविला. येवढ्या थरावर जेव्हां गोष्ट गेली तेव्हां श्रीमंत पेशव्यांनीं अलिजाबहादर दौलतराव शिंद्यांची कानउघाडणी केली आणि त्यावर अलिजाबहादरानी श्वशुरांस तशाच अर्थाचें पत्र लिहिलें. ही ताकीद पत्रें होळकरांच्या इतिहासांत महत्त्वाची असल्यामुळे ती आम्ही येथें साग्र देतो.

(१) **राजश्री दौलतराव शिंदे गोसावी यांस.** अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित बाजीराव रघुनाथ पेशवे पंतप्रधान अनेक आशीर्वाद. सु।। इहिदेमयावतेन अलफ यशवंतराव होळकर व तुमचे सरदार सर्जेराव घाटगे यांची लढाई होऊन त्यांचे इंदूर शहर तुम्ही लुटलें व उज्जेन होळकरांनीं लुटली. करितां सावकार व रयत लोकांकडून मातब्बर खंड घेतला हे नीट नाहीं. दुसरें, काशीराव होळकरास तुम्ही कर्ज रुपये पंधरा लक्ष ऐवजापैकीं अंबाड व माळवेप्रांतांतील महाल लाऊन घेतले. परंतु सौभाग्यवती आनंदीबाई होळकर यांचा खासगी खर्चाचा इनामी तालुका हातोद हे सर्जेराव घाटगे यांनीं लुटून ऐवज वसूल करण्याकरितां मामलेदार नेमला आहे. त्यांस खासगीवर दौलतीचे कर्जाचा कांहीं एक संसर्ग नसतां तुम्ही मामलेदार उठवून नेऊन खासगीचे जागेवर या ऐवजावर काडीमात्र दखल न देतां पूर्वापार चालत आल्याप्रमाणें चालवणें. करता सर्जेराव घाटगे यांस निक्षून ताकीद देऊन वसूल घेतलेले माघारी देणें. पुनः बोभाट न ये तें करणें. जाणिजे. चंद्र २५ सफर कळावे बहुत काय लिहिणें. मोर्तब लेखनसीमा.

(२) **श्रीनाथ :** राजश्री काशीराव होळकर गोसावी यांस. स्नेहांकित दौलतराव शिंदे रामराम विनंती उपरी. पुणें मुक्कामींहून पत्र आल्यांत होळकर राज्यांत दौलत व खासगी हे प्रथक असोन तुम्ही एकत्र करून खासगीचे ऐवजाची तोडमोड केली. त्यांस खंडेराव होळकर याचे मातोश्रींचे अधिकार खासगीवर आहेत या करितां निक्षून ताकीद करून देणें म्हणोन आल्यावरून आपल्यास पूर्वीच ताकीदीनें लिहून पाठविलें आहे. हल्लीं पुनः लिहून

आल्याप्रमाणें खासगीचे महाल जे असतील त्याचे ऐवज घेतले असतील ते खंडेराव होळकर यांचे मातोश्रीचे हवालीं करून द्यावे. यामध्यें दिवसगत लावूं नये. आपसांत घराचा खिस्सा आणि आमची बदनामी आहे हे मनांत आणून आतां पत्र पावतांच खासगीची जमा मशारनिल्हेचा करून इकडेस कळवितील. रा छ. २५ सवाल बहुत काय लिहिणें हे विनंती.

(३) **राजश्री काशीराव होळकर गोसावी यांस.** स्नेहांकित बाजीराव रघुनाथ प्रधान सु।। इसने मयातेनव आलफ. फौजेचे बेगमीस सरंजाम दक्षिण व महाल चालत आहेत. त्यांस मशारनिल्हेस दौलतराव शिंदे अलिजाबहार याज कडेस जावयाची सरकार आज्ञा असतां गेले नाहीत. सबब जप्ती करण्याचे हुकूम माहे जमादिलावलांत जाहले आहेत परंतु खासगी व दौलत होळकरांचे घराण्यांत प्रथक असल्याने, दिवाण, फडणीस व खजिना वगैरे वेगळे आहेत. त्यांस खासगी जप्तीची मोकळीक करून दौलतीची जप्ती करण्याची सनद दिली आहे. त्याप्रमाणें आपण करणें जाणिजे छ. १५ साबान हे विनंती.

इंदूरच्या लढाईचे अनेक अनिष्ट परिणाम झाले त्यांचे वर्णन वर आलेंच आहे. पण अनिष्टातूनही एक इष्ट गोष्ट बाहेर आली. होळकरशाहीच्या इतिहासांत व राज्यकारभारांत दौलत व खासगी अशी दोन अंगे आहेत इतकीच माहिती बहुजन समाजास आहे. या दोन्ही अंगांचे परस्पर संबंध कसे चालत आले आहेत हे ह्या तीन ताकीदपत्रांवरून स्पष्ट होत आहे. थोडक्यांत सांगावयाचें तर कैलासवासी सुभेदार यांस खासगीची मिळालेली सनद हे मूळ असून ही तीन ताकीदपत्रें त्या मुळावरील भाष्य होत. अस्तु.

आतां आपण महाराज यशवंतरावांकडे वळूया. इंदूरची लढाई आश्विन शुद्ध ८ अष्टमीस झाली त्या नंतर ते कुशलगडास गेले. ''महाराजांनीं गजाकुंवर, कृष्णाजी महाडिक यांजबरोबर सरंजाम देऊन इंदूरचा बंदोबस्त करावयास रवाना केलें. आपण जांबेस राहून तीन चार दिवसांनीं डेरे इंदूरच्या रोखे दिले. शिंद्यांकडील पेंढारी व फौज येऊन आश्विन वद्य १४ शीस उभय सैन्यांची लढाई झाली. गजाकुंवर कामास येऊन कृष्णा महाडिक यांस जखमा झाल्या. पेंढारियांनीं आपली शिकस्त केली.'' याच सुमारास किंवा याचेही पूर्वी सुभेदार काशीराव चारी बाजूंनीं हताश होऊन शिंद्यांचा तळ सोडून मातृभूमीकडे आशायुक्त अंतःकरणानें दृष्टी टाकीत होते. शेवटीं एकदाचे माळव्यांत येऊन ठेपले. यशवंतराव महाराजांस हें कळतांच त्यांनी मागील सर्व गोष्टी विसरून राजा व वडील बंधू या दोन्ही नात्यांनीं त्यांची बडदास्त ठेविली व नोकरांसही तशीच ठेवावयास लाविली. आपली अडचण होती तरी पण त्यांनी बंधूस तीं भासू दिली नाहीं. याप्रमाणें बंधूचा बंदोबस्त करून आपली राजधानी शत्रूच्या तडाक्यांतून सोडविण्याच्या कामगिरीस ते लागले.

''मनाचा मनसुबा सिद्ध करून त्यावेळचे मुख्य कामगार जे खंडो महादेव व दिवाणाकडील कृष्णराव भाऊ व श्रीपतराव व रामराव अप्पाजी पळसीकर व पाराजीपंत व सखाराम जगजीवन व दिनकरराव पागनीस व दाजी मुनशी व स्वारीतील बाळाजी कृष्ण निसबत पलटण इतक्या असाम्यांकडून खंडचिट्या लिहून घेतल्या. याप्रमाणें या मुत्सद्दी लोकांकडून पांचपन्नास लाखांचा तोडा करून वसुलास गुलामीखान निसबत मीरखान व

सरकारपैकीं दयाराम जमादार यांजला मागें महेश्वरास ठेवून दिल्हे. आपले बाड विठोबाचे देवालयापुढील बंगल्यांत ठेऊन दिले आणि जातीने इंदुरास येऊन हजर झाले. फौज चहूंकडून त्यांच्याभोंवतीं जमू लागली. त्या सर्वांना महाराजांनीं दमदिलासा दिला.

महाराजांनीं पैसा आणि माणूस यांचा जम बसविला. याउपर दुसरेंकडेही त्यांनीं प्रयत्न चालविला. दुदरनेकावर शामराव महाडिकाची योजना केली. महाडिक यशस्वी होऊन दुदरनेकच्या सात पलटणी आणि पस्तीस तोफा घेऊन महाराजांच्या तळावर येऊन दाखल झाले. इंदुरच्या फौजेत फितूर केला होता तोच मार्ग आतां इंदूरकरांनीं अंगिकारिला. उलट असें झालें कीं महाराजांचे शौर्य व औदार्य जगजाहीर असल्यामुळें थोड्या श्रमांत प्रतिपक्षाकडील मोठा समाज त्यांस येऊन मिळाला. याप्रमाणें मुबलग पैसा व दमदार माणसें औघ्या पंधरा दिवसांत मिळून पुनः सोबत्यांशीं दोन हात करण्यास महाराज सिद्ध झाले. आश्विन वद्य ८, ता. ३० आक्टोबर इ. स. १८०१ रोजीं ते शत्रूवर एकदम येऊन कोसळले. पूर्वीच्या विजयात दंग असल्यामुळें मनीमानसीं नसतांही हा शत्रूचा लोंढा एकदम त्यांच्यावर कोसळला. सर्जेरावांनीं जेमतेम महाराजांशीं तोंड दिले पण त्यात त्यांस यश आले नाही. या लढाईतील हकीगत बातमीदार देतो : ''सर्जेराव पांच सात कोस इंदुरपासोन मागें उज्जेनच्या रस्त्याकडे आले. हजार फौज आणि दोन पलटनी यांचा नाश यशवंतराव होळकरांनीं केला. सर्जेराव आणि होळकर यांजला अंतर अर्धकोसाचें आहे.'' **(ऐ. ल. सं. भा. १३ पान ७१८८)**

सर्जेराव हटल्यावर महाराजांनीं निकडीनें पाठलाग केला आणि सर्जेरावास उज्जेन शहरांत पिटाळून लावले आणि शहरास वेढा घातला. असा प्रसंग ओढवतांच दौलतराव शिंदेही उज्जेनीकडे वळले आणि महाराज यांस एक अमूल्य संधी मिळाली कीं सोबती व त्यांचे सेनापती दोघेही एकाच स्थळीं व काळीं त्यांच्या टापूत आले. याप्रमाणें इंदुरवरील शिंद्यांचा शह तर उठलाच पण शिंदे स्वतः आपली सेना व सेनापतीसह आपलेच राजधानींत कोंडले गेले.

होळकर-शिंद्यांचा संग्राम चाललेला पाहून श्रीमंत पेशवे क्रोधायमान झाले. दोघांच्याही सरंजामावर जप्ती बसविली आणि शिंद्यांचे मदतीस म्हणून पुण्याहून निघून कोपरगांवपर्यंत आले. यावरून जप्तीचा अर्थ लक्षांत येईलच. ता. १५ जून इ. स. १८०१ रोजीं होळकरांच्या दक्षिणेतील महालावरील जप्ती उठविली पण त्यानंतर काशीराव होळकर हें शिंद्यांकडून निघून माळव्यांत गेले आणि भावाभावांत संगनमत सुरू झालें ही बातमी श्रीमंतांस कळतांच त्यांनीं ता. २९ आक्टोबर इ. स. १८०१ रोजीं होळकरांच्या सर्वत्र सरंजामाच्या जप्तीचा हुकूम सोडला. हा प्रकार होतो न होतो तोच वर उल्लेखलेला उज्जेनीचा अद्वितीय वेढा सुरू झाला. या वेढ्याचे वर्णन त्यावेळच्या बातमीपत्रावरून आम्ही खाली देतो.

''शिंदे खासा फौजासुद्धां उज्जेनीजवळ आहेत. होळकर त्यांचे आसपास भारी सरंजामानिसीं आहेत. शिंदे ह्यांच्या फौजेंत महागाई भारी धारण दोन शेराची आहे. भोवतीं

यशवंतराव चाळीस हजारासह धिरट्या व घेरा घालून आहेत. शिंदे यांचे पाय भोईस लागणें दुरापास्त आहे.'' ही हकीगत नोव्हेंबर व डिसेंबरची आहे. **(ऐ. ले. सं. भा. १३ पृ. ७१९१)**

यानंतर शिंद्यांस समेटाशिवाय मार्ग राहिला नाही. बातमीदार लिहितो ''शिंदे होळकर ह्यांचा तह परस्परें होत आहे. शिंदे यांजकडून बोलण्यास कंपूकडील, होळकर यांजकडे गेला. बोलणें करून होळकरांकडून पाराजीपंत म्हणून गृहस्थ आले आहेत.'' याच सुमारास लखबादादा लाड बायांच्या बाजूने पंचवीस हजार फौजेनिशीं दौलतरावांचे विरूद्ध यशवंतराव महाराजांस येऊन मिळाले. सारांश, महाराजांचे वजन चांगलेंच वाढले. प्रत्यक्ष दौलतरावांशीं समरांगणात दोन हात करून फार दिवसांची ही तेढ कायमची तोडून टाकावी ही महाराजांची उत्कट इच्छा. दोन महिने जवळजवळ मैदानांत गांठ पडावी म्हणून जे प्रयत्न झाले ते सर्व निरर्थक झाले. उज्जेनीत धान्य व वैरण यांचा दुष्काळ पडून घोडीं व मनुष्यें यावर उपासमारीनें मरण्याचा प्रसंग येऊन ठेपला तरीही दौलतराव शिंद्याना बाहेर पडण्याचे धैर्य होईना. इ. स. १८०१ संपलें व इ. स. १८०२ उजाडलें. यानंतर महाराजांनीं एक व्यापक आणि विस्तृत व्यूह रचला. पण हा व्यूह कृतीत उतरविण्यापूर्वी महाराजांनीं अलिजाबहादुरास कळविलें कीं ''पूर्वी तुकोजीरावांशीं जे करारमदार झाले आहेत, ते सर्व तुम्ही बरोबर पाळण्यास कबूल असाल, तर तुमची आमची गोडी होणें शक्य आहे.'' हे म्हणणें मान्य झाले नाही आणि दोन्ही पक्ष होते त्यांस स्वरूपांत राहिले. सारांश, तडजोडीचा प्रश्न याप्रमाणें तडीस लागल्यावर महाराजांस जे दूरदृष्टीने दिसले त्याचा पाया व इमारत रचण्यास आता त्यांनीं प्रारंभ केला.

महाराजांची नजर चारी बाजूंनीं फिरकत असल्यामुळें आपल्या प्रतिपक्षाचें मर्मस्थान त्यांनीं शोधून काढलें. डिबाईन याच्या हाताखालीं तरबेज झालेलीं पायदळीं फौज ही तत्कालीन इतर फौजांपेक्षां वरचढ होती. दुसरी गोष्ट, दिल्ली दरबारची दिवाणगिरी आणि तिजपासून निष्पन्न होणारी सत्ता आणि मत्ता हे शिंद्यांचे दुसरें मर्मस्थान होते. उत्तरेंतील या मजबूतीच्या मानानें प्रतिपक्षाची दक्षिणेतील सत्ता कमकुवत होती. हीं तिन्ही मर्मस्थानें हिशेबांत धरून त्यांनीं आपला पुढील मार्ग रेखाटला. उत्तर आपल्याकडे घेऊन दक्षिणेतील जिवाजी यशवंत नांवाच्या शिंद्यांच्याच सरदारास आपलासा करून त्याजवर सोपविली. सारांश, एखाद्या भारतीय महावीराच्या बाहुबलास व बुद्धिबलास साजेसा व्यूह रचून तो लगेच वर्षाच्या आत महाराजांनीं तडीसही नेऊन दाखविला. या व्यूहाचे वर्णन क्रमशः आतां करूया. **(ऐ. ल. सं. भाग १३ पृ. ६९२६ वर संपादक लिहितात : )**

''ग्वाल्हेर प्रांत हा शिंद्यांच्या जहागिरीपैकीं सर्वात मोठा प्रांत. ग्वाल्हेरी पलीकडील आग्रा, मथुरा, दिल्ली वगैरे शहरांवर मोगल बादशहातर्फे शिंद्यांचाच अंमल होता. मोंगल बादशाहीची दिवाणगिरी पेशव्यांकडे होती आणि या दिवाणगिरीची वहिवाट आजपर्यंत पेशव्यांतर्फे शिंदे घराण्याकडे होती. या दिवाणगिरीच्या जोरावर उत्तम कवायती पलटणें शिंद्याना आपल्या पदरी बाळगिता आली आणि त्यामुळेच शिंदे यांस मराठी साम्राज्यांत महत्त्व प्राप्त झालें. तो ग्वाल्हेर प्रांत पादाकांत करावा, दिल्ली हस्तगत करून घ्यावी म्हणजे

शिंदे आपोआपच आपल्या पाठलागांवर येतील आणि मैदानांत समरांगणावर उज्जेनीस जे साधलें नाहीं तें उत्तर हिंदुस्थानांत सर्व जगाच्या समोर साधावें हा महाराजांचा व्यूह.''

या बेताला अनुसरून महाराज आणि त्यांना मिळालेले शिंदे बायांचे सरदार आपआपले फौजेनिशीं इ. स. १८०२ च्या फेब्रुवारीत दिल्लीच्या रोखे निघाले. शिंद्यांच्या तोंडावर उज्जेनीस त्यांनीं बरीच मोठी फौज ठेऊन दिली. दिल्लीच्या रस्त्यावर ठिकठिकाणीं मुक्काम करून खंड, खंडणी, नजराणे, घेत घेत महाराज कूच करीत होते. रतलामपासून तीन लाख खंडणी घेतली. रतलामवरून पिंपलोदा त्यांनी गाठला. पिंपलोद्यास शामराव महाडिक इहलोक सोडून गेले. महाराजांच्या मागें शिंद्यांचे सरदार बाळोजी इंगळे पंचवीस हजार फौज पांच पलटणें यांसह पाठलागासाठीं आले. असा हा पाठलाग चालला होता. महाराज प्रतापगडावरून मेवाडांत उतरले. पुष्करतीर्थाचे स्नान करून नाथद्वार येथें ते आले. येथें लखबादादाकडून त्यांस उत्तर आलें कीं ''मला उभयतां मालकांची मर्जी सांभाळणें असल्याने आपल्याकडे येतां येत नाही.'' नाथद्वार येथें महाराजांस कांहीं प्राप्ती झाली नाही कांकरोली व छोटे नाथद्वार यांच्यापासून अनुक्रमें पस्तीस व चाळीस हजार खंडणी घेतली. तेथून मलाद्या लाद्या बरखेड्यावरून वळून रामपुऱ्याकडे आले. रामपुरा व टोंक हे होळकरांचे परगणे, दुदरनेकानें बेमानी करून शिंद्यांच्या युरोपियन अधिकाऱ्याकडे ते प्रांत देऊन आपण निघून गेला होता. महाराज तेथें पोहचतांच तेथील अधिकारी ठाणीं सोडून आपले जीव बचावून पळून गेले. सारांश, या मोहिमेंत केवळ नांवाच्या दराऱ्यानें, हातांतून पूर्वी सुटलेले रामपुरा व टोंक हे दोन परगणे होळकरांच्या घरांत परत आले. रामपुऱ्याहून पिढावा, मांदरगड, लाखेरीवरून महाराज चंबळेवर उतरले. तेथून कोट्याकडे वळले. येथें आपल्या अधिकाऱ्यांची वाटणी करून भवानीशंकरास शिवपुरास पाठविलें. नागोजी पंडित, बालाराम शेट व नजीबखान यांस मामला वसूल करण्याकरितां कोट्यास ठेवून दिले. स्वतः स्वारी शिवपूर येथें येऊन फौजेंत दाखल झाली. तेथून पाराबोरी, शहाबाद, गुगलछबडा आणि सुजालपूर या शिंद्यांच्या ठिकाणांपासून खंडण्या वसूल करून ते आष्ट्यांस आले. आष्टे लुटून घेतले. तेथून हारदे हंडिया परगण्यांतून खांडव्यास आले. तेथें खंडणीच्या वसुलीसाठीं हरनाथसिंग यास ठेवून दिले आणि आपण स्वतः मीरखां यांस बरोबर घेऊन महेश्वरास आले. कोट्यास खंडणीसाठीं ज्या कामगारांस ठेविलें होतें त्यांनीं साता लाखाचा भरणा केला, असें माळवा रिपोर्टकार म्हणतात.

उज्जेनीहून निघून महेश्वराला महाराजांची स्वारी जी परत आली त्या मोहिमेचे वर्णन **ऐ. ले. सं. भा. १३ पत्र नंबर ६३३१** यांत बातमीदार करितो : ''यशवंतराव महाराज फौजसुद्धां मंदोसरास जाऊन चार लाख रुपये घेऊन तेथें तालुका लुटून तेथून कूच करून रतलाम येथें जाऊन तीन लाख रुपये खंडणी घेऊन तालुका लुटून तेथून झाबवा येथें जाऊन तेथेंही दोन लाख खंडणी घेऊन तोही प्रांत खराब केला. राजश्री लक्ष्मण आनंत लाड दतियास येऊन शिंदे बायांस घेऊन अंबोजी इंगळे यांसी लढाई देऊन इंगळे याजकडील तीन पलटणें साफ करून बायांसुद्धां जोतपुरास जाऊन तेथें बायांस मजबुतीनें ठेवून मशारनिल्हे होळकर

यांस सामील व्हावयास आले.'' हे बातमीपत्र व वरती दिलेली बक्षीच्या रोजनिशीतील माहिती एकमेकांस पूरक आहेत. दोन्ही उताऱ्यांचा विचार केल्यावर महाराजांनीं आपला उत्तरेंतील व्यूह पूर्णपणें पार पडला, असाच सिद्धांत निघतो.

यशवंतराव महाराज झाबव्यास खंडणी वसूल करण्याकरितां राहिले असतां इकडे ''शिंदे बहादूर यांनीं महेश्वर लुटावा हा बेत करून धारेहून फौजा रवाना करावयाचा बेत केला.'' हे वर्तमान महाराजांस झाबव्यास असतां कळलें. महाराजांनीं एक कंपू व दहा हजार फौज महेश्वरच्या रखवालीस रवाना केली. कंपू महेश्वरीं राहून दहा हजार फौज नर्मदा दक्षिण तीरास खरगोणबत्तिशीवरून बऱ्हाणपुरास जाऊन तेथील बंदोबस्त करावा हा हेतू आहे. सारांश, महाराजांनीं उत्तरेच्या रोखें दिल्लीपर्यंत जाऊन सोबत्याच्या मुलखांत आपला शह बसविला असतां त्याचा प्रतिकार म्हणून धारेवरून धाडलेले सैन्य येवढाच काय तो दिसतो. या संबंधांत बातमीदार लिहितो ''होळकरांनीं कूल मुलूख लुटून गारदगिरी करीत आहेत. पैका व फौज हुशार आहेत. सारांश, होळकरांचा दरद बहुत शिंदे बहादूर बाळगितात. **(ऐ. ल. सं. भा. १३ पत्र नंबर ६२३३ फेब्रुवारी इ. स. १८०२)**

यानंतर एप्रिल इ. स. १८०२ मधील हकीगत बातमीदार लिहितो : ''शिंदे याजकडील पलटणें दोन व कांहीं स्वार वीस कोसांवर होते ते लुटले. चार शेराची धारण आहे. वैरण मिळत नाहीं. इंग्रजांकडील वकील शिंद्यांकडे आले आहेत. दिल्लीचा बंदोबस्त करतो. अशी त्यांनीं बोलणीं घातली आहेत. शिंदे यांनीं होळकर यांजकडे लिहून पाठविले आहे.'' हा झाला प्रकार महाराजांच्या उत्तरेतील व्यूहासंबंधीं आणि तो यशस्वीही झाला हे स्पष्ट दिसते आहे. या व्यूहाबरोबर दक्षिणेतील व्यूहाची देखील आखणी करून त्यांनीं अंमलबजावणीही केली. तिकडे आतां वळूं या.

दक्षिणेतील होळकरांचा मुलूख चांदवड, अंबाड, सुलतानपुर, नंदुरबार, शेवगांव वगैरे जे परगणे होते त्यापैकीं बहुतेक शिंद्यांनीं सुभेदार काशीरावांस दिलेल्या कर्जाबद्दल आपल्याकडेच लावून घेतले होते आणि कांहीं उरले सुरले असतील ते श्रीमंतांच्या रोषाच्या जप्तीमुळें नाहीसे झाले होते. ही आपली सर्व मत्ता सोडविण्यासाठीं इ. स. १८०२ च्या जानेवारीत खालील प्रांतांचे स्वारी संबंधात फतेसिंग माने, अच्छेसिंग व वाजदअल्लीखान यांस रवाना केलें. या सर्व सरदारांबरोबर आपले दिवाण व मुत्सद्दी पाराशर दादाजी यांस मुख्य नेमून दक्षिणेंत पाठविले आणि स्वतः उत्तरेस निघून गेले. या उत्तरेंतील मोहिमेचे वर्णन वर आलेंच आहे.

पाराशर दादाजी खानदेशांत उतरले. बातमीदार लिहितो : ''पाराशरपंत सातआठ हजार जमाव घेऊन जिवाजी यशवंत यांजकडे आले. त्यांच्या भेटी झाल्या. शिंदे बायांच्या वतीने जे कोणी शेणवी सरदार दक्षिणेंत आणि उत्तरेंत दौलतरावांविरूद्ध उठले होते त्या बारभाई सरदारांपैकीं जिवाजी यशवंत हा एक फौजबंद सरदार होता. याजकडे शिंद्यांच्या बावन पागा होत्या म्हणून यांस बावनपागे असें म्हणत.'' हे बावनपागे आणि पाराजीपंत एक झाले. असले फौजबंद सरदार महाराजांस हवेच होते. पाराजीपंताच्या शिफारसीवरून

''जिवाजी यशवंत यांजला सरदारीची वस्त्रें व निशाण होळकरांनीं पाठविले''. दोघे सरदार एक झाले आणि त्यांनी कामाची वाटणी करून घेतली. बावनपागे यांनी बऱ्हाणपुरचे रोखे शिंद्यांच्या फौजेच्या तोंडावर राहावें. पाराजीपंतानी चांदवड प्रांताकडे वळावे असें ठरलें. सारांश, महाराजांच्या दक्षिणेतील व्यूहाला दोन शाखा फुटल्याः एक खानदेशांत आणि एक नाशिककडे. आतां पाराजीपंताची कामगिरी प्रथम पाहू या. ''होळकरांच्या तालुक्यांत ठाणीं शिंद्यांनीं बसविली होती. ती उठविलीं व पुनः आपली बसविलीं. त्याजबरोबर दहा हजार फौज (स्वार) आणि पांच पलटणें होती. तमाम ठाणीं उठवून व खंडण्या घेत राहुरी, वांगोरीस आले. येवल्याचे पेठेचीही खंडणी जाहली. त्यांनीं होळकरांचा सर्व सरंजाम मोकळा केला, इतकेच नव्हे तर नर्मदेअलीकडील शिंद्यांचा सरंजामही याच सपाट्यांत त्यांनीं हाताखाले घालून ठेवला.'' पाराजीपंताचा हा पराक्रम श्रीमंतांचे कानापर्यंत गेला. खानदेशचे सुभेदार धोंडोपंत गोडबोले यांस श्रीमंतांकडोन प्रतिकारार्थ हुकुम गेला. त्याचप्रमाणें उष्टखानेवाले बाळोजी कुंजीर, हुजरात पागे पथके या सर्वांस गोडबोल्यांस मिळण्याबाबत हुकूम सुटले. चांदवडनजीक लढाई होऊन गोडबोल्यांचा पूर्ण पराभव झाला. त्यांच्या चौदा तोफा व हजार घोडे पाडाव झाले. बाकी झाडून लुटला. स्वतः गोडबोले पळत कोपरगांवीं जाऊन थांबले. विंचूरकर यांचे लोकांनीं बचाव करून पार केला. यावेळीं होळकरातील फौजेस ''तोफा वगैरे सरकारच्या नेल्या असतील त्या माघारी देणें असा हुकुम झाला. महाराजांच्या शीलानुरूप व घराण्याच्या लौकिकाप्रमाणें हा हुकूम सुटला यांत संशय नाही.''

पाराजीपंत आणि त्यांची फौज यांनीं श्रीमंतांच्या फौजेवर चांदवड नजीकच्या लढाईत हा जो विजय मिळविला तो महाराजांच्या एकंदर कार्यास शुभशकुनच झाला असें म्हणावें लागतें.

पाराजीपंत पुण्यास पोहचल्यावर त्यांनीं श्रीमंतांच्या परवानगीने आपली डाक थेटपर्यंत बसविली. त्यामुळें खुद्द मालकाशी पत्रव्यवहार वगैरे सुरळीत झाला. ज्या समेटासाठीं ते श्रीमंतांकडे येऊन पोंहचले होते त्यात मात्र त्यांस यश मिळाले नाही. दोन महिन्यांच्या अवधींत श्रीमंतांनीं त्यांची भेट देखील घेतली नाही. मुनशी यांच्यामार्फत बोलावें असा हुकुम होता. याचवेळीं शिंद्यांचे वकीलहीं येऊन पोंहचले होते. त्यांचे बोलणें बाळोजी कुंजीरच्या मार्फत चालले होते. नागपूरकर भोसले यांनींही आपले वकील पाठविण्यास कमी केलें नाहीं. सारांश, वकील तर आलेच होते पण त्यांची आणि श्रीमंतांची गांठ मात्र मध्यस्थांच्या मार्फत. एवंच दक्षिणेतील व्यूहापैकीं प्रांत परत मिळविणें हे पाराजीपंतांनीं पार पाडले. समेटाचे मात्र कार्य झालें नाहीं. याच व्यूहापैकीं जी दुसरी बाजू बावनपाग्यावर सोपविली होती तिचेकडे आतां वळूं या.

बऱ्हाणपुरची बाजू या बावनपाग्यावर सोपविली होती. त्याच बाजूस शिंद्यांचे सरदार गोपाळराव चिटणीस हे आठ दहा हजार फौज घेऊन राहिले होते. चिटणीस व बावनपागे यांच्या दोन चार चकमकी होऊन मार्च इ. स. १८०२ आखेर बावनपागे थोडेसे मागें हटले. एप्रिलमध्ये महाराज उत्तरेतील मोहिमेवरून यशस्वी होऊन आल्यावर त्यांस दक्षिणेतील या

दोन्ही सरदारांच्या कामगिरीची बातमी कळली, तेव्हां या सर्व बाबींचा पूर्ण विचार करून पुढील कार्यक्रम आखला तो येणेंप्रमाणें.

दिल्लीची दिवाणगिरी हें शिंद्यांचे मुख्य सामर्थ्य. त्या बाजूस मोहीम नेऊन ती यशस्वी केल्यावरही शिंदे विशेष हालचाल न करितां स्तब्धच राहतात. खुल्या मैदानांत भेटून दोन हात करण्याचे जमत नाही, तेव्हां आतां मुख्याशीच गाठ घेतल्याविना लढ्याचा सोक्षमोक्ष होत नाही असें निश्चित करून महाराजांनीं जंगी तयारी केली आणि इ. स. १८०२ च्या मे मध्यें दक्षिणेकडील स्वारीचा पुकारा जोराने केला. ह्या स्वारीचे वर्णन पुढील प्रकरणावर सोपवून चालू प्रकरणावर प्रकाश पाडणारा कांहीं पत्रव्यवहारातील सारांश आम्ही खालीं देतों :

हे लेख बहुतेक सरकारी दप्तरांतीलच आहेत. कांहीं कोटा येथील गुळगुळे यांचे दप्तरांतींल आहेत. गुळगुळे हे पहिले बाजीरावसाहेबांचे स्थापित. यांचा दप्तरखाना मोठा असून होळकर आणि शिंदे ह्या दोघांचाही पत्रव्यवहार तेथील संग्रहात आहे. त्यामुळें दोघांचाही संबंध समजण्यास व उकलण्यास हा संग्रह उपयुक्त आहे. त्यातील कांहीं भाग शिंदेशाहीच्या इतिहासाचीं साधनें म्हणून प्रसिद्ध झाला आहे. ह्या तीन वर्षांतील (इ. स. १७९९ ते १८०२) होळकरशाहीची राजकीय व अंतःस्थ स्थिती तसेंच यशवंतराव महाराजांची निरनिराळी बौद्धिक व अंतःकरण विषयक कामगिरी यात स्पष्ट दिसून येईल.

(लेखांक १) यादी इ. स. १७९७ ते १८०० दिवाण पळसीकर यांजबद्दलची माहिती.

जमा रुपये

१०००० सरकारांतून लनामी गांव सुमारी सात हिस्सेदारांचे हिस्से जाऊन.

२३००० होळकरांकडील जहागीर सरंजामास (तपशील).

१५००० परगणे बर्डावद महाल, शिबंदीचा खर्च वजा. होऊन बाकी जमा

३००० जयपूर प्रांतापैकीं गांव सालवण.

२००० परगणे रामपुरापैकीं गांव खजुरी.

१००० खानदेशपैकीं गांव भटगांव.

२००० चांदवडपैकीं गांव दोन.

-------

२३०००

------

३३०००

पैकीं खर्च रुपये :

१ पळसी संस्थान दरसाल दहा हजारांचा खर्च होता.

१ पुणें मुक्कामीं खर्च.

१ होळकरांचे स्वारी समागमें बारमाही फिरणे शंभर घोड्यांनिशी सबब.

महालचा ऐवज स्वारी खर्चाखाली जाऊन दहा बारा हजार कर्ज होत असें. सदरहूप्रमाणें

जमाखर्ची इ. स. १२०७ तागाइत इ. स. १२१० पर्यंत जसे तसे चालले. पुढें जिकडील तिकडे वाताहत होऊन होळकरांकडील गांवखेडी दंग्याने उजाड पडली व अडथळाही पडला आहे. तेथील एक पैसा आज दहा वर्षे येत नाही.

**(दिवाण पळसीकर रेकॉर्ड)**

(लेखांक २) यादी संरंजामी सरदार, पागे वगैरे लोकांकडून सरंजामी आकारात दरखाची रक्कम वजा करण्याचा ठराव. सु।। समानतिसैन मयावआलक त।। इसनेमयानअलफ सन १२११ येकुण साल पांच ५

| | | |
|---|---|---|
| ९९६३७-१३-० सरंजामी मंडळ | | उत्पन्न येकुण रुपये |
| २६६८६-१४-० | तुळसाजी वाघ | २६६८६७-०-० |
| २९६१-०९-० | माधवराव वाघ | २९६१६-१-९ |
| ९८५०-००-० | अवचितराव वाघमारे | ९८४९८-५-९ |
| १०१६-१४-० | रा. म्हसके | १०१६७-०-० |
| ६०००-००-० | आनंदराव खटके | ६००००-०-० |
| ३०००-००-० | भागवत | ३००००-०-० |
| ६२३७-०८-० | ढमढेरे | ६२३७८-०-० |
| ८००-००-० | बागदरेकर भागवत | ८०००-०-० |
| १०००-००-० | व्यंकटराव नलगे | १००००-०-० |
| ९४५३-१२-० | नारायणराव बारगळ | ९४५४०-१०-० |
| ५००-००-० | फकीरजी शितोळे | ५०००-०-० |
| १५०-००-० | मानाजी उदाजी लांबहाते | १५००-०-० |
| ९८१०-००-० | चोंडीकर शिंदे | ९७९०४-०-० |
| ९९९०-००-० | यशवंतराव फणसे | ९९९००-०-० |
| ७२५-००-० | आडगांवकार पिंगळे | ७२४४-१२-० |
| ५३७-०८-० | पाराशर दादाजी | ५३७४-३-३ |
| ३७-०८-० | सेटीबा, गोविंदराव खेमनार | ३७५-०-० |
| ६०-००-० | पिराजी म्हाळोजी पिंगळे | ६००-०-० |
| ८६-०४-० | रांजणगांवकर बोराडे | ८६३-०-० |
| १०२-०८-० | अवधुतराव बुळे | १०२२-०-० |
| २००-००-० | खंडोजी पिसे | २०००-०-० |
| १०४३२-०८-० | लांभाते. खंडुजी, भिवाजी मळोजी व मक्काजी | |
| ...................... | | |
| ९९६३७-१३-० | | |

२४६४३-१२-० निसबत पागे सरंजामी — येकुण उत्पन्न

| | | |
|---|---|---|
| १५९४३-१२-० | चिमाजी बुळे | १५९४३९-३-६ |
| ३०००-००-० | गोविंदराव महाडिक | ३००००-०-० |
| २५००-००-० | माधवराव राजोळे | २५०००-०-० |
| ३१००-००-० | आंबोजी इंगळे | ३१०००-०-० |
| १००-००-० | सैयद महमद | १०००-०-० |

..................

२४६४३-१२-०

४४३५-१४-० चोळी बाबत

| | | | |
|---|---|---|---|
| ४२०-०-० | बारगळ | ४२००-८-० | दर ८४ |
| ९३३-२-० | वाघमारे | ९३३४-११-६ | दर १८६ |
| २९५-०-० | चोंडीकर शिंदे | २९५३-०-० | दर ५९ |
| २००-९-० | काशीबाई चिखली | २०१५-२-६ | दर ४१ |
| १५५-०-० | रखमाबाई मतकर | २०००-८-० | दर ४० |
| ०-०-० | मातोश्री बाईसाहेब | ७८४९७-६-६ | ,, ,, |
| ०-०-० | मथुराबाई होळकर | ६५५१-१४-६ | ,, ,, |
| ६५-०-० | चिमाजी बुळे | ६५०-०-० | दर १३ |
| १७५-०-० | राधाबाई भागवत | १७४०-९-० | ,, ,, |
| ५२३-१२-० | मुक्ताबाई फणसे | १०२३६ | दर १०४ |
| १९०-०-० | जिऊबाई वाघ | १९०० | दर ३८ |
| ७६५-०-० | हरकुबाई | ७६९९-२-० | दर १५३ |
| ०-०-० | खासगीकडे | ७२७५-५-९ | |
| १५०-०-० | नानुबाई बुळे | १४९४ | दर ३० |
| ३११-४-० | गेहनाबाई भांड | ३११८ | ,, ६२ |
| ५०-४-९ | सौभाग्यवती बाळाबाई | ५१०-२-६ | ,, १० |

......................

४४३५-१४-०

०-०-० कारकून मंडळी

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ० | नारो गणेश | ५४११८-९-० | सदाशिव मोरेश्वर गोळे | ६३५२-०-० |
| ० | रामराव अप्पाजी | २६५४३-९-० | महिपत लक्ष्मण | ५७०५-८-० |
| ० | यशवंतराव गंगाधर | २१४७०-०-० | | |

.....................

१२८७१७-७-०

०-०-० धर्मादाय ४४२३७-४-६

०-०-० बहुमान व बक्षीस असामी २७

**संस्थान पळसी येथील रेकॉर्ड**

(लेखांक ३) राजे जालमसिंग झाले संस्थान कोटे यांस : महाराज यशवंतराव होळकरांकडून. (ता. १०-४-१८०० गुळेगुळे दप्तर) सारांश, दुदरनेक फरांसीस यांस सरकारांतून हत्ती खरीदी करून, ऐवज सरकार हिशेबी लिहिणें म्हणोन.

(लेखांक ४) राजे जालमसिंग झाले यांस महाराज यशवंतराव होळकरांकडून. ता. १०-४-१८०० **(गुळगुळे दप्तर)** सारांश कीं फुलण फरांसींसाकडील पन्नास हजारांची वरात जाहली आहे. तो ऐवज घरोब्याचे चालीस व्यंग न पडतां, ऐवजाचा निर्गम दुदरनेक याजकडेस करून पावती घेणें. म्हणोन वगैरे.

(लेखांक ५) राजेश्री दौलतराव शिंदे यांस. यशवंतराव होळकर यांजकडून. (ता. ७ माहे मे इ. स. १८००) सारांश कीं. महेश्वरीहून माळवे प्रांतीं कूच करून गेला. इकडील-महालीं दंगा करणार. त्यांस आजपर्यंत तुमचीं पत्रें येत गेली त्याजवर इकडीलही लक्ष असतां असें प्रकार घडल्याने नीट नाहीं. महाली उपसर्ग न लागे तें करावें, म्हणोन लिहिले. त्यांस आमचें लक्ष पहिलेपासून आपल्याखेरीज नाहीं. आपली पत्रें येत गेलीं त्याप्रमाणें तीन मास महेश्वरी राहिलों. बंदोबस्ताचा अर्थ कांहीं न घडला. फौजेचा खर्च भारी, निर्वाह चालला पाहिजे याचकरितां माळवे प्रांतीं आलो. आपल्या प्रांतांत मागें उपसर्ग दिला नाही व पुढेंही द्यावयाचा नाही. दौलत खराबींत बहुत आली. जसे आपलें अभय आहे, त्याप्रमाणें बंदोबस्त सत्वर घडे तें करावें. इकडून आपले लक्षावेगळें कांहीं घडावयाचें नाहीं. म्हणोन वगैरे. **(गुळगुळे दप्तर)**

(लेखांक ६) मयारामभाई व धनगर मंडळी आणि सिलेदार यांस महाराज यशवंतराव होळकर यांजकडून **(ता. १२-२-१८०१ सरकारी रेकॉर्ड)** शिंदे यांचा भाऊपण पूर्वापार. त्यांसी ऐक्यता असावी या भावी जपत असतां त्यांनीं त्याची वृद्धी करावी ते न करितां या दौलतीचा अभिलाश धरून सर्वस्वी खराबीं करून बायकामुलें आपले वासांत ठेऊन आम्हावर फौजपलटणें रवाना करितात तेव्हां जशी त्यांची चाल दृष्टीस पडत गेली त्यांसारखी वर्तणूक करणें प्राप्त होऊन, घडला प्रकार तो परभारें ऐकल्यांत आलाच असेल. तुम्ही या दौलतीतील सर्व सन्निध असोन आमची बायकामुलें त्यांनीं वरांत ठेवावीं, येविसी जाती-अभिमान तरी कांहीं असावा किंवा कालमाहात्म्याप्रमाणेंच सर्वांच्या बुद्धी व्हावयाच्या. विचार पुरतेपणीं मनन केल्यास न समजावें असें नाहीं. इतःपर तरी उचितास चुको नये. तुमचे खर्चाची ओढाताण असेल तरी जेथें मुक्काम असेल तेथें येऊन भेटणें. म्हणजे हजेरी घेऊन लवाजमा पाहून बंदोबस्त खर्चाचा केला जाईल. म्हणोन वगैरे.

(लेखांक ७) श्रीमंत पंतप्रधान यांसी, यशवंतराव होळकर यांजकडून : ता. १७-६-१८०१ इकडून विनंती पत्रें वेळोवेळीं पाठवितो परंतु उत्तराची आज्ञा होत नाहीं यामुळें चित्त सापेक्षित राहतें. तीर्थस्वरूप विठ्ठलराव होळकर यांनी आज्ञा न घेतां, श्रीपंढरपुराकडे जाऊन क्षेत्रास उपसर्ग दिल्यामुळें इतराजी होऊन प्रकार घडला तो समजला.

श्रीचे इच्छेनें घडलें त्यांस उपाय काय? स्वामीहातें जे घडले तें सेवक लोकांस श्रेयस्करच आहे. आमचे लक्ष कैलासवासी वडिलांनीं सेवा केली त्याचप्रमाणें सेवा करून दाखवावी. आमचे हातून अधिकउणें दिसोन आल्यास मार्गांस लावून सेवा घ्यावी हेंच विहित. म्हणोन वगैरे : (हे संपूर्ण पत्र होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें यात पहावयास मिळेल.)

(लेखांक ८) ता. १८-७-१८०१) उज्जेनच्या लढाईसंबंधात भारमल होळकरांस : महाराज यशवंतराव यांचें पत्र कीं प्रातःकाळापासोन दोन्ही कंपूच्या तोफा चालू करून प्रहरदिवसपर्यंत गोळे मारून पलटणें कापून, तोफा दरोबस्त घेऊन पांचसात गोरे फिरंगी मारले गेले. पांच धरून आणले. नाटेससाहेब व वाकडे गांवांत पळून गेले. देवजी गौळी याचा पुत्र वगैरेनीं लढाई चांगली केली. ईश्वरसत्तेनें लक्ष्मीकांत सहाय होऊन यश आपल्यास दिले. इकडील कोणी जाया झाले नाहीं. लोकांनी शर्थ केली तुम्हास कळावे. सेंधव्याची पत्रें पुढें जल्द रवाना करणें. म्हणोन :

(लेखांक ९) ता. २३-७-१८०१ भारमल होळकरांस महाराजांकडून : कीं, ती. बाळासाहेब मुहूर्तेकरून स्वारी जात असतां मार्गी पेंढारियाचे स्वारांनीं कटकट केली. घोड्यावरून खालीं आले. परंतु जवळ माणसें होती त्यांनीं हत्तीवर बसवून घेऊन आले. कोठें कोणाची इमानक्रिया कायम राहिली नाहीं. तशांत सोबती छलदृष्टी, कोणाकडून काय फंद करवितील याचें शाश्वत नाहीं. तुम्ही रात्रंदिवस सावधानीं राखीत जावी. आमची चित्तवृत्ती वडिलांकडे लागून आहे. भेट होईल तेव्हां समाधान घडेल. म्हणोन.

(लेखांक १०) ता. ३०-७-१८०१ भारमल होळकरांस कीं वडिलांनीं येतो म्हणून आज्ञा केली. त्यावरून बहुत संतोष झाला. वद्य द्वादशी (श्रावण) शुक्रवारीं पुष्य नक्षत्रावर मुहूर्त चांगला आहे. अवकाश थोडा आहे. तीन दिवसांत त्यांनीं यावे असें घडले पाहिजे. म्हणोन.

(लेखांक ११) ता. १०-२-१८०२ लालजी बल्लाळ गुळगुळे यांस महाराज यशवंतराव यांजकडून : विशेष तुम्हाकडील बोलण्याचे भाव रा. बालचंदशेट यांनीं लिहून कळविले. ऐसियासी. तुम्ही जुने माणूस पाहिले फार ऐकलें फार त्यांस दोन्ही सरदारींत कलह लागोन बखेडे वाढल्यास अर्थ कसे आहे त्याचा विचार तुम्हासारख्यांनीं न करावा हें काय? तुम्ही दोन्ही सरकार येकच मोजून उचितास जपावे हेंच योग्य आहे. त्यांतही इकडून दुसरा अर्थ किमपी न जाणावा. राजश्री नागो जिवाजी व बालचंदशेट बोलतील त्याप्रमाणें खातरजमा राखोन ज्यात उपयोग तें करणें. जाणिजे छ ६ सवाल. मोर्तबसुद.

**(शिं. शा. इ. सा. भा. २ लेखांक १४६)**

या पत्रव्यवहारानें संस्थानची अंतर्बाह्य स्थिती नीट कळून येईल.

सरंजामी पद्धत ही गेल्या चाळीस पन्नास वर्षांत या राज्यांत दृढमूल होऊन तिची मुळेपाळें खोल व दूरवर पसरली होती. या पद्धतींत लष्करी, धार्मिक, आर्थिक व

विद्याविषयक अंगे संमिश्रित झालेली होतीं. राज्यशासन यंत्राचे हें एक धिप्पाड, विस्तृत आणि व्यापक असें अंग होतें. राज्य उत्पन्नाचा सुमारें एकशष्टांश पैसा या अंगाकडे खर्ची आणि तो कायमचा पडलेला होता. याच अंगाची दशा पहिल्या लेखावरून ''जिकडील तिकडे वाताहात होऊन होळकरांकडील गांव खेडीं दंग्याने उजाड पडलीं व अडथळाही पडला आहे. तेथील एक पैसा आज दहा वर्षे येत नाहीं.'' सोबत्या सोबत्यांमधील चुरशीनें या सरंजामी पद्धतीवर किती दुष्परिणाम घडले हें लेखांक दोनवरून स्पष्ट कळणारें आहे. दरखाची रकम दशांशानें तोडण्याची आलेली पाळी कळून येते. एकंदर हलाखीचें दर्शन या दोन लेखांवरून होते ''युद्धस्य कथा रम्याः'' हें जरी, खरें असलें तरी तें कानापुरतेच रम्य आहे. समाजाच्या एकंदर जीवनाला ते अरम्यच वा अरण्यच होय.

अशी एकंदर हलाखीची स्थिती असतांही मुख्य मालकाची दृष्टी धीर गंभीर किती होती हे या लेखांकांतील पत्रांनीं स्पष्ट होत आहे. ले. ५ च्या लेखांत अलिजा बहादरास गेलेले पत्र विनयाचें असूनही स्पष्ट उक्तीचें आहे. ''आम्ही सर्व प्रकारें आपले भरवसियावर असो. दौलत खराबीत बहुत आली. जसें आपले अभय आहे त्याप्रमाणें बंदोबस्त सत्वर घडेल तें करावें'' असें लिहिले आहे. काशीरावांसंबंधीचे वेळोवेळीं काढलेले उद्गारांवरून महाराजांची उदार वृत्ती कळून येते. महाराज भेटीची आतुरता दर्शवितात आणि लिहितात ''सोबती छलदृष्टी कोणाकडून काय फंद करवितील याचे शाश्वत नाहीं'' इतकीं सगळी काळजी वाहून सर्व तऱ्हेचा मानमरातब ठेवल्यावरही सुभेदार काशीराव निसटून जातात. तरी कोणावरही त्रागा न करितां शांतपणेंच महाराज लिहितात. स्थितप्रज्ञाचीच ही स्थिती म्हणावयाची. ले. ७ मध्यें आपले मालक श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे यांस ते लिहितात. ''इकडून विनंतीपत्रें वरचेवर पाठवितो परंतु उत्तराची आज्ञा होत नाहीं.'' आपले बंधू विठूजीचा अमानुष वध झाला असतांही त्याबद्दल कोणचाही वक्र शब्द न काढतां महाराज मालकास विनवतात ''आमचे लक्ष कैलासवासी वडिलांनीं सेवा केली त्याप्रमाणेंच असून सेवा करून दाखवावी हेंच आहे. वडिलांनीं एकनिष्ठपणें चाकरी केली आणि पूर्वीपासून लोभ संपादन केला त्याप्रमाणेंच आम्ही ही चाकरीची उमेद धरून आहोंत. सर्वांनीं एकदिल राहून स्वामीसेवेव्यतिरिक्त दुसरा अर्थ किमपी नाही'' अशा भावीं स्वामींचें मन आळविण्या संबंधात आपली शर्थ त्यांनी केली आहे. सारांश, श्रीमंतास खुशींत ठेवून आपले कार्यसिद्धीकडे जितकें त्यांस वळविता येईल तितके प्रयत्न महाराजांनीं केलें यात संशय नाही. मालक, बंधु, यांच्या त्यांच्यापरी मानमरातब व मर्यादा राखून आपल्या कार्यावर अढळनिष्ठा त्यांनीं ठेवलेली दिसून येते. मात्र मालक व बंधु यांची गुणग्राहक बुद्धी बेताचीच असल्यामुळें या धोरणाचा कांहीं उपयोग झाला नाही. ले. ६ वरून महाराजांची संग्राहकवृत्ती दिसून येते धनगर मंडळीला एकीकडे थोडेसे टोचलें आहे आणि दुसरीकडे लगेच उचलूनही धरलें आहे. ''उचितास चुको नये'' हे सारपूर्ण वाक्य महाराजांचे स्वभावाचे द्योतक आहे.

हाताखालील माणसांसीं त्यांची वागणूक कशी होती हेंहीं दिसून येईल. ले. ११ मध्यें गुळगुळ्यांस महाराज लिहितात, ''तुम्ही दोन्ही सरकार एकच मोजून उचितास जपावें हेंच या दिवसांत योग्य आहे.'' कोटा संस्थानशीं असलेला संबंध लेखांक ३, ४ त स्पष्ट केला आहे. सारांश, ही आताच उल्लेखिलेलीं पत्रें राजकीय संबंध दर्शवितात.

या आणीबाणीच्या प्रसंगीं घाबरून अगर बिथरून न जातां वरिष्ठांशीं, कनिष्ठांशीं आणि बरोबरीच्याशींही पूर्वापार चालत आलेले आपले संबंध सांभाळून वागणें हे असामान्यपणाचेच लक्षण होय. आपले ध्येयाकडे ध्रुवदृष्टी ठेवून अष्टपैलूपणा पदोपदीं, तोल न जाऊं देतां सांभाळणें, हे थोर विभूतीचें लक्षण होय.



**प्रकरण ५ वें**

# पुण्याची लढाई, मे ते आक्टोबर इ. स. १८०२

मागील प्रकरणांत यशवंतराव महाराजांचे दोन व्यूह मांडिले. एक उत्तरेंतील आणि दुसरा दक्षिणेंतील. उत्तरेंतील कामगिरी आपले शिरावर घेऊन यशवंतराव महाराजांनीं ती यशस्वी केली. दक्षिणेंतील कामगिरी पाराशर दादाजी व बावनपागे यांजवर सोंपविली. पाराशर दादाजींनी, मुलूखगिरी संबंधात सांगितलें त्याहून, अधिक करून दाखविलें. पण पुणें दरबारांत त्यांचीं डाळ शिजेनाः यामुळें १८०२ च्या मे चे सुमारास दक्षिणेतील कामगिरी महाराजांस स्वतःच अंगिकारावी लागली. तेव्हां मागील बंदोबस्त पूर्णपणें करून त्यांस पुढील पाऊल टाकणें योग्य होतें आणि त्याप्रमाणें त्यांनी केलेंही.

हा बंदोबस्त म्हणजे उज्जेनीस कोंडले गेलेले आलिजाबहादुर, त्यांचे सेनापती आणि सेना ही बाहेर न पडतील अशी व्यवस्था करणें. दुसरा बंदोबस्त म्हणजे अगदी घरचा सुभेदार काशीराव हे शरीरानें आणि मनानें अगदी दुबळे. या त्यांच्या दुबळेपणाचा फायदा सोबत्यांनीं निरंकुशतेनें घेऊन होळकरशाही गिळंकृत करण्याचा अगदी घाट बेतांत आणला होता. मगरीच्या घशातून हे राज्यरूपी रत्न काढण्याचा आटोकाट प्रयत्न महाराज यशवंतराव ह्यांचा चालू होता. काशीराव हे वडील बंधू हें मनांत बाळगून त्यांचा मानमरातब महाराजांनीं ठेवला होता. तरी पण त्यांच्या व्यंगाबद्दल महाराज पूर्ण सावध होते. दुबळेपणानें ते शिंद्यांकडे गेले होते. दुबळेपणानेंच ते परत बंधूकडे परतले आणि याच दुबळेपणामुळें आपल्या पाठीमागें हे परत शिंद्यांकडे जाणार नाहींत कशावरून? हा विचार मनांत करून महाराजांनीं त्यांस स्वारींत बरोबर घेण्याचा विचार केला पण काशीराव निसटले. अशा स्थितींतही महाराज

न डगमगतां भारमल होळकर यांस लिहितात ''आमचा श्रीलक्ष्मीकांत आहे. त्यांजकडील संधान सोबत्यांकडे आहे. कागदपत्र जाणेयेण्यास मार्ग मिळून तोच. त्याचा जाबता राहून बंदोबस्त झाला पाहिजे. यास्तव हें पत्र लेखन केलें असे. तरी हा विचार बाह्यात्कारें कोणास न समजतां नावघाटावर वगैरे जामच्या घाटासुद्धां कागदपत्रांची व माणसांची चौकशी ठेवून पत्रें व माणसें धरून अटकेंत ठेवीत जाणें.'' या पत्राप्रमाणें शक्य तितका काशीरावांकडील बंदोबस्त करून सोबत्याच्या बंदोबस्ताचाही उपाय त्यांनी केला. बातमीदार लिहितोः ''शिंदे ह्यांचे पल्ल्यावर उज्जेनीस दहा बारा हजार स्वार, फौज पठाण ठेवून आणि नंतर एकत्र होऊन होळकरांनीं फौजेच्या तीन टोळ्या केल्या व कूच केलें. महेश्वराहून कूच करून नावडातावडीवरून सेंधवे नजीकच्या मुक्कामीं आले.'' आणि येथून महाराजांची दक्षिणेंतील मोहीम सुरू झाली. निघतांना महाराजांनीं पुकारा केला कीं ''शिंद्यांच्या जुलमाविरूद्ध दाद मागण्याकरितांच आपण पुण्यास श्रीमंतांच्या पायापाशीं जात आहोत'' **(ऐ. ले. सं. भा. १४ पान ७३९८)**

आपलें म्हणणें त्यांनीं जगास जाहीर केलें हे म्हणणें केवळ स्थूल रूपांतच : पण पाराशर दादाजीबरोबर जीं यादी त्यांनी पूर्वीच पाठवून दिली होती ती सूक्ष्मरूपांची असोन व्यवस्थित मांडलेली होती. तिची कलमबंदी येणेंप्रमाणें:

(१) वेडसर काशीरावाला वस्त्रें मिळून त्याच्या नांवावर होळकरांची सर्व दौलत शिंद्यांनीं गिळंकृत केलेंली आहे. दुसऱ्याच्या चिथावणीवरून सरकारच्या हातून होळकर घराण्याचें नुकसान झालें तें होऊन गेलें. माझ्या घराण्याच्या उज्ज्वल परंपरेस साजेल अशा रीतीनें आपली सेवा करावी अशी माझी इच्छा आहे.

(२) श्रीमंतांनीं दूरवर विचार करून माझा व शिंद्यांचा समेट करून द्यावा. आम्हां दोघांच्या भांडणामुळें बिचारी रयत मारली जात आहे.

(३) मल्हाररावांचा अल्पवयी मुलगा खंडेराव आणि त्याची आई जिऊबाई वा जिजाबाई दोघेंही आशीरगडावर कैदेत आहेत. त्यांस ताबडतोब मुक्त करावें.

(४) काशीरावांची नालायकी स्पष्ट झाली आहे. घराण्यांत मल्हाररावांचा अल्पवयी मुलगा खंडेराव हा एकच कायदेशीर वारस शिल्लक राहिला आहे. त्याच्या नावानें सरकारातून सरदारीची वस्त्रें मिळावीं आणि मला त्याच्या मुतालकीची वस्त्रें मिळावीं.

(५) शिंद्यांनीं व इतरांनीं काशीरावांपासून वाटेल तशी करारपत्रें व कर्जखते लिहून घेतली आहेत, तीं होळकरांच्या दौलतीला बंधनकारक असूं नयेत.

(६) आम्हां दोघांपैकीं एकाचा मुलूख दुसऱ्याच्या ताब्यांत गेला आहे तो ज्याचा त्यांस परत मिळावा.

(७) नर्मदेपलीकडील मराठी राज्याच्या पेशवे, शिंदे आणि होळकर अशा तीन वाटण्या मराठी राज्यांत पूर्वापार चालत होत्या. मध्यंतरी खल पडला. आतां पूर्वीप्रमाणें मुलखाच्या तीन वाटण्या पुनः कराव्या.

(८) शिंदे व होळकर हे बरोबरीचे तीन पिढ्यांचे सेवक : असें असतां शिंद्यांना

एक किल्ला व दहा लाखांची जहागीर सरकारांतून नूतन मिळाली. त्याप्रमाणें आम्हासही मिळावी. तसे करणे श्रीमंतांस शक्य नसेल तर शिंद्यांस मिळालेली नवीन देणगी सरकारांत परत यावी.

(९) उत्तर हिंदुस्तानांतील राजेरजवाडे यांजपासून खंडणी वसूल करण्याचा हक्क शिंदे व होळकर या दोघांनाही पूर्वापार चालत आहे. हल्लीं शिंदे सर्वच अधिकार घेऊन बसले आहेत. हा अतिक्रम दुरूस्त व्हावा.

(१०) आम्हा उभयतांचा समेट करून द्यावा. दुर्दैवानें प्रयत्न फोल झाल्यास श्रीमंतांनीं तटस्थ राहवे. एका विरूद्ध दुसऱ्यास मदत करूं नये.

(११) मी दक्षिणेंत येत आहे तो केवळ आपणाकडे दाद मागांवी, आपला गैरसमज दूर करावा याच हेतूनें येत आहे. आपल्याला उपमर्दकारक वाटणारे कोणतेही कृत्य मजकडून होणार नाहीं, ही खात्री बाळगांवी.

ह्याप्रमाणें ११ कलमांची यादी श्रीमंतांपुढें पाराशर दादाजींनीं सादर केली होती. तिचा निकाल लागण्याचा संभव दिसेना. शेवटलाच मार्ग महाराजांस राहिला आणि तो ते आक्रमूं लागले.

सेंधव्याच्या घाटावरून खानदेशांत महाराज उतरले. बातमीदार लिहितो, ''लष्करांत धारण रूपयाचे दोन शेर पीठ आणि खर्चाची तर नेहमीच अडचण राहत गेली. सेंधव्याचा घाट उतरून थाळनेर महाल होळकरांचा बसमय किल्ला भिकाजी होळकरांस जहागीर : तीन दिवसांत किल्ला खाली करून घेतला.'' तेथून कूच करून तापी दक्षिण तीरास बेटावद येथें आले.

महाराजांचा कूच चालू असता शिंदे अगदीच स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं बऱ्हाणपुर मुक्कामी गोपाळराव चिटणीस यांस ठेवून दिले होते. पण हुकुम असा होता कीं, ''बऱ्हाणपुरी मुक्काम करून असावे. होळकरांचे पिच्छावर जाऊं नये व लढाईचा मोहरा देऊं नये.''

थाळनेरास मुक्काम असता महाराजांनीं शिंदे बहादराच्या फौजेच्या तोंडावर जी एक टोळी निराळी काहडली तिच्यावर बावनपागे, मीरखां पठाण व फत्तेसिंग माने यांस नेमून त्यांस थाळनेरास ठेवून दिलें. पण त्यांसही ताकीद केली कीं ''शिंदे बहादर यांचे फौजेवर चालून जाऊन लढाई देऊं नये. शह राखून मजबुतीनें असावें.''

महाराजांनीं दुसरी टोळी गणपतराव नारायण दिवाण, शाहमतखान व आबाजी लक्ष्मण यांजबरोबर देऊन मालेगांवकडे पाठविली आणि तिसरी टोळी स्वतःबरोबर घेऊन बेटावद येथून निघून खानदेशांत उतरले. पहिल्या टोळीचें काम नुसतें देखाव्याचें होतें. शक्य तो रस्ता अडवून धरावा. या पलीकडे त्यांस कार्य नेमून दिले नव्हतें. ती स्थिती दुसऱ्या टोळीची नव्हती. या टोळीने गांडापूर, बैजापूर इकडून खंडणी तर घेतलीच. त्यांच्या भीतीमुळें टोंके, नाशिक वगैरे प्रांत उद्ध्वस्थ जाहले. तत्रस्थ विंचूरकर, मालेगांवकर राजेबहादूर व ओढेकर वगैरे सरदार आपापली ठिकाणें सोडून कुटुंबांसुद्धां निघून त्र्यंबक किल्ल्याचे आश्रयास गेले. नाशिकांस खंडणीचा रोखा येऊन धडकतांच दोन हजार ब्राह्मण श्रीगंगेवर येऊन बसले.

शहामतखान पठाणानें आपल्या जमावासह तळ दिला. त्याच्या सैन्यास नाशिक प्रांत हे अगदी मोकळे मैदान सापडले. सरदार वगैरे लोक आधीच बाहेर पडले होते. पठाणानें ''कांहीं एक दयामाया न दाखवितां मारझोड करून तत्रस्थ लोकांकडून हजारो रुपये उकळले.''

महाराज स्वतः चाळीसगांवास तळ देऊन आजूबाजूच्या प्रांतांतून वसूल करीत होते. खानदेशांत मुक्काम कित्येक महिने होता. त्यांच्या बुभुक्षित फौजेनें झाडांना पानें देखील ठेविलीं नाहींत असें बातमीदार कळवितो. पारोळे गांवापासून महाराजांनीं दोन लाख खंडणी घेतली. एरंडोल गांव जमीनदोस्त झाला.

तिसऱ्या टोळीतले सरदार फत्तेसिंग आणि आबाजी लक्ष्मण यांनीं नगर प्रांताकडे रोख धरला. हेतू हा कीं ''त्या प्रांतीं नगरचा किल्ला मजबूत आणि नवीन दहा लाखांचा मुलूख पेशवे सरकारांनीं दौलतराव शिंदे यांस नुकताच इनाम दिला होता आणि होळकरांचा मुलूख सरकारांत जप्त केला हे वैषम्य शल्यासारखें वाढत होते.'' इ. स. १८०२ मध्यें होळकरांच्या सरदारांनीं नगर प्रांत गाठला, शिंद्यांचा, त्यांच्या अनुयायांचा जेथें जेथें संबंध आला ती ठाणीं ते गांव व ते वाडे जमीनदोस्त करण्यांत आले. वामोरी, वारी शिंगवे, राजुरी हे गांव होळकर फौजेच्या तडाक्यांत सापडले. बाळोजी कुंजीर आणि त्याचे पक्षीय यांची घरेंदारें नाशकाकडेही होतीं त्यांचीही तीच गत झाली. नगर प्रांतांतील जामगांव हें शिंद्यांचें आवडतें राहण्याचें ठिकाण. तेथें खणत्या लागल्या. याप्रमाणें सुडाची कल्पना जिकडे तिकडे वावरूं लागली. ही उद्ध्वस्ताची बातमी श्रीमंतांस कळतांच त्यांनी सरदार आंगऱ्यांची या होळकर सरदारांवर योजना केलीः पण त्यांस श्रीमंतांकडून नुसता हुकुम मात्र सुटला. माणसांची वा द्रव्याची कांहीं एक तरतूद झाली नाही. तेव्हां आंगऱ्यांसंबंधीचा हा हुकुम कागदोपत्रींच राहिला.

महाराजांनीं केवळ काम सरदारांवर सोंपविलें होते असें नाहीं. एका टोळीचे आधिपत्य स्वतःकडे घेऊन पारोळ, मालेगांव, धोडप, या गांवावर खंड व खंडणी बसवून ती जमा केली. धोडप किल्ल्याखालील दोन तीन ठाणीं काबीज केलीं. याप्रमाणें त्यांच्या तिन्ही टोळ्या स्वदेशांत धामधूम करून आणि खंडणी जमा करून श्रीमंतांचे सिंहासन हादरून टाकीत होत्या. स्वतः पेशवे आता जागृत होऊन नव्याजुन्या सरदारांस, हुजरातीस व पाग्यांस सक्तीचे हुकूम सोडू लागले. पण हे सर्व हुकूम सुकासुकीच होते. होळकर आपल्या सैन्यास पावलोपावलीं ताजेतवाने ठेवीत होते. संपादन केलेले प्रथम शिपायांस वाटून देत. राहिला भाग आपल्याकडे. या लालुचीनें त्यांच्याकडे भरणा वाढीचा आणि ताजातवाना असा राही. अशा तऱ्हेची स्थिती दोन्ही पक्षांची होती. श्रीमंत स्थिर तर महाराज चळवळें : श्रीमंतांचे हुकूम कागदोपत्रांत तर महाराजांचे हुकूम पैशांत. अशी चढती कळा पाहून महाराजांचे वकील पाराशर दादाजी यांनी श्रीमंतांस अर्ज केला जे, ''सेवेसी येऊन चार महिने जहाले. अद्यापपावेतों कांहीं एक समेटाचा वगैरे बंदोबस्त होत नाहीं. त्यांस मला आज्ञा द्यावी. मी यशवंतरावांकडे माघारी जातो. पुढें स्वामींची मर्जी असेल तसें करावें. आम्हाकडे हरयेक किसींचा गुन्हा सरकारचा नाही. सर्वा गोष्टीची विनंती केलीच आहे.'' यावर श्रीमंत उत्तरले

कीं ''एका दो दिवसांनीं तुम्हासही निश्चयाचा जाब सांगतो.'' पण हे सगळें कालहरण होते.

पाराशर दादाजींच्या म्हणण्यास त्यावेळीं तेथें हजर असलेल्या भोसले यांच्या वकिलांनीं दुजोरा दिला. पण हें सगळें आळवावरचें पाणी होतें. इकडे याप्रमाणें वरवर गोष्टी सांगून होळकरांचें पारिपत्य करण्यासाठी शिंद्यांस व आपल्या सरदारांस श्रीमंत पेशवे आंतून पत्रें धाडीत होते. निश्चितपणा कोठेंच नव्हता आणि संशय वृत्ती सर्वांचे संबंधीं असल्यामुळें कोणीही तनमनधनानें काम करण्यास धजेना. याच सुमारास श्रीमंतांच्या आज्ञेनें पुणें शहरांत ता. ३० जून रोजीं सायंकाळच्या प्रहर दिवसापासून मध्यरात्रपर्यंत एकाएकीं धरपकड सुरू झाली. या धरपकडीत मोरोबादादा फडणवीस व त्यांचे पुत्र, फडके बंधू व त्यांचे पुत्र, यशवंतराव नगरकर, राघोपंत फरासखान, नीलकंठराव खासगीवाले, नारायणराव वैद्य वकील निसबत भोसले, सरदार रास्ते वगैरे सुमारें तीस मंडळी पकडली गेली. कारण इतकेच कीं या सर्व मंडळीचा महाराज यशवंतराव होळकरांबरोबर धागादोरा असावा अशा संशयानें हो धरपकड चालली होती. सारांश, श्रीमंतांच्या मनाचा थांग कोणासच लागण्यासारखा नव्हता. ह्या सर्व बातम्या महाराजांस त्यांच्या स्वारीच्या मुक्कामांत कळत होत्या. श्रीमंतांसंबंधीं आशा यापुढें धरण्यांत शहाणपणा नाहीं असें निश्चित जाणून त्यांनीं आपले पाऊल पुण्याचे रोखें चालविले. फत्तेसिंग मान्यांस आपल्याकडे त्यांनीं बोलाविले. रस्त्यांत नगर शहराजवळ शिंद्यांचे फौजेचा त्यांनीं खरपूस समाचार घेतला. पुढें सरकत असतां शाहमतखान पठाण पांच सात हजाराच्या जमावानें मान्यांस येऊन मिळाला. हा वाढता जमाव दोन्ही दिशांनीं पुण्यास येत आहे असें दिसतांच श्रीमंतांनीं शिष्टमंडळ महाराजांकडे पाठविले. शिष्टमंडळाचे बोलण्यांत आलें कीं : ''तुम्ही सरकार पदरचे सरदार व तुमचे वाडवडीलीं दौलतीस कसे जपले हें माहित असतां तुम्ही लाखो फौजा घेऊन स्वदेश, खानदेशांत श्रीमंतांचे महालापासून लाखो रुपये घेऊन ते लुटितां, जाळतां यांतील अर्थ काय ? तुमचे मनोधर्म समजले पाहिजे.'' यावर महाराज उत्तरले. ''श्रीमंत आमचे धनी, इष्ट आराध्य, आम्ही सेवक लोक. चाकरी झाली न झाली हे कैलासवासी वडिलांस ठावूक व श्रीमंताचे ध्यानांत, परंतु आमच्या ऐकण्यांत कैलासवासी खंडेराव होळकर व मालेराव होळकर व सवाई मल्हारराव व आम्हापावेतों कसकशा अनावळ्या श्रीमंतांच्या राज्यांत केल्या कीं राज्यांत लाखो रुपये नुकसान व स्वाधीन होण्यास फौज खर्चीला खोच लागले. परंतु हस्तगत केल्यावर अवघ्या गोष्टींचा बंदोबस्त करून हजारो रुपये सरबराखर्ची देऊन जेथील तेथें पावतेच करीत आले. विठूजी होळकर यांजकडून स्वामींची अवज्ञा अथवा अनावली तादृष्य केली नव्हती. तथापी बाळकाचे चोरीस बुक्क्याचा मार. आपण धनी, पदरचे माणसास अमार्गाचे मार्गास लावावे, यास्तव शिक्षा अन्यायासारखी असावी, क्रोधवश्य 'आपले मनांत असें आलें ही असतां' आमचे भाऊ बरोबरीचे शिंदे, विंचूरकर, राजेबहादर, असतां वगैरे बरोबरीचे इतक्यांवरही प्रसंग पडले तेथें मल्हारजी होळकर, तुकोजी होळकर यांनी अन्यायाचे माफ करून घेतले. वाजतां वारा लागूं दिल्हा नाही. श्रीमंतही मान्य करीत

आले. आमचे प्रसंगीं आमचे भाऊ दालीबंद लहान मोठे एकानेही रदबदली न करितां, रंगांत रंग मिळविला व स्वामीनेंही आदिपश्चात विचार न पाहतां बाळकाचे चोरीवर प्राण घेतला. आम्ही लहान मोठे आपले पायापाशीं उभे रहाणार : आमचे समाधान, शांतवन, खावंदांनी व बरोबरीचे भाऊ यांनी काय केलें ?'' या बोलण्यावर शिष्टमंडळ निरुत्तर झालें आणि उठून गेलें.

महाराज आपल्या फौजेच्या बिनीपुढें चालू लागले आणि मालेगांवजवळ त्यांनीं तळ दिला. खानदेशातून नाशकाकडे व त्यापुढेंही होळकरांच्या ज्या टोळ्या गेल्या त्यांचे संबंधात बातमीदार लिहितो. ''खानदेशांतील वर्तमान तरी राजश्री यशवंतराव होळकर फौजसुद्धां कासारवाडी नजिक मालेगांवांवर मुक्काम करून आहेत. जिवाजी यशवंत व मीरखान पठाण मिळोन पंधरा हजार फौज शिंदे बहाद्दर यांच्या फौजेच्या तोंडावर ठेऊन कुल प्रांताच्या खंडण्या घेऊन लुटून बेचिराख केला. आघाडीस रा. गणपतराव नारायण, शहामतखान पठाण व फत्तेसिंग माने हे त्रिवर्ग मिळोन गंगा उत्तरतीरीं कुल प्रांताच्या खंडण्या घेऊन मुलूख बेचिराख केला. गणपतराव नारायण पांच सात हजार फौजसुद्धां पूर्वेस धोडपच्या किल्ल्यास शह देऊन अंबाडचा रोख धरून आहेत. शहामतखान पांच सात हजार फौजेसुद्धां नाशिक त्रिंबक वगैरे पश्चिमेकडील प्रांतांत खंडण्या घेत आहेत व प्रांतही बेचिराख करितात. नाशकास पठाणाकडील लोकांनीं वेढा घालून क्षेत्रांतील ब्राह्मण धरून दहा लक्ष रुपये खंडणी मागत आहेत. फत्तेसिंग माने यांनीं उत्तर तीरच्या खंडण्या घेऊन गांव लुटून व रामजी पाटील व रायाजी पाटील व बाणाजी शेटे व निंबाजी भास्कर वगैरे शिंद्यांकडील लहान मोठे गृहस्थ यांची घरे जाळोन खणून टाकतात. जामगांव, नगर, पेडगांव चांभारगोंदे वगैरे शिंद्यांकडील उजाड होत आहेत. खासा होळकर याच बाजूने आहेत. गंगा, भीमा भरल्यानंतर छावणीस ठिकाणा व घास लकडी वगैरे रसद पोहचवून लष्करांत आबादानी राहे याच्या विचारांत आहेत.'' या बातमीपत्रावरून होळकरांच्या सैन्याची संख्या, त्यांनी चारी बाजूनी मांडलेला धुमाकूळ आणि मनांत धरलेला संकल्प ही स्पष्ट दिसून येतात. विरुद्धपक्षाची याच बाबतीतील परिस्थिती अवलोकूंया.

होळकर बेकैदी म्हणून सरकारांतून बाळोजी कुंजीर व बाबूराव आंग्रे यांस शिंद्यांकडे उज्जेनीस पाठवून परस्परें शिंदे होळकरांचा समेट करावा म्हणोन श्रीमंत पेशव्यांनीं घाट घातला. होळकरांच्या कुल सरंजामाच्या सोडचिठ्या पाराजीपंत यांजपाशीं देऊन होळकराकडे पाठविण्याचा संकल्प सोडला आणि दुसऱ्या घटकेस ''होळकरांचे पारिपत्य करावे असें ठरलें.'' याप्रमाणें बैठ्या बैठकीवर संकल्पविकल्पांचे उदक सुटत होतें. आतां लष्कराची तजवीज कशी होती तें पांहू या. शिंद्यांकडील फौज चांगदेवीस (खानदेशांत) आहे ती व हुजुर फौजेची तजवीज ठरली जे, मिळून पन्नास साठ हजार दोन्हीकडची मिळून जमा करावी. त्यावरून कुल लहान मोठे नवे सरदार यांस फौज ठेवावी म्हणोन आज्ञा झाली. आज्ञा झाली पण अंमलात किती आली हे पाहिले पाहिजे. जुन्या सरदारांचीं मनें दुखविली आणि त्यांचे मानपान काढून घेतले यामुळें ती मंडळी फार तर शरीरानें हजर

राहिली. त्याशिवाय धोंडोपंत गोडबोले, बाबूराव कात्रे, चाफेकर, कुंजीर, चौधरी ही नवीन मंडळी येऊन उभी राहिली. सरकारी पागे, पथके आणि हुहुरातीतील मानकरी यांस आज्ञेप्रमाणें वागणें भागच होते. ही सर्व मंडळी यजमानाच्या रक्षणार्थ पुण्याच्या आसपास उभी राहिली. प्रतिनिधींचे पथक, सांगलीकरांचे सैन्य, बारामतीकरांचे लष्कर अशी सुमारें आठ-दहा हजार फौज फत्तेसिंग मान्यांच्या पारिपत्याकरितां गारदौंडच्या रोखे जाण्यास तयार झाली. पण लौकरच प्रतिनिधी व सांगलीकर कांहीं निमित्य सांगून आपआपल्या प्रांताकडे निघून गेले. नवीन सरदार उभे केलें त्यांचे नमुने पाहण्यालायक आहेत. नगरचा कादरखान कसाई याला दहा हजार स्वारांचे सरदारी देऊन वीस लाखाचा सरंजाम दिला आणि दहा हजार फौज तयार करण्यास सांगितलें. गोविंदराव परांजपे यांस नवीन तोफा, जुरबा, वगैरे करण्यास पुण्यास कारखाना घालण्यास सांगितलें. दोघेही नवेच उमेदवार पण पुढें काय झाले याचा उल्लेख कोठेंच नाही. याप्रमाणें श्रीमंतांच्या नव्या जुन्या सरदारांची व सैन्याची हलाखी होती. हुकूम सुटत पण पैसा हातातून सुटत नसे. येऊन जाऊन सगळी मदार शिंद्यांवर, पण शिंदे उत्तरेस गेल्यापासून बऱ्याच हलाखीत आले होते. इ. स. १८०२ च्या आगस्टांत बातमीदार लिहितो. ''खुद्द दौलतराव ह्यांचा मुक्काम उज्जेनीस होता आणि त्यांचा सरसेनापती मुसापीरु हा दिल्ली प्रांतांत होता व तो शिखांत मिळून मिसळून गेला होता. अंबोजी इंगळे आणि शिंदे बाया आठ दहा हजार फौजेनिशीं झासी प्रांतीं वावरत होत्या. फकीरची गाढवे आणि यशवंतराव घोरपडे हे थोडीशीं फौज घेऊन कोटच्याकडे खंडणीच्या कामावर होते. नागोराम कांहीं हजारानिशीं डोंगरपुर बासवाडा इकडे कामावर गुंतला होता. फिरंगी जानबत्तीस रामपुरा भानपुऱ्याकडे फिरत होता. गोपाळराव चिटणीस आठ दहा हजार फौजेनिशीं बऱ्हाणपुरास होळकरास तोंड देण्यासाठी राहिले होते. फौजेची अशी पांगापांग झाली असल्यामुळें खुद्द मालकाकडे लष्कर थोडें होतें. संरक्षणार्थ ते लष्कर पुरेसें नव्हतें. मग यजमानाकडे काय पाठविणार ? ही झाली संख्येची स्थिती. बायांबरोबर युद्ध करण्यास आणि होळकराशीं चपळाईचे डावपेच खेळण्यांत दौलतरावांची बहुतेक दौलत गारद झाली होती. प्रांत होळकरांच्या स्वारीमुळें बेचिराख होऊन गेला होता. पण घरची स्थिती कशीबशी असली तरी श्रीमंतांचा निकडीचा तगादा वारण्यासाठी शिंद्यांनीं मुकुंद शेट सावकाराकडून दहा लाखाचे कर्ज काढलें. फौजेच्या देण्याची थोडीशी तडजोड केली आणि सदाशिवराव भास्कर बक्षी याजबरोबर दहा पलटणें आणि दहा हजार स्वार असा सरंजाम श्रीमंतांकडे रवाना केला.''

उज्जेनीहून लष्कर निघाले आणि गोपाळराव चिटणीस यांस बऱ्हाणपुरास येऊन भेटले. तेथें सैन्याच्या समजावणीचा प्रश्न उभा राहिला. वेळ कसा तरी मारून आगस्टच्या अखेरीस बक्षी आणि चिटणीस बहुळचे घाटास आले. तेथून पैठण, कायगांव, टोक्यावरून नगराच्या रोखें चालले. ही बातमी यशवंतराव महाराजांस कळतांच त्यांनीं आजूबाजूस पसरलेल्या आपल्या सरदारांस सूचना पाठविली. सप्टेंबराच्या आरंभीं हे होळकरांचे सर्व सैन्य मुळा नदीवर राहुरीजवळ एकत्र झाले. यशाचा रंग यशवंतरावांच्या बाजूस चांगलाच चमकत होता.

पण यशवंतराव महाराज चांदवडाहून याच वेळीं नाशकास वळले आणि एक चांगली संधी दवडली. राहुरीस जमा झालेले सैन्य पुन्हा फांकले आणि ही संधी कायमची गेली.

यशवंतराव महाराज नाशकाकडे वळले. त्या शहरीं त्यांच्या मुसलमान सरदाराने क्षेत्रस्थांस त्राही भगवान करून सोडले होतें. पेठे, राजेबहादर वगैरे सरदार मंडळी शहर सोडून दूर गेले होते. राहिलेल्या सावकार, पांढरपेशे व भिक्षुक मंडळीकडे महाराजांनीं चाळीस लक्षांची मागणी केली. त्या मंडळीने आपली हलाखीची स्थिती सांगून चार लाखांवर तोडजोड करून घेतली. श्रीमंतांनीं होळकरांशीं समेटाचे मार्ग नाना रूपांनीं जरी मांडून ठेविले होते तरी दुसऱ्या बाजूचीही तयारी चालू ठेवलीच होती. आसपासचे सरदार जमा करीत होते. त्याप्रमाणेंच शिंद्यांकडेही संधान त्यांनीं ठेविले होतेच. शिंद्यांनीं दहा लाखाचे कर्ज काढून सदाशिवराव बक्षी व गोपाळराव चिटणीस यांजबरोबर सैन्याची पहिली टोळी पाठविली. हे लष्कर ता. ८ सप्टेंबरचे सुमारास येऊन पोहोचलें. दुसरी टोळी सखाराम घाटगे यांजबरोबर पांच हजार घोडे स्वार आणि दोनचार पलटणें अशी येऊन थडकली. या दोन्ही टोळ्या, मार्गाने येत असतांना स्वस्थपणानें आल्या नाहीत. प्रांत आपला, स्वराज्याचा, ही भावना कांहींयेक न राहतां दोन्ही बाजूंनीं समसमान अशीच वृत्ती राहिली. पुढें श्रीमंतांस शिंद्यांचें पाठबळ मिळतांच समेटाची बोलणीं सुरू झाली. या संबंधांत बातमीदार लिहितो : ''१ होळकरांकडे वकिलीस सदाशिवपंत ओगले गेले होते. त्यांस तेथून पुढें शिंद्यांकडे वकिलीस गेले म्हणोन वदंता आहे. २ होळकरांची समजूत होऊन सलुखांत यावे असा रंग आहे. ३ शिंदे होळकर यांचा समेटाचा मजकूर कांहींयेक दिसत नाहीं आणि ४ होळकरांकडील समेटाचे कलमाचे याद पूर्वी वकील घेऊन आले आहेत, त्याची तोडजोड होऊन एकही कलम ठरणेंत आलें नाहीं. समेटाचा मजकूर दिसत नाहीं.'' यापुढें बातमीदार लिहितो. ''शिंदेबहाद्दर यांचे चित्तांत होळकरांचा समेट करावा हा विचार नाही. त्याच अन्वयें श्रीमंतांची मर्जी आहे. जसें श्रीमंतांचे मर्जीत व शिंदे यांचे मर्जीत आहे, हे विचार यशवंतराव होळकर यांचे ध्यानास आले आहेत, त्याप्रमाणें होळकर वागत आहेत.''

होळकर व शिंदे या उभयतांची सैन्ये निरनिराळ्या हेतूंनीं दक्षिणेंत उतरलीं. यशवंतराव महाराजांचा हेतू श्रीमंतांची भेट घेऊन आपली सर्व हकीगत त्यांस निवेदन करून पूर्ववत नातें चालू करावें असा होता. त्यांची यावेळीं गेलेली पत्रें (श्रीमंतांस) ही गोष्ट स्पष्ट दर्शवितात. शिंद्यांचें लष्कर हा हेतू पार पडूं नये अशा अप्रत्यक्ष हेतूनें खालीं उतरले होतें. दक्षिणेंत दोघांच्याही सैन्यानें कहर करून सोडला होता. अशा ह्या काळोखी रात्रींत कांहीं चांदण्या चमकत राहून आपआपल्यापरी कांहीं शितळाई पुरवीत होत्या. खालील पत्रें या दृष्टीने मननीय आहेत.

(१ ले पत्र) वे.शा.सं.राजश्री रामचंद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित यांसी स्नेहांकित यशवंतराव होळकर दंडवत. विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें. खानदेश प्रांतीं खासा स्वारी आल्यावर पुढें राजश्री फत्तेसिंगराव माने वगैरे फौजा या प्रांतीं (म्हणजे नाशिक, नगर) रवाना झाल्या. जनवार्ता सैन्याचा उपद्रव. यामुळें कायगांव, टोंक, प्रवरासंगम,

तिरस्थळी, क्षेत्रांची जागा. ब्राह्मणांस भय उत्पन्न झाले. साल-गुदस्त क्षेत्र कायगांव पेंढारियानें लुटिले. त्यामुळें भय अधिक उत्पन्न झालें. त्यावरून क्षेत्रस्थ ब्राह्मण श्रीफल घेऊन मान्यांचे भेटीस पुण्यस्तंभीं गेलें. त्यांनींही अभय दिले जे आम्हास येविशीं सुभेदारसाहेबांची आज्ञा आहे जे क्षेत्रांस उपसर्ग देऊं नये. त्यावरून सर्वांस संतोष झाला. हल्लीं राजश्री आमिरूलदोले फौजसुद्धां कसबे गांडापूर येथें आले. अंबाकडे स्वारी जाणार, त्याकडील उपसर्ग क्षेत्रास लागला नाहीं. माने यांनीं खात्री केली. त्याप्रमाणें अनुभवास सर्वांच्या आलें. पूर्वापार कैलासवासी थोरले सुभेदारांपासून या स्थळाचा अभिमान आहेच. त्याप्रमाणें सांभाळ करालच. आम्हाकडील गांडापूर परगण्यांतील तीन गांव व नेवास परागण्यांतील एक गांव ऐसे चार गांवे आहेत. आज पांच सहा वर्षे पायमल्लीनें खराब झाली. त्यांस त्यांचें व तिरस्थळीचें संरक्षण घडावें. याजकरितां नबाबास पत्र दिल्हे पाहिजे, म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐशियास तुम्हांकडील लक्ष्मण उमाजी याजबरोबर राजश्री आमिरूल दौले याजला पत्र पाठविलें आहे. हे त्यांजकडे पावतें करावें. गांवास उपद्रव देणार नाहीत, सर्वदा पत्र पाठवून संतोषवीत जावें. बहुत काय लिहिणें (मोर्तबसुद) श्रावण शुद्ध १३ शके १७२४

याप्रमाणें दीक्षित जहागिरदार (पेशवे सरकारांचें गुरू) यांस अभयपत्र देऊन यशवंतराव महाराजांनीं अमीरखान व फतेसिंग यांस व फौजेच्या इतर सरदारांस आज्ञापत्रें पाठविलीं. याप्रमाणेंच २, ३, पाराशर दादाजी व गोपाळराव गोविंद गानू पेशवे दरबारांतील होळकर सरकारचे वकील यांनींही पत्रें पाठविलीं जे ''परभारें आपल्यास न समजतां उपसर्ग न लागणेंबद्दल, त्यांची रखवाली होय ते करण्याबदल आणि क्षेत्रस्थ ब्राह्मणांचे समाधान व श्रीमंतांच्या मर्जीचा संतोष व आपले यजमानाच्या कल्याणावरतीच गोष्ट नेण्याबद्दल'' लिहिलें. याच अर्थाचे सेनापती मान्यांचे पंढरपुरास गेलेले पत्र व वर्तन स्तुत्य आहे. सारांश, जरी बाजूने कहर उसळलेला दिसत होता तरी पण श्रीसमर्थांच्या ''तीर्थक्षेत्रें आवघी मोडिली, कांहीं राहिलीं तुम्हा कारणें.'' या बहुमोल उपदेशाचा विसर पडला नव्हता, हें होळकरशाहीस अभिनंदनीय आहे.

समेटाचें खरें स्वरूप बाहेर आल्यावर यशवंतराव महाराजांनीं माने यांस पुण्याकडे वळण्याचा आणि आपण स्वतः वाफगांवाहून निघण्याचा उपक्रम केला.

या वेळेस श्रीमंतही विशेष सावध होऊन शिंद्यांकडे पत्रावर पत्रें जात होतीं. त्याप्रमाणें शिंद्यांकडून एकदमांत सैन्य न येतां टोळ्यांनीं येत होतें. यशवंतराव महाराजही सावधान राहून आपल्या व सरदारांच्या सैन्याचा व्यूह कालानुसार व कार्यानुसार बदलीत होते. एक टोळी नगरजवळ येतांच त्यांची होळकरांशीं गांठ पडली. आश्विन शुद्ध ७ रविवारपासून रोज लढाई सुरू झाली. ''नगराहून तीन हजार फौज व हजार अरब व हजार बैल रसद याप्रमाणें सरंजाम पलटणांत येऊन दाखल झाला. चकमकींत महाराज यशवंतराव यांच्या बसत्या घोड्यास गोळा लागून ठार झाला. शामतखानसुद्धां यशवंतराव महाराज यांस शिंद्यांच्या फौजेनें मागें हटवून गणपतीच्या ओझर यापासून ब्राह्मणवाड्याचा घाट पार करून देऊन, घाटमाथ्यावर शिंद्यांचे फौजेचा व पलटणाचा मुक्काम झाला.'' येथें होळकरांचा

हिरमोड झाला पण त्याचा वचपा मान्यांनीं लवकरच काढला. तो प्रकार येणेंप्रमाणें. फत्तेसिंग माने फौजेसुद्धां पंढरपुराहून निघून बारामतीचे पलीकडे पांच कोसांवर मुक्काम करून राहिले. त्यांच्याशी सामना देण्याकरितां श्रीमंतांनीं पुरंधरे यांस जरीपटका देऊन व पानशे वगैरे सरदारांस त्यांची मदत करण्याबद्दल आज्ञा देऊन बारामतीच्या रोखें रवाना केलें. मान्यांवर तोफा सुरू होतांच त्यांनीं पुरंधऱ्यास सांगून पाठविलें जे आम्हांस आमच्या खावंदांची आज्ञा आहे कीं सरकार फौजेशी लढूं नये. त्यावर पुरंधरेंनी जाब पाठविला कीं आम्हास सरकार आज्ञा आहे कीं तुमचें पारिपत्य करा. त्यावर मान्यांनी त्यांस कळविलें कीं आम्हास जेजुरीस श्रीकुलस्वामीचे दर्शनास जावयाचें आहे. तुम्ही आम्हाला राजीखुशीनें वाट द्या. पुरंधऱ्यांचा निरोप आला कीं तुम्ही बंडखोरी करून सरकारी हुकमास न जुमानतां इकडे आला आहांत. तुम्ही सापडाल तेथें पारिपत्य करण्याचा पेशवे सरकारचा हुकूम आहे. असा निरोप पाठवून पुरंधऱ्यांनी तोफा सुरू केल्या. सरकारी फौजेंतून पन्नास गोळे सुटेपर्यंत मान्यांनीं सबुरी केली, आणि नंतर तोफा सुरू केल्या. बाळोजी कुंजीराचा मुलगा पांडोबा आघाडीस होता त्याचा गोट उधळला. घटका दोन घटका तोफातोफी झाल्यावर मान्यांनीं आपली पलटणें पुढें घालून जरी पटक्यावर बेजरब चालून घेतलें. पुरंधरे, पानशे यांनीं दोन घटकांपर्यंत शत्रूशीं शौर्याने लढाई केली आणि नंतर तोफा व जरीपटका टाकून पळून तळावर गेले. मग कोणी हत्यार धरलें नाही. जरीपटक्याजवळ मालुजी घोरपडे पथकासुद्धां होते. त्यांनीं एक घटकापर्यंत लढाई देऊन जरीपटक्याचा हत्ती काढून देऊन लढाई थोपवून राखली. त्यांस मालोजी घोरपडे यास भाल्याच्या जखमा चार लागून, घोड्यास जखमा लागून खालीं आले. मान्यांनीं मालोजीस पालखींत घालून नेले आणि पुरंधरे यांचा तळ घेतला. पानशे यांचा झाडून तोफखाना वीस तोफा वगैरे सरंजामसुद्धां माने यांनीं नेला. शिवाय बुणगे निम्मे सरकारच्या जमादारखान्यासुद्धां लुटले गेले. ही लढाई बारामतीनजीक झाली. म्हणून बारामतीची लढाई म्हणतात. श्रीमंतांस ही बातमी कळतांच पांच तोफा आणि रूपराम चौधरी यांची पलटणें वगैरे सरंजाम पुरंधरे जे आपल्या सासवड गांवी गेले होते त्यांजकडे रवाना केला पण याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

पेशव्यांचे सैन्यावर मान्यांनीं म्हणजे पर्यायाने होळकरांनीं हा विजय संपादिला तो तेथेंच न थांबता आजुबाजूच्या प्रांतावर त्याचे परिणाम झाले. बारामती, मेडद आणि इतर गांवांवर खंडणी बसवून ती मान्यांनीं लागलीच वसूलही केली. खुद्द पेशव्यांवरही या लढाईचा परिणाम झाला. ''श्रीमंतांनीं मातुश्री यशोदाबाई, सौभाग्यवती बाईसाहेब, आप्पासाहेबाचे कुटुंब व कैलासवासी नाना फडणवीस यांचे कुटुंब या सर्वांची रायगडास रवानगी केली. पेशव्यांचा सांगलीकरांवर रोष झाला त्यांस खरमरीत ताकीदपत्र गेलें. मान्यांनीं आपला कूच शंभूमहादेव नजीक करकुंभ येथें करून नंतर जेजुरीस श्रीचे दर्शनास गेले. श्रीक्षेत्र पंढरपूर येथें मान्यांनीं व त्यांच्या सैन्याने जी वृत्ती धारण केली होती तशीच त्यांनी जेजुरीसही ठेविली. मालोजी घोरपडे जखमी होऊन मान्यांचे हातीं लागले होते. ते बरे होतांच त्यांस त्यांचे इनाम गांवीं रवाना केलें. जरीपटक्याचे निशाण जें हत्तीसुद्धां पाडाव झाले होतें तें लौकरच

पेशव्यांकडे मोठ्या सन्मानानें पाठवून दिलें.''

जुंपलेल्या ह्या युद्धांत जय अपजय एकाच बाजूस चिकटून राहिला नाहीं. बारामतीस होळकर विजयी तर बालेखिंडीचे लढाईत शिंदे विजयी. शामतखानानें आपल्या दहा हजार जमावाच्या अनेक टोळ्या करून शिंद्यांचा पुण्याकडील रस्ता रोखून ठेविला होता. बालेखिंडीच्या चकमकीत शामतखानाचे हातास गोळी लागली. या चकमकींत यशवंतराव महाराज हजर होते. शिंद्यांचा वरचष्मा झाला.

पण हा यशाचा प्रकार सार्वत्रिक नव्हता. ''पठाणाच्या दोन टोळ्या नारायणगांव, ओतूरच्या सुमारें आल्या. तेथून चाकण सुभ्यानजीक गेल्या. किल्ल्यावरील तोफा सुरू झाल्या. निघोज, झांबडले, मोसी चिखलीपर्यंत स्वार आले. श्रीमंत ह्यांचे स्वार मार्गी लुटून जिवें मारिले. पठाणाकडील लोकांनीं खडकीचे पुलापर्यंत गणेशखिंडीपर्यंत लूट केली तेव्हां पुणें शहर गडबडलें. सरकारचा जवाहीरखाना व जामदारखाना सिंहगडास गेला. असाच प्रकार शिंद्यांचेही लष्करानें केला. शिंद्यांकडील पेंढारियांनीं फक्त पुणें ठेऊन बाजत चार दिशा पश्चिम घाटापर्यंत मुलूख बेचिराख केला. शहरापासून बारा कोसांवर यशवंतराव महाराज आहेत. दंग्यामुळें शहर परागंदा आहे. शिंद्यांना वीस लांब पल्ल्याच्या तोफा आणि तीन लक्ष रुपये देऊन श्रीमंतांनीं मदत केली तेव्हां यशवंतराव महाराजांनीं श्रीमंतांस लिहिलेलें पत्र आम्ही खाली देत आहोत.''

''आज्ञेप्रमाणें बारामतीवर मुक्काम करून आहे. फौजेसह पेंढारियांस ताकीद केली. त्यांस सरकारांतून समेटाच्या बोलण्याकरितां कोणी मजकडे येणार त्यांस आज्ञा व्हावी. आमचा व शिंद्यांचा समेट झाल्यानें राज्याचा बंदोबस्त होऊन शत्रूवर दाब पडेल. शिंद्यांच्या फौजेस जंगी सरंजामाची व खर्चाची वगैरे सरबरा होत आहे, त्याप्रमाणें आम्हाकडील फौजेची व्हावी व शिंद्यांकडील फौजेचा जसा रोख दृष्टीस पडेल, त्याप्रमाणें आम्ही चाकरीस हजर आहो.'' असें पत्र पाठवून यशवन्तराव महाराज हे जेजुरीहून कूच करून बारामतीस आपल्या मुख्य फौजेंत सामील झाले.

ता. २२ आक्टोबर इ. स. १८०२ रोजीं सदाशिवराव बक्षी फौजेसह वानवडीच्या तळावर येऊन दाखल झाल्यावर आणि ते व त्यांचे युरोपियन लष्करी अंमलदार येऊन श्रीमंतास भेटून व त्यांस त्यांनीं भर दिल्यावर श्रीमंतांस दुप्पट धैर्य आले आणि त्याप्रमाणें त्यांचे बातबेत सुरू झाले यशवंतराव महाराजही गैरसावध राहिले नाहींत. यावेळीं बारामतीच्या आसपास फत्तेसिंग माने, शामतखान, मीरखान पठाण, नागो जिवाजी, जिवाजी यशवंत, गणपतराव नारायण, आबाजी लक्ष्मण वगैरे सर्व सरदार फौजेसह एकत्र जमा केलें. या फौजेंत चौदा पलटणें, अलीगोल म्हणजे बिनकवायती पायदळ, पंचवीस तीस हजार स्वार आणि शिंद्यांच्या तोडीचा उत्तम तोफखाना सुमारें शंभर तोफा असा सरंजाम तयार होता. पेशवे आणि शिंदे यांची संयुक्त फौज आणि होळकरांची फौज ही संख्येने जवळ जवळ सारखीच होती यशवंतराव महाराजांचे मनांत यावेळीं दोन विचार प्रामुख्याने घोळत होते असें दिसते. (१) वानवडीवर शिंदे आणि कुंजीर यांच्या जमलेल्या संयुक्त फौजेस

झोडपून काढावयाचें. (२) असें झाल्यावर श्रीमंत बाजीरावसाहेबांस आपल्या ताब्यांत घेऊन त्यांच्या दिवाणगिरीवर अमृतरावाची स्थापना करावयाची आणि असें घडून आल्यावर होळकरशाहीची घडी पूर्ववतप्रमाणें बसेल हें क्रमप्राप्तच होते. इतकी सर्व सैन्याची आणि मनाची तयारी केल्यावर अगदी शेवटला उपाय म्हणून श्रीमंतांचे डोळे उघडण्याचा प्रयत्न पत्रद्वारे केला या पत्रांत जी मुख्य गोष्ट उल्लेखिली तो ''ऐतिहासिक लेखसंग्रह'' कार याप्रमाणें नमूद करतात.

''आपण गादीनशीन झाल्यापासून राज्यातील सर्व गोष्टी शिंद्यांच्या तंत्राने होत आहेत. आपण खावंद आणि शिंदा हा आपला नोकर आहे परंतु आपण नोकराचे आहारीं सापडला आहात, त्यामुळे राज्याचे वाटोळें झाले आणि शत्रू बळावले. शिंद्यानें आतापर्यंत बहुत अमर्यादा करून आपलाही वेळोवेळीं अपमान केलेंला आहे. शिंद्यांच्या वर्चस्वाचे जोखड आपण मानेवर बाळगिलें आहे, तें दूर फेकून द्यावें आणि त्याला वठणीवर आणण्याचें काम मजवर सोपवावें. एकाच लढाईत त्यांचे डोळे उघडतील.'' याप्रमाणें निरोप पाठवून यशवंतराव महाराजांनीं आपल्या फौजेचा तळ बारामतीहून हालवून तो पुण्याच्या रोखे कवडीस आणला. ह्या निरोपाबरोबरच अशीही विनंती श्रीमंतांकडे गेली कीं समेटाचें बोलणें करणेंच असेल तर बाळोजी कुंजीर आणि निंबाजी भास्कर यांस आमच्याकडे पाठवावे यांच्या जिवाची धास्ती वाटत असेल तर माने आणि दुसरें कोणीही सरदार श्रीमंतांकडे ओलीस राहतील. इतकी खातरजमा दिल्यावरही त्या दोन इसमांस यशवंतराव महाराजांकडे जाण्याचे धैर्य होईना. त्यांचे मनच त्यांस साक्षी होतें. विठोजी होळकरांचा अमानुष वध घडून आणण्यांत याच दोन व्यक्ती मुख्य होत्या. साहजिकच समेटाची बाजू बाजूस पडून युद्धाचाच मार्ग शिल्लक राहिला.

यशवंतराव महाराजांनीं आधी निरोप पाठविल्याप्रमाणें आश्विन वद्य १४ चतुर्दशीच्या सहा घटका दिवसपर्यंत वाट पाहिली आणि नंतर युद्ध पुकारलें. या युद्धांत हजर असलेल्या व्यक्तींच्या लिखाणावरून ''तेवीस हजार पागा, फौज व हुजरात, शिवाय पंधरा हजार पलटणेंसुद्धा गाडद, शिवाय शिंदे यांजकडील दोन कंपू व दहा हजार फौज, अशी श्रीमंत पेशवे सरकार आणि शिंदे मिळून संयुक्त फौज होती. पेशवे आणि शिंदे यांच्या संयुक्त फौजेइतकीच तुल्यबळ होळकरांची फौज होती. होळकरांचा मुक्काम पुण्याशेजारीं हडपसर आणि कवडी या गांवांवर असोन, शिंद्यांचे फौजेचा तळ पुण्याशेजारीं कोरेगांव आणि वानवडी या ठिकाणीं होता. होळकरांचे सैन्य तुल्यबळ होतें पण स्थिती मात्र चांगली नव्हती. होळकरांचे लष्करांत महागाई फार. शिंद्यांकडे तसा प्रकार नव्हता.''

भवानीशंकर, मीरखान, तात्या जोग आणि खुद्द यशवंतराव महाराज यांनीं प्रत्यक्ष लढाईत भाग घेतला होता. ऐतिहासिक लेख संग्रहांतील बातमीपत्रें लढाईच्या दुसऱ्या दिवशीं लिहिलेलीं आहेत. इंग्लिश इतिहासकारांनीं माहिती मिळवून कालांतरानें लिहून ठेविली आहे म्हणून, तरतमाचा विचार करूनच आम्ही लढाईचे वर्णन खालीं देत आहोत. ''प्रातःकाळ पासूनच उभयपक्षीं सैन्याच्या हालचाली सुरू झाल्या. पेशवे सरकारच्या फौजेच्या तीन टोळ्या

करण्यांत आल्या. मध्यभागीं शिंद्यांची फौज व पलटणें उभीं राहिलीं. त्या फौजेच्या एका बाजूस जरीपटका पेशव्यांचा आणि दुसऱ्या बाजूस हुजरात अशा सरकारी फौजेच्या टोळ्या दोन उभ्या राहिल्या. शिंद्यांचे फौजेचे आघाडीस तोफखाना सज्ज करून ठेवण्यांत आला होता. होळकरांनीं जरीपटक्यासमोर शामतखान पठाण आणि हुजराती समोर फत्तेसिंग माने उभे केलें. मध्यभागी शिंद्यांचे फौजेच्या तोंडावर स्वतः यशवंतराव महाराज आपली पलटणें व तोफखाना पुढें घालून उभे होते. होळकरांनीं जेव्हां अंबाऱ्या दृष्टीस पडल्या तेव्हां घोड्याखाली उतरून नमस्कार केला आणि फौजेस ताकीद केली कीं कोणी श्रीमंतांचे फौजेकडे जाऊं नये. प्रहर दिवसास होळकरांनीं आपले तोफखान्यास आज्ञा केली कीं जरीपटका आमचा खावंद. त्याजकडून पंचवीस बार निघत तो तुम्ही स्वस्थ असावें. त्याप्रमाणेंच घडले. प्रथम होळकरांचे फौजेवर कुंजीर व निंबाजी भास्कर ह्यांनी गोळे सुरू केलें. नंतर होळकरांकडील सुरुवात झाली. ते दोन प्रहरपर्यंत एकसारखा मार मारला. ही गोळ्यांची लढाई तीन प्रहर अखेरपर्यंत जाहली. ही मारगिरी संपतांच होळकरांकडील चार पांच हजार पठाणांनीं शिंद्यांच्या पलटणावर व सरकारच्या तोफखान्यावर चाल करून समशेरची लढाई दोन घटकांपर्यंत शिंद्यांचे कंपूवर जाहली. त्यात शिंद्यांची पलटणें कचरली. होळकरांकडील पलटणें व तोफखान्याकडील लोक मारीत मारीत आले. शिंद्यांकडील तोफेची नासाडी बहुत जाहली. धीर निघत नाही हें पाहून सरकारचा जरीपटका निघाला. शिंद्यांची फौज जेव्हां पळूं लागली तेव्हां होळकरांकडील बक्षीसाहेब व मुर्तीजाखान वगैरे सरदार शत्रूचा पाठलाग करूं लागले. त्यावेळीं आश्रफखां नांवाचा सरदार पांच हजार स्वारांनिशीं बक्षीसाहेबाशीं मुकाबला करण्यास आला. बक्षीसाहेबानें आपले सामर्थ्य तोलून त्याच्याशीं सामना करण्याचें सोडून दिलें. यशवंतराव महाराजांनीं त्यावेळीं चालून जाऊन, विजेप्रमाणें आपल्या तरवारीनें आणि भाल्याने त्यांस आपल्या पुढून हाकून लाविलें. यावेळीं महाराजांच्या हाताला जखम झाली असतांहीं ते एकसारखे शत्रूशीं लढत राहून त्यांच्या फौजेच्या रांगा तोडीत होते.

श्रीमंत पेशवे सरकार पर्वतीवरून लढाई पाहत होते. आपल्या सैन्याची झालेली दाणादाण पाहून सिंहगडावर निघून गेले, तेव्हां पुण्यांत मालक कोण, कोणीच राहिला नाहीं. सदाशिवराव बक्षी नगरच्या किल्ल्याकडे निघून गेले आणि सर्व पुणें शहर यशवंतराव महाराजांच्या हातांत चालून आलें. इंग्लिश इतिहासकार लिहितात, शिंद्यांच्या पायदलांत असलेल्या चार युरोपियनांपैकीं तिघे जखमी होऊन शत्रूच्या हातीं गेले. सदाशिवभाऊ बक्षीं आपले घोडेस्वारांनिशीं जीव घेऊन पळाले. पुणें शहर मालकविरहित झाले तरी कोणीही शहरास उपसर्ग लावूं नये असा हुकूम यशवंतराव महाराजांनीं काढला आणि पेंढारियापासून रेसिडेंसीचें रक्षण केलें. तोच इतिहासकार पुढें असें म्हणतो, शिंद्यांची यावेळची सर्व तयारी केवळ जुजबी होती. कां तर त्यांच्याकडून होण्यासारखी संख्या अगर रक्कम त्यांजकडून आली नाही. सांभाळण्याचा मात्र भार वाढला. क्याप्टन डावीसवर हल्ला जो यशवंतराव महाराजांनीं केला त्या वेळी हातांतून रक्त वाहत असतांही महाराजांनीं जोराचा हल्ला केला

तो निकराचा होऊन यशवंतराव महाराजांचे गळ्यांत विजयश्रीनें माळ घातली.

भर दिवाळीच्या दिवसांत शिंद्यांकडील कंपूंत पांच साडेपांच हजार मनुष्य ठार झालें. होळकर यांजकडील तीन साडेतीन हजार मनुष्य मृत्यूमुखीं पडलें. भर दिवाळीच्या दिवशीं खुद्द पुण्यनगरांत जो हाहाकार उडाला आणि सर्व महाराष्ट्रांतही नरकचतुर्दशीचे दिवशीं किती जणांना मंगल स्नानाचे दिवशीं अमंगल झालें असेल याची कल्पनाच करावी. पानिपतचा प्रसंग परक्या शत्रूशी होता आणि आजचा हा प्रसंग घरांतल्या घरांत. मागचें प्रसंगीं दुःखांत कांहीं तरी समाधानास जागा होती. म्लेंछांस मागें हटविलें असें मानण्यास जागा होती. आजचा हा प्रसंग केवळ घरच्या यादवीचा. खालीं मान घालण्याचाच प्रसंग. या प्रकरणांतील कांहीं निवडक पत्रें सोबत जोडली आहेत

(लेखांक १ ते ६ पर्यंत)

लेखांक १ आणि २ यावरून दिसून येते कीं श्रीमंत यशवंतराव महाराज दक्षिणेंत उतरल्यावर मुक्कामा मुक्कामावरून सविस्तर हकीगतीचीं पत्रें पाठवीत गेले असणार. त्या पत्रांचा नमुना म्हणून हीं दोन पत्रें खालीं दिलीं आहेत.

लेखांक ३ : यातील ''सर्व सरदारांनीं एक होऊन परराष्ट्राचा प्रसर न व्हावा'' हे वाक्य महत्त्वाचे आहे. त्या वेळच्या मराठा मंडळाच्या मनोभूमिकेचे दर्शक आहे. ''आम्ही स्वराज्याचे बंदोबस्तास अनुकूल आहोंत'' हाच अर्थ आणि ही वाणी श्री. यशवंतराव महाराज यांनी दरबारांत व समरांगणावरही अनेकवेळां प्रगट केली आहे. त्यावरून त्यांचे स्वराज्यावरील प्रेम, मालकासंबंधी आदर व आयुष्याचें ध्येय ही स्पष्ट दिसून येतात.

लेखांक ५, ६ : पुण्याच्या लढाईचे वर्णन स्वतःच यजमान देत आहेत. पूर्ण यश मिळालें तरी त्याबद्दल कोणचाही अहंकार न धरितां श्री जगदीश लक्ष्मीकांत हा कर्ता करविता आहे ही दृढ भावना. ''त्याकाळीं श्रीनेंच सुदर्शन चक्र सभोंवतें फेरऊन संरक्षण केलें'' या वाक्यावरून पुराणादिकांतील कथांवर त्यांचा विश्वास व भर दिसून येतो. ''श्रीमंतांनीं कोठें जमून उभे असावें किंवा वाड्यांत राहणें न करितां सिंहगडचे सुमारें गेले. इकडून ओढ आजपर्यंत झाली नाहीं व पुढें होणार नाही.'' श्रीमंतांसंबंधानें असलेलें प्रेम व आदर, पूर्ण यशाचे वेळींही, यशवंतराव महाराजांचे मनातून तिळप्राय कमी झालें नाहीं. उलट भर यशाच्या भरांत असतांही मर्यादा पालन करण्याची त्यांची इच्छा स्तुत्य व अनुकरणीय आहे.

**सरकारी दप्तरातील लेखांक अनुक्रमे १ ते ६.**

(१) यशवंतराव महाराजांकडून भारमल होळकरांस : ता. २२-८-१८०२ कैलासवासी मातोश्रीसाहेबांचे प्रतापे अरिष्ट निरसन होईल. चांदवड हस्तगत झालें. माळवा एक दोन दिवसांत स्वाधीन होईल. ज्याची जशी चाल दृष्टीस पडेल त्यांसी सादरच आहे. फळदाता श्री लक्ष्मीकांत आहे. उत्तम तेंच करील. राजश्री विठ्ठल महादेव (किबे) यांनी सावधानी करून कंपूचा बंदोबस्त ठेविला आहे.

(२) ता. १३-९-१८०२ खासा स्वारी वैजापूरीहून कूच होऊन गाळणा, चांदवड येथील किल्लेजात बंदोबस्त करून जनस्थानास (नाशकास) आली. येथून स्वारी कूच करून

फौज मीरखान इस्मतखान व नागो जिवाजी यांजला सोबती यांचे फौजेच्या मुकाबल्यास पाठवून खासा स्वारी त्यांचे उपराळ्यास आहे. श्रीलक्ष्मीकांताचे कृपेने उत्तम तेंच घडेल.

(३) इ. स. १८०२ चहूंकडून मसलत प्रकरणीं अवडंबरें आलीं आहेत. कोणाचा विश्वास न धरितां सावधानीनें असावें, म्हणोन लिहिलें. त्यांस नबाब, इंग्रज एक होऊन पलटणें पुण्यास दाखल झालीं. श्रीमंतही येऊन पोहोचले असतील. सर्व सरदारानीं एक होऊन परराष्ट्राचा प्रसर न व्हावा या अर्थी भोसले यांचे विद्यमानें बोलणीं लागलीं आहेत. आम्ही स्वराज्याचे बंदोबस्तास अनुकूल आहों. अंतःकरणापासोन सफाईनें समेट जाल्यास दुसरें दाखववायाचें नाहीं. त्यांजकडून चालींत एक, बोलण्यांत एक दिसूं लागल्यास आमचाही भार श्री लक्ष्मीकांतावर आहे. तो उत्तम तेंच करील.

(४) ता. १५-९-१८०२ भारमल होळकरांचे नांवें. श्रीमंतांकडील संधान राखून त्यांचे विचारें सोबत्यांस जरब बसोन ज्यात दौलतीचा बंदोबस्त घडे तो विचार करावयास सर्व आहे म्हणोन लिहिलें. त्यांस श्रीमंतांचे संधान राखून त्यांचे मर्जीनें जसें घडेल तसें करावें. या विचारास जपत असतां बाहेरून बोलणें समेट करितों असें होऊन दिवस काढून सोबत्याशी फौज पलटणें आणून लढाई मोडली. माने याजवर बाळोजी कुंजीर व मानकरी वगैरे पाठविले तेव्हां त्यांचे अंतःकरण शुद्ध नाहीं. त्याप्रमाणें फलेही निदर्शनास येतात. इकडून जपावयास कमी करीत नाही. श्रीकृपेनें घडेल तें खरें. मान्यांच्या भेटी देवीच्या पायानजीक जाहल्या. एक दो रोजा सडे होऊन मुकाबल्यास जाऊं. श्रीमंतांसीं आपल्याकडून वांकडे दाखवीत नाही. त्यांजला सोबत्याचे कारभारी व कुंजीर जसे भासवितात तसे करतात त्यांस उपाय काय ?

श्री म्हाळसाकांत चरणीं तत्पर
मल्हारजी सुत खंडेराव होळकर

(५) ता २५-१०-१८०२ पुण्याची लढाई (बळवंतराव यांचे नांवें महाराजांकडून) (ह्यांतील शिक्का माहितीसाठी देत आहोत) आपल्याकडे एक दोन पत्राच्या रवानग्या केल्या त्यावरून सविस्तरें ध्यानास आलेंच असेल. श्री जेजुरीची यात्रा करून थेऊरनजीक आलो. श्रीमंतांकडून राजश्री नारायण वैद्य व रघुनाथ धोंडदेव भागवत बोलावयास आले होते. त्यांतील अर्थ दिवस काढावयाचे इतकांच दिसला. तेव्हां त्यांसी मार्गस्थ करून आश्विन वद्य छ.२७ जमादिलाखर इंदुवारीं प्रातःकाळीं पासोन लढाई सुरू होऊन दोन प्रहरपर्यंत दुतर्फा जितकी शर्थ तितकी जाहली. सेवटी आम्ही जातीनिशीं फौजेसह हल्ला करून श्री कृपेनें दरोबस्त पलटणें गारद केली. तोफा अगदी सांडविल्या. फौजेपैकीं कांहीं सडे जीव घेऊन पळून गेले. वरकड सर्व लुटून घेतलें. श्रीमंत सिंहगडाकडे गेले. आपण या उपरी कोणेविशी संशय मनात न आणितां सत्वर यावयाचे करावे. रवाना छ.२९ जमादिलाखर सु।। सलासमयातेन व आलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती (श्री मोर्तबसुद)

(६) ता.२५-१०-१८०२ यशवंतराव महाराजांकडून भारमल होळकरास नारायण बाबुराव वैद्य, रघुनाथ धोंडदेव भागवत, पाराशर दादाजी व गोपाळराव गोविंद गानू यांस : कांहीं जीव दिसेना तेव्हां मार्गस्थ करून आश्विन वद्य १४ इंदुवारीं प्रातःकाळीं पासोन दोन प्रहरपर्यंत लढाई होऊन तोफ व फौजेची शर्थ दोन्हीकडून चांगली जाहली. शेवटीं जातीनिशीं फौजेसह हल्ला केला. श्री लक्ष्मीकांत कृपेनें त्यांची फौज पलटणें दरोबस्त गारद जाहली. तोफा अगदी सोडविल्या. फौजेपैकीं कांहीं सडे मात्र जीव घेऊन गेले. बाकी सर्व लुटून घेतलें. आमचे हातास तीन जखमा तरवारीच्या हलक्याच लागल्या आहेत. खैर मोठी जाहली. सत्वरीच बऱ्या होतील. ज्या ज्या ठिकाणीं शत्रूशीं मुकाबले पडत गेले तेथें सबकारच पडत गेले. तोफांचे गोळे व बंदुकीच्या गोळ्यांची पर्जन्यवृष्टी होत गेली त्या ठिकाणीं जागजागीं स्वारीखालील घोडेही गोळे लागून कामास येत गेले. गोळ्या अंगरखे, पागोटे, यांस आसपास लागून गेल्या. त्याकाळीं श्रीनेंच सुदर्शन चक्र सभोवती फेरवून संरक्षण केलें. त्याप्रमाणें पुढेंही सर्वोपरी त्याचाच भरवसा. कोणेविसीं काळजी न करणें. श्रीमंत फौजेसह बाहेर निघाले. कुठे जमून उभे असावे किंवा वाड्यांत राहणे न करितां सिंहगडाचे सुमारें गेले. इकडून ओढ आजपर्यंत जाहली नाही व पुढेंही होणार नाहीं.



**प्रकरण ६ वें**

# पुण्याचे लढाईनंतर : श्रीमंत पुनः गादीवर बसले
## ता. १३-५-१८०३

पुण्याची लढाई झाल्यानंतर श्रीमंत बाजीरावसाहेब जे निघाले ते वडगांव, डोणजे असे मुक्काम करीत करीत बाहेरच राहिले. त्यांचे मुत्सद्दी बाळोजी कुंजीर, निंबाजी भास्कर इत्यादि लढाईच्या प्रारंभालाच जीव घेऊन पळाले होते. ते कालांतरानें कोकणामध्यें आपल्या यजमानास येऊन मिळाले. शिंद्यांकडून आलेले सदाशिवराव बक्षी लढाईत कांहीं वेळ दम धरून होते पण महाराज यशवंतरावांच्या समशेरीपुढें तेही हतप्रभ होऊन कोठें निघून गेले तेही कळेना. सारांश, लढाई संपल्यावर पुण्यास मालक, मुत्सद्दी असा कोणीही राहिला नाही. अशा समयीं युद्धांतील विजयी पुरूष हा मनांत आणील तर जिंकलेल्या भूमीचा पूर्ण मालक होऊं शकतो. अशी संधी प्राप्त झाली असतांही यशवंतराव महाराजांनीं मर्यादापालन कसें व किती केलें हें त्यांनीं त्यावेळीं सोडलेल्या हुकुमांवरून दिसून येईल. ते हुकूम खालीलप्रमाणें.

(१) कुल फौज होळकरांची. ताकीद जे शहरास (पुणें) काडीचाही उपद्रव कोणी केला असतां पारिपत्य (जिवे मारणें) करीन.

(२) कुल शहराची गिर्दवाणी (चहूबाजूंनी नाकेबंदी) होळकरांनीं करून कोणास बाहेर जाऊं देत नाही.

(३) श्रीमंतांनीं शहरांत यावें म्हणोन यशवंतराव महाराजांनीं बोलणें लाविलें.

(४) सरकारवाड्याच्या बंदोबस्तास तोफा व पलटणें होळकरांकडील गेली.

(५) गांवातील बंदोबस्तही पूर्वी राजश्री काळ्यांकडे होता त्याप्रमाणें होळकरांकडील

आधिक उणें सांगणें काळ्यांकडेच येतें. आणि त्याप्रमाणें काळे करितात.

(६) लढाई व्हायचे पूर्वी दोन दिवस पुणें शहरांतील बाजार बंद होता. मंगळवार म्हणजे लढाईचेच दुसरें दिवशीं होळकरांनीं ताकीद केली कीं सुखरूप दुकानें उघडून व्यवहार करावा. ते दिवशीं मध्यमांतच होते. बुधवारपासून झाडून व्यवहार चालू लागला.

(७) शिंदे यांजकडील तळ गांवांत आला होता. तो गांवच्या लोकांनीं लुटला होता. त्याची चौकशी करण्यास सुरुवात केली.

(८) पेंढार अनिवार, मार्ग चालत नाही. त्यांनीं जिकडे तिकडे अनर्थ करून दिला आहे. ईश्वरें कृपा शहरावर ते दिवशीं केली. शहरांतील बंदोबस्त यशवंतराव महाराजांनीं ठेवल्यामुळें ही आपत्ती टळली.

(९) आबा काळे यांस हुकूम गेला कीं ''सरकारवाड्याचा बंदोबस्त चीजवस्तसुद्धां चौकी पहारा आदिकरून राखावे व सदरहू गृहस्थ यांचाही बंदोबस्त राखावा, जिम्मेस तुमच्या आहेत व कोतवाल यांस बोलावून होळकर यांनी ताकीद केली कीं शहरची चौकी, रात्रीचा बंदोबस्त पूर्ववतप्रमाणें तुम्ही करता कीं आम्ही करावा म्हणोन सांगितलें. त्यावरून कोतवालाने उत्तर केलें जे आम्हीच पूर्ववतप्रमाणें करतो. नंतर कोतवालास शेला पागोटें देऊन लावून दिल्हे.''

(१०) महाराजांनीं आपले तर्फेचे दोन कारकून व शंभर पन्नास प्यादे बुधवार पेठेत भिड्याचे दुकानांत ठेविले. शहरांत लष्कराच्या लोकांनीं वगैरे पेंढारियांनीं लूट, लबाडी, जबरदस्ती केली तर बेमुर्वत पारिपत्य करतात. हरनाथसिंग चौधरी आणि शेखजी यांनीं या हुकमाची अंमलबजावणी केल्याचा ता. १ नोव्हेंबरच्या पत्रांत उल्लेख आहे तो असा. एक दोन पठाणांनीं शहरांत धुंडाई केली तेव्हां एका पठाणाचा हात तोडला आणि दुसऱ्याचें नाक कापले आणि त्याला उंटावर बसवून शहरातून फिरविलें.

(११) यशवंतराव महाराज स्वतः वानवडीस शिंद्यांचे वाड्यांत येऊन राहिले. फत्तेसिंग माने यांचे एक फौजबंद सरदार कवडीवर मुक्काम करून राहिले. नागो जिवाजी हे दोन हजार फौज घेऊन पुण्याशेजारीं पर्वतीवर येऊन राहिले. एक दोन कंपन्या लकडी पुलाजवळ येऊन उतरल्या.

ह्याप्रमाणें विजयी यशवंतराव महाराजांनीं मर्यादेचे उल्लंघन न करितां पुणें शहराचा अंतर्बाह्य बंदोबस्त केला.

लढाई झाल्यानंतर श्रीमंत पेशवे सरकार हे मुक्कामावर मुक्काम करीत बाहेरच राहू लागले. वडगांवांहून डोनजे येथें ते गेले. त्यांचा मुदपाकखाना बरोबर गेला नव्हता. ही हकीगत यशवंतराव महाराजांस कळतांच त्यांनीं ''पंचवीस तीस ऊंट भरून भोजनाचें वगैरे साहित्य यजमानाकडे लावून दिले'' निरोपही पाठविला जे श्रीमंतांनीं पुण्यास यावें. पण सभोवार असलेल्या मंडळीत शांत विचाराची माणसे फार कमी होती. यशवंतराव महाराजांचा भिवाजी कोलते याजबरोबर निरोप गेला तो येणेंप्रमाणें ''श्रीमंत पेशवे सरकारांशीं मला वाकडेपणा करावयाचा नाहीं. श्रीमंतांनीं पुण्यांत येऊन गादीचा बंदोबस्त करून स्वस्थ राहवे. शिंदे यांचा

मात्र पुस्तपन्हा करूं नये. धनी यांनीं उभयतांचा बंदोबस्त करून द्यावा.'' यावर मानकरी यांचे बोलणें पडलें कीं, ''श्रीमंत राजश्री अमृतरावसाहेब यांसी पुण्यात आणून ठेवावें. आपण तर आहों येथेंच रहावे. होळकरांचा जाबसाल रावसाहेब उलगडून देतील. नंतर होळकर कूच करून गेल्यावर खाशांनीं पुण्यास जावे.'' पण निंबाजी भास्कर व कुंजीर यांस मानकरी यांचें म्हणणे पसंत नव्हते. मुत्सद्यांचें मानस मागती जमाव करून होळकरांचे पारिपत्य करावे. जलचर आणावे व दौलतराव यांस फौजेसुद्धां बोलवावें आणि एकंदर जमाव हुजरातसुद्धां करून होळकरांचे पारिपत्य करावे. हाच दम श्रीमंतांस मुत्सद्दी देत होते आणि तोच शेवटीं प्रभावी ठरला. इतर मुत्सद्यांच्या समाधानाकरितां ओगले यांस अमृतरावाकडे रवाना करून देऊन त्याच दिवशीं पहाटेचे चार घटका रात्र राहतां श्रीमंत अप्पासाहेबांसुद्धा निघोन रायगडचे रोखे गेले.

सारांश, पुण्याचा अंतर्बाह्य बंदोबस्त, मर्यादेत राहून, यशवंतराव महाराज यांनीं केला. यजमानांची अडचण दूर करून पुढील रस्ता आपण होऊन सरळ व सुखाचा दाखविला. पण हे सर्व यत्न व्यर्थ झाले. श्रीमंतांस कुमंत्र मिळून त्यांनीं आपल्याच वडिलांचा मार्ग परक्यांस घरात आणण्याचा स्वीकारिला आणि ते त्या मार्गानीं जाऊं लागले. तेव्हां या बाजूने कार्यसिद्धी होत नाही, असें जाणून यशवंतराव महाराजांनीं जो मर्यादेचा आणि मुत्सद्दीगिरीचा मार्ग काढला तोही आतां पाहूंया. ज्या अमृतरावाचा उल्लेख वरती मानकऱ्यानें केला होता ते यावेळीं जुन्नरास राहत होते. त्यांजकडे श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं सदाशिवपंत ओगले यांस कोकणांत चलण्याबद्दल निरोपासह पाठविलें होते. श्रीमंतांच्या म्हणण्याप्रमाणें अमृतराव कोकणांत जाते तर यशवंतराव महाराजांचा सर्वच व्यूह ढासळला असता. आपला दक्षिणेंत येण्यातला जो मुख्य व प्रथम हेतू पुण्याच्या दरबारचा योग्य बंदोबस्त करून देणें हा कोणत्याही मार्गाने साधण्याकडे त्यांचे सर्व चित्त लागून राहिलें होतें. ओगले अमृतरावाकडे गेल्याची हकीगत कळतांच यशवंतराव महाराजांनीं सरदार आनंदराव होळकर यांजबरोबर दोन कारकून आणि पांचशे स्वार ताबडतोब अमृतरावांकडे रवाना केलें. हे नुसते करूनच ते स्वस्थ राहिले नाहीत. पहिलें पांचशें स्वार गेल्यावर त्याजवर दोन दिवसांनीं आणखीन हजार स्वार गेले. परंतु तेथील बेत निघण्याचा मतलबावर पाहून आणखीन चार हजार फौज गेली. तेव्हां अमृतरावसाहेबांस पुण्यास येण्याखेरीज गत्यंतर राहिले नाही. मुत्सद्दीगिरीची शिकस्त म्हणावयाची ती हीच. ओगले आणि श्रीमंत यांचे बेत बाजूस पडले आणि कार्तिक शुद्ध १२ स जुन्नरहून मंचर आणि मंचरहून पुणें असा कूच होऊन श्रीमंत अमृतराव होळकरांच्या लष्करांत येऊन राहिले.

पुण्याच्या लढाईनंतर केवळ बारा दिवसांचे आंत यशवंतराव महाराजांनीं शहराचा अंतर्बाह्य बंदोबस्त तर केलाच; पुढील कार्याच्या दृष्टीनें प्रतिपक्षीं यांचे बेत हाणून पाडून आपली कार्यैकदृष्टी जगताच्या अनुभवास आणून दिल्ही. या वेळींही त्यांची स्वतःची प्रकृती चांगलीशी नव्हती. लढाईतील तरवारीचे पांच घाव अजून ओलेच होते. तरी पण एखाद्या योग्याप्रमाणें सर्व शारीरिक दुःख विसरून ध्येयाकडेच दृष्टी ठेवून ते असल्यामुळें एवढा सर्व कारभार ते आटोपू शकले. पण ते येथेंच थांबले नाहीत. यापुढें जो व्याप त्यांनीं

आरंभिला तो आता विचारांत घेऊंया. मोरोबादादा फडणीस व हरीपंत फडक्यांचे चिरंजीव आणि त्याच मानाचे कांहीं प्रतिष्ठित गृहस्थ यशवंतराव महाराजांस अनुकूल आहेत अशा संशयाने श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं अटकेंत टाकिले होते. त्यांची सुटका यशवंतराव महाराजांनीं केली. ही सुटका करीत असतां जे प्रतिकूल राहिले असें वाड्यांतील देशमुख व वैजनाथ मामा यांस तोशीसही सोसावी लागली. शहरावर यादी बसविली होती तिजसंबंधात व्यापारी मंडळाने तक्रार करतांच ती यादी रद्द झाली. यावर यशवंतराव महाराजांची नजर दूरवर जाऊं लागली.

त्यांचा पराक्रम व विजय ऐकून उज्जेनीच्या विजयानंतर उत्तरेंतील धाडशी व शूर माणसांचा जमाव त्यांचेभोवतीं जमला आणि त्या जमावाचा महाराजांनीं उपयोगही करून घेतला. तसाच प्रकार आतां या पुण्याच्या लढाईनंतर दक्षिणेंत होऊ लागला.

(१) सातारचे छत्रपती श्रीशाहू महाराज यांचे सापत्न बंधु चतुरसिंग भोसले शूरपणाबद्दल प्रसिद्ध होते. ते यावेळीं पुण्यास यशवंतराव महाराज यांच्याकडे चार पांचशेंच्या जमावानिशीं पुण्याच्या बाहेर येऊन उतरले. त्यांस होळकरांनीं दोन तीन हजार फौज व एक पलटण याप्रमाणें देऊन जेजुरीस पाठविलें आणि त्यांस कामगिरी सांगितली कीं जेजुरीहून पुढें साताऱ्यास जाऊन किल्ल्यावरील आणि खालील शहरांतील बंदोबस्त करावा. याकरितां यशवंतराव घोरपडे यांसही तिकडेच रवाना केलें.

(२) नारायणराव माने सरदार दोन तीन हजार फौज व दोन तोफा व कांहीं पलटणें अशा जमावासुद्धां वाई देशात गेले. तेथें खंडण्या स्वीकारूं लागले. मुलूख तमाम उजाड होत चालला, मौजे पाडळी येथें त्यांनीं दोन हजार रुपये खंडणी घेतली.

(३) फतेसिंग माने यांनीं रहिमतपुरकर रयतेस ताकीद पाठविली कीं साल-मजकुरचा ऐवज कमाविसदारास न देणें. तो ऐवज होळकराकडे देणें आहे.

(४) कऱ्हाडदेश, फलटणदेश, मिरजप्रांत, बागलकोट, धारवाड वगैरे प्रांतांतून खंडण्या घेण्याचे ठरले आणि त्याच हेतूनें यशवंतराव घोरपडे, नारायणराव माने आणि चतुरसिंग भोसले याकामीं वहिवाटू लागले. चतुरसिंग भोसल्यांचा मात्र मार्ग आगदीच तृतीय; नांव सांगांवयाचे होळकरांचें आणि तुमडी भरायची आपली असा मार्ग त्यांनीं स्वीकारला.

याप्रमाणें पुण्याची अंतर्बाह्य व्यवस्था व बाह्य मुलखातून खंडणी वसूल करण्याचे अशी दोन्ही कामे यशवंतराव महाराजांनीं स्वतःच्याच दमावर चालविलीं. याच सुमारास श्रीमंत अमृतराव पेशवे यांस तातडीने पण बहुत सन्मानानें त्यांनीं पुण्यास आणिले. हे श्रीमंत भांबुर्डे येथील तोफखान्यातींल बंगल्यांत उतरले. त्यांच्या आगमनापूर्वीच दोन दिवस मोरोबा दादा फडणीस व बाबा फडके या दोन मुत्सद्यांची सोडवणुकहीं महाराजांनीं करविली होती. याप्रमाणें जुन्या मुत्सद्यांतील कांहीं मंडळी महाराजांनीं पुनः प्रस्थापित केलीं. ''श्रीमंत अमृतराव येत आहेत हें महाराजांस कळल्यावर त्यांनीं वीस हजार फौज व तोफखाना घेऊन सामोरे दोन कोस खडकीनजीक येऊन परस्पर भेटीचा समारंभ उत्तम प्रकारचा होऊन व परस्परें मुदारतीचीं भाषणें होऊन व खुशीच्या तोफा शंभर शंभर आवाज दोहीकडील होऊन

यशवंतराव वानवडीस मुक्कामास गेले; रावसाहेब व मोरोबादादा व बाबा फडके भांबुरड्यास आले. (ता.१२ नोव्हेंबर रोजीं श्रीमंत अमृतराव पेशवे यांनी कारभार हाती घेतला.) शहरांतील काम झाडून राजश्री हरीपंत भावे यांजकडे सांगितले. पेशजी होळकरांकडून नागो जिवाजी व शेखजी व हरनाथ कारभार शहरांत करीत होतें ते आतां उठून गेले. लढाई झालेवर धारण पावणे दोन पायली वर आली होती. आठ चार दिवस चालले. नंतर होळकर यांनीं बंद बांधून दिला कीं तीन पायली ज्वारी, बाजरी आणि आडीच पायली गहू, हरभरे याप्रमाणें विकावे. सरकार वाड्यांतील बंदोबस्त जनार्दनपंत फाटक वाकनिशी कडील रावसाहेब यांचे स्वारीबरोबर होते त्यांस सांगितला.

हशमांपैकीं चारशें लोक सरकारवाड्यांत असावे अशी पूर्वीची नेमणूक. त्याप्रमाणें भास्कर महादेव फडणवीस यांस आज्ञा झाली. गोविंदराव बर्वे यांचे काम वाड्यांतील पूर्ववत् त्यांजकडेस सांगितले. राजश्री नारो शिवराव खासगीवाले यांस आज्ञा झाली कीं तुमचे कारखाने पूर्वीचे आहेत त्यांचा बंदोबस्त करावा. हुजूरपागा ढेरे याजकडे त्याचा बंदोबस्त घोडीं, उंटें वगैरे चोहीकडे चराईवर गेली होतीं ती येक जागा करूं लागले. सारांश, जुने अंमलदार जितके आहेत त्यांस हुडकून काढून त्यांचे काम सांगितलें. श्रीमंत अमृतराव पेशवे यांनी थोड्यांच दिवसांत शहरचा व वाड्यांचा असा बंदोबस्त केला कीं त्यांचे आज्ञेशिवाय कोठेंही पान हालेनासें झालें. झाडून किल्ल्यांस ''हुशारीने असावे म्हणोन सनदा श्रीमंतांच्या नांवाच्या गेल्या.'' त्यावर तारखा मोरोबादादा फडणीस करूं लागले. याप्रमाणें मुख्य कारभार सुरळीत चालूं झाल्यावर श्रीमंत अमृतराव, महाराज यशवंतराव, मोरोबा फडणीस यांच्या वारंवार भेटी होऊन इतर कामांसंबंधीं खलबतें सुरू झालीं. पहिली गोष्ट जी त्यांनी केली ती चौघांच्या सह्यांनी श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे यांस खातरजमेचीं आणि पुण्यास येण्याबद्दलची पत्रें गेली. श्रीमंतांचे कोकणांतील मुक्काम वरचेवर बदलत होते. बरोबर गेलेल्या मंडळीस फार कष्ट पडत होते. अशा स्थितींत ही वरील विनवणीची पत्रें गेली असता श्रीमंतांची उत्तरे आली कीं तुम्ही बहुत खातरजमेने लिहिलें, परंतु आम्हांस खरें वाटत नाहीं. राजश्री चिंतोपंत देशमुख व मामा भागवत उभयतां यांजपाशीं जी बोलणीं असतील ती बोलून त्यांनीं आमची खातरजमा केल्यास नंतर स्वारी येण्याचा विचार करण्यांत येईल. ते आले नसतां खातरजमा होत नाही. मुत्सद्यास जी अडचण पडली ती ही कीं देशमुख व भागवत हे दोघेही आधीच असंतुष्ट झाले होते. त्यांची अप्रतिष्ठा होळकरांचे कारभाऱ्यांनीं भिड्यांचे वाड्यांत केली होती. यामुळें मुत्सद्यांची म्हणणीं ऐकण्यास देशमुख व भागवत तयार नव्हते आणि त्यामुळें हे बाजीरावसाहेबांकडे गेले नाहीत व श्रीमंतांचे येणें शक्यच नाहीं. सारांश, मुत्सद्यांचे म्हणण्याप्रमाणें श्रीमंतांचे पुण्यास येणें जमत नाही असें गृहीत धरूनच मुत्सद्यांस इतर बाबीचा विचार करणें भाग पडले. याच सुमारास यशवंतराव महाराजांच्या जखमा भरून आल्या. त्याचे कडूस्नान केलें. ता. २३ नोव्हेंबर रोजीं खैरियतचा मोठा समारंभ त्यांनी केला आपल्या छावणीत बावन तोफा सोडण्यांत आल्या. त्यांच्या पदरच्या सरदारांनीं आणि मानकऱ्यांनीं त्यांना नजरनजराणे केलें महाराजांनीं

आपले लोकांस ज्या लहान मोठ्या सरदारांनीं उत्तम सेवा केली त्यांस मोठमोठी वस्त्रें देऊन त्यांचा सन्मान केला.

(१) भवानीशंकर यांना नौबत, निशाण, हत्ती, घोडा, झालरदार पालखी देऊन त्यांच्याकडे राज्यांतील लहान मोठी कामें सोपविलीं व त्यांस राजे हा किताब दिला.

(२) मूर्तीजाखान यांस नबाब हा किताब दिला.

(३) वाजदअलीखान यांस रुस्तमउदौला हा किताब दिला.

(४) शाहमतखान व नजीबखान या दोघांस नबाब हा किताब देऊन हत्ती, नौबत व निशाण वगैरे देऊन त्यांचा सन्मान केला.

ह्या प्रसंगी श्रीमंत अमृतराव पेशवे यांनीं यशवंतराव महाराजांस हत्ती रुप्याचे अंबारीसुद्धा, कंठी, शिरपेच, मोत्याचा तुरा आणि बहुमानाची वस्त्रें दिली.

पेशव्यांचे दरबारी इंग्रजांचे वतीने क्लोजसाहेब वकिलीचे कामावर होता. त्यानें आपल्या वकिलाला यशवंतराव महाराजांकडे मिजाजपुर्सीस पाठवून आपल्या राष्ट्राच्या वतीने मोठ्या स्नेहभावानें मेजवानीचें आमंत्रण दिल्हे. महाराजांनीं आमंत्रण स्वीकारिलें. साहेबबहादुरनी महाराजांचा पाहुणचार, आदरसत्कार महाराजांचे योग्यतेस साजेसा केला. बावीस तार्टें पोशाखाचीं आणि चकमकीच्या बंदुकी देऊन महाराजांचेबरोबर जे इतर लोक होते त्यांनाही पोशाख दिले. याप्रमाणें हा समारंभ मोठ्या थाटामाटांत व आनंदाचा झाला. यांत संशय नाहीं. मेहनत केलेल्यांना आपल्या श्रमाचें सार्थक झाले असें वाटण्यासारखेच श्रीमंत यशवंतराव महाराजांनीं केलें. पेशवे सरकारच्या जागीं असलेले श्रीमंत अमृतराव व कंपनी सरकारच्या अंमलदारानींही यशवंतराव महाराजांचा योग्य सन्मान केला यात संशय नाही. या सन्मानाचे तारखेपूर्वी एकच शोचनीय गोष्ट झाली होती. ता. १८ नोव्हेंबर रोजीं म्हणजे समारंभापूर्वी पांच दिवस होळकर सरकारांची नेमनिष्ठेने अनेक दिशांनीं सेवा करणारे पाराशर दादाजी वाघ हे कैलासवासी झाले. दोनच दिवसांचे दुखण्यानें त्यांचा अंत झाला. श्री देवी अहिल्या मातोश्रींच्या कारकीर्दीत त्यांनीं उत्तम सल्लामसलत देऊन गादीचे तेज राखिले होते. यामुळें सवाई मल्हाररावांचा त्यांजवर रोष झाला होता. सत्य पण अप्रिय बोलून मल्हाररावांस शुद्धीवर आणण्याचा त्यांनीं प्रयत्न केला होता. त्यांची योग्यता जाणून यशवंतराव महाराजांनीं त्यांस समेटाचे बोलणें करण्यासाठीं पेशव्यांचे दरबारीं पाठविलें होतें. श्रीमंतांसीं धिम्मेपणाने वागून योग्य अवसर येताच नम्र पण स्पष्ट भाषण त्यांनीं केलें. योग्य वेळीं इशारा देऊन आपल्या यजमानास युद्धाची इशारत दिली. सारांश, सत्राव्या व आठराव्या शतकांत मराठा मंडळात जे मुत्सद्दी होऊन गेले त्यांच्यात पाराशर दादाजींचे स्थान बरेच वरचें लागेल असें आम्हांस वाटतें. त्यांच्या कष्टाचे फळ मिळविण्याची संधी येण्यापूर्वीच ते इहलोक सोडून गेले. ते जगते तर त्यांचा इतरांप्रमाणें महाराजांनीं सन्मान करून गुणग्राहकता दाखविली असती यात शंका वाटत नाही. अस्तु.

श्रीमंत बाजीरावसाहेबांचा प्रश्न निकालांत आणला. होळकरांचा आनंदसमारंभ उरकला आणि नंतर गंभीर स्वरूपांचे प्रश्न चौघा मुत्सद्यांपुढें श्रीमंत अमृतराव, होळकर,

फडणीस व फडके यांजपुढें उभे राहिले.

(१) ''दौलतीचा बंदोबस्त'' या प्रश्नावर दत्तक घेणें अगर दुसरें कांहीं ठरविणें तें ठरवावें. अमृतरावाचा मुलगा विनायकराव हा कैलासवासी सवाई माधवरावसाहेबांचा दत्तक पुत्र आहे असें समजून आपण बाळाजी माधवराव या नांवानें राज्य कारभार चालवावा. या योगानें बाजीरावसाहेब आपोआप पदभ्रष्ट होतात. लोकांचाही त्यात संतोषच होईल आणि बाजीराव यांचे पाठीराखे जे इंग्रज त्यांच्याशीं लढण्याचा प्रसंग आल्यास सर्व मराठे मंडळांचे सहाय मिळवितां येईल.

(२) शिंद्यांचे पारिपत्य करण्याबद्दल आणि त्यांचे वर्चस्व पेशवे दरबारांतून कमी करण्याबद्दल श्रीमंत अमृतराव पेशव्यांनीं एक कोटीचा करार पूर्वीच केला होता. त्यांस अनुसरून यशवंतराव महाराजांनीं मोठें सैन्य नोकरीस ठेवून दक्षिणेंत येण्याचे एक प्रकारें धाडसच केलें. महाराजांनीं आपली कराराची बाजू सत्य केली तेव्हां श्रीमंत अमृतराव पेशव्यांनी कराराची आपली बाजू पूर्ण करावी म्हणून यशवंतराव महाराजांनीं आग्रह धरला. दत्तकासंबंधी श्रीमंत अमृतराव मुग्ध राहिले. दुसऱ्या प्रश्नावर अमृतराव आणि त्यांचे अनुयायी आधीच श्रीमंत पेशवे आणि शिंदे यांचे पट्यांनीं हलाखींत आले होते. कोटीचा प्रश्न कांहीं लाखांवर अमृतरावांनीं तात्पुरता सोडविला. यशवंतराव महाराजांस हा प्रश्न सुटल्यासारखा वाटला नाही. पैशाच्या हलाखीखालीं यशवंतराव महाराजही हैराण होऊन गेले होते आणि हा प्रश्न त्यांस निकडीचा वाटूं लागला होता. तोच प्रश्न आता दिरंगाईवर न टाकतां, हातात घेऊन निकाल करणें यशवंतराव महाराजांस आवश्यक वाटू लागले. मुत्सद्यांच्या खलबतांत ''पुणें शहरापासून पंचवीस लाखांची पट्टी वसूल करावी आणि तूर्त होळकरांची अडचण भागवावी'' असें सर्वानुमते ठरले. या पट्टीच्या वसुलाची सर्वाध्यक्षता श्रीमंत पेशवे यांच्या तर्फेने पुण्याचे सध्याचे कारभारी हरीपंत भावे या गृहस्थाकडे देण्यांत आली आणि वसुलीच्या मदतीस होळकरांकडील नागो जिवाजी, हरनाथसिंग आणि सेखजी या तीन सरदारांची योजना झाली. होळकरांची थोडीशी पठाणी फौजही हरीपंत भावे यांच्या दिमतीस देण्यांत आली. ता. ७ डिसेंबर रोजीं ही व्यवस्था मुकरर झाली.

साताऱ्यास कोणी वजनदार सरदार पाठवून तेथून वस्त्रें आणावी वगैरे प्रश्नांचा यशवंतराव महाराजांनीं एकदोन बैठकीत पाठपुरावा केला होता. पण त्या प्रश्नाची तितकी तातडी श्रीमंत अमृतराव पेशव्यांना वाटेना. ते कांहीं काळपर्यंत या प्रश्नासंबंधीं मुग्धच राहिले. श्रीमंत अमृतराव हे श्रीमंत बाजीरावसाहेबांस वरचेवर निकडीचीं व विनवणीचीं ''तुम्ही उगीच घाबरून कुठेतरी भडकून जाऊं नये. खुद्द तुमच्याशीं आमचे वैर कोणतेंही नाहीं. आमचे तुम्हाला भय कां वाटतें हेंच आम्हाला समजत नाहीं. तुम्ही खुशाल पुण्यास परत यावे आणि पूर्वीप्रमाणें राज्याचा उपभोग घ्यावा.'' अशा अर्थाचीं पत्रें गेलीं. त्यावर श्रीमंतांकडून उत्तरे आली त्यात एकच मजकूर होता ''होळकरांसारख्या उपटसुंभ्याच्या नादीं लागण्यांत तुमचा परिणाम लागणार नाहीं. तुम्ही इकडे आम्हाजवळ महाडास यावें, तुम्ही आम्ही मिळून एखादी मसलत उभी करून होळकरांचा नाश करूंया.'' होळकरांच्याही पत्रास ''तुम्हांस

जें काय सांगांवयाचे असेल ते देशमुख व भागवत या उभयतांस समजून सांगांवें आणि त्यांची कशी ती समजून करून त्यांना आम्हाकडे पाठवावें. हे दोन गृहस्थ आम्हाकडे परत आल्याशिवाय आम्हाला तुमच्याशीं कोणत्याही बाबतींत बोलावयाचें नाहीं.'' दोघा मुख्य मुत्सद्यांस अशा अर्थाची पत्रें आल्यावर मुख्य गादीची व्यवस्था श्रीमंत अमृतरावांचा मुलगा यांस दत्तक देऊन ''विनायक माधवराव यांचे नावांचा शिक्का सुरू करण्याचें ठरलें.''

यशवंतराव महाराज यांनीं सातारियास जाऊन विनायक माधवराव यांचें नांवें राज्याची वस्त्रें आणावी. बरोबर राजश्री मोरोबा दादा यांचे पुत्र नाना व अन्याबा फडके होळकरांबरोबर सातारियास जावे. असें निश्चित होऊन यशवंतराव महाराज बाहेर पडले. पुण्याहून ते कोंढव्यावर आले. तेथें सायंकाळीं वांती होऊन ज्वरांश आला. दुसरें दिवशीं ज्वर विशेष झाला तेव्हां आपल्या तर्फेचे फत्तेसिंग मान्यांची तयारी त्यांनी केली आणि सरकारतर्फे त्रिंबकराव पेठे यांची नेमणुक झाली. तेथून दुसरें दिवशीं रास्त्यांच्या वाड्यांत राहण्यास यशवंतराव महाराज आले. फत्तेसिंग माने ठरल्याप्रमाणें वीस तोफा वगैरे पलटणें फौजेसुद्धां सातारियास रवाना झाले. पेठे एका दिवसाच्या अंतराने गेलें. पुण्याहून निघतांना मान्यांचा बहुमान होळकरांनीं केला तसाच श्रीमंत अमृतरावांनींही केला. होळकरांनीं चौघडा दिला आणि खुशीने बार पन्नास केलें. श्रीमंत अमृतरावांनीं मान्यांस कचेरीच्या डेऱ्यांत गादीवर बसण्याचा मान, मोरचलाची चवरी, साहेब नौबत, खासे हत्ती व घोडे असा बहुमान केला. अशा बहुमानानें माने निघाले आणि साताऱ्यास ते आले. रस्त्यांत रामचंद्रराव घोरपडे आणि चतुरसिंग भोसले आपआपल्या फौजानिशीं मान्यांस येऊन मिळाले. साताऱ्यास आल्यावर मान्यांनीं वस्त्रांची मागणी केली. त्यावर छत्रपतींनीं आपल्या अटी कळविल्या.

(१) पूर्वी बाळाजी बाजीराव ह्यांचे कारकीर्दीत छत्रपतींच्या खासगी खर्चाकरितां स्वतंत्र मुलूख तोडून देण्यांत आला आहे. त्या मुलखावर सर्वस्वी छत्रपतींची सत्ता चालावी असेंही ठरले आहे. पुढें पेशव्यांनीं ही व्यवस्था मोडून, हें संस्थान आपल्या वहिवाटीत घेतलें आणि आम्हाला नजरबंदींत ठेविलें आहे. याप्रसंगीं आमचें संस्थान आमच्या ताब्यांत देण्यांत यावे.

(२) बाजीराव पेशव्यांशीं आमचे आतापर्यंत वेळोवेळीं तंटे झाले त्याप्रीत्यर्थ आम्हाला फौज ठेवावी लागली. तिचें देणें अजून द्यावयाचें आहे. पुणें दरबारानें आतां हें देणें देऊन आम्हाला कर्जमुक्त करावें.

(३) वस्त्रें देण्याबद्दल आमचे मानपान पेशव्यांकडून यावयाचे असतात ते शिरस्तेप्रमाणें देण्यांत यावे.

या अटीवर यशवंतराव महाराज व श्रीमंत अमृतराव यांनीं उत्तरें दिलीं तीः

(१) आतापर्यंत सातारा संस्थानची वहिवाट पेशव्यांकडे आहे ती तशीच यापुढें कायम राहील. त्या व्यवस्थेत कोणताही फेरबदल केला जाणार नाहीं.

(२) महाराजांच्या शिबंदीच्या देण्याशीं आमचा कांहीं संबंध नाहीं. ज्यांच्याकडे आतापर्यंत संस्थानची वहिवाट होती त्यांच्याकडून म्हणजे बाजीरावसाहेब पेशवे यांजकडून

हें देणें छत्रपतींनीं वसूल करून घ्यावें.

(३) छत्रपती आणि मातोश्री राणीसाहेब यांचे मानपान आम्ही यथाशक्ती पाठविले आहेतच. छत्रपतींनीं कृपा करून यावर संतोष मानावा आणि आम्हाकडे वस्त्रें पाठवून द्यावीत.

याप्रमाणें उत्तरे देऊन श्रीमंत अमृतरावांनी कापड, जवाहीर व नगदी मिळून सुमारें लाख रुपयांचा ऐवज मानपानाबद्दल छत्रपतींकडे पोहोचता केला. परंतु एवढ्यानें त्यांचे समाधान झाले नाही. छत्रपतींनीं किल्ल्यावरून होळकर फौजेवर तोफा सुरू केल्या पण फत्तेसिंग मान्यांनीही चारपांच दिवस सतत मारा ठेवल्यानें समेटाचे बोलणें लाविलें. डिसेंबरच्या आखेरीस वस्त्रें हातीं येतांच मान्यांनी वेढा उठविला आणि पेठे वस्त्रें घेऊन पुण्यास आले. ह्या वेळेपर्यंत अनेक मुहूर्त चुकले आणि ता. ५ जानेवारी इ. स. १८०३ हा मुहूर्त ठरला. वस्त्रें हाती आली आणि प्रश्न उद्‌भवला कीं वस्त्रें आधीं कीं दत्तविधान आधीं. सारांश, यशवंतराव महाराजांनीं अट्टाहास धरून गादीची व्यवस्था करण्यासाठीं तनमनधनाने जी झीज सोसली ती यशास न येतां आपआपसांत लढाया झाल्या. पैसे आणि माणसें गमाविली. दत्तविधान झाले नाही आणि श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं कांहीं निराळाच प्रकार केला, तो आतां पहावयाचा आहे.

श्रीमंत अमृतराव व महाराज यशवंतराव यांनीं श्रीमंत बाजीरावसाहेबांस वेळोवेळीं पुण्यास येण्यासंबंधीं विनवून पाहिले. कुंजीराच्या कुमंत्रापुढें ही पत्रें निरर्थक झाली. बरोबरच्या मंडळीच्या हालअपेष्टा फार झाल्या. मंडळी श्रीमंतांस सोडूनही गेली. प्रत्यक्ष बंधू चिमणाजी अप्पांनीही विनविलें पण हे सर्व व्यर्थ गेलें. तेव्हां शेवटी एकच मार्ग राहिला. त्यांना जबरदस्तीने घेऊन येण्याकरितां कोकणांत होळकरांच्या फौजा रवाना झाल्या. त्या पांच घाटांनी कोकणांत उतरल्या. श्रीमंत उभयतां महाडास होते. ते फौजा येतात हें समजल्यावर महाडाहून रायगडास गेले. तेथें त्यांचा हुकूम चालेना. श्रीमंतांबरोबर कुंजीर होतेच त्यांनीं ''आतां येथून इंग्रजाकडे जावें'' असा सल्ला दिला. चिमाजी अप्पांनीं मत दिले कीं ''कुंजीराचे मसलतीनें चाललों त्याचा परिणाम ठीक झाला नाही. इंग्रजाचे कैदेंत पडावें ते पक्षीं पुण्यास वडील रावसाहेब आले आहेत तेथेंच जावे.'' होळकरांचे सैन्याचे पाठोपाठ मीरखान पठाण पांच सहा हजार फौजांनिशी महाडच्या रोखें चालून जाऊं लागला. कावळ्याच्या घाटांत दोन्ही फौजांची लहानशी चकमक होऊन होळकरांची फौज थोडी मागें हटली. बाकीच्या ठिकाणीं या टोळ्यांनीं श्रीमंत बाजीरावसाहेबांची वाट अडवून धरली. पुण्याचे मुत्सद्यांचे बेत बाजीरावसाहेबांसही कळत होते. दत्तकाची कथा त्यांचे कानावर आली होती. श्रीमती यशोदाबाई म्हणजे कै. सवाई माधवरावांचें कुटुंब यापूर्वीच रायगडावर कैदेत होत्या. आतां त्यांचा अधिक बंदोबस्त करण्यासाठी बाजीरावसाहेबांनीं गोपाळपंत कुंजीर आणि नारोबा औटी या दोन सरदारांची नेमणूक केली. रायगडावरून श्रीमंत पेशवे बीरवाडीस परत आले आणि तेथें त्यांनीं आपल्या जवळच्या सर्व लोकांस निरोप दिला, आणि इंग्रेजांकडे जाण्याची जल्दी चालविली. होळकरांचे फौजेस घाबरून ता. २५

नोव्हेंबरला बाजीरावसाहेब सुवर्णदुर्गास गेले. खंडेराव रास्ते खर्चाची पुरवणी करीत बरोबर होते. महागिऱ्यातून (होडीतून) जलमार्गे जाऊन तेथून पायमार्गे हरणाईस गेले. जातांना सरदार पानशे, विंचूरकर, पुरंधरे, बिनीवाले वगैरे मंडळीस वाट फुटेल तिकडे जावें असें त्यांनीं सांगितलें. तेथून स्वारी रेवदंड्यास गेली. तेथें चिमाजी अप्पा आजारी झाले. येथेंच बाबुराव आंग्रे श्रीमंतांस भेटले आणि पुण्यास जाण्यासंबंधीं पुष्कळ आग्रह धरिला पण श्रीमंतांनीं तिकडे दुर्लक्ष केलें. यापुढें बाजीरावसाहेबांनीं आपलीं मुलें माणसें सुवर्णदुर्गावर ठेविलीं.

पुण्याच्या बातम्या जशा श्रीमंत बाजीरावसाहेबांस कळत होत्या तशाच त्यांच्याही हालचाली पुण्यातींल मुत्सद्यांस वेळोवेळीं कळत होत्या. सैन्य तर या मुत्सद्यांनीं आधीं पाठविलेंच होतें. श्रीमंत बाजीराव पेशव्यांचा विचार पुन्हा शिंद्यांकडे वळला आणि तो विचार तितकाच इंग्रजाचे बाजूस आहे हें त्या मुत्सद्यांस कळलें. यशवंतराव महाराज हे नेहमी सावधान असत. अमृतराव पेशवे यांस पुण्यांत आणण्यांत जशी त्यांनीं सावधानता व मुत्सद्देगिरी दाखविली त्याप्रमाणें बाजीरावसाहेबांच्या प्रत्येक डावास ते प्रति डाव आतांपर्यंत टाकीत आले. शिंद्यांकडे बाजीरावसाहेबांचें धोरण आहे हें लक्षांत येतांच त्यांनीं शिंद्यांस पत्र पाठविलें. ते येणेंप्रमाणें. ''पेशवे विनाकारण घाबरून कोकणांत पळून'' गेले आहेत. तेथून ते इंग्रजांच्या आश्रयास जाणार, ही गोष्ट आतां स्पष्टपणें दिसत आहे. एकदां इंग्रजांचा पाय मराठी राज्यांत शिरल्यावर मग कुठले शिंदे आणि कसले होळकर अशी स्थिती प्राप्त होईल. प्रसंग आणीबाणीचा आहे. पूर्वीच्या सर्व गोष्टी विसरून आतां तरी तुमचे व माझे सख्य होऊ द्या. आपणा दोघांचा समेट झाला तरच मराठी राज्याचा तरणोपाय आहे. मुख्य गोष्ट पेशवे इंग्रजाचे आश्रयास न जातील असें उपाय तुझी ताबडतोब अंमलात आणा'' महाराज यशवंतरावांचे हें पत्र त्यांच्या औदार्याची व मुत्सद्देगिरीची साक्ष पटवते. यावर शिंद्यांनीं जो मार्ग काढला तो पाहू या. यावेळीं घाटग्यांचे प्राबल्य विशेष होते. शिंद्यांकडून पेशव्यांस पत्रें गेलीं कीं,''आपण महाडास जाऊन जीव बचावलात हें ठीकच केलें. यापुढें इंग्रजांचे आश्रयास जाण्याचा आपला विचार आहे असें दिसतें. एकदा आपण इंग्रजांचे जाळ्यांत गुरफटला म्हणजे त्यांतून आपली सुटका केव्हांही व्हावयाची नाही. होळकरांच्या पारिपत्याची एवढी काय मातब्बरी आहे कीं ज्यासाठीं आपण परकियांचा आश्रय पत्करावा? होळकरांचे नाश करण्याचे काम आमचे हातून अजूनही होण्यासारखें आहे. आतां आम्ही त्या कामासाठी दक्षिणेंत मुद्दाम येत आहोत ही दोन पत्रें पाहिली म्हणजे इंग्रजांकडे पेशव्यांनीं जाऊं नये, असेंच शिंदे आणि होळकर ह्या दोघांचेही एकमत. या हेतुस्तव होळकर मागील सर्व गोष्टी विसरून शिंद्यांशीं सहकार्य करण्यास पुढें हात करतात. पण शिंदे तो हात झिडकारून घरात यादवी माजवून परक्यास घराबाहेर ठेवण्यास पाहतात.

शिंदे पत्र पाठवूनच स्तब्ध राहिले नाहींत. त्यांनीं आपल्या सरंजामांत कलमजारी सुरू केली. उज्जेनीहून तळ हलविला आणि आपला मोर्चा थेट बरहाणपुराकडे वळविला. यजमानाची ही दृष्टी पाहतांच खानदेशांत असलेले त्यांचे फौजबंद सरदार गोपाळराव चिटणीस, पुण्याच्या लढाईतून पळालेले सदाशिवराव बक्षी, नगरास पूर्वीच असलेली फौज

आणि रामचंद्र भास्कर यांनीं उज्जेनीहून आणलेली फौज बरहाणपुरास एकत्र झाली. सारांश, यशवंतराव महाराजांनीं मराठी साम्राज्याच्या संरक्षण व संवर्धनासाठी स्वतःस विसरून उदार धोरण शत्रूमित्रांपुढें मांडिले असतां ते कोणाच्याही गळीं न उतरून स्वतःच्याच बचावाची पाळी आतां त्यांजवर येऊन बेतली. शिंद्यांच्या ह्या एकत्र जमलेल्या सैन्यानें धुळें, सोनगीरपर्यंत होळकरांचा अंमल उठवून लाविला; आणि वऱ्हाडचे बाजूस अजंठ्याचे घाटापर्यंत होळकरांचा मुलूख मारून ताराज केला. हा असा प्रकार झाला मराठी साम्राज्याच्या दोन आधारस्तंभांचा. तिकडे पुण्यास वस्त्रधारण आधीं कीं दत्तविधान आधीं हा वाद माजून मुख्य मुसळ केरांतच आणि कोकणांत पेशवे इकडून तिकडे हेलखावे खात आहेत. जलचरांनीं हे सर्व समजून घेऊन थोड्यांच अवधींत कार्य साधले तें असें.

याच सुमारास कर्नल क्लोज रेसिडेंट होता. त्यानें ज्या दिवशीं यशवंतराव महाराजांस आदरातिथ्य व आहेर कंपनी सरकारचे वतीनें करून खूश केलें होतें व श्रीमंत अमृतरावांसही कोणत्याही प्रकारें दुखविले नाही, त्या दिवशीं ''तुम्ही एकदम पुणें सोडून निघून या तेथें राहूं नका. असा मला वरिष्ठांचा हुकूम आला आहे तेव्हां मला येथून गेल्याशिवाय गत्यंतरच नाही, माझा निरूपाय आहे'' असें श्रीमंत अमृतराव व महाराज यशवंतराव यांस सांगून त्यानें पुणें सोडलें. श्रीमंत बाजीरावसाहेब बाणकोट येथें केनेडी यांस येऊन भेटले. पेशवे, रेसिडेंट क्लोज आणि कर्नल पामर यांच्या भेटी मुंबईस झाल्या. बाजीरावसाहेब तेथील मेजवानी घेऊन ता. ६ डिसेंबर इ. स. १८०२ रोजीं शेलक्या लवाजम्यासह वसईला येऊन पोंहचले. इंग्रज रेसिडेंट कर्नल पामर तेथेंच येऊन भेटला. श्रीमंत बाजीरावसाहेब पुण्यास न येतील तर निदान त्यांनी आपली हद्द सोडून इंग्रजाचे हद्दीत न जाणें होळकर व अमृतराव यांस इष्ट वाटत होतें. जोंपर्यंत जरीपटका घेऊन आपल्या हद्दीत फिरत आहेत तोंपर्यंत त्यांचा पेशवाईवरील हक्क नष्ट होत नव्हता. ही गोष्ट बाजीरावही जाणून होते म्हणून शक्यतोवर आपली हद्द सोडून न जातां व वसईसही आपल्या हद्दीत राहून त्यांनी कंपनीच्या रेसिडेंटांमार्फत मुंबईच्या गव्हर्नराशीं ''पगारी मैत्रीच्या तहाची'' वाटाघाट सुरू केली. ती वाटाघाट दहाबारा दिवस चालून ता. ३१ डिसेंबर रोजीं इंग्रजांची फौज मदतीस घेण्याचा वसईचा तह होळकरांच्या धाकानें आणि त्यांच्या परिपत्याकरितां सर्व मराठा मंडळाच्या मनाविरुद्ध श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे यांनीं त्यावर आपली सही शिक्का करून पुरा करून दिला आणि कंपनीचे मित्रत्व ऊर्फ मांडलिकत्व पत्करले. या तहाच्या अटी सुरूच येणेंप्रमाणें:

(१) एकाचे शत्रुमित्र तेच दुसऱ्याचे शत्रुमित्र मानणें. (२) इंग्रजांनी स्वतःचे मुलखाप्रमाणेंच बाजीरावांच्या मुलखाचें संरक्षण करणें. (३) त्यांसाठी सहा पलटणें व तोफा युद्धोपयोगी सामानसह बाजीरावाचे मुलखांत ठेवणें. (४) खर्चासाठी सव्वीस लक्ष नक्त उत्पन्नाचा मुलुख इंग्रजांस कायम देणें. (५) इंग्रजाशी बिघाड करणाऱ्या दुसऱ्या टोपकरांस पेशव्यानें आपले राज्यांत न ठेवणें. (६) निजाम वगैरे हर कोणाशी बाजीरावाचा तंटा असल्यास त्याचा निकाल इंग्रज बहादूर करतील तो त्यानें मान्य करणें. (७) गायकवाडानें इंग्रजांशीं दोस्तीचा तह केला होता त्यांस बाजीरावानें मान्यता देऊन त्याचा गायकवाडांशीं

दावा असेल तर त्यांत इंग्रज बहादुरांचा निकाल मान्य करणें. (८) कारणपरत्वें सहापेक्षां जास्त पलटणें लागल्यास इंग्रजांनीं बाजीरावास व बाजीरावानें इंग्रजांस देऊन एकमेकांचे सहाय करावे. (९) एकमेकांनीं आगाऊ कळविल्याशिवाय परदरबाराशीं सवाल जबाब न करणें. (१०) सुरत शहर व तेथील आपले सर्व हक्क तहांत बाजीरावानें इंग्रजांस लिहून दिले. ह्या अर्थाच्या इतर किरकोळ अटीही होत्या.

ही तहाची बातमी लगेच पुण्यास आली. ता. २ जानेवारी इ. स. १८०३ रोजीं श्रीमंत अमृतराव, महाराज यशवंतराव, मोरोबा फडणीस व बाबा फडके एकत्र झाले. त्यावेळीं महाराज यशवंतराव म्हणाले, ''बाजीरावानें राज्य बुडविले. इंग्रज आतां म्हैसूरचा प्रकार पुण्यास करणार. आपण प्रथम शिंद्यांस विचारावे कीं तुमच्या सल्ल्यानें हा प्रकार झाला कीं काय ? शिंद्यांनीं त्यांस कबुली दिली नसेल तर आपण सर्वांनीं एक होऊन इंग्रजांशीं सामना करावा.''

यशवंतराव महाराजांनीं जे भविष्य केलें तें खरेंच ठरले आणि याउपर मराठेशाहीची बाजू कशी फुटत गेली हेंच आपणास आतां पहावयाचे आहे. ता. १२ जानेवारी रोजीं म्हणजे वरील वाटाघाटी नंतर आठदहा दिवसांचें आंतच श्रीमंत पेशवे बाजीरावांनीं आपले बंधूस म्हणजे श्रीमंत अमृतरावास लिहिलें कीं ''यशवंतराव होळकर वगैरे कित्येकांनीं गैरमार्गांत पडून बंडखोरी आरंभली आहे. त्याची संगत तुम्ही ताबडतोब सोडून पंधरा दिवसांत आम्हास येऊन भेटा. कोणतीही सबब सांगूं नका व बरोबर विनायक बापूस आणा.'' त्याच तारखेस यशवंतराव महाराजांनीं श्रीमंत बाजीराव पेशव्यांस पत्र पाठवून कळविलें कीं ''शिंद्यांच्या बरोबरीने होळकरांची सरदारी आपण कायम ठेवावी. खंडेराव होळकरास सरंजामाची वस्त्रें द्यावी आणि त्यांस आमची हवालीं करावें. आपणास माझा विश्वास वाटत नसेल तर मी एकटाच आपले भेटीस वसईस येतों'' कर्नल क्लोज यांनीं यशवंतराव महाराजांस कंपनीदोस्त म्हणून बहुमानयुक्त मेजवानी दिल्याचें वर आलेच आहे. त्याच क्लोजसाहेबांनीं वसईचा तह घडवून आणल्यावर यशवंतराव महाराजांस कळविले ''श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं आमच्याशी रीतसर करार करून आमची लष्करी मदत स्वीकारली आहे. तो करार पार पाडणें आमचे कर्तव्य आहे. तुमची व बाजीरावसाहेबांची गोडी करून द्यावी अशी गव्हर्नर जनरलसाहेबांची फार फार इच्छा आहे. बाजीरावसाहेबांचा लोभ संपादन करण्यास आम्ही तत्पर आहोत असें तुम्ही अनेकवार बोलून व लिहून कळविलें आहे. ती गोष्ट खरी करून दाखविण्याचा एकच मार्ग आहे. तो हा कीं तुम्ही पुणें सोडून फौजेसह आपल्या हद्दींत निघून जावें. तुम्ही पुण्यांत राहिल्यास तुमचा आमचा बिघाड होण्याचा प्रसंग येईल. याचा नीट विचार व्हावा''.

प्रसंग तर असा येऊन ठेपला पण यशवंतराव महाराजांचे धैर्य खचलें नाही. भोसल्यांचे कारभारी पुण्यांत होते त्यांची भेट होळकरांनीं घेऊन बोलण्यांत आणिलें कीं ''शिंद्यांसीं आमचा बेबनाव, त्यांचा शह आमचे मागें आहेच. पंतप्रधानाशीं तर लढाईच होऊन ते वसईस गेले. ते व इंग्रज आणि सेनासाहेब एक झाले असतां अवघड. शिवाय खंडेराव

होळकर शिंद्यांचे कैदेत बरहाणपुरीं आहेत. ते सुटून यावेत, याजकरितां झाले ते समर्थ, परंतु आतां तरी तुम्ही मध्यंतरीं येऊन आपसातील घरची खलश मिटवावी, सफाई होऊन एकवाक्यता करावी. त्यांसमयीं उभयतां कारभारी यांनीं प्रसंगोपात प्रेमाची भाषणें करून स्नेहाचा विचार ठरवून, होळकरांचा मनोदय रक्षून त्वरा करून चैत्रमासीं नागपुरास आले.'' याच उद्देशानें शिंद्यांचा वकील या वेळी नागपुरास येऊन इंग्रजांचे पारिपत्याचा मजकूर बोलूं लागला. मराठ्यांचे या तऱ्हेचे बेत आणि बोलणी चालू असतां कंपनी सरकार स्वस्थ बसलें नव्हतें. वसईचा तह पुरा होतांच लार्ड वेलस्ली गव्हर्नर जनरलानें मराठ्यांस कब्जांत आणण्याकरितां ठिकठिकाणीं आपल्या फौजा तयार करण्याचा उद्योग चालविला. पुण्यावर मोहीम करण्याची तयारी आधी कित्येक वर्षे ते करीत होते. (१) वाघावर आलेली फौज वीस हजार त्यांनी हरीहर येथें ठेवून तिची तयारी कडेकोड केली. या फौजेवर मद्रासचा सेनापती स्टुअर्ट हा मुख्य होता. (२) दुसरी फौज निजामाचे हद्दीवर पारिंडा येथें जमली. यात खुद्द निजामाचा व त्याच्या तैनातीस असलेल्या इंग्रजांचा मिळून एकंदर तेवीस हजार जमाव होता. यांचा अंमलदार कर्नल स्टिव्हनसन होता. (३) मुंबईस कलकत्याहून आलेले तीन हजार लोक कर्नल मरेच्या हाताखालीं होते. (४) सेनापती लेक याच्या हाताखालीं कानपुरास जमाव होत होता. चारी ठिकाणीं मिळून एकंदर इंग्रज फौज साठ हजारावर होती. लार्ड वेलस्लीनें आपला धाकटा बंधू सेनापती वेलस्ली यांस सर्वाधिकारी नेमले. हे वेलस्ली ता.२० एप्रिल रोजीं पुण्यास दाखल झाले. तेथें सर्व शांतता आहे आणि पेशव्यांनीं आतां वसईहून निघण्यास हरकत नाही अशी सूचना जातांच ता. २७ एप्रिल रोजीं बाजीरावसाहेब आणि क्लोज् वसईहून निघाले. या त्यांच्या येण्यांत बाजीरावसाहेबांचे मते दिरंगाई होत आहे असें वाटून त्यांनी शिंद्यांस लिहिलें कीं आम्ही इंग्रजाशीं करार नाईलाज होऊन केला आहे. तरी तुम्ही सत्वर येऊन शत्रूचें निवारण करावें. त्याप्रमाणें फेब्रुवारीच्या मध्यावर शिंदे बरहाणपुरास येऊन पोहोचले. शिंदे बरहाणपुराहून एकदम पुढें पुण्यास येते तर श्रीमंत अमृतराव व महाराज यशवंतराव यांची त्यांची भेट व एकवाक्यता झाली असती. पण शिंद्यांच्या पोटांत होळकरांची भीती. पांच महिनेपर्यंत शिंदे बरहाणपुरास राहिले पण कोठेंच कांहीं कामास स्वरूप येईना. सारांश, मराठे मंडळांत जूट व्हावी असें सर्वांचे बोलणें पण करण्यांत कोठेंच गांठ पडेना. तेव्हां वसईहून निघालेले क्लोज व बाजीरावसाहेब पेशवे ता. १३ मे इ. स. १८०३ रोजीं पुण्यांत प्रवेश करून ''हिज हायनेस बाजीराव पंडित प्रधान बहादूर पेशवाई पदावर प्रविष्ट झाले. तत्पूर्वीच ता. ३१ मार्च रोजीं श्रीमंत अमृतराव सर्व असबाब घेऊन जुन्नरजवळ जोरवे येथें गेले होते. ता. २० एप्रिल रोजीं होळकर चांदवडास येऊन राहिले होते. याप्रमाणें पुण्यास जमलेल्या चार मुत्सद्यांचे चार दिशांस प्रयाण होऊन श्रीमंत बाजीरावसाहेब पुन्हा गादीवर इंग्रजांचे मांडलिक होऊन स्थानापन्न झाले. महाराज यशवंतरावांचे स्वतः संबंधाचें, पुणें दरबारसंबंधाचें आणि मराठा मंडळासंबंधाचें सर्व उदार धोरण जेथल्या तेथेंच विरून गेले आणि स्वसंरक्षणाचाच प्रश्न आता त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला. तो त्यांनीं कसा सोडविला हे पुढील प्रकरणांत पाहूंया.

चालू प्रकरणांत जी पत्रें आम्हास महत्त्वाचीं दिसली त्यांचा सारांश लेखांकाने खालीं खुलासा करीत आहोत. लेखांक १ – त्यावेळची राज्यकारभाराची शिस्त दर्शवितो. महेश्वर किल्ल्याचे संरक्षण करण्यासाठी काय व्यवस्था केली होते हे तर दिसतेच पण लष्करी शिक्षण आपले लोक कितपर्यंत घेऊ शकत हेही लक्षांत येते. समुद्रातील किल्ल्याचे वर्णन पेशवे दप्तरांतील वसईच्या दोन भागांत वाचावयास मिळते. लेखांक २ – अत्यंत उदार धोरण धरून ही केवळ तत्त्वनिष्ठेंत गुरफटून न राहणारे यशवंतराव महाराज आपले घरचे दोषही पाहू शकतात. हे दोन्ही गुण एकत्र असणे दुर्लभ आणि म्हणतात, ''समेटाची भोसल्यावर मुखत्यारी, कसें ठरवितात त्याप्रमाणें समजून कर्तव्य ते करावयास येईल.'' सर्व बोलके निघाले आणि कर्तव्य काय ते महाराजांसाठीच शिल्लक राहिले. लेखांक ३, ४ – सोबत्यांसंबंधाच्या व्यवहाराचे आहेत. गंभीर विषयातही महाराजांचा अधिकारयुक्त विनोद बघण्यासारखा आहे. लेखांक ५ – ''सरकार कामांत उभयतांनीं जपावें. नुकसान दिसून आल्यास तेथील बंदोबस्त आम्हीच करावा, आपण करूं नये असें नाहीं'' हे वाक्य आणि कै. देवी अहिल्याबाईंच्या कारकीर्दीतील वसाहती वाढविणाऱ्या कमाविसदारांची पत्रें यांची तुलना केल्यास अधिकारी नोकरवर्ग वृत्तीने किती खालावला होता याची कल्पना करितां येते. जो इशारा देणेंची मातोश्रीसाहेबांस गरज पडली नव्हती ती महाराज यशवंतराव यांस पडली याचे हे पत्र दर्शक आहे. अंतरंगाची थोडी बहुत चुणुक लेखांक १ ते ५ यांत दिसून येणारी आहे.

(१) लेखांक ता. २–३–१८०३ **(होळकर सरकार रेकॉर्ड)** यादी मोजदाद तोफखाना तटबंदी वगैरे किल्ले महेश्वर विद्यमान राजश्री बाळाजी भास्कर छ ७ जिल्काद शके १७२४

१० तोफा सुमारी १५ पैकीं वजा जीनसाहेब फिरंगी याजकडील कंपूत ५ बाकी किल्ले मजकुरीं बुरजावर वगैरे सुमारी १० यांचा तपशील.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | दक्षिणेस श्रीगणपतीचे जवळ लोखंडी. | १ | ईशान्य कोन पिराचे बुरुजावर. |
| १ | उत्तरेकडे तटबंदी बुरुजावर लोखंडी. | १ | दिल्ली दरवाजा उजवे बाजूस तटबंदी बुरुजावर. |
| १ | कमानी दरवाजा तटबंदीस फेलीवर पंचधातूची. | १ | उत्तरेकडील पिराचे बुरुजावर. |
| १ | कमानी दरवाजा उजवे बाजूस तटबंदी पंचधातूची. | १ | आग्नेय कोन बुरुजावर तटबंदी. |
| १ | तटबंदी बुरुजावर मध्यम तोफ लोखंडी. | १ | दक्षिणेकडील बंगाली बुरुजावर लोखंडी. |
| .... | | ... | |
| ५ | | ५ | |

३० भालेकरी दरवाजावर. १ जंबुरेची नळी, ६ जंबुरेनळ्या, १ सिंगाडे.
२१ जेजालीसुमारी. १ गोळे सुमारी ४००
१ नागरियाची जोडी लोखंडी श्रीगणपतीमागें.
५ गंजिफागाड्या दिल्ली दरवाजापुढें ४ दर २२ गाडी १ दर २८
५ जंबुरे सुमारी ५ बंगाली बुरुजावर ३ व मांडळखोर दरवाजावर २
२ नैऋत्यकोणी बुरुजावर जेजाली सुमारी दोन.
...
५३

येकुण त्रेपन्न दागिने आहेत. शिवाय जंबुरे १०६ पैकीं सरकारांत पाठविले २५ पंचवीस. बाकीं आहेत व गोळे वगैरेची मोजदाद करून दिलीच नाही. ते करून लिहून घ्यावी.

(लेखांक २) इ.स.१८०३ (यशवंतराव महाराजांचा पत्रव्यवहार) तांब्राचे सहवासांत श्रीमंत स-बंधू जाऊन पडल्यामुळें त्यांचे हातें दस्ताऐवज लिहून घेणें त्यांजला तर कर्तव्यच होते, परंतु अनायासें निमित्य होतें. करहाड प्रांतीं पलटणें तुरक स्वार येऊन पोंहचलें. पुण्यास दाखल होतीलसे दिसतें. सोबत्यांकडून व भोसल्याकडून पत्रें येतात कीं सरकारांतील समेट होईल. तूर्त जागा सोडूं नये. पुण्यासच असावे. जडभारी पडूं लागल्यास फौज पाठवूं निदान आम्ही येऊं. याचे विचार पाहतां अद्यापी कलह मिटला नाही, तो तांब्राशीं मुकाबला करणें योग्य नाहीं. कलमबंदीप्रमाणें मुद्दे हाशील होऊन बंदोबस्त झाल्यानंतर एकदिलानें कांहीं अवघड पडू पावणार नाही. श्री लक्ष्मीकांताचे कृपेने जें घडून येईल ते खरें. नबाबाचे सूत्र तांब्राशी लागलें आहे, आपलेकडील पठाणास फोडूं पाहतात. परंतु साधत नाहीं. कारस्थानें चाललींच आहेत. स्वारी तूर्त चांदवड खानदेशांत येत आहे. समेटीची भोसल्यावर मुखत्यारी, कसें ठरवितात त्याप्रमाणें समजून कर्तव्य तें करावयास जाईल.

(लेखांक ३) महाराजांचे भारमल होळकरांस पत्र. ता.१-४-१८०३ सोबत्याकडोन सोडचिठ्या महाल, प्रांताच्या श्री लक्ष्मीकांताच्या कृपेनें व कै. मातोश्री अहिल्याबाई साहेबांचे व सुभेदारांच्या पुण्यप्रतापें लौकरच येतील.

(लेखांक ४ इ. स. १८०३) समेटाचें बोलणें लागल्यापासोन त्यांचे महालास इकडून कांहीं उपसर्ग लागूं पावला नाहीं यामुळें जपणेंच पडतें. आपल्या माहलीं जप्त्या होत्या त्याही उठवितात. तुम्ही दोन पलटणाचा जमाव करून महालाचा बंदोबस्त चांगला करून सोबत्याकडील मुलखांत कांहींएक तोशीस लागू न देतां बचाव करावा. आपली रयत जेथील तेथें आबाद होऊन लावणी दरोबस्त होय तो अर्थ करून कमाविसदार पाठविणें. ते जमा खर्चाची बेरीज दाखवितील असें न पाठविणें समजून खातरजमेचे पाठविणें.

श्रीम्हाळसाकांत चरणीं तत्परः तुकोजी
सुत यशवंतराव होळकर निरंतर

(लेखांक ५) ता. ९-१२-१८०३ (अस्सल पत्र, शिक्यासह देत आहोत) राजश्री भारमल दादा होळकर यांस स्नेहांकित यशवंतराव होळकर रामराम उपरी : तुम्ही सरकारांत पत्र पाठविले. संस्थान बडवाणी येथील बंदोबस्त हरनाथसिंह यांनीं मतकराकडे काम सांगोन करविला आहे. म्हणोन त्यांस संस्थानजागा सरकारची, आपणही सरकारचे, सरकार कामांत हरकोठेंही न्यून पडेल ते समयास जो जवळ असेल त्यानें सांभाळावें. याजकरितां हे पत्र लेखन केलें असें. तरी आम्ही मतकरांकडे संस्थानमजकुराचें काम सांगितले होतें. परंतु त्यांच्यानीं सरकारचाकरी बनून न आली. हरामखोर माणसास काय करावें. तेथील बंदोबस्त आम्हींच करावा, आपण करूं नये असें नाहीं. सरकार कामाचें नुकसान दिसोन आल्यास त्याचा बंदोबस्त करावा. असो. हल्लीं आम्ही स्वारीसमागमें लांब आलों. आपण संनिध आहांत ते पक्षी आपले तर्फेने कोणी संस्थानमजकुरीं पाठवून तेथील बंदोबस्त करावा. जमियतीचे काम पडल्यास सरकार बिजागडचे शिबंदीपैकीं जमियत घ्यावी. येविशयीं आपल्यास पेशजी लिहिलें आहे. सारांश, सरकार कामांस उभयतांनीं जपावे. ठाणें गौतमतपुरा, सणजी, येथींल वहिवाट पेशजीपासून तुम्हाकडे चालत आली त्याप्रमाणें हल्लींही सरकारांतून तुम्हाकडे चालवावयाचें ठरून कंचनसिंग यांजला पत्रें दिली आहेत त्याप्रमाणें खासगीकडील हरदूगांवची वहिवाट करावी. छ.२४ साबान. अर्बामया-तेनव अलफ. बहुत काय लिहिणें. मोर्तबसुद.



प्रकरण ७ वें

# श्रीमंत बाजीरावसाहेब पुण्यास परतल्यावर
## इ. स. १८०५ पर्यंत

कर्नल क्लोजसाहेब श्रीमंत बाजीरावसाहेबांना बरोबर घेऊन वसईहून पुण्यास आले. श्रीमंत ता.१३ माहे मे इ. स. १८०३ रोजीं शनिवारवाड्यांत पुनः आपले गादीवर बसले. एवढी हकीगत मागील प्रकरणाचे शेवटीं आपण पाहिलीच आहे. यापुढें गादीवर आरूढ जाहल्यावर ''दुरंदेश विचार करून मनसब्याचे चालीनें थरचे चिरे थरी बसविण्याचे'' श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं हातीं घ्यावें अशी इच्छा सुभेदार काशीराव होळकरांप्रमाणें इतर सरदारांचीही असणे साहजिक आहे. उत्तरेत शिंदे, होळकर, बुंदेले, वगैरेः मध्यभागांत नागपुरकर भोंसले व दक्षिणेंत रास्ते, पानशे, पटवर्धन वगैरे हे सर्व सरदार फौजबंद होते. ''दौलतेंत शत्रु प्रबळ शिरला. दौलत राहत नाहीं. आजपर्यंत स्वेइच्छा भोक्तृत्व झालें. हिंदुधर्म सर्वांनीं एकदिल होऊन राखावा. इंग्रजांनी स्वराज्यांत प्रसार करून दौलत आकर्षण केली. स्वधर्म व स्वराज्य राखावें हे चित्तांत धरावें.'' अशी मनोवृत्ती वरपासून खालपर्यंत सर्वांची झालेली. आजपर्यंत पुढारी मानलेले पेशवे ''नित्य श्रीःनित्यमंगलं'' या न्यायानें श्रीमंत सुखरूप आहेत. भोजनसमयीं रांगोळ्या वाजंत्रीत मन सदा दंग. लावण्या ऐकण्यांत रंगलेले, शागीर्दास पालखी, चौकीदारास जवाहीरी दागिने. याप्रमाणें रागरंग मुख्य यजमानांचा.'' बंधु अमृतराव यांस काम करण्याचा उरक चांगला. बाजीरावसाहेब पराभव पावून पुणें सोडून गेल्यावर यशस्वी महाराज यशवंतरावांच्या हातात पुणें आले. पण श्रीमंत अमृतरावांनीं पुण्यास येतांच अगदी अल्पावधीत मोठ्या युक्तीनें व गोडपणानें सर्व कारभार

आपले हातीं परत घेऊन यशवंतराव महाराजांस त्यांच्या योग्य दर्जावर ठेवून दिले. सर्व मराठा मंडळावर त्यावेळीं व त्यापूर्वीही त्यांची छाप चांगली बसली होती. सारांश, श्रीमंत बाजीरावसाहेब नाहीत तर नाहीत पण श्रीमंत अमृतरावांस परंपरा, वजन, अनुभव आणि कामाचा उरक या चार गुणांनी सर्व मराठा मंडळ जुटींत आणून परक्यांचा शिरलेला हात दौलतीतून काढतां जरी आला नसतां तरी त्यांनीं तो वाढूं दिला नसतां खास. पण तेंही घडलें नाही. सारांश, मराठा मंडळांत भावना थोडीबहुत जरी असली तरी त्यांस शास्ता मिळाला नाही. प्रतिपक्षास माणसें साधीच, साधनेंही बेताचीच पण शास्ता मात्र अद्वितीय व अपूर्व मिळाल्यामुळें त्या पक्षाची सरशी झाली हें सांगणें नकोच. हा शास्ता म्हणजे दुसरा तिसरा कोणीही नसून त्यावेळचे गव्हर्नर जनरल लार्ड वेलस्ली होय. याचा सर्व पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून यास राज्यकार्यधुरंधर असें म्हणण्यास हरकत येणार नाहीं. बर्कसाहेबांच्या भाषेंत सांगांवयाचे तर ''काय आहे व काय नाही हें उमगायचें. त्यातून निष्पत्ती कशी व किती काढायाची याची कल्पना बांधायची आणि ती कल्पना कृतीत उतरावयाचीं'' हे मुत्सद्याचे लक्षण वेलस्लीस बरोबर लागू पडतें. त्यांच्या सात वर्षांच्या कारकीर्दीत भरतखंडाची अंतःस्थिती पारखून, हातीं असलेल्या सत्ता, सामुग्री, संपत्ती व सेना यांच्या साह्याने ब्रिटीश सत्तेस त्याने सार्वभौमत्व प्राप्त करून दिलें आणि या सर्व सामुग्रींनी बलिष्ट असूनही मराठा मंडळ त्याजपुढें हार गेलें. हें कसें हें थोडक्यांत पाहून होळकरांच्या इतिहासाकडे आपणास वळावयाचें आहे.

श्रीमंत बाजीरावसाहेब यांस स्वशरीररक्षणापलीकडे कांहींच ध्येय नव्हतें. या ध्येयाचे जे कोणी आड येतील ते त्यांचे शत्रु. यामुळेच बंधु अमृतराव त्यांस नकोसे झाले होते. शिंदे दरबाराच्या चिथावणीवरून महाराज यशवंतराव यांचेबद्दल जो दुराग्रह बनला होता तो कायमचाच राहिला. महाराज यशवंतरावांनीं आपल्या कृतींनी व वाणीने अनेक वेळां स्वामीनिष्ठा दाखविली असूनही ती यजमानांच्या गळीं उतरली नाहीं. श्रीमंत बाजीरावसाहेब गादीवर आल्यावर श्रीमंत अमृतराव नाशकाकडे वळले. त्यांस सेनापती वेलस्ली यांनीं आपल्या कश्यपीं लावून घेतले. त्यांची पूर्वीची सात लाखांची जहागीर होती तितकी त्यांस आपल्या वजनाने वेलस्लीने मिळवून दिली. या देणगीबद्दल वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं नापसंती दर्शविली तेव्हां वेलस्ली लिहितो. ''अमृतरावांच्या प्रत्यक्ष फौजेपेक्षां मराठा मंडळावरील त्यांचें वजन जास्त बाधक होते जहागिरदारांस फितवून आमच्या विरूद्ध हालचाली करण्याची संधी अमृतरावास देणें किती धोक्याचें होतें याची कल्पना करणें सोपें नाही. अमृतरावाने मागें राहून पुण्याशीं असलेला माझा पाय तोडून टाकला असता तर शिंदे भोसल्या संबंधाचे असलेले आमचे बेत सर्व ढासळून पडले असते.'' सारांश, अमृतरावासारखा प्रतिपक्षांतील वजनदार पुढारी सात लाखास विकत घेऊन सर्व मराठा मंडळ दुर्बल करून टाकलें ही किंमत कंपनी सरकारास फार पडली नाहीं. याप्रमाणें पेशवे घराण्यांतील दोन पुरूषांनीं आपल्या पूर्वपरंपरेस पारखे होऊन पूर्वजांनी जोडलेलें मराठा मंडळ मोडण्यास स्वखुशीनें हातभार लावला. आतां राहिलेले, सदिच्छा असलेले पण फुटकळ झालेले, सरदार काय करीत होते हें पाहूंया.

(१) **शिंदे** : ता. ९ जानेवारी रोजीं कर्नल क्लोज यानें वसईच्या तहनाम्याची प्रत अलिजा बहादराकडे पाठविली आणि वरती असेंही कळविले कीं श्रीमंत बाजीरावसाहेबांस पेशवाईवर स्थापून बंडखोराचे पारिपत्य करण्यासाठी इंग्रज फौज पुण्यास जाईल तिजबरोबर तुम्हींही आपली फौज, मदतीस देऊन हा एकंदर कार्यभाग सिद्धीस न्यावा. बंडखोर या शब्दानें होळकरांकडे बोट दाखविले हे सांगांवयास नकोच. या उल्लेखानें शिंद्यांस समाधान झालें, तर दुसऱ्या बाजूनें श्रीमंत पेशव्यांवर आजपर्यंत ठेवलेला आपला वरचष्मा कमी होऊन इंग्रजांचा चढणार या विचाराने त्यांस वैषम्यही वाटलें असणार. पुढें थोडा रंग पालटतांच इंग्रज बहादराची निकट झाल्यावर ता. १६ मार्च रोजीं शिंदे यांजकडून उत्तर गेलें कीं. ''दक्षिणेंत शांतता राखणें शिंद्यांसही इष्ट आहे आणि इंग्रज सरकाराशी शिंद्यांचा जो स्नेहभाव चालू आहे तोच मजबूत ठेवल्यानें शांतताही कायम राहील. होळकराशीं आमचा कलह आहे तो आमचा आम्हीं पाहून घेऊं. त्यांसाठीं इंग्रजांची जरूरी नाही.'' वसईच्या तहाबद्दल शिंद्यांनीं कळविलें कीं वस्तुतः सालबाईचा तह अद्यापी कायम आहे. शिंदे हे इंग्रज आणि पेशवे यांत मध्यस्थ आहेत तेव्हां इंग्रजांनीं तहाच्या वेळीं शिंद्यांचा सल्ला घ्यावयास पाहिजे होता. यानंतर तारीख ४ माहे मे रोजीं शिंदे बऱ्हाणपुराहून निघाले तेव्हां गव्हर्नर जनरलांचा त्यांस निर्वाणीचा खलिता गेला कीं निजाम व पेशवे हे आमचे दोस्त आहेत, त्यांच्या प्रांतांतून अगर प्रांता बाजूनें मोठे सैन्य घेऊन तुम्ही जाणें तुम्हास व आम्हास इष्ट नाही. ता. ६ आगस्ट रोजीं सेनापती वेलस्लीचें दौलतरावांस पत्र आलें कीं आमच्या सैन्यानें मागें जावें मग तुम्हीही नर्मदापार जाल अशा अर्थाचे तुमचें पत्र पोंहचलें. मैत्रीसाठीं पुढें केलेंला हात तुम्ही झिडकारला आहे. शांततेसाठीं आणि दोस्ताचे हितासाठीं आतां युद्ध करणें आम्हास जरूर आहे. युद्धाची सर्व जबाबदारी तुमचेवर आहे. हा झाला प्रकार इंग्रजांसंबंधाचा. जुलई-आगस्ट महिन्यांत इंग्रजांस जीं पत्रें गेलीं ती बहुतेक शिंदे व भोसले यांच्या संगनमतानेंच गेली. याच सुमारास पेशवेही शिंद्यांशीं हितगुज करीत होते. इंग्रजांशीं जरी आम्ही तह केला आहे तरी तो नाईलाजाने केला आहे. त्यांचें जूं झुगारण्यास तुम्ही आम्हास मदत केली पाहिजे. अशा अर्थाचें टुमणे पेशव्यांचेंही शिंद्यामागें लागलें होतें. अशा एका पत्राला शिंद्यांचें बाजीरावसाहेबांस जें उत्तर गेलें तें राजकारणांत उलाढालीचें झाले. शिंद्यांनीं पेशव्यांस कळविलें कीं तूर्त तुम्ही होस हो म्हणून म्हणा. होळकरांचें म्हणणें मान्य करा म्हणजे सर्वांनीं मिळून प्रथम इंग्रजांचा धुव्वा उडवूं आणि वसईचा तह झुगारून देऊं आणि यानंतर सर्व एक होऊन होळकरास वठणीवर आणण्यास वेळ तो किती लागणार ? शिंद्यांचे हे पत्र श्रीमंत अमृतरावांचे हातीं लागलें. त्यांनी ते सेनापती वेलस्लीस दाखविले. वेलस्लीनें त्या पत्राचा चांगलाच फायदा करून घेतला. तें पत्र यशवंतराव महाराजांचे हाती जाईल अशी काळजीपूर्वक व्यवस्था केली. त्याचा परिणाम वेलस्लीच्या अपेक्षेप्रमाणेंच झाला. महाराज यशवंतराव उमगले आणि मागल्याच पायी माळव्यांत परतले.

(२) **भोसले** : यांचें पटवर्धनास गेलेले पत्र त्यांच्या मनाचें दर्शक आहे. ''इंग्रजांनीं स्वराज्यांत प्रसार करून दौलत आकर्षण केली. त्यांस हिंदुधर्म रक्षावा, स्वराज्य राखावें

हें चित्तांत धरून दौलतराव शिंदे यासुद्धां आम्ही मसलतीस प्रवर्तक झालों असों. तुम्हांस तो स्वराज्याचें कल्याण पाहणें व या मसलतीस अनुकूल होणें जरूर आहे तरी तुम्ही कोणताही आंदेशा मनांत न आणितां अशा प्रसंगी मसलतीस शरीक व्हावे.'' या मनोवृत्तीस अनुसरून त्यांचीं पत्रें इंग्रजांस जात होतीं. त्याचप्रमाणें घरच्या कार्यात ही त्यांचें लक्ष याच मार्गाला अनुकूल होते. ता. ९ जुलाई रोजीं खंडेराव होळकरांस भोसल्यांनीं दौलतरावांकडून वस्त्रें देववून यशवंतराव महाराजाकडेस रवाना केलें. समेट घडून आणण्यासाठी भोसल्यांनीं अनेक प्रसंगीं आपले वकील होळकरांकडे पाठविले. सारांश, सर्व मराठा मंडळ जूट होऊन स्वधर्म व स्वराज्य यांचें रक्षण व्हावे या हेतूस अनुसरून भोंसले घराण्याच्या पूर्वापार लौकिकाप्रमाणेंच नागपुरकर भोसल्यांचीं वागणूक या प्रसंगीं झाली.

(३) **होळकर :** पेशवे ता. १३ मे रोजीं गादीवर स्थानापन्न झाले. सेनापती वेलस्ली दक्षिणेंत तळ हालवून पुण्याचे रोखे निघाला. हें ऐकून महाराज यशवंतराव पुणें सोडून निघाले. औरंगाबादेस वेढा घालून अकरा लक्ष खंडणी वसूल केली. पुढें पैठण व जालणापुर येथेंही खंडणी घेऊन ते चांदवडास जाऊन राहिले. समेटाची दृष्टी आणि तीही पेशव्यांचे मार्फतच असल्यामुळें यशवंतराव महाराजांनीं प्रथम आपल्या अटी भोसल्यांच्या वकिलांमार्फत शिंद्यांकडे पाठविल्या. त्या अटी व त्यांची शिंद्यांकडून आलेलीं उत्तरें येणेंप्रमाणें. (अ) श्रीमंतांची सेवा तुम्ही आम्ही एकवाक्यतेनें करीत आलों, त्याप्रमाणें पुढें एकनिष्ठेनें उभयतांनीं सेवा करून श्रीमंतांचे मर्जीचा संतोष राखावा. येणेंप्रमाणें करार. (आ) भोंसल्यांचा आमचा स्नेह पूर्वीपासून आहे तसाच तुम्हाकडून असावा. मीरखानाचा संशय भोसल्यांचे मनांत आहे तो दूर करून त्यांची खातरजमा करावी आणि त्रिवर्गाची एकवाक्यता असावी. दौलतींत ओढ बहुत, त्यांस फौजेचे खर्चाची योजना करावी. (उत्तर) खर्चासाठीं इकडून सावकार देवविला जाईल. (इ) श्रीमंत स्वामींची आज्ञा शिंदे यांजकडे येईल त्यांनीं वडीलपणें आम्हास सल्ला सांगाल त्याप्रमाणें फौजपलटणासुद्धां तयार करून सांगाल तिकडे जाऊं. या कारभारानुसार त्रिवर्गाची एकवाक्यता होऊन भोसल्यांनीं कटक प्रांतीं फौजा पाठवून जलचरास कीड बसवावी. या अटी इ. स. १८०३ च्या जून मध्यें होळकरांनी शिंद्यांकडे पाठविल्या. या संबंधांतच यशवंतराव महाराज नागपूरकरास लिहितात. ''जागां जागां दिक्कती व बादज मसलत होण्याचे अर्थ. तेव्हां सध्या फौजेचा निर्वाह चालून मसलतीस उपयोग कसा घडतो हे अर्थ आपले मनांत न यावे असें नाही. मसलतीची निकड आणि जाबसाल उगवल्याखेरीज फौजेचा चरितार्थ कोणी रीतीनें चालतो.'' सारांश, होळकरांचे महाल जप्तींतच राहिले. त्यांचे मनीचे बेत मनांतच राहिले. पुढेंही यशवंतराव महाराज रघुजी भोसल्यास लिहितात. ''इंग्रजाचा प्रसर राज्यांत होऊं न द्यावा या गोष्टीस आम्ही सर्व प्रकारें अनुकूल. त्यावरून उभयतांनीं आमची खातरजमा केली व आपली पत्रेंही त्याच अन्वयें येत गेलीं. नमूद होण्यास कसूर ठेविली नसतां आपण इकडील जाबसाल उगवून न पाठवितां आम्हास माघारें चांदवडास जाण्याविषयीं लिहिले तेव्हां सर्व प्रकारें आपली मर्जी, दरकूच लाचार होऊन माघारें गेलों. जाबसाल उगवल्यानंतर मसलतीस सिद्धच आहोंत. आजपर्यंत

जाबसाल उगवले असते तर इतकी लांबड कशास पडती. अद्यापीही सर्व प्रकारें अनुकूल आहोत. वाटणीसंबंधानें जाबसालाचा मात्र गुंता आहे. सारांश, देवी श्री अहिल्या मातोश्रींच्या कारकीर्दीतील शेवटल्या भागांत सोबत्यांमधील वाटणीचा जो प्रश्न उद्‌भवला होता तो त्या वेळीं तर सुटला नाहींच पण त्याचे धागेदोरे नारूच्या रोगाप्रमाणें कालांतराने राष्ट्ररूपी शरीरास व्यापून राहिले आणि सर्व शरीराचा त्यांनी फन्ना उडविला हें स्पष्ट आहे.

जाबसाल उरकला नाहीं म्हणून महाराजांनीं खेद जरी प्रगट केला तरी आपली उमदी नजर त्यांनीं खचूं दिली नाहीं. ता. २७ आगस्ट इ. स. १८०३ रोजीं यशवंतराव महाराज भोसल्यांस लिहितात. ''आजपर्यंत आपसात फूट होती यामुळे त्यांचा (इंग्रजांचा) इतका प्रसार झाला. प्रस्तुत आपली त्रिवर्गाची एकदिली झाली तेव्हां स्वराज्यांतील सर्व लहान-थोर सरदार मराठा, मुसलमान सामील होतील. हिंदुस्थान प्रांतींचे राजेरजवाडे व समशेरबहादूर, बुंदेले, झाशीवाले आदिकरून छोटेमोठे अनुकूल होतील. इतका भरणा पाहतां पांच-सहा लाख फौज व दहा कंपू होतील. दोन थाके (भाग) करून चाल केली असतां कांहीं जड पडावें असें नाहीं. त्यांची चाल चहूंकडून आणि आपण एके ठिकाणींच घोटाळणें ठीक नाहीं. प्रथम नबाबाचा मुलूख पोटीं पाडावा. इकडे आम्हीही तसा बेत धरितो. सारांश, याप्रसंगीं एकदिलीत कसर नसावी. याचे पोटांत कामें बहुत आहेत. आपण विचारवंत, दूरदृष्टी आहांत. विस्तारें लिहावें असें नाहीं.'' हातीं पैसा नसतांहीं, जेथून आशा धरली तेथून निराशा आली तरी पण खंबीर राहून अनुकूल स्थितीतही जे विचार सुचायचे नाहीत ते प्रतिकूल स्थितींतहीं प्रगट झालेले पाहणें खरोखरच उत्साहजनक आहे. आपआपसांत जितकी पड घेणें शक्य तितकी पड घेतली पण वेलस्लीस पत्रांचें उत्तर देताना ''तुमच्या आमच्या भेटी जशा व्हावयाच्या असतील तशा होतील.'' असें उत्तर दिलें.

(४) कर्नल वेलस्लीने बोर्ड आफ कंट्रोलला ता. २७-३-१८०३ रोजीं जो खलिता पाठविला त्यांत तो लिहितो. ''शिंदे-भोसल्यांचे बेत पूर्ण होण्यास मी त्यांस अवधी दिला नाही म्हणूनच मला यश आलें. अमृतरावानें मागें राहून पुण्याशी असलेला माझा पाय केव्हांच तोडून टाकला असता. ह्या माझ्या पायाचें सूत्र थेट म्हैसूरपर्यंत जुळविलेलें होतें. पटवर्धन, रास्ते, निपाणकर वगैरे कर्नाटकातील समस्त मराठे जहागिरदार मी माझ्याकडे सांभाळून धरले होते म्हणूनच मला निर्धास्तपणें शिंदे-भोसल्यावर चढाई करतां आली.'' दक्षिणेंतील सरदारांत पटवर्धन ज्येष्ठ व श्रेष्ठ. ''पुण्यास श्रीमंतांच्या भेटी झालेवर आज्ञा झाली जे, तुम्ही इंग्रजांबरोबर बंडखोराचे पारिपत्यांस जावें. इंग्रजांचेही आग्रह बहुतच पडले, परंतु इंग्रजांबरोबर जाणेंची आमची चाल नाहीं. श्रीमंत घरीं बसून तमाशा पाहतात. लौकिक वाईट व दाबही नाहीं'' या वरील उताऱ्यावरून दक्षिणेतील मराठे सरदारांची मनःस्थिती व परिस्थिती किती केविलवाणी झाली होती याची कल्पना करतां येते. त्यांस कोणतेंच धोरण स्वतःचें नव्हतें व असलें तरी नसल्यासारखेंच होते. उत्तरेंतील सरदार प्रबळ, फौजबंद पण एकीं होणे जमेना. सारांश, मराठा मंडळात शक्ती, युक्तीहीं भरपूर होती पण सर्वांस धरून चालणारा व चालविणारा शास्ता कोणी उरलेला नव्हता. समोरचे पक्षाला शास्ता

मोठा भला भक्कम मिळाला होता. लार्ड वेलस्लीचे सर्व कागदपत्र पाहिले म्हणजे त्याची बुद्धी कशी सर्वगामी होती हें लक्षांत येतें. त्यानें पसरलेलें जाळें आतां पाहूंया.

(१) उत्तरेंतील युद्धाचें केंद्र अलाहाबाद व कानपूर येथें ठेविलें व तेथें लेकसाहेब हे मुख्य अधिकारी नेमले. या द्वारानें शिंद्याला शह द्यावयाचा व जमेल तर चढाईचें धोरण ही अंगिकारायचे. लेककडे जी कामगिरी दिली होती ती या ध्येयास अनुरूप होती. गेल्या पाव शतकांत शिंद्यांचे वजन दिल्लीपतीवर बसले असून उत्तर हिंदुस्थानांतील पठाण व रोहिले त्यांचे अंकित झाले होते. या सर्वांस फोडून काढून शिंद्यांचें वजन उत्तरेतून पोकळ करावयाचे. दक्षिणेंत शिंदे युद्धात गुंतले असतां उत्तरेतून जाणाऱ्या मालाचा व माणसांचा पुरवठा अडवून धरावयाचा अशा धोरणानें लेकनें आपला सर्व व्यवहार व सूत्र आखावें अशी त्यांस आज्ञा होती. (२) शिंद्यांचे मागें कर्नल क्लोज आणि कालिन्स हे ठेवले होते. युद्ध कीं स्नेह याबद्दल त्यांनी शिंद्यांच्या मागें टुमणें एकसारखें लाविलें होतें. शिंदे हे मराठा मंडळाचे अवयव होते आणि इतर अवयवांचे सल्लामसलतीनें उत्तर देणें हें त्यांचे कर्तव्य होतें, पण त्यांस तशी फुरसतही दिली नाही. शिंद्यांनीं सालबीचे तहाचा मसुदा मुत्सद्देगिरीनें पुढें मांडला असतां त्याचे योग्य निराकरण कालिन्स कडून झालें नाहीं. (३) होळकर हे धडाडीचे सेनानी. त्यांचा व शिंद्यांचा समेट झाला असता तर सेनानी व सेना एकत्र होऊन युद्धाचा रंग कांहीं निराळाच झाला असता. श्रीमंत अमृतराव स्वार्थास भुलून वेलस्लीच्या वरपांगी कावेबाजपणास बळी पडले. शिंद्यांचे मागें कालिन्स आणि इतर सरदारांचे मागें वेलस्ली अशी ही जोडी गव्हर्नर जनरलानें लावून दिल्यामुळें फोडाफोड त्वरित झाली. (४) श्रीमंत बाजीरावसाहेब व निजाम ह्या दोघांस दोस्त म्हणून त्यांचा उपयोग वेळ पडेल त्याप्रमाणें करण्यास लार्ड वेलस्ली मागेंपुढें पाहत नसे. यशवंतराव महाराजांनीं निजामाचे राज्यात औरंगाबाद, पैठण, जालनापूर काबीज करून कित्येक लाखावर खंडणी वसूल केली असतां या दोघांच्या मदतीस कोणीही सेनापती गेला नाहीं व यशवंतराव महाराजांस कोणी जाबसालही केला नाही. पण जेव्हां शिंदे व भोसले विचार-विनिमयासाठीं जमूं लागले तेव्हां दोस्तांचा प्रश्न पुढें आला. सारांश, युद्धनीतींत शक्य तितकी निरनिराळीं केंद्रें तयार करून फौजबंद असें मराठे सरदार बाहेरून घेरून तर टाकलेच व आंतूनही घरभेदानें ते जितके पोकळ करतां येतील तितके वेलस्लीनें केलें. अशा एकंदर अनेक मार्गांनी व सबबीवर ता. ७ आगस्ट १८०३ रोजीं वाळकीचे मुक्कामीं सेनापती वेलस्लीने जाहीरनामा काढिला कीं, ''पेशवे व निजाम यांचे संरक्षणासाठी आम्हास शिंदे-भोसल्यांशीं युद्ध करावे लागत आहे. या युद्धात बाहेरच्यांस यत्किंचित उपद्रव देण्याची आमची इच्छा नाही. मात्र लोकांनीही आमच्या फौजांस कोणताही त्रास देऊं नये.''

या युद्धास इतिहासकार ''द्वितीय मराठा युद्ध'' असें म्हणतात. पहिलें युद्ध सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत झाले होते. त्यांत खुद्द पेशवे व त्यांचे सरदार म्हणजे पर्यायानें अखिल मराठा मंडळ सामील झाले होते तेव्हां त्या युद्धास प्रथम मराठा युद्ध म्हणणें हे सार्थच आहे. आतांच्या या युद्धास खुद्द पेशवे उभे नव्हते. दक्षिणेंतील सरदार तटस्थ होते.

होळकरांनीं आपलें अंग काढून घेतलें होतें. युद्धांस उभे राहिले काय ते शिंदे आणि भोसले. तेव्हां या युद्धास मराठा युद्ध म्हणणे सार्थ नाही. ''शिंदे भोसल्याशीं कंपनीचे युद्ध'' असें म्हणतां येईल. तसेंच या युद्धाचा होळकर रियासतीशीं विशेषसा संबंध येत नसल्यामुळें आम्हीही सविस्तर वर्णनाच्या भानगडीत न जातां कार्यापुरतेंच या युद्धाचें वर्णन करण्याचें योजिलें आहे. हें युद्ध शके १७२५ गोकुळ अष्टमीचे दिवशीं सुरू होऊन मार्गशीर्ष वद्य ३० स संपले. म्हणजे सव्वाचार महिने चालले. युद्धास वेलस्लीच्या धोरणानें आणि चालनानें पांच ठिकाणीं तोंड फुटलें. महाराष्ट्र, गुजराथ, कटक, दिल्ली व बुंदेलखंड. गुजराथ, दिल्ली व बुंदेलखंड येथील स्वाऱ्या शिंद्यांविरूद्ध होत्या. कटकवरील स्वारी भोसल्यांविरूद्ध होती आणि महाराष्ट्रांत म्हणजे सातपुड्याचे आजुबाजूस जें युद्ध झालें तें भोसले आणि शिंदे यांविरूद्ध. या युद्धांत इंग्रजांची फौज अंदाजें पन्नास हजार होती. या शिवाय श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं सैन्य पाठविलें ते सर्व हिशेबांत धरल्यास पाऊण लाखाजवळ भरती जाते. शिंदे-भोसल्यांचा आंकडा तपशीलवार मिळत नाहीं, तथापि अंदाजें असें म्हणता येईल कीं, उत्तरेंत पेरूचे हाताखाली शिंद्यांचे चाळीस हजार सैन्य होतें. दक्षिणेंत दुदरनेकाचा कंपू वगैरे पंधरा हजाराजवळ जाईल. भोंसल्यांचे आंकडे मिळत नाहींत. शिंद्यांनीं ज्याप्रमाणें आपली माणसें उत्तरेंत व दक्षिणेंत ठेवली होतीं त्याप्रमाणें भोंसल्यांनीं कटकचाही बंदोबस्त आधीं केला होता. सारांश, वेलस्लीच्या जाळ्यास तोंड देण्याची मराठ्यांनीं तयारी केली होती. पण दुर्दैवाची ही गोष्ट कीं परकीय अंमलदारांवर फाजील विश्वास टाकल्यामुळें दौलतराव शिंद्यांस साधनसंपन्न असूनही तोंडघशीं पडावें लागलें. भोसल्यांनीं आपल्याच सैन्यावर विशेष मदार ठेवल्यामुळें तोंडघशी पडण्याच्या प्रसंगांतून वांचले. होळकर आणि शिंदे यांचे दुआबांतील प्रकरणावरून खटके उडाले त्यावेळी शिंद्यांनीं त्या प्रांतीं पेरूस बसविला आणि आयत्या बिळावरील हा नागोबा पुष्ट होऊन शेवटीं यजमानावरही फुत्कार टाकूं लागला. लेकनें त्यांस वश करून थोड्या अवधींत व थोड्या खर्चांत शिंद्यांचे वर्चस्व हरण करून कंपनी सरकारास तें मिळवून दिलें. वरचे सर्व राजेरजवाडे ब्रिटिशांचे अंकित झाले. शिंद्यांचे म्हणजे पर्यायाने मराठ्यांचें उत्तरेंतील वर्चस्व या युद्धानें नाहीसें झालें. गुजराथेतील भडोच वगैरे आणि दक्षिणेंतील नगरची बाजू वरच्याचप्रमाणें शिंद्यांकडून घसरली. पैठणावर म्हणजे दक्षिणेंत वेलस्ली शिंदे-भोसल्यांचे पुढें सर्द होऊन विचारांत पडला. वेलस्लीची फौज पुढें गेली होती. तिची आघाडी मारून बहुत उपद्रव केला. याच सुमारास वेलस्ली लिहितो, ''अमृतराव अप्पा देसाई व निजामाच्या फौजा या सर्वांस खर्चास पुरविताना माझे नाकी नऊ आले. पुण्याहून पैशाचा पुरवठा मला चालू आहे म्हणूनच माझा निभाव आहे.'' वेलस्लीच्या या दोन वाक्यांवरून युद्धाचें अंतःस्वरूप चांगलेच लक्षांत येतें. बराचसा कार्यभाग इंग्रजांनीं शौर्यापेक्षां फितवाफितवीनेंच साधला असें म्हणणें भाग पडतें. असई, बऱ्हाणपुर, आशीरगड, गांवीलगड, इत्यादि ठिकाणीं लढाया होऊन दोन्ही बाजूंनीं तहाची तहान सुरू झाली. आगरा व लासवाडी येथेंही युद्धें झालीं. लासवाडीस शिंद्यास बरीच मोठी ठोकर लागली. बुंदेलखंडांतही मराठ्यांची सत्ता फाटाफुटीनें व फितूरफंदानें उध्वस्त

झाली. याप्रमाणें चार महिने चार दिशांस युद्ध चालून अडगांवच्या लढाईनंतर आठपंधरा दिवसांचे आंत शिंदे-भोसल्यांशीं इंग्रजांनीं तह करून घेतला. इतिहासकार या युद्धांत इंग्रज विजयी झाले असें सांगतात. वेलस्ली काय म्हणतो ते पाहू या. ''आंता यापुढें शिंद्यांस आणखीन नरम करण्याची शक्ती मला नाही. दक्षिणेंतला त्यांचा मुलूख मी हस्तगत केलाच आहे. गुजराथच्या फौजेस उज्जेनवर चालून जाण्याची सोय नाही. शिंद्यांचे पायदळ कंपु सर्व नाहीसें झालें. घोडदळ मात्र सर्व शाबूत आहे. या घोडदळाचे पाठीस लागण्यास आम्हास देशभर भटकावें लागणार. त्यात धान्याचा पुरवठा आम्हांस होणे बिलकुल शक्य नाही. उलट शिंदे मात्र आपल्या घोडदळानें आमचा पुष्कळ नाश करूं शकेल. आणि भोसल्यांशीं तह होत आहे तो बिघडवील. दोघे पुन्हा संगनमत करून उठतील तर त्यांजपुढें माझा व स्टिव्हनचा बिलकुल निभाव लागणार नाही. तूर्त हे तह करून मी मोकळा होतों.'' सारांश, सेनापतीचाच हा लेख वाचला म्हणजे इंग्रज विजयी झाले हे म्हणणे किती खरें आहे याची कल्पना करितां येईल. तह झाले ही गोष्ट खरी आणि त्या तहाचे तपशील अंमलात आणण्यासाठीं शिंद्यांचे दरबारी मालकम व भोसल्यांचे दरबारी एलफिन्स्टन हे ब्रिटिश रेसिडेंट रूजू झाले. सारांश, इ. स. १८०४ उजाडलें, मराठा मंडळातील दोघेजण ''सरकार'' नांवानें गणलेले मराठशाहीचे आधारस्तंभ आतां इंग्रजी छायेखालीं गेले. या युद्धांत कायमच्या अशा दोनचार गोष्टी नजरेस आल्या. परक्या अधिकाऱ्यांची निमकहरामी, स्थानिक घोडदळ हें केव्हांही अधिक टिकाऊ, गनिमी काव्याची लढाई ही स्थानपरत्वें अधिक काम देते. भोसल्यांनीं ही पद्धत अगदींच टाकून दिलेली नव्हती आणि पुढें असेंही आपण पाहूं कीं महाराज यशवंतरावांनीं या पद्धतीचा अंगिकार करून कंपूस अनेकवेळां बेदम करून सोडलें. या दोघां आधारस्तंभाबरोबर जे तह झाले त्यांचे परिणाम या दोघांस ''पगारी मित्र'' करून सोडले. थोडेंबहुत श्रीमंत पेशवे यांच्या पंगतीतच जाऊन बसले म्हणजे पर्यायाने यांचे हातपाय बांधले जाऊन ''दसरा आणि मुलुखगिरी'' हे शब्द केवळ भाषेंतच राहिलें.

कर्जाचा पेच, फौजेची वाताहत, उत्कृष्ट कमाईचा मुलूख गमावणें, हातांतून गेलेला बादशहावरील ताबा इत्यादि कारणांनीं दौलतराव एकदम उच्चासनावरून गडगडले ते पुन्हा वर उठले नाहींत. रजपुत राजांवरचे दौलतरावांचे हक्क नष्ट झाले आणि यशवंतराव महाराजांचे मात्र कायम राहिले. या सर्व गोष्टींवरून आतां मात्र दौलतरावांचे डोळे उघडले. स्वतःची फौज नाहीशीं झाल्यामुळें महाराज यशवंतरावांपासून बचाव करण्याचें साधन त्यांस राहिलें नाहीं. बाजीराव तर अजूनही होळकरांस पाण्यांत पाहत होते. सारांश, दोघेही दोस्त म्हणजे श्रीमंत बाजीरावसाहेब व आलिजा बहादर दौलतराव आपली दौलत घालवून होळकरांचीही दौलत घालविण्याचे मार्ग पाहू लागले आणि मार्ग तो एकच कंपनी सरकारची पायधरणी करणें. इंग्रजांस तेंच हवें होतें. त्यांनीं लगेच बऱ्हाणपुर येथें इ. स. १८०४ फेब्रुवारीत पूर्वीच्या तहांत दोन नवीन कलमें घातलीं. (१) तैनाती फौज व (२) महाराज यशवंतरावांचा पाडाव करण्यासाठी सहकारिता. शिंद्यांची व श्रीमंतांची इ. स. १८०३ च्या

युद्धानंतरची ही मनोवृत्ती तर त्याच सुमारास यशवंतराव महाराज लिहितात. ''आजपर्यंत हिंदु राज्य सर्वांनीं एकदिल राहून चालविलें. अलीकडे ज्याचे-त्याचे दौलतींत गृहकलह होऊन राज्य विपर्यास पडोन हिंदुधर्म नाहीसा होण्यास मूळ जाहलें. त्याचें छेदन करण्यास सर्व एकदिल झाले पाहिजेत, तर हिंदुंची कायमी राहील. आम्हीं जो क्रम इंग्रजाशीं लढण्याचा आरंभला आहे हाच यावतदेह चालवावा असें मनांत आहे. यांत परमेश्वर अनुकूल होऊन जे घडवील तें खरें. परंतु एकानेंच असा प्रकार करून बाकीच्यांनीं तमाशा पाहून आपापली दौलत सांभाळून असावें यातील परिणाम कसा हें चित्तीं विचारून ज्यांत हिंदुधर्माची कायमी व परिणाम नीट तें करावें''. या उताऱ्यांत महाराजांचें ध्येय व धोरण स्पष्ट होतात आणि ते एकमेवाद्वितीय असें शब्दशः व अर्थशः होते. याच सुमारास कंपनी सरकारचे डावपेच कसे चालले होते हें त्यांचेच लेखावरून आपण पाहूंया.

शिंदे-भोसल्यांशीं युद्ध चालू असतां वेलस्ली बंधु होळकरांचे वाटेस बिलकुल गेलें नाहींत. उलट त्यांस गोंजारून त्यांची मनधरणीच करीत होते. ता. ५ जानेवारी इ. स. १८०४ रोजीं वेलस्लीनें महाराज यशवंतरावांस लिहिले. ''शिंदे व भोंसले यांच्याशीं पुनःदोस्तीचा तह होऊन त्यांचा व आमचा सलोखा कायम झाला. तुम्ही बाजूस राहून हा बनाव घडून आणण्यांत मदत केली याबद्दल मी तुमचें अभिनंदन करितों. त्या युद्धांत तुम्ही अत्यंत शहाणपणाचे व दूरदृष्टीचे वर्तन केलें हे पाहून मला पूर्ण समाधान वाटते आणि मी तुम्हास असें आश्वासन देतों कीं जोपर्यंत तुम्ही कंपनी सरकारच्या किंवा त्यांच्या दोस्तांच्या वाटेस जाणार नाही तोपर्यंत आम्हीही तुमच्या वाटेस जाणार नाहीं.'' हे पत्र लिहून त्यावरील शाई वाळते न वाळते तोंच त्याच महिन्याचे अखेरीस लार्ड लेकने महाराज यशवंतरावांस कळविलें कीं ''तुम्हांस आमच्याशी समेट राखावा असें वाटत असेल तर हल्लींची युद्धाची तयारी सोडून बोलणें करण्यासाठी वकील आमच्याकडे पाठवा. एकाच महिन्यांतील ही शाबासकीची व धमकीची पत्रें पाहिली म्हणजे कंपनी सरकारची वृत्ती अंदाजता येते. वरील पत्र लिहून लगेच लार्ड होळकरांचे अंगांवर हिंडोन येथें दाखल झाला. हे ठिकाण जयपूरच्या पूर्व बाजूस गंभीर नदीवर आहे. ठिकाण मध्यस्थानीं आहे. त्यावर १६ मार्च रोजीं होळकरांचे दोन वकील लेकच्या पत्रानुरोधानेंच त्यांच्या छावणींत हजर झाले आणि होळकरांच्या मागण्या त्यांनीं लेकपुढें मांडिल्या. (१) रजवाड्यांतून चौथाई वसूल करण्याचा चालत आलेला आमचा हक्क अव्याहत चालावा. (२) दुआबांत व बुंदेलखंडांत जे आमचे परगणे पूर्वीपासूनचे आहेत ते आमच्याकडेच असावेत. कदाचित ज्या परगण्यांबद्दल कैलासवासी तुकोजीराव होळकर व महादजी शिंदे या सोबत्यांत वाद उत्पन्न झाला होता आणि ज्यावर पुढील रण माजलें होतें तोच प्रश्न येथें यशवंतराव महाराजांनीं सोडविण्याचा यत्न केला असणार. (३) शिंद्यांत आमच्यांत कोणताही भेद मानला जावूं नये. या अटी लेकला मान्य झाल्या नाहीत आणि त्यानें महाराजांस लिहून कळविले कीं आम्हास मान्य होतील अशाच अटी तुम्ही आम्हांपुढें मांडा. कंपनी सरकारच्या राजनीतीचा हा एक अपूर्व मासलाच म्हणावयाचा. या पत्रानंतर

महाराजांनीं दक्षिणेंत आपल्या ताब्यांत असलेले परगणे वेलस्लीकडे मागितले आणि त्यांत मात्र युद्धाची दरडावणी त्यांस दाखविली. याच सुमारास शिंद्यांकडे व भोसल्यांकडे आपले वकील पाठवून इंग्रजांचा पाडाव करण्यासाठी तुम्ही आम्हास सामील व्हावें म्हणोन विनंती करण्यांत आली. शिंद्यांनी उत्तर दिलें कीं ''तुमचा आमचा सलुख राहवा अशी इच्छा असेल तर तुम्ही आमच्या मुलखास बिलकुल उपद्रव देवूं नये. नाहींतर आम्हास तुमच्यावर शस्त्र उचलण्याचा प्रसंग आल्याशिवाय राहणार नाही.'' यावर होळकरांकडून उत्तर गेले कीं ''शिंद्यांचे यत्किंचित अहित करण्याचा माझा इरादा नाही. इंग्रजांस नरम करावें येवढाच माझा हेतू आहे. इंग्रजांनीं मराठ्यांचे राज्य बुडविले. त्याचा प्रतिकार करणे हेंच अत्यंत निकडीचे माझें काम असोन त्यांसाठीं तुमचे अजमीरचे ठाणें मला तात्पुरतें घेणें जरूर वाटतें. तेंच स्थळ जोधपुरकरांस देऊन त्यांची मदत मी मिळविली आहे. युद्ध संपल्यावर तुमचें अजमीर स्थळ तुम्हास पूर्ववत् परत मिळेल.'' पण याउपर सोबती पूर्ववतच राहिले असें दिसते.

पत्रव्यवहार व वकिलांचीं बोलणीचालणीं ही चालू होतीच, तर दुसरें बाजूनें महाराज यशवंतराव ''सांबरच्या किल्यानजीक मुक्काम करून होते जयपुराकडून बरीचशीं खंडणी घेऊन कोटयास दाखल झाले. कबिले तोफखाना वगैरे भारी अजबाब मारवाडांत ठेवून तेथें हरनाथसिंग व नागो जिवाजी पंचवीस तीस हजार फौजेनिशीं आहेत. मीरखान पठाण वीस हजार फौजेनिशीं अजमीराकेडस आहे. जीवलाल वगैरे तीन सरदार चांदवडनजीक दहा बारा हजारांचा जमाव करून आहेत. सुभेदार काशीराव थाळनेरास फौजेनिशीं होते त्यांस जिवलालसिंग यांनीं दौड करून लुटलें.'' याशिवाय भोसले व शिंदे यांजकडून अनेक कारणानी सुटलेले शिपाई गडी आपण होऊन यशवंतराव महाराजांचे सेवेंत आले. सारांश, हा भला भक्कम जमाव पाहून तेंच निमित्य मात्र करून गव्हर्नर जनरल यांनीं ता. १६ एप्रिल इ. स. १८०४ रोजीं होळकरांविरूद्ध युद्ध पुकारले.

हे युद्ध इ. स. १८०४ एप्रिल ते इ. स. १८०५ डिसेंबर म्हणजे पावणे दोन वर्षे हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत गर्जत होते. युद्धाचीं केंद्रे मध्य-हिंदुस्थान, सातपुडा, अंतरवेदी व पंजाब ही कमीअधिक प्रमाणांत मानतां येतील. कंपनी सरकारास त्यांचे नुकतेच बनलेले तहाचे दोस्त उघड अगर अंतस्थ मदतीस होते. किमानपक्ष ते तटस्थ तरी होते. होळकरांच्या बाजूस क्वचितच बाहेरून मदत मिळाली; आणि तीही बेताबाताचीच. युद्ध पुकारल्याबरोबर पहिलाच संग्राम जो जाहला तो मुकुंदरा खिंडींत कर्नल मानसनशी. जें धावपळीचें युद्ध झाले त्यांस आपल्याच देशाच्या इतिहासांत नव्हें, पण इतरत्रही तुलना मिळणार नाही. महाराज यशवंतरावांयेवढा गनिमी पद्धतीनें लढणारा सेनापती उत्तर मराठेशाहींत दुसरा कोणीच झाला नाही अशी त्यांची वाहवा सर्वतोमुखीं झाली. डी. सी. बुल्जर आपल्या लेखांत इ. स. १९२२ सालीं लिहितो. ''युद्धांत जय मिळणें ही गोष्ट केवळ फौजेच्या तयारीवर अवलंबून नसते. पहिली गोष्ट, सेनानायक अनुभविक व चतुर असला पाहिजे. या बाबतीत यशवंतराव होळकर महाराज लायक ठरतील. त्यांस

मोठी अडचण नडली ती पैशाची. इतरांनीं नुसता त्यांस बाहेरून पैशाचा पुरवठा केला असता तर त्यांनी एकट्यांनीं इंग्रजांस वठणीस आणलें असतें. मराठ्यांकडे जेवढे म्हणून युरोपियन अंमलदार होते ते सर्व इंग्रजांनीं फितूर करून फोडले होते. ही बाब या युद्धांत विचार करण्यासारखी आहे.'' आतां मानसनशीं मुकुंदरा घाटामध्ये झालेली गनिमी काव्याची लढाई पाहूं या :

युद्धाचा पुकार गव्हर्नर जनरलने ता. १६ एप्रिल इ. स. १८०४ रोजीं केला. महाराज होळकर यांसही, शिंदे-भोसल्यांप्रमाणें चारी बाजूंनीं घेरून युद्ध करावयाचें हा व्यूह गव्हर्नर जनरलसाहेबांनीं आधींच ठरवून त्याप्रमाणें तयारी केली. हें एकवीस महिन्यांचे युद्ध निरनिराळ्या सहा केंद्रांत चालून शेवटीं दोन्ही पक्ष निरनिराळ्या कारणांनीं नरमाईत आले आणि मग तह झाला. युद्धास प्रारंभ मध्य हिंदुस्थानांत झाला. तो प्रकार येणेंप्रमाणें. सेनापती वेलस्लीनें सुचविलें कीं कर्नल मरेने गुजराथची फौज घेऊन माळव्यावर चालून जावें, म्हणजे तेथें त्यांस शिंद्यांची मदत येईल, पण ही शिंद्यांची मदत आली नाहीं. याच सुमारास दिल्लीच्या बादशहाकडून यशवंतराव महाराजांस महाराजाधिराज, राजराजेश्वर, आलिजाबहादर ह्या पदव्या समर्पण करण्यांत आल्या. यामुळें लेकच्या पोटांत धास्ती पडली कीं दिल्लीचें अनुसंधान यशवंतराव महाराजांनीं पाठीशीं घातलें असावें. दोन तीन बडे युरोपियन आफिसर होळकरांचे नोकरींत असून दुसरें पक्षास मिळाले तेव्हां त्यांचीं डोसकीं मारून यशवंतराव महाराजांनीं भाल्यावरून मिरवणूक काढली. या दोन तीन कारणांवरून लेकने उत्तर हिंदुस्थानांतच युद्धास प्रारंभ केला. यशवंतराव महाराज या सुमारास राजपुतान्यांत खंडणी वसूल करीत होते. लेकनें कर्नल मानसन यांस महाराजांवर टेहळणी करण्यासाठीं जयपूर हद्दीत ठेवून दिलें. मानसन होळकरांचे मागें लागतांच लेकही त्यांस येऊन मिळाला. टोंक, रामपुरा येथील होळकरांचा मजबूत किल्ला ता. १६ जून रोजीं लेक व मानसन यांनीं मिळवून घेतला. यानंतर लेक कानपुराकडे निघून गेला. तेव्हां मानसन आपल्या पलटणासह होळकरांच्या पाठीमागें त्यांच्या प्रदेशांत शिरला. याच प्रदेशाचे सीमेवर मुकुंदरा खिंडारांत बुंदी व कोटा येथील राजे इंग्रजांस येऊन मिळाले. मानसननें ता. १ जुलाई रोजीं हिंगलाजगड किल्ला घेतला. याप्रमाणें विजयी होऊन उज्जेनीस जावें आणि मरेची भेट घेऊन होळकरांस चेपावें हे मानस मानसनचे. याच सुमारास महाराज यशवंतराव शिंद्यांच्या सुसंपन्न मंदसोर शहराकडे वळले. तेथून चांगलीच खंडणी वसूल केली. चंबलच्या पूर्वेस पांच कोसांवर मानसनचा मुक्काम असता त्यांस बातमी लागली कीं होळकर नदी उतरून आपलेकडे येत आहेत. तेव्हां उतारांतच त्यांजवर हल्ला करावा म्हणजे सहज त्यांची दाणादाण उडेल असें मनांत आणून मानसन त्या उताराकडे वळला. इतक्यांत त्यांस कळले कीं होळकर नदी उतरून अलीकडे आले सुद्धां. खालून मरेकडून पत्र आले कीं पावसाळ्यांत तो मानसनला मिळू शकेना आणि तिसरी अनपेक्षित अडचण अशी आली कीं धान्याचा पुरवठा कोठूनच होईना. मानसनने बापुजी शिंदे यांस होळकरांच्या तोंडावर

ठेवून मुकुंदरा खिंडीकडे तोफखान्यासह तो माघारी वळला. होळकरांनीं बापूजी शिंदे व ल्युकन यांच्या फौजांचा फन्ना उडविला व ल्यूकन यांस कैद केलें. याप्रमाणें तोंडावर ठेवलेल्या लोकांचा समाचार घेऊन महाराज मानसनच्या मागें लागले. खिंडींत मानसनला कळलें कीं लेककडून कांहीं तोफा व पायदळ आपल्या मदतीस येत आहेत. त्या आशेनें तो कोट्याकडे वळला. तेथील राजानें चंबला उतरू दिली पण धान्यसामुग्री दिली नाहीं. कोट्याहून मानसन रामपुऱ्याकडे वळला. बनास नदीवर मानसन ओलांडून जातो तो ता. २४ आगस्ट रोजीं होळकर त्याच्या पुढें दत्त. त्यावेळीं निकराची लढाई होऊन मानसनची पुष्कळशी खराबी झाली. तेव्हां सर्व जड सामान टाकून देऊन रात्रीं होळकरांस चुकवून ता. २५ आगस्ट रोजीं खुशालगडास पोहचून खुशाल राहिला. दोन महिन्यांचा हा पळ सारखा चालू होता आणि मानसननें आपला जीव वाचविला इतकेंच काय ते साधलें. या गनिमी काव्याचे लढाईने यशवंतराव महाराजांची कीर्ती दूरवर पसरली. जाट वगैरे राजे तटस्थ वृत्ती टाकून यशवंतराव महाराजांस मिळाले. या युद्धांत यशवंतराव महाराजांकडील सावधानतेमुळें मानसन वगैरे यांचा संगम झाला नाहीं. तसेच मानसनला कल्पना नसतांही महाराज अचानक त्याच्यापुढें बनास नदीवर उभे राहिलें आणि तिसरी ही गोष्ट त्यांच्या कंपूचा मालक माखनसिंग मारला जाऊन तोफा शत्रुंनीं घेतल्या होत्याः परंतु महाराज भाग्यवान. जातीनें तोफेवर येऊन आपण तोफा चालवून शेकडो माणसें मारली. या तीन गोष्टी विजयांत विचारांत घेण्यासारख्या आहेत. या विजयामुळें शिंद्यांकडील बापूजी शिंदे व सदाशिवरावभाऊ आपण होऊन होळकरांस सामील झाले.

पहिल्या केंद्राचे युद्ध माळव्यांतील मुकुंदरा खिंडीत झालें तें वर आलेंच आहे. दुसरें केंद्र दुआबांतील युद्ध होय. आग्ऱ्याहून महाराज मथुरेकडे वळले. मथुरा कब्ज्यांत घेऊन तेथून गणपतराव दिवाण व चिमणाजी पंत (व्यास) यांस आग्ऱ्याचे रोखे पाठविलें. कानपुराहून लेक निघाला होता. त्याच्या तोंडावर आपली मुख्य फौज ठेवून महाराज स्वतः दिल्लीकडे वळले. दिल्लीचा इंग्रजी बंदोबस्त बेताबाताचाच होता. लेकही त्यांच्या मागोमाग दिल्लीकडे वळला. आतां येथून म्हणजे ता. १७ आक्टोबरपासून ता. ३ नोव्हेंबरपर्यंत यशवंतराव महाराजांचे मागें लेकची धांवपळ सुरू झाली. होळकरांकडील महिपतराव रामचंद्र यांनीं पेंढाऱ्यांच्या सहायाने लांडगेतोड करून लेकचा दारूगोळा खराब केला. या दोन महिन्याच्या दौडीनें इंग्रज पलटणें भारी जेरीस आली. दररोज पंचवीस २५ मैलांहून कमी दौड कधीं पडली नाहीं आणि छापे वगैरे घालतांना तर कधीकधी सत्तर–पंचाहत्तर मैलांची मजल मारल्याशिवाय भागलें नाहीं. या दुआबातील युद्धांत कोणाचाही पक्ष सरसनिरस ठरला नाहीं. तरीपण महाराजांनीं वेलस्लीच्या लिहिलेल्या पत्रांत, ''समरांगणावर जरी तुमच्या तोफखान्यापुढें माझा इलाज चालत नसला, तरी शेकडो मैलांच्या दौडी मारून अल्प अवकाशांत दूरदूरचे प्रदेश जाळून, लुटून टाकण्याचें सामर्थ्य मला आहे. तुम्हास एका क्षणाची विश्रांती मी घेऊं देणार नाही. एकदा समुद्राच्या

लाटांप्रमाणें होळकरांच्या फौजा देशभर लोटूं लागल्या म्हणजे लाखो प्राण्यांचा संहार होईल. त्यांजला विरोध करण्याची छाती कोणालाही होणार नाहीं.'' हा मजकुर आता या दुआबातील युद्धानें लेकच्या व इतर इंग्रेजी अधिकाऱ्यांच्या गळी चांगलाच उतरला. महाराजांनी आपल्या फौजेबद्दल जो हा वर प्रस्ताव केला तो यथायोग्य होता. (१) मारवाडांत हरनाथ सिंग व नागो जिवाजी पंचवीस-तीस हजाराच्या जमावानें होते. (२) मीरखान पठाण वीस हजाराचे जमावाने अजमीराकडे होते. (३) चांदवडानजीक जीवलाल वगैरे सरदार दहा पंधरा हजार जमावानिशी होते आणि (४) महाराजांचे बाहूंस जसजसें यश येऊ लागलें तसतसें तटस्थ असलेले सैन्य त्यांस येऊन मिळूं लागले. सारांश, सागरास भरती येऊं लागली म्हणजे लाटांमागें लाटा उसळून कल्होळ उडवून देतात आणि दशदिशा व्यापून टाकतात तोच प्रकार या युद्धांत झालेला आपणास दिसून येईल आणि महाराजांचे लेखांत अतिशयोक्ती नसून आत्मविश्वास प्रतिबिंबित आहे हें कळून येईल.

दुआबांतील धावपळ चालूं राहून महाराज जाटाच्या मुलखांत उतरले. येथून युद्धाचें तिसरें केंद्र सुरू होतें. हें आपण पुढील प्रकरणांत पाहूं.



**प्रकरण ८ वें**

# इंग्रजांशीं युद्ध व तह

महाराज यशवंतराव दुआबातून कूच करीत असतां त्यांस भरतपुरचे जाट रणजीतसिंग सामील झाले. डीग व भरतपुर हे जाटांचे दोन मजबूत किल्ले युद्ध सामुग्रीनें भरपूर सिद्ध होते. त्या ठिकाणीं होळकरांस मनासारखी व्यवस्था करतां आली. दोघांच्या फौजा महाराज यशवंतरावांच्या नेतृत्वाखालीं एकदिल झाल्या आणि त्यामुळेंच डिसेंबर इ. स. १८०४ पासून एप्रिल इ. स. १८०५ पावेतों जे युद्ध झाले ते हिंदुस्थानाच्या इतिहासांत नामांकित झाले आहे. प्रथम हा जाट राजा इंग्रेजांकडे सामील होता पण महाराज यशवंतरावांची चलती व चपलता पाहून तो महाराजांकडे वळला. जाटाचें राज्य संपन्न होतें. त्यांचा लढाईचा बाणा जगविख्यात आहे आणि ह्या सर्व गोष्टींचा पूर्ण उपयोग करून घेण्याची बुद्धी व उदारता महाराज यशवंतरावांत होती. महाराजांचा वाढता जोर पाहून सेनापती लेकनें डीगवर स्वारी केली आणि ता. १० डिसेंबर रोजीं किल्ल्यास मोर्चे लाविले. तोफांचा मारा झाल्यावर ता. १३ रोजीं तटास लहानसें खिंडार पडले. त्यातून रात्रीच्या वेळीं तीन टोळ्यांनीं निकराचा हल्ला करतांच डीग किल्ला व शहर इंग्रजांचे हस्तगत झालें. मात्र त्या कामीं उभय पक्षांचे पुष्कळ लोक जाया झाले. डीगचा पाडाव झाल्यावर होळकर व जाट यांच्या संयुक्त फौजा भरतपुरास येऊन राहिल्या. जाट रणजीतसिंगाने महाराजांस कळविलें कीं तुम्ही मदत असावें. खर्चास चार रुपये लागल्यास ते देऊं.

ता. १९ डिसेंबर रोजीं सेनापती लेक भरतपुरावर चालून आला. त्याजवर यशवंतराव महाराजांनीं बाहेरून छापे घालून पुष्कळ नासाडी केली. भरतपुरचा तट चिखलाच्या रुंद

भिंतींनीं बनविलेला, खालीं मोठा खंदक असलेला दुर्लंघ्य गणला जात असें. त्या तटावर मोर्च्यांतून लेकनें तोफांचा मारा ता. ७ जानेवारी रोजीं चालू केला. कांहीं दिवसांनीं तटास खिंडार पडलें. त्यातून हल्ला चढवितांच इंग्रज फौजेवर जाटांनीं जोराचा मारा केला. त्यात इंग्रजांचे पुष्कळ लोक मरून ते नाउमेद झाले. ता. २१ जानेवारी रोजीं दुसरा हल्ला चढविला पण त्याचीही तीच गत. तेव्हां कांहीं चांगल्या तोफा बाहेरून आणवून लेकनें पुनः सर्व सिद्धता केली. ता. २० फेब्रुवारी रोजीं तिसरा हल्ला चढविला. ह्याही प्रसंगीं पुष्कळ युरोपियन मारले गेले आणि निष्कर्ष तर कांहींच झाला नाहीं. दुसरें दिवशीं हल्ला चढला त्या प्रसंगी किल्ल्यावरून तोफांचे गोळे, लांकडाचे पेटलेले ओंडे आणि आगीचे घडे यांचा वर्षाव हल्ला करणाऱ्यांवर असा कांहीं बेसुमार झाला कीं याही हल्ल्यांत भयंकर नुकसान होऊन इंग्रजांस माघार घ्यावी लागली. एकंदरींत इंग्रजांचे तीन हजारहून जास्त शेलके लोक जाया झाले. दारूगोळा संपला, तोफा निकाम्या होऊन धान्यसामुग्रीही खलास झाली ''अठरा हल्ले आले. अठराही हल्ले आतून जाट, बाहेरून होळकर, यांनीं मारून काढले. इंग्रज पलटणांचा शेणसडा झाला. होळकरांकडील सोमाजी लांभाते केवळ कलीमधला ''अर्जुन'' कामास आला.''

या यशाच्या भरातच मीरखान बुंदेलखंडांतून येऊन महाराजांस मिळाला. २९ मार्च पासून ता. १ एप्रिलपावेतों लेकनें आपली शिकस्त केली पण मीरखानाच्या चतुराईमुळें इंग्रजांचा दम चालेना. इकडे यश मिळाल्यानंतर मीरखानास रोहिलखंडात पाठवून महाराजांनीं त्या बाजूस इंग्रजांच्या पाठीस लावून दिला. लेकचे हल्ले विफळ झाले आणि त्याच संधीस शिंद्यांसीं इंग्रजांचा बेबनाव झाला. शिंद्याने आपली फौज घेऊन भरतपुरावर जाण्याचें ठरविले. उन्हाळा भयंकर व पुढें पावसाळ्यांतही अनेक अडचणी जाणून लेकनें कपटविद्येचा आश्रय करून होळकरांकडून जाटास फोडिलें. सारांश, ऐन रंगांत आलेले हें युद्ध आमच्यातील फितुरामुळें निकामी झाले. तथापी चतुरस्त्र योद्धा म्हणून यशवंतराव महाराजांची कीर्ती चिरकाळ टिकेल यांत शंका नाहीं.

युद्धाचें चौथें केंद्र दक्षिणेंत चांदवड लासलगांव इत्यादि ठिकाणीं चालू होते. महाराजांचा सर्व भर उत्तरेंत असल्यामुळें दक्षिणेंकडे पाहण्यास त्यांस जितका अवसर मिळाला नाहीं. त्यांची फौज बेताचीच होती. विरुद्ध बाजूस पेशव्यांचे व त्यांचे सरदारांचे एकवटलेलें सामर्थ्य, निजामाचे सैन्य आणि इंग्रजांचे सैन्य. प्रदेशही महाराजांचे सैन्यास थोडाबहुत परकाच. त्यामुळे महाराजांचीं चांदवड, धोडप आणि जालना इत्यादि ठिकाणें हातांतून निसटलीं. याचप्रमाणें बुंदेलखंडांत महाराजांचे सरदार मीरखान यशस्वी झाले नाहींत. युद्धाचे हें केंद्र बेताचेंच होतें, तरीपण पहिल्या दोन तीन केंद्रांत होळकरांचा हात जसा चालला तसा या बुंदेलखंडाचे केंद्रांत चालला नाही. जाताजातां राहिले सहावें केंद्र. त्या केंद्रांत नारायणगड, मल्हारगड व रामपुरा हेही होळकरांचे हातून निसटले. एवंच, युद्धाच्या सहा केंद्रांपैकीं भल्या भक्कम अशा उत्तरेतील तीन केंद्रात म्हणजे मध्य हिन्दुस्थान, दुआब आणि जाटांचा प्रांत यात महाराजांनीं इंग्रजास चांगलेच दमविले. राहिलेल्या तीन केंद्रांत म्हणजे

बुंदेलखंड, दक्षिण आणि माळव्यांतील कांहीं भाग यात जयापजय समसमानच झाला असें म्हणता येईल. होळकरांचा प्रभाव विशेषसा दिसला नाहीं.

लार्ड वेलस्ली गव्हर्नर जनरल यांस घमेंड होती कीं सर्व राजे लोकांस कह्यांत आणून इंग्रजांची सत्ता सार्वभौम करूं. भाषेंत मात्र मायावीपणा ठेवला कीं सर्व हिंदुस्थानभर शांतता प्रस्थापूं. व्यूह रचून कार्यांस प्रारंभ होताच अकल्पित अनुभव येऊं लागले. सेनापती वेलस्ली सर्व बाबींत 'हो' स 'हो' म्हणेना. लेक त्यांचे वतीचा होता ही गोष्ट खरी. मरे, मानसनचे अंदाज चुकले. हिंदुस्थानातील हवा, ऋतुमान आणि स्थलमान यांचाही अंदाज नीट आकलन झालेला नव्हता. युद्धामुळें आणि हयगयीमुळें कंपनीचा व्यापार बसला. उत्पन्न नाहीं, कर्ज वाढलें. यामुळे इंग्लंडातील कंपनीचे चालक व मालक रुष्ट झालें. इंग्लंडचे प्रधानास युरोपांत नेपोलियनास तोंड द्यावयाचें होतें. या सर्व गोष्टींचा परिणाम गव्हर्नर जनरल वेलस्लीच्याविरुद्ध मत घरींदारीं क्षुब्ध झाले. स्वतः त्यांची उमेद पूर्ववत राहिली नाहीं. हा प्रकार झाला इंग्रजांचा. दुसऱ्या बाजूनें यशवंतराव महाराजांस आतापर्यंत सर्वत्रच यश मिळालें नाहीं. जाट फोडला गेला तेव्हां त्यांचीही खंबीरता पूर्ववत राहिली नाहीं. अशा स्थितीत दौलतरावांनीं ''आम्ही भरतपुरास जाणार'' असा निरोप रेसिडेंटास ता. २ मार्च रोजीं पाठविला. या सुमारास सर्जेराव घाटग्यांनीं अनेक उपद्व्यापांनीं पुनः आपलें प्रस्थान शिंद्यांच्या दरबारीं ठेवले होते. त्यांनीं यशवंतराव महाराज व त्यांचे साथीदार यांची भेट घेतली आणि समेटाचा प्रश्न त्यांजपुढें मांडला. महाराज ता. १७ एप्रिल रोजीं सबलगड येथें सोबत्यांस जाऊन भेटले. ''शिंदे यांनीं जागा मैदान पाहून बिछायत करून पांच हजार खासा उंची पोशाखांत येऊन बसले. नंतर होळकरांची स्वारी आली. बरोबर साठ हजार स्वार, अंगात दहा शेर रुईचा डगला, सफेद दुपटा, ढाल, तरवार, खांद्यावर बासडा गांठची गांठच आली. त्यांत यशवंतराव कोणते हें ओळखूं येईना. येतांच गराडा फिरवून देऊन दोन हजार खासा उतरला. तिकडल्या इकडल्या तोफा चालल्या. चार घटकापर्यंत कोणाचा शब्द कोणाचे कानीं पडेना. दौलतरावांचें तोंड सुकून गेलें. एक दोन रोज बोलणीं होऊन सफाईचीं बोलणीं झालीं.''

या भेटीतही महाराजांचा दिलदारपणा सहजासहज दिसून आला. अंबोजी इंगळे इंग्रजांस फितूर झाल्याबद्दल आलिजाबहादरांचा त्याजवर रोष होताः परंतु येवढ्या बलवान सरदारास शिक्षा पोहचविण्याची त्यांची ताकद व तयारी ही दोन्हीहीं नव्हती. महाराज यशवंतरावांनीं अंबोजीस पकडून हरनाथचे स्वाधीन केलें. हरनाथानीं हरिहराची दोन्हीही स्वरूपें दाखवून पन्नास लाखांची तोड पाडली. त्यापैकीं सहा महाराजांचे खासगत. याप्रमाणें जाब ठरून पैका आणावयास बालाराम शेट आगरवाले यांस कोटा येथें रवाना केलें. हें वर्तमान ऐकून शिंद्यांस व त्यांचे मंडळीस आश्चर्य वाटले. आपले येथें महिनाभर होते आणखी महिन्याभर राहते तरी पूर्वदिवसच, असें सर्वांनीं आश्चर्य केलें. याच भेटींत महाराजांच्या तेजाचा दुसराही अनुभव आला. ती गोष्ट येणेंप्रमाणें. यशवंतराव महाराज शिंद्यांची छावणी सोडून जाईना म्हणून रेसिडेंटानें ''मी तुमची छावणी सोडून निघून जातों''

असा एकच गिल्ला केला. असें मागें अनुभव आले असतांही आलिजाबहादर त्यावेळीं जे करूं शकले नाहींत ते आज त्यांनीं केलें. शिंद्यांनीं रेसिडेंटावर आपला पहारा बसवून त्यांस छावणी सोडून जाण्यास अटकाव केला. सुमारें दोन महिनेपावेतों रेसिडेंटावरील शिंद्यांची अटक कायम होती. सभोवार सक्त पहारा होता. प्रवास करतांनाही अटक चालूच होती. कोट्यावरून शिंदे-होळकर आजमेराकडे गेले. या दोन महिन्यांत शिंद्यांचा कारभार सर्जेराव घाटगे व यशवंतराव महाराज दोघेही नेटानें करीत. ज्या गोष्टी करण्यास दौलतरावचा जीव कचरें त्या गोष्टी हे दोन कर्ते पुरुष केव्हाच सिद्धीस नेत. त्यातील एक गोष्ट कैफियतकार देतात ती ''जानबत्तीसाचे (शिंद्यांचा सेनापती) कंपूत फौजेनें पगारासाठी गवगवा केला. तेव्हां यशवंतराव महाराज पन्नास हजार रुपये सांडण्यावर घेऊन पांचा स्वारानिशी कंपूत गेले. बत्तीसास वेगळा करून अवघे आफिसर चांदणीखालीं बोलाविले. तेव्हां सर्वांस आश्चर्य वाटले. सरदार खावंद यांजला म्हणावें. छाती करून एक आपल्यांत आला. आफिसरांस प्रश्न केला जे, ''तुम्ही चाकर बत्तीसाचे कीं आमचे?'' आफिसरने उत्तर केलें, ''आम्हास बत्तीस व सरकारची बटीक दोन्ही ही सारखीच. सांगाल त्याची चाकरी करूं. बाकी चाकर सरकारचे.'' यावर महाराज म्हणाले, ''उत्तम आहे. आम्ही आज तुमची रकम चुकवितों. बत्तीसास कित्येक जाब विचारावयाचे आहेत. त्यांस आमचे स्वाधीन करावें.'' त्याप्रमाणें रकमा वाटल्या. बत्तीसास हस्तगत करून घेतलें आणि दौलतरावांचे स्वाधीन केलें. याच भेटीत दौलतरावांनीं काशीरावांस आणून यशवंतरावांची आणि त्यांची गोडी करून दिली. महाराजांनीं अंबुजी इंगळ्याची आणि दौलतरावांची पैसेफेडीने गोडी करून दिली आणि इंगळ्यास दौलतरावांचा कारभार सांगितला. सारांश, या सबळगडच्या भेटींत मागल्या सर्व गोष्टी विसरून आपल्या अंतःकरणाची जी थोरवी यशवंतराव महाराजांनीं अनेक गोष्टींत सहजासहज दाखविली ती रणांगणावरील बाहुबलाच्या थोरवीला साजण्यासारखीच आहे; हें स्पष्ट दिसेल.

सबलगडास व त्यानंतर एकदोन महिनेपर्यंत सोबत्यांचा जो सलोखा झाला तो फार वेळ टिकला नाही. महाराज यशवंतरावांची वृत्ती जी पुढें होळकरशाहीच्या इतिहासाचे साधनामध्ये नमूद झाली ती स्वानुभवानेच त्यांनी स्पष्ट केली. ''ज्यांनीं स्वराज्याचे मसलतीस हमराह असावे ते आपले जीव रक्षितात ते पक्षी इतरांचें कारण काय ? ये समयी हिंदू धर्मास कोणाचीही हुशारी नाही.'' सारांश, स्वराज्य व स्वधर्म ह्या दोन बाबी महाराजांचे पुढ्यात होत्या. इतरांच्या दृष्टी किती आकुंचित होत्या हें ''आपले जीव रक्षितात'' ह्या केविलवाण्या उद्‌गारांत स्पष्ट होत आहेत. गव्हर्नर जनरल वेलस्ली यांची पद्धत वरिष्ठांस नापसंत होऊन त्यांस इंग्लंडात जावे लागले. त्यांचे जागी लार्ड कार्नवालीस आले. त्यांनीं शिंद्यांस पत्र लिहिलें कीं ''रेसिडेंटास तुम्ही मोकळा करा म्हणजे गोहद व ग्वाल्हेर ही तुमची ठिकाणें तुम्हास परत देण्याचा हुकूम सेनापती लेक यांस मी पाठवीत आहे.'' पूर्वीचा ताठा सोडून इंग्रज नरमाईने बोलू लागले. हें पाहून शिंद्यांनीही समेटास तात्काळ मान्यता दिल्ही. या समेटाचे काम मालकम व कवलनयन या दोघांनीं पुरें केलें. हा तह मुस्ताफापुरचा

म्हणून प्रसिद्ध आहे. तो ता. २२ नोव्हेंबर इ. स. १८०५ रोजीं झाला. झालें. यापुढें होळकर एकटेच व उघडे पडले. आपली एकंदर चळवळ ता. २९ नोव्हेंबरच्या पत्रांत ते भारमल होळकरास कळवितात. तें पत्र आम्ही लेखांकरूपांत पुढें देत आहोंत.

(लेखांक १) ता. २९-११-१८०५ भारमल होळकरांस महाराजांचे पत्र. इकडील वर्तमान पटियालापावेतों स्वारी आल्याचें वर्तमान पेशजी लिहिलेंच आहे. पटियालेकर राजा आदिकरून सिखांच्या भेटी जाहल्या. मसलतीस अनुकूल परंतु त्यांचे घरांतील राणी कुंवेरशी कलह पडला. त्यांची समजुत करावी यानिमित्य आठ पंधरा दिवस मुक्कामही करून राहिलों परंतु ताळ न पडे. असें पाहून दोहींकडेही एखलास ठेवून लाहोरवाल्यांचे संधानें आलीं व शहांकडीलही पत्रें आली. त्यांजला सामील करून पुनः शत्रूचे मुकाबल्यास जावें, या विचारें पटियाल्याहून कूच करून दरकूच छ १ रमजानी सतलज नदीवर उत्तर तीरावर फौज कंपुसहित आलों. शहांकडील पत्रें कीं अटक नदीचा पूल तयार होऊन दोन तीन दस्ते पार उतरले, आणखीनही उतार चालला आहे. दरोबस्त फौजसुद्धां सत्वरच येऊन पोहचेल. याभावी नदी तीरावरून पुढें अमृतसर, लाहोरच्या जिल्ह्यांत येऊन पोहचलो. लाहोरवाले राजश्री रणजीतसिंग आदिकरून दरोबस्त सीख सामील झालेत. इतःपर थोडक्याच दिवसांत अवघ्यांस एकवट करून श्री लक्ष्मीकांताचे कृपें शत्रूचा पराभव करून इंद्रप्रस्थ, श्रीमथुरा या जिल्ह्यांत येऊन पोहचतों. ह्याकाळीं जर सोबती अनुकूल असते तर उपयोग बहुतच होता. त्यांचें मनांत न येतां इकडील निसरसांड करून कारभारियाचे विचारें लोभावर दृष्टी देऊन शत्रुशीं ऐक्यता केली. त्याजला आप्तकी दिसों न यावी याजकरितां रा. सखाराम घाटके सर्जेराव व जिवलालसिंग इकडील तर्फे जे माळवे प्रांतीं होते त्यांजवर तिकडील महाली उपद्रव लागल्याचें निमित्य येऊन फौज व पेंढारी रवाना करून इकडील महालमुलखाची खराबी करितां, हे बोभाट हुजूर आल्यावरून सोबत याजला लिहिणें ते लिहिलें आहे. निदर्शनास येईल ते खरें. राजश्री खंडो महादेव व कुंजीर आदिकरून मंडळी राजधानींत पोहचून तेथील पत्रें आलीं असतील अथवा येतील, तिकडील वर्तमान सविस्तर रवानग्या मारवाडातून करीत जाणें म्हणून पत्रें स्वारींत पोहचत जातील. छ ७ रमजान सु।। सीत-मयातेनवआलफ. मोर्तबसुद. **(सरकारी रेकार्ड)**

अखेरपर्यंत आपल्या ध्येयास चिकटून या ना त्या मार्गानें आपला मार्ग क्रमीत राहणें हे थोर माणसांचेंच लक्षण होय. पगडबंदांपैकीं कोणी साथ करीत नाहीत, हे पाहून महाराजांनीं अटकेपर्यंत धांव घेतली; शिखांस अजमावून पाहिले. तेथील जमीन भुसभुशीतच दिसली. अटकेपलिकडेही नजर फेकली पण कणखरपणा कोठेच दिसेना. तेव्हां ''प्रथम मालकमसाहेबांकडील पैगाम सलुखाविषयीं मीरखानाकडे आला होता, मग बालाराम शेट आणि मीरखान यांनीं मसलत करून यशवंतरावांचे कानावर घातलें. त्यांचेंही अंतःकरण होतेंच. मग बालारामास हरनाथसिंगाकडे पाठविलें. त्यांचे बोलणें होऊन भेटीचा बेत ठरला. लेकसाहेबांकडून दोन साहेब भेटीस आले. यशवंतराव महाराजांची भेट झाली. दोस्ती होऊन लेकसाहेब दिल्लीकडे गेले.''

कंपनीचा विचार समेट करणें इष्ट असें ठरून लेककडे सरकारी हुकूम गेला कीं होळकरांची समजूत घालून कसे तरी युद्ध संपवावें. दोहीं बाजूनीं तशीच वृत्ती बनत गेल्यामुळें तहास विलंब लागला नाही. बयास नदीचे कांठीं राजपुर घाट येथें ता. २४ डिसेंबर इ. स. १८०५ रोजीं तह ठरला. हा तह व त्याच्याच पोटांतून निघणारे दोन तह नबाब कपूरखान याजबरोबरचा व नबाब मीरखान याबरोबरचा महत्त्वाचे असल्यामुळें हे तिन्ही तह स्वतंत्ररुपानें या प्रकरणाचे अखेरीस जोडिले आहेत. मुख्य होळकरांबरोबर झाल्या तहासंबंधीं भवानीशंकर लिहितात, ''महाराज यशवंतरावर रोहटक येथून निघून आसमंतात चांगल्या बहाद्दर सैन्यासह दाखल झाले. प्रत्येक गावांतून लाख रुपये मामलत घेत गेले. हिंदुस्थानीं रिसालदारांनीं तनखा मिळण्याबद्दल दंड व फिसादी केल्या. याबरोबर तीन दिवस धरणें दिलें. त्यांस तनखा देऊन समजूत केली. पुढें जयपुर व जोधपुर यांजमध्ये युद्धाग्नि पेटला होता, त्यांत जयपुरच्या राजानें दहा लाख रुपये नजराणा देऊन यशवंतरावांची कुमक घेतली आणि कोणाकडेही सामील न होतां तटस्थ राहिले.'' या प्रकरणासंबंधात माहिती देणारे सरकारी दप्तरांतील कांहीं कागद आम्ही पुढें देत आहोत. त्यावरून तत्कालीन लष्करी व्यवस्थेची कल्पना बांधता येईल. ''जिकडे जसा उपयोग पाहुं तिकडे आणऊन घेऊं.'' हे शब्द महाराज यशवंतरावांच्या राज्यकारभाराच्या शैलीचे द्योतक होत. त्याचप्रमाणे लेखांक २ इंगळे प्रकरणासंबंधीं : त्याचा सारांश खालीलप्रमाणें.

(लेखांक २) सबलगडचे मुक्कामीं भेटी जाहल्यापासून मेवाडांत येईपावेतों दोन्ही दौलतीत पूर्वसांप्रदायानुरूप ऐक्यभाव चालून दबाब पडून परस्परें संतोष व शत्रूंस मसलत प्राप्त झाली. वडिलांचे चालीप्रमाणें श्रीमंतांचे राज्यात किलाफ न वाढतां सेवा घडत आली, तैसीच घडावी. त्याप्रमाणें ताम्रांचा ऱ्हास करावा हाच विचार दृढनिश्चयाचा होऊन फौजेंत खर्चाची ओढ. दोन्ही दौलतीचे मामले इंगळे यांजकडे. पदरचे माणुस बिघडूं नये यास्तव कामाचे ओझें त्यांचेच माथां दिलें. यातील क्रियेचे वगैरे अर्थ समजण्यांत तथा राहिली नाहीं. बऱ्हाणपुरचे प्रसंग येऊं नये अस्तु. हल्लीं राजश्री सर्जेराव यांजकडे तीन चार सूचना गेल्यामुळें मशारनिल्हे चितोडपावेतों आले. सत्वरच येऊन मिळतील. बाह्यात्कार व्यंग दिसू न देतां वृश्चिक याचा जाब लवकरच होईल. लोकांची दिलभरी करून जैपूरवाले वगैरे सामील होतील तितके करून आग्रे, दिल्लीचे मैदानांत येऊन पायबंद देतों. सारांश, आपले एक अनुमते जाले असतां हिंदुधर्माची सर्वांस शरम पडून पगडबंदही सामील होतील. **(होळकर सरकारचे रेकार्ड, इ. स. १८०४ पैकीं)**

ह्या सोबत जोडलेले लेखांकावरून अनेक प्रकारांनीं राज्ययंत्रावर प्रकाश पडेल. ''कच्चा हिशेब जमींदाराचे दाखल्यानिशीं सरकारांत समजाऊन देऊन'' हे शब्द तत्कालीन राज्यकारभाराचे पद्धतीचे दर्शक आहेत व मननीय आहेत. महालानिहाय जे जमींदार वंशपरंपरेचे असलेमुळें त्यांचा राज्ययंत्राचे कामी उपयोग करून घेण्याची मराठी राज्याची दृष्टी उपयुक्त होती. सरकारी नेमलेले अधिकारी कमाविसदार वगैरे कितीही हे उपयुक्त असले तरी त्यांची वृत्ती उपरी असण्याचा संभव व रयतेच्या हिताकडे दुर्लक्ष

होण्याचाही संभव. तेव्हां या अधिकारी वर्गावर स्थानिक दाब जमीदारांचा असणें राज्याच्या बळकटीस इष्ट होय. असें हे दुहेरी सांधे राजाचे आणि रयतेचे प्रत्येक महालीं असल्यानें राज्याच्या शाश्वतीस धक्का बसण्याचा प्रसंग क्वचित येई.

ह्या प्रकरणाचे आधारभूत कांहीं लेखांक व तह व उपतह खाली नमूद करीत आहोत.

(लेखांक ३) ता. ९-१०-१८०४ राजश्री वासुदेव रघुनाथ कमाविसदार संस्थान बुंदी वगैरे. स्नेहांकित यशवंतराव होळकर दंडवत. सु.स्वमसमयातेन व-आलफ. आलीसाहेब सिलेदार निसबत लाला भवानीशंकर यांजकडील अमिनुदिन सिलेदार याजला तिकडून स्वारी आली तेव्हां जखमी. सबब कोट्यास रा.लाला भवानीशंकर यांचे वाड्यांत ठेविले. त्याजला स्वारींत येण्याविषयीं ठराऊन हे पत्र तुम्हास सादर केलें असें. तरी अमीनुद्दिन सिलेदार यांजला बदलमुशाहिरे ऐवजी स्वारी खर्चास रुपये ३०० तीनशें तुम्हाकडून देविले असते. तरी सदरहू रुपये संस्थान मजकुर येथील ऐवजीं सालमशाही खर्च देऊन मशारनिल्हेचा वाटेचा जाप्ता राजश्री जालमसिंग यांजकडून देववून बंदोबस्त करून स्वारींत मथुरें प्रांतीं पावते करून देणें. जाणिजे छ ४ रजब. मोर्तबसुद.

(ह्या पत्रावरील शिक्का इतर शिक्यापेक्षा निराळा असल्यानें खाली देत आहोत.)

श्री लक्ष्मीकांत : शाह आलम बादशाह गाजी का, फरजंद अरजुमंद बहादुसाल मुल्क जबदतल उमरा महाराजधिराज राजराजेश्वर जशवंतराव होळकर सुबेदार आलिजाह नुसरते जंग बहादुर

(लेखांक ४) ता.२९-११-१८०५ रा. वासुदेव रघुनाथ कमाविसदार संस्थान बुंदी पाटण व लाखेरी यांस स्नेहांकित यशवंतराव होळकर दंडवत. तुम्हाकडे संस्थान व परगणे मजकूर येथील मामलत सालमजकुरीं होती ते पेस्तर साल संमत १८६२ चे अव्वल सालापासोन दूर करून राजश्री बाजीराव बापुजी यांजकडे सांगून हें पत्र सादर केलें असे. तरी तुम्ही कच्चा हिशेब जमीदाराचे दाखल्यानिसीं सरकारांत समजाऊन देऊन पेस्तर सालचे अव्वल तारखेपासून महाली कोणेविसी दखलगिरी न करितां संस्थान व महालची ठाणीं मशारनिल्हेच्या जिमेस करून कबज घेणें. जाणिजे छ २९ सफर (शिक्का मोठा वरीलप्रमाणें.)

(लेखांक ५) ता. ७-७-१८०५ रा. भारमल होळकरांचे नांवें. चि. अमृतराव होळकर स्वारींतून खानदेश प्रांतीं गाळण्यास कामगिरीकरितां गेला. त्याची पुढें जायची सोय नाहीं. कांहीं एक दिवस महेश्वरीं राहणार. समागमें सरकार पागेतील डागाचीं घोडीं आहेत. त्याजला चंदी तेथें पावली पाहिजे. तरी तुम्ही चिरंजीवाबरोबरील घोड्यांची हाजेरी घेऊन तेथील सिरस्ते चंदी रोजिना देत जाऊन घोड्यांचे पोटांत चंदी जाय आणि घोडे हुशार राहतें करणें. उंटांसहित दागाचीं जनावरें असतील त्यांजलाही चंदी देत जाणें : छ ९

**(तहनामा पुणें पेशवे रेकॉर्डपैकीं ता. २४ डिसेंबर इ. स. १८०५)**

श्रीमंत महाराज यशवंतराव होळकर व सर जान मालकमसाहेब यांचे विद्यमानें करार

शेख हबीबुल्ला व बाळाराम शेट ठरला त्याचीं कलमे खालीलप्रमाणें :

तहनामा सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे सरदारांसीं व महाराजे मबसूफ यांसीं कित्येक प्रकारें जुदाई आली होती. सांप्रत उभयपक्षीं दोस्ती मुकरर जाहली. त्यांस गव्हर्नर जनरल सर जार्ज वारली, वारोनेटसाहेब बहादुर यांजकडील मुखत्यार लार्ड लेकसाहेब त्यांजकडील मुखत्यार, कर्नेल जान मालकमसाहेब बहादुर यांचे विद्यमानें व महाराजे होळकर यांजकडील शेख हबीबुल्ला व बालाराम शेट यांचे विद्यमानें करार ठरला बतपशील.

(१) कलम पहिलें : सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांजकडील सरदार करार करितात कीं महाराजे यशवंतराव होळकर यांसी लढाई मौकूफ जाली. पुढें महाराजे मौसूफ करार करितात कीं सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांसी व त्यांचे इलाखेदारांसी व दोस्तांसी कोणे प्रकारें शत्रुत्वाची मसलत करणार नाहीं व ज्यामध्यें त्यांचे नुकसान तें करणार नाहीं.

(२) कलम दुसरें : महाराजे यशवंतराव होळकर करार करिताहेत कीं रामपुरा व टोंक व बुंदी व लाखेरी व समधी व मालोगांव व दतिया वगैरे मुलूख बुंदीचे पहाडाचे उत्तरेस आहे तो आजपर्यंत सरकार दौलत मदार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे इलाख्यांत कायम आहे. त्या मुलखाचा दावा करणार नाहीं व आस्ता धरणार नाहीं.

(३) कलम तिसरें : सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे सरदार करार करीत आहेत कीं होळकरांचे खानदानचा कदीम तालुका व मुलूख माळव्यांत व दुसरें राजे मेवाड व मारवाड व हाडोती व चंबल नदीचे दक्षिणेस राजे आहेत त्यांचे मुलखांत आहे त्यांस उपद्रव देणार नाहीं व अंमल दखल करणार नाहीं आणखी करार करीत आहेत कीं होळकरांचे तालुक्याचा मुलूख तापी नदीचे दक्षिणेस व दक्षिण प्रांतीं आहे तो अद्याप सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांजकडील सरदाराचे हस्तगत आहे तो महाराजे यशवंतराव होळकर यांचे सरकारांत माघारा द्यावा. मगर चांदवडचा किल्ला व परगणा अंबाड व सेवगांव व गंगागोदावरीचे दक्षिणेकडील गांवही मकाने मात्र सरकार कंपनी इंग्रेज बहादुर यांचे स्वाधीन राहतील. परंतु होळकरांचे खानदानाचे थोरपणावर नजर देऊन करार केला जातो महाराजे यशवंतराव होळकर यांजकडून दोस्ती कायम राहील व कोणे एक प्रकारे सरकार कंपनी इंग्रेज बहादुर व त्यांजकडील इलाखेदार व दोस्त यांचे तालुक्यास उपद्रव न लागल्यास मुलुखमजकुरही दिढा वर्षांनीं महाराजे यशवंतराव होळकर यांचे स्वाधीन केला जाईल.

(४) कलम चवथें : महाराजे यशवंतराव होळकर करार करिताहेत कीं परगणें कोंच बुंदेलखंडचा जिल्हा आम्ही सोडला याचा दावा करणार नाहीं परंतु सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचे सरदार करार करीत आहेत कीं महाराजे मौसूफ यांजकडून दोस्तीची मजबुती यथास्थित राहिल्यास ज्याप्रमाणें बाळाबाईस जहागीर दिली आहे त्याप्रमाणें कोंच महाराजे मौसूफ यांची कन्या भीमाबाई यांस दोन वर्षानंतर कंपनीचे सरकारांतून जहागीर दिल्ही जाईल.

(५) कलम पांचवें : महाराजे यशवंतराव होळकर करार करीत आहेत कीं सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचा मुलूख व यांचे सरदारांनीं घेतलेला मुलूख व त्यांचे इलाखेदार व दोस्त यांचे तालुके यांसी कोणेविसीं दावा करणार नाहीं.

(६) कलम सहावें : महाराजे यशवंतराव होळकर करार करिताहेत कीं सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांचे रजामंदीसिवाय कधींही कोणे येक फिरंगियाच्या मुलकांतील माणूस नौकर ठेवणार नाही.

(७) कलम सातवें : महाराजे यशवंतराव होळकर करार करीत आहेत कीं सर्जेराव घाटगे यांनीं लबाडी करून मुलखाची खराबी केली त्याहीमध्यें सरकार कंपनी इंग्रज बहादुर यांसी लबाड्या बहुत अयोग्य केल्या याजकरितां सरकार दौलतमदार कंपनी इंग्रज बहादुर यांचे सरदारानीं त्या बदजाताचे लबाडीचा इस्तहारनामा लिहून पाठविला यास्तव सर्जेराव मजकूर याजला आपले इलाखेचे मुलकाच्या मसलतीत घेणार नाहीं व चाकरीस ठेवणार नाहीं.

(८) कलम आठवें : सरकार दौलतमदार कंपनी इंग्रज बहादुर यांजकडील सरदार करार करिताहेत कीं महाराजे यशवंतराव होळकर सला मुकरर करून तहनामे दुरुस्त जाहल्यावर आपले तालुक्याकडे कूच करून जातील त्यांस आम्हाकडून कोणीही मुजाहिम होणार नाहीं. कोणे गोष्टीविषयीं अडथळा होणार नाही व त्यांचे कोणत्याही कामांत दखल करणार नाहीं. परंतु यांस शर्थ कीं त्यांनीं आपला तहनामा दुरुस्त होतांच पटियाला व खटलन वगैरे तालुके सरकार व जयपुरचे राजे डावे हाताकडे टाकून दरकूच आपल्या तालुक्यास जावें. मार्गामधीं सरकार वगैरे मुलूख लागल्यास रयतीस कोणेविसीं उपद्रव होऊं न पावे. आपले फौजेपासून त्याची रखवाली करावी.

(९) कलम नववें : येणेंप्रमाणें तहनामा नौ कलमाचा ता. २४ डिसेंबर इ. स. १८०५ इ. मु. छ २ शवाल सन १२२० हिजरी बियास नदीचे तीरी रायपुरचे घाटावर उभयपक्षीं मसलतीने लिहिण्यांत आला. महाराजे यशवंतराव होळकर यांचे मुखत्यार सेख हबीबुल्ला व बाळाराम शेट यांचे मोहर दस्तकतानिशीं लिहून जनरल लार्ड लेकसाहेब यांचे हवाला केला व एक तहनामा लार्ड लेकसाहेबांचे मुखत्यार कर्नल जान मालकमसाहेब बहादुर याचे मोहर दस्तकतानिशीं लिहून होळकरांकडील मुखत्यारांस दिला.

यादी सुभा राजश्री यशवंतराव होळकर यांजकडील जावरा वगैरे महालची वहिवाट नबाब कपूरखां इप्तेखांसदौले याचे सुपूर्द करून कायमी सरदार केलें. त्याजबद्दल ठरावाचीं कलमे बी तपशील शके १७२७ संमत १८६२ इसवी इ. स. १८०५ (ता. २७-१२-१८०५)

श्री म्हाळसाकांत चरणीं तत्पर :
तुकोजी सुत यशवंतराव होळकर

(१) श्रीमंतांच्या देहनगीनें जावरा, पिंपळोद वगैरे महाल या सरकारच्या वांटणींत आलेले तुमचे सुपूर्द केलें आहेत. त्यांजवर तुम्ही कमाविसदार नेमून महाला निहायची देखरेख व आबादी इस्तवारी ठेवीत जाणें.

(२) सरकारांतून महालानिहायचे बंदोबस्तासाठीं तुमचे निसबतीची फौज तुमचे स्वाधीन केली आहे. त्याचे खर्चाचा आकार व इनामदार हक्कदार यांचा खर्च दिल्हे.

महालाचे बेरजेतून वजा करून खाली लिहिल्याप्रमाणें दरसाल सरकारांत भरीत जाणें.

(३) तुम्ही लहान अधिकाराने सरकारांत चाकर राहून थोर जाहला. सरकार सेवा इमानानें केली जाणून तुम्हास सरदारीबद्दल महाल मुकरर केलें आहेत. त्या महालचे वसुलांतून दरसाल सरकारांत तुम्ही पांच लक्ष एक रूपया ५००००१ देऊन बाकी इनामदार हक्कदार व तुमचे सरदारीकडे व फौजेचे कामास खर्च करीत जाणें.

(४) जी फौज तुमचे ताब्यांत दिली आहे त्या व तिचे खर्चाचे आकारांत कमजास्ती करणें जाहल्यास इकडील इतल्यानें करीत जाणें व ज्या ज्या वेळी सरकारांत फौजेची जरूर लागेल त्यावेळीं फौजेसहित तुम्ही चाकरींत हजर राहत जाणें.

(५) छ २ सवाल रोजीं सरकार कंपनीबरोबर या सरकारचा तह जाहला त्यावक्ती तुम्हीं व नबाब मीरखां अमीर दौले उभयतांनीं सरकारांत कलमबंदीची याद देऊन जिकर कळविला कीं दिल्हे महालाचे उत्पन्नातून पूर्वीपासून फौजेचा खर्च होऊन बचत राहिली. तसा ऐवज सरकारांत भरीत आलों. आतां सरकारची सरदारी ठरली. सबब फौजेचे व सरदारीचे वगैरे खर्चाचा अंदाज मनांत आणून सरकारांत पेस्तर नक्की ऐवज दरसाल किती द्यावयाचा. ठराव व्हावा म्हणोन त्याजवरून सरकारांनीं वर लिहिल्याप्रमाणें कंपनी सरकारचे सरदार कर्नल जान मालकम व इकडील वकील इलची शेख हबीबुल्लाखां व बाळाराम शेट यांचे विद्यमानें ही कलमबंदी ठरविली आहे. यांत पुढें कांहीं कमजास्त न होतां सरकार याप्रमाणें अंमलात आणतील.

येणेंप्रमाणें पांच कलमें आहेत. याप्रमाणें वहिवाट करून सरकार चाकरी एकनिष्ठपणें निरंतर करीत जाणें. छ. ५ सवाल. मोर्तबसुद इ. स. १२२० हिजरी मुक्काम बीलनदी समीप रायपूर घाट.

मोर्तबसूद.

अस्सल यादीची प्रत पुण्यास श्रीमंतांकडे दखलगिरीसाठीं रवाना छ ९ सवाल.



**प्रकरण ९ वें**

# इ. स. १८०५ च्या तहापासून इ. स. १८०८ अखेर

रायपूर घाट (राजपूर) चा तह ता.२४ डिसेंबर इ. स. १८०५ त कायम झाला. या तहानें होळकरांचा पूर्वीचा सर्व प्रदेश त्यांजकडेस कायम झाला; पण या तहांत विशेष गोष्ट जी आपणास ध्यानांत घ्यावयाची ती ही कीं हा तह महाराज यशवंतराव होळकरांबरोबर झाला. सुभेदार काशीराव होळकरांबरोबर नाहीं. सुभेदारीची वस्त्रें पेशव्यांनीं काशीरावांस दिली होती. आज सात आठ वर्षांच्या हालअपेष्टा व परिश्रमानंतर यशवंतराव महाराज जगाच्या दृष्टीनें होळकरशाहीचे मालक ठरले. पेशव्यांचा अधिकार बाजूस पडला आणि सर्वांत मोठी गोष्ट झाली कीं होळकरशाहीवरील शिंदेशाहीचे ग्रहण सुटलें. सारांश, महाराज यशवंतरावांच्या ध्येयापैकीं पायाभूत असलेलें तत्त्व आज थोडेंबहुत तरी सिद्धीस गेलें. पायाभूत म्हणण्याचें कारण त्यांचे ध्येय केवळ होळकरशाहीपुरतें आकुंचित नसून मराठेशाहीची दृढ संघटना आणि ताम्रास तोंड देणें इतकें व्यापक होते. आपले स्थान थोडे बहुत स्थिर झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या ध्येयाच्या साधनार्थ चाललेले त्यांचे प्रयत्न आतां पाहूंया. भवानीशंकर लिहितात, ''यशवंतराव महाराज रोहटक येथून निघून आसमंतात चांगल्या बहादुर सैन्यासह दाखल झाले. प्रत्येक गांवांतून लाख रुपये मामलत घेत गेले. हिंदुस्थानी रिसालदारांनीं तनख्याबद्दल बंड व फिसाद केला. त्यांस तनखा देऊन त्यांची समजूत केली. जयपुर, जोतपुर यामध्यें युद्धाचा प्रसंग आला. जयपुरवाल्याकडून देणगी चालत आली. आपलीं घरचीं माणसें जोतपुरास होती ती बोलाऊन घेतलीं आणि कोणाकडेही सामील न होतां तटस्थ राहिले.'' या तहाचा आणखीही एक विशेष परिणाम झाला तो

असा कीं युद्धाच्या भर हंगामांत लेकनें मराठेशाहीच्या उत्तर हिंदुस्थानांतील मांडलिकास फोडून वैयक्तिक तह केलें होते; ते तह नवीन आलेल्या गव्हर्नर जनरलानें अमान्य केलें. त्यामुळें राजपुतान्यातील जयपुर जोधपुरदिकांचे होळकर शिंद्यादिकांशीं संबंध पूर्वागतच राहिले. सारांश, होळकरांची सत्ता स्थिर होऊन यशवंतराव महाराज तिचे सर्व मान्य अधिकारी ठरले; आणि रजपुतांवरील त्यांचें अधिपत्य अबाधित राहिलें.

याप्रमाणें आपले स्थान स्थिरस्थावर केल्यावर महाराजांचे लक्ष अंतर्व्यवस्थेकडे गुंतले. (१) शिक्क्यांत पूर्वी खंडेरावांचे नांव होतें त्याजागीं शिक्का आपले नांवाचा चालू केला. (२) मोठी फौज बाळगण्याचे प्रयोजन न राहिल्यानें ती कमी केली. दक्षिणी फौजेस जमेल त्याप्रमाणें त्यांच्या मूळ घरी पाठवून दिलें पण अमीरखानासारखे पठाण अडून बसले. त्यांस पोट भरण्यासाठीं जयपुरचे नोकरीवर पाठविलें. (३) हरनाथसिंगास वसुलीसाठीं प्रांतनिहाय पाठविले. (४) जयपूर व जोधपूर यांत संग्राम उभा राहिला. जोधपुरकरांचे पूर्व उपकार स्मरून त्यांचा समेट करून दिल्हा. (५) भानपुऱ्यास आल्यावर नवीन सव्वाशें तोफा ओतण्याचा कारखाना चालू केला. (६) पूर्वीचे कंपु मोडून निवडक माणसें छाटून बारा पलटणें नवीन भरलीं. आणखीन सहा पलटणांची भरती करावयास लोक जागजागां गेले आहेत.''

ता. १५-२-१८०६ रोजीं खुद्द महाराजांनीं राजश्री व्यंकोजी भोसले सेनाधुरंधर यांस पाठविलेले पत्र एकंदर स्थितीचे दर्शक असल्यानें ते संबंध आम्ही खाली देत आहोत. ''आपलें पत्र पावलें. अभिप्राय अवगत झाला. आपलें पत्र आलें होतें. त्यावरून येण्याची सिद्धता झाली, परंतु अनेक प्रकारच्या अडचणी प्राप्त होऊन यावयाचा योग तूर्त घडत नाहीं. जमियत रवाना केली आहे. ती येऊन पावेल, मागाहून हरयेक निमित्तानें नर्मदा उत्तरतीर येणें घडेल व सविस्तर राजश्री व्यंकटराव कृष्ण यांचे लिहिल्यावरून कळेल म्हणोन लिहिलें व मशारनिल्हेचें लिहिल्यावरून समजण्यांत आलें. ऐसियास स्वराज्यांत जलचरांचा प्रसार विशेष झाला. हा घडूं न येणास्तव, महालमुलखाची आशा न ठेवितां, कळेल त्याप्रमाणें फौज व कंपू वाढवून, करोडो रुपयांचे पेचांत येऊन, आज दोन-अडीच वर्षे होत आलीं. रात्रंदिवस इंग्रजाशीं मुकाबल्याचा प्रसंग घडत आला. दरम्यान राजश्री दौलतराव शिंदे यांनीं मेळ करून भेट घेतली. त्यांचे आपले एकविचारानें पगडीवाले सामील राहतीलच, याभावें आपलेकडे पत्रांच्या रवानग्या होत गेल्या. मेवाड प्रांतीं आलियावर ताम्रास चोहोकडून पायबंद देऊन हारीस आणावे यास्तव पंजाबापावेतों जावयाचें केलें. इकडे लाहोरवाले वगैरे शिखांच्या भेटी होऊन सर्व सामल झाले. पोक्त जमाव झाल्यामुळें फिरंगी मागें पंचवीस तीस कोसांचे अंतराने येत गेले. त्यांनीं पटियाल्याचे मुक्कामापासून समेटाचे बोलणें लाविलें. इकडील मुस्तेदी पाहून सोबत्यांनीं (शिंदे) राजेरजवाडे अनुकूल करून दिल्लीचे सुमारें येऊन शह द्यावा, तें न करितां, कारभारी दुराशेंत येऊन पुन्हा त्यांनीं एकोपा ठेवून मेवाडांत राहिलें. पूर्वी स्वराज्यांतील ऐक्यता बहुत, येणेंकरून आजपावेतों व्यंग न पडतां येकछत्री अंमल फैलावला होता. हल्लींच्या आपसांतील चाली पाहून सर्वांस आपले घर संरक्षण करून

जमीनदारीनें असावें हें प्राप्त झाले. आपले येण्याची प्रतीक्षा होतीच, तो योग न आला. फौज सामल होईल हे कागदपत्रीं मात्र श्रवण झालें अथवा बंगाल वगैरे बल धाडलें असतें तरी किती उपयोग पडता. हिंदु धर्मास मुख्य आपले इरादे नमूद असावे, असाही अर्थ नाहीं. सर्वत्रांची उमेद, अनुभव व प्रत्यय पाहून, इंग्रेजाकडून समेटाचें बोलणे झालें होतें, त्यावरून समेट करून घेतला. फिरंगी कूच करून माघारें दिल्ली प्रांतीं गेलें. आमचे मुक्काम व्यासगंगा व सतलज नदीचे दुआबांत आहे. इतःपर दरकूच माळवा प्रांतीं यावयाचें घडेल. वरकड घरोब्याचे विचार सनातन आहेत ते यथाक्रम चालवावे. इकडील दुसरा अर्थ मानूं नये. सर्वदा पत्र पाठवून कुशल वर्तमान कळवीत असावें. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.''

सन १८०५ त इंग्रजांबरोबर यशवंतराव महाराजांनीं पहिला तह केला. त्या तहानंतर ''झालें आपलें काम, आतां स्वस्थ बसूं'' या वृत्तीत ते राहिले नाहींत. इ. स. १८०६ त कंपनी सरकाराबरोबर त्यांचा दुसरा तह झाला. एका वर्षाच्या मुदतींत ''स्वराज्यांत जलचरांचा प्रसार विशेष झाला त्यांस चोहोकडून पायबंद देऊन हारीस आणावें.'' या हेतूनें ''महाल मुलखाची आशा न ठेवितां, कळेल त्याप्रमाणें फौज व कंपू वाढवून, करोडो रुपयांचे पेचांत येऊन रात्रंदिवस इंग्रजाशीं मुकाबल्याचा प्रसंग घडत आला.'' इत्यादि शब्दांत महाराजांनीं विनयपूर्वक केवळ एका वर्षांतच नव्हे पण इ. स. १८०६ पर्यंतचें आपले चरित्र संक्षिप्त रीतीनें वर्णिले आहे. तह झाला पण अंतःकरणाची तळमळ जी वरील पत्रांत त्यांनीं वर्णिली आहे ती त्यांस स्वस्थ बसूं देईना. आकाशपाताळ एक करण्याचा हा एका वर्षांत जो अट्टाहास त्यांनीं केला तो इंग्रजी कागदांवरून आम्ही खालीं देतों.

सुभेदार काशीराव व मीरखान आपआपल्या दृष्टीप्रमाणें हालचाल करीत होते. यशवंतराव महाराजांच्या दृष्टीकोनाबरोबर या दोघांचा दृष्टीकोन नेहमींच जमणें शक्यही नव्हतें व साध्यही नव्हतें; पण यशवंतराव महाराज हे ''जिकडचा उपयोग तिकडे करून घेणारे'' असल्यामुळें आपल्या संकल्पांतून त्यांस त्यांनीं (महाराजांनीं) वगळलें नाहीं. बडोद्याच्या राजप्रकरणांत आपलें अंग ठेवून त्याही प्रकरणाचा आपल्या राजकारणांत उपयोग करून घेण्यास ते पाहत होते. इ. स. १८०५ च्या ता. १३ मेच्या पत्रात बडोद्याचा रेसिडेंट ही गोष्ट आपल्या वरिष्ठांपुढें मांडतो. याच मुदतींत प्रतापगड, जावद येथील खंडणी वसूल होत आहे. ता. २५ आगस्टचे सुमारास महाराज, घाटग्यास रामपुरची जहागीर बहाल करितात आणि जगजाहीर करितात कीं काबुलचा राजा आणि शीख हे माझ्या कार्यात सहकारी झाले आहेत. सदाशिव माणकेश्वर हे श्रीमंत बाजीरावसाहेबांजवळ कारभार करीत होते त्यांस ता. २० आगस्ट रोजीं महाराजांनीं पत्र पाठविलें. त्याचा सारांश इंग्रजी पत्रावरून खालीं देत आहोंत.

''इकडील हकीगत तरी आपणास वेळोवेळीं श्रुत होत असणारच. आमच्या पूर्वजांनीं श्रीमंतांच्या सेवेंत देह कसे खर्ची घातले हें आम्ही सांगावयास नको. त्या पूर्वपरंपरेस जागून दक्षिणेंत दर्शनास आलों. यजमान उठोन जलचरांकडे गेले. जलचरांचा बाहेरून मायावीं

देखावा असला तरी आपले साम्राज्य ते घशाखाली उतरविणार अशी पक्की खात्रीं असल्यामुळें त्या प्रसंगास तोंड देणेंचा मी निर्धार केला होता. यश माझ्यासाठीं मी पाहत नव्हतो. आजपर्यंत ''हल्लींच्या आपसातील चाली पाहून सर्वांस आपले घर संरक्षण करून जमीनदारीनें असावे हें प्राप्त झाले आहे.'' कांहीं काळपर्यंत आमच्या सोबत्यांस आमचे म्हणणें पटून आमचे सहयोगी ते बनले आहेत. आतां आमचे मालक या कार्यात येऊन त्यांनी कळस चढवावा. माझी पूर्ण खात्री आहे आमच्या एकीपुढें शत्रू तगणार नाही. मालकांचीं आज्ञा आम्हा दोघांस यावी. पूर्वापारच्या पद्धती पाळूंया म्हणजे त्याचप्रमाणें यशही पदरांत पडेल.''

पेशव्यांचें अंतःकरण आपल्याबद्दल शुद्ध नाहीं, सोबती पतंग उडविण्यांत रमलेले आणि त्या पतंगाप्रमाणेंच झालेलें; हें सर्व जाणूनही केवळ ध्येयाच्या प्रेमासाठीं महाराजांनीं कितीतरी पड घेतली हे परकियांच्या ह्या पत्रावरून स्पष्ट दिसून येईल.

घराकडील खटपटीस कोठच्याच तऱ्हेनें यश आलें नाहीं तेव्हां महाराजांनीं ता.२० सप्टेंबरच्या सुमारास आजमीर व नारनोळ करून ता. ११ आक्टोबरला पटियालापुढें मुक्काम केला. तेथील साहेबसिंगाची भेट घेऊन शिखांपुढें राजकारण मांडलें. ता.२३ नोव्हेंबरला इंग्लिश रेसिडेंटास भीती पडली कीं दिल्लीवर जाऊन होळकर इंग्रजांशीं दोन हात करणार. ता.२६ नोव्हेंबरला साहेबसिंगाबद्दलची आशा सुटून यशवंतराव महाराज सतलजपार गेले. महाराज व्यापक दृष्टीनें प्रेरित होऊन हाल आपेष्टांत रानोमाळ फिरत आहेत त्याच वेळीं अलिजाबहादुर, होळकरांचा मुलूख डोळ्यापुढें ठेवून कलमबंदी करण्यात गर्क झाले होते.

ता. २६ नोव्हेंबरला सतलज ओलांडून महाराज पार गेले, त्यांसंबंधात कर्नल बर्न वरिष्ठांस कळवितो. ''हे कृत्य आमच्या कल्पनेबाहेर उरकून गेले. महाराजांचे या धैर्याने आम्हां सर्वांस खालीं पाहवयास लाविले आहे. त्यांचे एकंदर लष्कर लवाजमा पटियालापासून इतकें लांबवर पसरलें होतें कीं त्यांच्या तोफा तेथून निघून जातील ही कल्पना देखील करवत नव्हती.पण आम्ही सन्निध असतांदेखील तोफखाना निघून गेल्याची बातमी आम्हांस मागाहून लागली. पंजाबात महाराज गेल्यावर रणजीतसिंगाकडून वकील त्यांजकडे आले आणि अफगाणिस्थानचा राजा सुजाइल्मुल्क याचेही वकील आले. रणजीतसिंगाचे आमंत्रण होतें कीं सर्व शीख सरदार एकत्रित करूंया. त्याचप्रमाणें अफगाणिस्थानचे राजाचे म्हणणें पडलें कीं आपण आल्याशिवाय महाराजांनीं इंग्रजांविरूद्ध युद्ध पुकारू नये. महाराजांनीं वकिलाबरोबर अफगाणचे राजासाठी दोन लाखांचे जडजवाहीर व नजरभेट म्हणून पाठविली. शिखांचे दरबारीं भाषण झालें. झिंदला राजा भागसिंगानें साधी माणुसगिरी देखील दाखविली नाहीं. स्वारी पुढें क्यूटाळ येथें गेली. राजा भाइलालसिंग हा आधीच इंग्रजांचे कच्छपी गेला होता. जोतसिंग, गुरूदत्तसिंग आणि कर्मसिंग हे तिघे छोटे मोठे सरदार थोडे बहुत महाराजांकडे वळत होते, तोंच इंग्रज बहादुरांकडून पत्र येतांच मूग गिळून बसले. याप्रमाणें रणजीतसिंगाची वाणी फोल ठरली. अफगाण राजे गृहकलहामध्यें गुरफटून पडले आणि त्यांचे पाऊल तेथेंच थबकले. सारांश, दक्षिणेंत आशा दिसेना, उत्तरेंत आसरा मिळेना अशा

स्थितींत ''हिंदुधर्मास मुख्य आपले इरादे नमूद असावें हे कांहीं एक दिसण्यांत येईना. स्वधर्मास एक आमचा नफा, वरकडांचीं नुकसानी, असाही अर्थ नाही, सर्वत्रांची उमेद, अनुभव व प्रत्यय पाहून इंग्रजांकडून समेटाचें बोलणें झालें होतें त्यावरून समेट करून घेतला'' एवंच, इ. स. १८०५ पासून म्हणजे रायपूर घाटाचा तह झाल्यापासून इ. स. १८०६ चा हा तह घडेपर्यंत आपल्या ध्येयाच्या साधनार्थ महाराजांनीं दक्षिण-उत्तर पालथी घातली. पण त्यांची हाक अरण्यरूदनाप्रमाणें आली आणि गेली आणि इ. स. १८०६ चा तह घडून आला. तो तह आम्ही संपूर्ण पुढें दिला आहे. हार किंवा जय असें कोणाच्याही पक्षास न येतां जिकीरीस पडून आटोपतें घ्यावें अशा भावनेनेंच तो तह झालेला दिसतो.

पहिली गोष्ट ही कीं, हा तह इंग्रजी कंपनी व यशवंतराव होळकर यांचा सलुख झाला असें उल्लेखितों, म्हणजे स्पष्ट होते कीं सुभेदार काशीराव मागें पडले. दुसरी गोष्ट ''चिरा चिऱ्याचे जागीं बसवावा'' ही यशवंतराव महाराजांची इच्छा पेशव्यांच्या हातून पूर्ण न होतां इंग्रजी कंपनीकडून पूर्ण झाली. पेशव्यांनीं संधी गमाविली. सबंध तहाकडे पाहतां मांडलिकत्व कबूल केलेलें दिसत नाही. गेलेला कांहीं प्रांत परत मिळून रजपुतान्यांतील संस्थानें मराठ्यांची मांडलिक राहिली, ही बाब पुढील पत्र लेखांकांवरून दिसून येणार आहे.

होळकरशाही तगली. यशवंतराव महाराज तिचे मालक जगजाहीर झाले. तेव्हां महाराजांनीं आपले लक्ष उच्च ध्येयावरून काढून गृहव्यवस्थेकडे लाविलें हेंही पुढील पत्रलेखांकांवरून किंवा ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या स्वतंत्र पुस्तकांत दिसोन येणार आहे. दुसरें, मल्हाररावांचा मुलगा खंडेराव हा किशनगड परगण्यांतून कूच करून हरमाड्याचे मुक्कामास येत असतां त्याचें देहावसान झालें. इंग्रजी ग्याझिटियरकारांनीं विषप्रयोग झाला असें म्हटलें आहे; पण तत्कालीन लेखांवरून स्पष्ट दिसतें कीं वाख्यानेच देहावसान झाले. या नंतर महाराजांनीं आपल्याच नांवाचा शिक्का सुरू केला, हें सांगांवयास नकोच.

तह जाहल्यानंतर दोन तीन वर्षेपर्यंत श्रीमंत यशवंतराव महाराज आणि कंपनी सरकार यामध्यें सलूक चांगला टिकला. महाराजांची कीर्ती दूरवर पसरली असल्यामुळें ज्या ज्या ठिकाणीं सैन्याची, सेनापतीची अगर सल्ल्याची गरज भासे त्या त्या ठिकाणीं महाराज यशवंतरावांची स्मृती सहज उद्‌भवे. हैद्राबाद, पुणें आणि नागपुर या ठिकाणीं जेथें जेथें बखेडा उद्‌भवला तेथें तेथें महाराजांच्या सहाय्याची याचना होई.

दक्षिण हैदराबादेस आई व मुलगा यात बखेडा उत्पन्न होऊन आईनें एक कोटीची देणगी महाराजांस देऊं केली. राजा महिपतराम भागानगराहून (दक्षिण हैद्राबादेहून) निघून महाराजांचे आश्रयास येऊन राहिले. या महिपतरामानें मालेगांवजवळ सैन्यभरतीस प्रारंभ केला आणि वहदअली खानबंगश, दादूखान वगैरे नर्मदेवरील सेनानायकांशीं सामील होण्याचा संकल्प केला. इ. स. १८०८ च्या जून मध्यें महिपतराम यांनीं रतलामच्या दक्षिणेस छावणी केली आणि स्वतः होळकरांकडे जाऊन भेटले. तेथून ते रामपुऱ्याकडे गेले आणि मीरखानची

मार्गप्रतीक्षा करीत राहिले. यावेळीं इंग्रज बातमीदार लिहितों कीं ''यशवंतराव महाराजांचेजवळ सवाशें तोफांचा संग्रह सज्ज झाला होता. दोघांचें सैन्य मिळून दहा हजाराची भरती झाली होती. तिकडे रतलाम संस्थानात बखेडा उत्पन्न होऊन एका पक्षाचे डोळे यशवंतराव महाराजांकडे लागले होते. याच वर्षाच्या आगस्टमध्यें झाबुवा संस्थानावर महाराजांनीं दहा हजारांची वरात करून महिपतरामाची संभावना केली'' याच सुमारास महिपतराम यांनीं इंग्रजी कंपनीकडे पत्र पाठवून आपलें मनोगत प्रगट केलें. त्या पत्रांत ते लिहितात कीं आपले मालक असबजहां यांसी जसा मी आज्ञाधारक आहे तसाच कंपनीशींही सलूख राखून आहे. पण माझ्याबद्दल कंपनीतील कांहीं लोकांनीं अफवा उठवून माझे नांव बद्दू केले आहे. अशा स्थितींत महाराज यशवंतरावांचा सल्ला घेण्यास मी येथें आलो. त्यांचा व माझा पूर्व परिचय नव्हता; तथापि माझ्या दर्जावर नजर देऊन त्यांनीं माझा मानमरातब उत्तम ठेविला, द्रव्याची मदत मला केली, अधिक असलेलें माझे सैन्य आपलेकडे लावून घेतलें आणि माझ्यासंबंधाचें पत्र गव्हर्नर-जनरलसाहेबांकडे दिले.'' पण पुढें हे सर्व नातें बदलले. इ. स. १८०९ मध्यें तोफेच्या तोंडीं मृत्यू पावण्याचे दुर्भाग्य या महिपतरामास प्राप्त झाले.

मधून मधून अलीखानबंगश, दादूखान असें अर्धवट राजे यशवंतराव महाराजांवरतीं उलटून पडण्याचे कांहीं प्रसंग या दोन तीन वर्षांत येऊन गेले. ही मंडळी इ. स. १८०८ च्या मे मध्यें पांच हजार समुदायासह चांदवड सभोवार जमले. यावेळीं खंडोपंत चांदवडला कारभारी होते. प्रसंगाची तातडी पाहून सन्निध असलेल्या कंपनीच्या अधिकाऱ्याकडे त्यांनीं मदत मागितली. अधिकाऱ्यानें मोठ्या सहानुभूतीपूर्वक पुण्याकडे बोट दाखविलें. अशा स्थितींत दादूखान आणि त्याचे सोबती यांनी खानदेशांत कित्येक महिनेपर्यंत नासधुस चालविली. ही बातमी महाराजांचें दरबारांत कळतांच मीरखानाची योजना त्यांनी केली. बरेच वेळपर्यंत मीरखानाचें तिकडे जाणें झालें नाहीं. याच वर्षी श्रीनर्मदेस महापूर येऊन पंचवीसशें माणसें दगांवली असें इंग्लिश बातमीदार म्हणतो. या महापुराचा सरकारांनीं केलेला बंदोबस्त पुढील पत्रांकांवरून पहायास मिळेल.

खानदेशास हे वर्ष वाईट गेलें. दाऊदखान वगैरे लुटमार करीत होते हें वर आलेच आहे. त्यात निजामाचा प्रांत सन्निध असल्यामुळें या लुटारू लोकांस अधिक फावले. कंपनीचे अधिकारी ''शांततेचा भंग'' हा जप मोठ्यानीं जपूं लागले. गोविंद हरी नांवाचे होळकरांचे अधिकारी यावेळीं मोठ्या कैचींत सापडले. त्यांनी सेवगांव येथें मोठ्या मजबूतीने ठाणें देऊन शत्रूस दम दाखविला. अंबाडहून आणखी सैन्य मागविले. यामुळें त्या प्रांतांत मोठीच धामधूम उभी राहिली. पेंढारीही वाट पाहतच होते. अशा स्थितींत माळव्यांतून कांहीं मदतीची आशा दिसेना. या सालच्या ता. २९ डिसेंबर रोजीं कर्नल डोहट यानें दादुलखानावर एकदम हल्ला केला. खान आणि त्याची मंडळी नंदुरबार व सुलतानपुराकडे पळून गेली. त्यांचें सर्व सामान जागेवरच पडून राहिले. हैदराबादकडून घोडेस्वारांचें पथक आले त्यामुळें तर दादूलखानाची अगदीं धांदल उडाली. यावेळीं चार हत्ती, अठरा तोफा आणि सबंध बाजार

जेथच्या तेथें शत्रूच्या हातीं लागला. सारांश, ह्या एका वर्षांत खानदेशास महाराज स्वतः जाऊं न शकल्यामुळें आणि दोस्तांच्या मुलखास त्रास पोहचेल या जपामुळें पेंढारी व दाऊदखानासारखे बाजूस पडून कंपनी सरकारचे पाऊल मात्र मजबूतीनें या प्रांतांत पडले. इ. स. १८०८ चे सुमाराला महाराज ''परतंत्र'' व्हावयास प्रारंभ झाला. मनाची विमनस्कता दिसूं लागली. कधीं स्थिती चांगलीं तर कधीं बेहोष असा प्रकार झाल्यामुळें दरबारांत अनेंक रंग दिसों लागले. फौजबंद अमीरखान ''नाकापेक्षां मोती जड'' होऊन बसला. घरांतही फाटाफूट सुरू झाली. बळवंतराव कृष्ण दातार या गृहस्थास पुढें करून यशवंतराव निंबाळकर यांची विधवा बयाबाई व होळकरांचे सरदार पांढरे रणनवरे मोहिते आणि बारभाई यांनीं कंपनीशीं पत्रव्यवहार सुरू केला. त्यांत त्यांनीं हेतू प्रदर्शित केला कीं यशवंतराव महाराजांस गादीवरून काढून गादीचा मालक आमच्या मतानें आम्हीं ठरवूं. कंपनी सरकारनें सर्वथैव आमचे सहाय्य करावे. या मजकुराचा पेश त्यांनीं लाविला. कंपनीकडून उत्तर गेलें कीं यशवंतराव महाराज कंपनी सरकारचे दोस्त असल्यामुळें कंपनी सरकार या अर्जाचा विचार करूं शकत नाही; आणि अर्जदारांनी कंपनी-सरकारच्या मुलखांतून त्वरित बाहेर निघून जावें. गादीवरील हें मोठेंच संकट अशा प्रकारें आलें तसेंच गेलें. इ. स. १८०८ पासून इ. स. १८११ पर्यंत महाराजांची विमनस्कता कमीजास्ती प्रमाणांत चालूच होती. धर्माकुंवराचे एकदां विशेष प्राबल्य वाढले तरी पण धर्माकुंवर, आमीरखान आणि त्याचे दोस्त हे धूमकेतूप्रमाणें उदय पावत, त्रस्त करीत आणि अस्तंगतही होत. या मंडळींत बालाराम शेट मात्र नंदादीपाप्रमाणें थंड, शांत पण अखेरपर्यंत टिकून राहिले.

सन १८०९ च्या फेब्रुवारीच्या ता. ९ रोजीं महाराजांची कन्या भीमाबाई यांचा विवाह गोविंदराव बुळे यांजबरोबर मोठ्या थाटानें झाला. या भीमाबाई राजकार्यांत चांगल्या निपुण होत्या. इ. स. १८०६ त त्यांनीं वडिलांस लिहिलेले एक पत्र उपलब्ध आहे. त्याचा सारांश पुढें आम्हीं देणार आहोंत व पुढें बुळे घराण्यांत गेल्यावरही आपल्या अंगचें तेज त्यांनीं चांगलेच चमकविलें. त्याचे वर्णन पुढें वेळोवेळीं येईलच. हे गोविंदराव बुळे चांगले पराक्रमी होते. इ. स. १८०९ च्या ता. ६ डिसेंबर रोजीं त्यांनीं धार येथें चांगला विजय मिळविला आणि त्या विजयामुळें धार दरबारानें लाखांचा भरणा गोविंदरावांकडे केला. महाराजांच्या विमनस्क स्थितींत जे कारभारी मंडळ नेमले गेले त्यात गोविंदराव बुळे यांस मानाची जागा मिळत असताही ती त्यांनी नाकारली. इ. स. १८११ च्या मे महिन्यांत महाराजांचें सैन्य घेऊन गोविन्दराव बुळे गोधऱ्याकडे वळले. रू. १८००० चा तोडा घेऊन ते परतले.

अमीरखानाचें प्रस्थ या कारकीर्दीत बरेंच वाढलेलें दिसतें त्याच्या संबंधांत तत्कालीन इंग्लिश लेखकांत व बातमीदारांत बराच बाऊ वाटत असलेला दिसतो. महाराजांच्या प्रकृतीस विकृती झाल्यापासून त्यांच्या अंतकालापर्यंत म्हणजे इ. स. १८०८ पासून इ. स. १८११ पर्यंत या तीन चार वर्षांत अमीरखानानें नागपुराकडे धामधूम केलेंली दिसते. त्याचप्रमाणें इ. स. १८०८ च्या शेवटल्या पादांत सबंध राज्यकारभार त्याच्या पूर्णपणे ताब्यांत गेलेला दिसतो. कर्नल क्लोज अमीरखानसंबंधीं याप्रमाणें उल्लेख करितात. ''हिंदुस्थानमध्यें सध्या

असलेल्या सेनापतींत अमीरखानाचा दर्जा फार श्रेष्ठ आहे. युद्धासंबंधीचे त्याचे बेतबात विचारपूर्वक रचलेले असतात. युद्धाचे डावपेचांत आणि शत्रूस चकविण्यांत त्याचेइतका चतुर इसम कोणी दिसत नाहीं.'' यांची मजल जबलपुरापर्यंत गेलेली दिसते. इ. स. १८०९ च्या ता. ९ डिसेंबरच्या पत्रांत मजकूर आहे कीं ''भोसल्यांनीं अमीरखानाचा पराभव केला ही गोष्ट जरी खरी असलीं तरीपण एखाद्या जेत्याप्रमाणें अमीरखानानें त्या प्रांतांतून वसुली केली.''

नागपुराहून उठून अमीरखानाची स्वारी उज्जेनीकडे वळली. इ. स. १८१० ता. २७ मार्चच्या पत्रांत उल्लेख आहे कीं, उज्जेनीहून एक लाख आणि खाचरोदहून तीस हजारांची त्यानें उचल केली. याच वर्षाच्या एप्रिल महिन्यांत महाराजांच्या प्रकृतीमुळें जें कारभारी मंडळ बनले होते त्याच्यांत आणि अमीरखान यांत वितुष्ट आले. बाईसाहेब अमीरखानाच्या बाजूस वळल्या आणि अमीरखानानें महाराजांच्या अर्भकास दोन वर्षाचे वय असतांच गादीवर बसविले. (हेच पुढील मल्हारराव होळकर होत) अमीरखानानें चारी कारभाऱ्यांस बंदोबस्तांत ठेविले. त्यापैकीं धर्माकुंवर आणि चौधरी यांची इहलोकीचीही यात्रा बंदिवासांतच संपली. अमीरखानाचे मेहुणे गफूरखान आणि गुलाबखां हे आतां महाराजांचे शरीर-संरक्षक म्हणोन वावरूं लागले. याच वर्षाच्या जुलईत एक अतिशय जुनें पण प्रसिद्ध मंदिर अमीरखानानें लुटून पन्नास हजाराचे जडजवाहीर हस्तगत केलें. इ. स. १८११ त आपल्या सैन्याच्या तीन छावण्या करून संस्थानच्या चारी बाजूस आपला शह त्यानें बसविला.

श्रीमंत महाराज यशवंतराव यांनीं पुण्याची लढाई जिंकून पंतप्रधानाचें व अलिजाबहादुरांचें तेज जगताच्या निदर्शनास आणून दिलें. त्या दोघांवर अवलंबून असणारे सुभेदार काशीराव हे त्यापुढें फिक्के पडले हे सांगांवयास नकोच. आणखी अनुभवानें शहाणे होऊन काशीराव हे यशवंतराव महाराजांचे आश्रयास आले. मागील सर्व गोष्टी विसरून महाराज यशवंतरावांनीं वडील बंधूचा बोज राखिला तरी पण चंचल काशीराव स्थिर राहूं शकले नाहीत. अलिजाबहादराशीं त्यांनीं गुप्त पत्रव्यवहार ठेवलाच होता. इ. स. १८०६ च्या तहानें काशीराव निर्माल्यवत झाले. अशा स्थितीतही त्यांचे मन व पाय एके ठिकाणीं टिकूं शकले नाहीत. गुप्त बेत व संकेत चालूच होते. तेव्हां इ. स. १८०८ चे मार्च महिन्यात असा प्रसंग आला कीं महेश्वर येथें काशीराव होळकरांच्या पक्षपाती मंडळीनें थोडा बहुत उठाव केला. तेथून बीजागडास काशीराव गेले असतां दोन्ही पक्षांपुढें मारहाण चालली. त्यांत काशीराव हे शांत झाले. याप्रमाणें दहा-अकरा वर्षांच्या कारकीर्दीत नामधारी झालेले सुभेदार काशीराव कांहीं एक न करितां आले तसेच गेले. कंपनीने तहानें मान्य केलेंले व तत्पूर्वीच स्वपराक्रमानें गाजलेले यशवंतराव महाराज होळकरशाहीचे निर्विवाद असें मालक बनले. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं यापुढें हे आतापर्यंतचे स्वतंत्ररूपी यशवंतराव न राहतां त्यांची दुश्चित्तता वेळींअवेळीं उभी राहूं लागली. सारांश, शेवटल्या तीनचार वर्षांतील कृत्ये महाराजांची कोणती व कारभाऱ्यांची कोणती हे सांगणें कठीण आहे. तरी

पण संस्थानचा इतिहास या दृष्टीनें त्या कृत्यांचा निर्देश करणें आवश्यक आहे आणि म्हणून आम्ही ती खाली नमूद करतो.

१ गणपतराव दिवाण सुंदरशीस तिकडून व्यवस्था लावण्यासाठीं गेले होते.

२ पूर्वापार जयपूर हें होळकरांचे मांडलिक असतां शिंद्यांनीं जोतपुरकराचे मदतीने इ. स. १८०८ च्या जुलाईमध्यें जिंकून तेथें खंडणी वसूल केली. जोधपुरकरांची चार हजार माणसें कामास आली. हा द्वेषाग्नि पूर्वीप्रमाणेंच अजूनपर्यंत धुमसत राहिला. इंधन पडतांच भडका व्हावयाचाच. इ. स. १८१० च्या मार्चमध्यें होळकरांच्या सैन्यानें उदेपुराजवळ असलेले कस्तोर आणि सादडी हे दोन परगणें लुटून फस्त केलें. शिंद्यांचेही सैन्य आजुबाजूस घिरट्या घालीतच होते. होळकरांच्या पेंढाऱ्यांची दहशत घेऊन हे सैन्य नाथद्वाराकडे वळलें. उदेपुरवाले होळकरांचे सहाय्य मागतच होते. शेवटीं निर्णय असा कुठेंच झाला नाही. आजूबाजूस चकमकीं छोट्यामोठ्या सरदारांमध्यें घडून येत. शेवटीं इ. स. १८१० च्या ता. २० मे रोजीं सलुख घडून आला. उदेपुरासह सबंध मेवाड तेरा लाखांस होळकरांकडे ठरला गेला. निम्मे रकम लगेच पदरांत पडली आणि बाकीबद्दल उदेपुरकरानें दोन माणसें ओलीस दिली. याप्रमाणें हे तंट्याचे बीज कांहीं काळपर्यंत तरी येथें नाहीसे झालें. सारांश, इ. स. १७९७ पासून इ. स. १८११ पर्यंत म्हणजे १४-१५ वर्षांचा हा काळ एकंदरीने होळकरशाहीस बराच जाणवला. इ. स. १७९७ पासून पुढील नऊ वर्षपर्यंत ही राजवट टिकते कीं न टिकते अशा स्थितीत होती. अतिश्रमानें व धूर्ततेनें यशवंतराव महाराजांनीं ती तगवली आणि एक दोन वर्षे सक्त मेहनत घेऊन तिला ताजीतवानी करतात, तोच त्यांची विमनस्कता उभी राहिली. पुढें बंद राहिला नाही. सैन्यास आंवरून धरणारा सेनानी कोणी दिसेना. तलावाचा बांध फुटून ज्याप्रमाणें लहानसहान नाले वाहूं लागतात तीच स्थिती या राजवटीची इ. स. १८१०-११ चे सुमारास झाली, असें वरवर दिसत असूनही पूर्वापार घातलेला पाया मजबूत, नीतीन्यायावर रचलेला असल्यामुळें एकंदर इमारतीचा डोलारा एकदम खालीं आला नाही. तो कसाबसा जीव धरून राहिला. हें पुढील कांहीं लेखांकांवरून दिसून येईल.

या पुढें कांहीं लेखांक सारांशरूपानें देत आहोत त्यावरून अत्यंत बिकट अवस्थेंतसुद्धां दिसून येणारी पूर्वजांबद्दलची आदरबुद्धी व्यक्त होते. देव ब्राह्मणासंबंधाचा आदर, श्रीछत्रपती शिवाजी महाराजांनीं श्रीसमर्थांस दिलेली सनद व राजराजेश्वर यशवंतराव महाराजांनीं हरीभक्त परायण (ह. भ. प.) महिपतीबुवा चिदानंद स्वामींस दिलेली सनद यांत बरेंच साम्य आहे. ''स्वामी सर्व विषयांपासून व्यतिरिक्त तत्रापि लौकिकरित्या सेवा घडावी म्हणून'' हे शब्द मननीय आहेत. मराठी राजवटीतील राजधर्म येथें प्रकाशित होतो. तसेंच पहिल्या पत्रांत ''सिद्धीस नेणार त्यांचें पुण्य आहे.'' हें वाक्य 'मातृदेवो भव' या महावाक्याचा अनुवादच होय. त्याचप्रमाणें देवालयादि संस्थानांचा अंतर्बाह्य घालून दिलेला बंध मननीय व अनुकरणीय आहे. ''वहिवाट सक्रियेनें करून'' यात दिलेल्या मार्गानें सर्व अधिकारी वर्गानें जावें. देव-संस्थानें आजुबाजूचे प्रांतांस जखडून देऊन प्रजाजनांना अभ्युदय व निःश्रेयस

स्वराज्यांत कशी साधूं देत हेंही लक्षांत येईल. सारांश, ही पत्रें समुच्चयानें वाचली असतां आमचे राजे ऋणत्रयापासून मुक्त होऊन प्रजाजनाचे कल्याण साधून त्यांचे आशीर्वाद कसे संपादीत, हें दिसून येईल.

एका लेखांकावरून प्रांतनिहाय अंदाजपत्रक कसें चाले याची कल्पना बांधतां येते. नाना फडणीसांच्या फडांत लेखणीचें शिक्षण घेतलेले कारकून सर्व साम्राज्यभर पसरले आणि एकच एक पद्धत सररहा सर्वत्र चालू राहिल्यानें कामकाज एकरूपीं चाले. भीमाबाईचें पत्र पाहिल्यानें राजघराण्यातील स्त्रियांही कारभारांत किती लक्ष घालीत हें दिसून येईल. ह्याचप्रमाणें बायजाबाई शिंदे व मैनाबाई पवार यांनीं ही गोष्ट जगाच्या निदर्शनास आणून दिली आहे.

तहानंतर संस्थान सोपर इंद्रगड, देवळे प्रतापगड व मेवाड यांशीं होळकर राजवटीचा संबंध वरिष्ठ तत्त्वाचा होता असें दिसून येतें. त्याचप्रमाणें ''ताहारापुर'' चे हनुमंतपुरा हें नांव विख्यात करण्याबद्दलची श्रीमंतांची आज्ञा वाचली म्हणजे डाक्टर फ्रेझर यांनीं मराठी राजवटीवर ''पुनर्घटना'' असा जो शेरा दिला तो किती यथार्थ आहे याची कल्पना बांधतां येईल.

सारांश, एकीकडे लढायांची धामधूम चालली आहे, शत्रु ते शत्रुच, पण मित्रही नांवाचेच राहिलेले, तिजोरींत खडखडाट उडालेला; सैन्य जमा करावें आणि युद्धास उभे राहावें; जय मिळाल्यास सैन्याची पाठ थोपटून पोटास द्यावें असा रोजचा क्रम, पाठीवर संसार मारून दैनंदिन चाललेला असें असूनही राज्याची अंतरव्यवस्था या लेखांकांत जी दिसून येते तीवरून कैफियतकार म्हणतात, ''जरबवान पुरुष, तोंडांत दौलत आहे'' हें जितके खरे तितकेच पायाशुद्ध घातलेली इमारत अनेक अंतर्बाह्य संकटांस तोंड देऊन तगली हेही खरे.

(लेखांक १) महाराजांकडून भारमल होळकरांस : कैलासवासी तीर्थरूप मातोश्रीबाई साहेब (अहिल्याबाई) यांचे छत्रीचा कारखाना चालू करण्यासंबंधांत विजयादशमीचे दिवशीच पत्र लिहून रवाना केलें आहे. हल्लीं भूधर गजधर (कारागीर) याजला पाठवून हें पत्र लेखन केलें आहे. तरी पूर्व पश्चिम उत्तर जागा मोजून छत्रीचे स्थळापासून राजश्री रामराव अप्पाजी पळसीकर यांजे हवेलीपर्यंत पाया भरून खिडकीचे सुमारें शिवघाटाचा, बेत ठेवून बाकीच्या पायात देऊळ व बाग, नगारखाना करावा. श्री काशीविश्वेश्वराचे देवालयाबरोबर जमिनीची भिंत बांधून आल्यानंतर पुढें देवालयाचें काम चालेल. कामाचा नक्षाही भूधरास समजावून तेथें घेऊन आला आहे. काम सोईने चांगले मातोश्रीसाहेबांचे लौकिकाप्रमाणें ज्यांत कांहीं कसर न राहतां जो पाहील त्यांस मानवेल असें करावें. सिद्धीस नेणार त्यांचें पुण्य आहे. आमचें लक्ष त्यांचे चरणीं अंतःकरणपूर्वक आहे. त्यापक्षीं त्यांच्या आशीर्वादे करून सर्व घडेल. कारखान्याचा बंदोबस्त चांगला राहून काम सत्वर चाले तें करणे. खर्चाची योजनाही केली जाईल छ १६ जमादिलावल मोर्तबसुद.

(लेखांक २) यादी वसूल बाकी अजमासे परगणे पाटण (नरसिंगगड) बिन रुजवात इ।। संमत १८५७ तागायत संमत १८६१ एकूण साल पांच.

जमा

७९२५०-००-० संमत १८५७ पासून संमत १८६१ पर्यंत पांचसालचा आकार ३९६२५० रुपये दरसाल एकुणऐंशी हजार दोनशें पन्नास प्रमाणें सदरी.

खर्च रुपये.

९३०५५-०८-६ संमत नबाबमीरखां ६००००, फिरंग्याकडे ८००० व वराता २५०५५-०८-६ तपशील : बक्षीकडे १०५५७-१२-०, स्वारी बुळे १११७५-१४-६ गोविंदराव बाबा पाटणास आले तेव्हां व कमाविसदाराकडे ३३२१-१४-०

२,४१०००-००-० संमत १८५८, वरात फुलण फिरंगी ४८००० संमत १८५९, दुसाला ८३००० पीर गोसअली, लालचंद, अंबोजी इंगळे मिळून (संमत १८६१ मीरखां ११००००)

...................

३,३४०५५-८-०

बाकी रुपये. ६२१९४-७-६

(लेखांक ३) तहनामा संमत ता. २४ डिसेंबर इ. स. १८०६ **(पुणें रेकार्डपैकीं)**

इंग्रज कंपनी व यशवंतराव होळकर यांचा सलुक जाहला. गुजारत कर्नल मालकम व शेख हबिबुल्ला व बाळाराम शेट निसबत यशवंतराव होळकर : कलमावर उभयपक्षीं करार केला कीं इंग्रज कंपनी व त्यांचे बावस्ते वगैरे त्यांजवर बदसलुखेंत चालू नये व त्याचप्रमाणें इंग्रजांही चालावें. कलम १

प्राचीन ठिकाणें होळकर यांचे कुटुंबाचे आहेत. येणेंप्रमाणें. मेवाड व माळवा व हडोती व कित्येक राज्यांसुद्धां चंमल नदीचे उत्तरभागीं. ती ठिकाणें इंग्रज कंपनी कबूल करितात कीं तेच क्षणी यशवंतराव होळकर यांचे हवाला करावीं. या शिवाय दक्षिणेमध्यें होळकर यांची ठिकाणे तापीचे उत्तरभागीं आहेत ती पण द्यावी व चांदवडचा किल्ला व परगणा व अंबाड व शेवगांव व गांवें परगणें गोदावरीचे उत्तरभागीं आहेत ते होळकर सल्लेच्या कराराप्रमाणें चालल्यानें तारीख मजकुरपासून अठरावे महिन्यांनीं होळकर यांचे कबिल्याचे हवाली करावी. कां तर सदरहु ठिकाणें गोदावरीचे उत्तरभागीं होळकर यांचे कुटुंबाची प्राचीन होतीं. सबब. कलम १

बुंदेलखंडामध्ये कुंचेचे परगणें इंग्रज कंपनी यांस यशवंतराव होळकर याहीं दिल्हें. तो मुलुख कंपनी याहीं आपले ताब्यांत ठेवून त्याचा उपज भीमाबाई, यशवंतराव होळकर यांचे कन्येस आपले सल्लेच्या कराराप्रमाणें चालल्यास सदरहू उपज चालू करावा जसें बाळाबाईचें चालविलें त्याप्रमाणें. कलम १

यशवंतराव होळकर याहीं कबुलाती केली कीं टोपीकर हरएक जातीचा इंग्रजसुद्धां आपले नोकरीस इंग्रजांचे अनुमतीसिवाय ठेवूं नये. कलम १

सरजेराव घाटगे यांस यशवंतराव होळकर यांनीं आपले मसलतींत अथवा चाकरींत ठेऊं नये कीं इंग्रजांचा उघडा दुष्मन आहे. सबब. कलम १

वरील कराराप्रमाणें यशवंतराव होळकर यांसी परवानगी आहे कीं हिंदुस्थानामध्यें यावे. त्यांस इंग्रजांनीं मुजाहिम होऊं नये व त्या मार्गांत आले असतां इंग्रजही यशवंतराव होळकर यांचे मसलतीत अथवा हरयेक बाबे सामील न व्हावें. ऐसेही असोन करार केला कीं यशवंतराव होळकर कलमबंदीचे कागदावर सही केल्यानंतर तात्काळ हिंदुस्थानांत राहदारीमध्यें शहर पटियाला पैठण व झिंद व इंग्रजांचा मुलूख व राजा जैपुर हीं ठिकाणें डावे हातावर सोडून जावें. त्यांस यशवंतराव होळकर कबूल करितात कीं मार्गी चालतां आपले फौजेला मना कीं ज्या मार्गे जाणें होईल तेथें लुटपाट लढाई वगैरे तुफान करणार नाही. कलम १

टोंक व रामपुर व बुंदी व लाखेरी व सुमीदी व भिमनगांव वडाइ वगैरे ठिकाणें बुंदीचे डोंगराचे उत्तर दिशेस इंग्रज कंपनी याजवळ कब्जांत होती ती ठिकाणें दरोबस्त यशवंतराव होळकर यांस दिली. कलम २

(लेखांक ४) इ. इ. स. १८०५–६ भीमाबाईंचे आपले वडिलांस पत्र. (यशवंतराव) जोधपूर मुक्कामींहून वडिलीं पत्रें पाठविलीं. लेखनार्थ अवगत जाहला. उत्तरें येणेंप्रमाणें.

१ सोबत्यांच्या भेटी जाल्यावर मेवाड प्रांतीं उभयतांनीं जावें ऐसें बोलण्यांत आलें त्यावरून कृष्णगडचे सुमारें यावयास लिहिलें होतें. मागून मसलती अन्वयें शत्रूकडील जाबसाल येके देठीं लागल्याखेरीज बोलो देणें ठीक नाही असें समजून येणें महकूफ करून दोन जोड्या रवाना केल्या म्हणोन आज्ञा : ऐसियास अगोदरीं पत्राची उत्तरें पाठवून सिद्धताही केली होती. मागाहून महकुफीवरून स्थिरता केली. पुढें आज्ञा जशी येईल तैसें केलें जाईल.

२ घाणेरियाचे जमियतीविशीं अगोदर पत्रें पाठविलीं होतीं. तेथें निर्वाह चालत असल्यास चिंता नाही. तेथें गुजारा होत नसल्यास परस्थळीं बखेडा करावा हें चांगलें नाहीं. अर्जुन पलटण व सिलेदार यांची रवानगी करणें. पुढें तुम्हांस बोलावून घेणें तेव्हां आणखीन फौज पाठविली जाईल म्हणोन आज्ञा : ऐसियास प्रथम वडिलीं पत्रें आलीं ते येतांच येथून राजश्री अप्पाजी परशराम यांजला रवाना करून चिरंजीव चेनसिंग यांस वडिलांचे आज्ञेप्रमाणें दोन्ही वकिलांची रवानगी करावयाविशीं पत्रें लिहून दिलीं. मशारनिल्हे तेथें गेल्यावर राजाजीकडील कारभारी साहेबचंद यांनीं महालोभ दाखवून ठेवून घेतले. अलीकडे घाणेरियाचे ठाकूर चेनसिंगाचे बाहादरीने भेटून जागा सोडून निघून गेला. ठाणें राजांचे कायम झाले. तेव्हां परदेशी फौजेस निरोप देतात. आपल्याही फौजेचा आल्या दिवसांचा निर्गम करून पलटण व सिलेदार यांजला मेडत्यावरून स्वारींत रवाना करून चेनसिंगानीं येथें यावें ऐसें ठरोन राजाजींनीं आपले कारभारीस पत्र लिहिलें. येथून ही चेनसिंगास पत्र लिहून त्याजकडील कारकून बाबाजी रामचंद्र याची रवानगी केली आहे. तेथील जाबसाल तुटक आला तेव्हां

निष्कारण जमियत ठेऊन बखेडा करावा हें चांगलें नाहीं. सिलेदार व अर्जुन पलटणचे लोकांत आळा, बंधन, रीतभात कांहींच राहिली नाहीं. याजकरितां रवाना करावयाविशीं लिहिलें आहे. तेथें घडेल तैसे मागाहून लिहून पाठवूं. कलम

३ येथील संस्थानिकास घरची मसलत उभी राहून दिडवाण्याचें ठाणें घेऊन दौलत–पुरियास मोर्चे लाविले. हें वर्तमान येतांच त्यांनी आपली फौज रवाना करून आपल्याकडीलही फौज रा. जीवलालसिंग याजकडून जावी. या अन्वयें येथें बोलून त्यांनीं आपले खलिते व आमचीं पत्रें घेऊन वडिलांकडे दोन तीन रवानग्या लगट केल्या. पावल्यावर घरोब्याचे रीतीनें किती जपतात तेव्हां आपण उपराळा करावा हें उचित जाणोन राजश्री कृष्णाजी महाडिक यांची कंपुसह रवानगी करून राजश्री जीवलालसिंगाकडे बळवंत साबाजी यांजला पाठवून इकडे खलित्याचे जाब व आमचे पत्रांची उत्तरें पाठविली. ते आल्यापूर्वीच सेखावटीतील जमियत आली होती. त्याची व राजाजींचे जमियतीची लढाई होऊन सेखावटीची जमियत सिकस्त खाऊन निघोन गेली. दिडवाणेस यांचे ठाणें कायम झाले. यांची फौज तिकडेच आहे. तूर्त आपले फौजेचे प्रयोजन नाहीं. काम लागल्यास बोलावून घेऊं. परवानगीचा अक्षेप न घेत ऐसी आज्ञा असावी. ह्या अन्वयें बोलण्यांत येऊन वडिलांचे खलित्याचा जाब लिहून रवाना केला आहे. त्या अन्वयें येथूनही कृष्णाजी महाडिक व जीवलालसिंग व बळवंतराव साबाजी याजला जेथील तेथेंच असावे या भावीं पत्रें लिहून रवाना केलीं. वडिलींही तेथून लिहावें.

४ तेथील प्रासंगिक मजकूर लिहिला तो समजला. आजपर्यंत इंगळे यांजकडील वजा वसूल होऊन पुढील बेत कूच मुक्कामाचा ठरला असेल त्याप्रमाणें आज्ञा पाहिजे.

५ रामपुऱ्यास पेस्तरसाल ऐवजी वरात तीन लक्षाची कोठारी याचें नांवें करून पाठविली ते पावली. गिरे यांचे विद्यमानें महाली रवाना करून तगादे लावितां ऐवज येईल तैसे लिहून पाठवूं.

६ येथील सर्व मंडळी लहानथोर कुशलरूप आहेत. वडिलीं काळजी न करितां तिकडील साद्यंत लेखन करीत असावें.

७ चौकी पाहऱ्यांचा जाबता वर्दीप्रमाणें यथास्थित आहे.

येकुण सात कलमें मनन करून उत्तराची आज्ञा केली पाहिजे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. ''पेवस्त छ २० रविलावल सन १२१५ फसली.

(लेखांक ५) राजे राधिकादास संस्थान सोपर यांस यशवंतराव महाराजांकडून ता.२८–१२–१८०६ संस्थान मजकुरीं पवारांचा हिस्सा आहे. त्याची सरकारांतून जप्ती करून तेथील काम बालाराम आगरवाले यांजकडे सांगून हें पत्र तुम्हास लेखन केलें असें. तरी तुम्ही पवाराकडील कारकुनास इतला न देतां अगरवाले याचे कारकून वहिवाट करतील त्याजला कोणे गोष्टीची अडचण न पडतां उपर राखीत जाणें. र।। छ १७ सवाल.

सबा-मयातेनवआलफ मोर्तबसुद.

(लेखांक ६) महाराजा शिवदानसिंग संस्थान इंद्रगड यांस यशवंतराव महाराजांकडून ता.९-६-१८०७ उपरी संस्थानमजकूर व खातोली वगैरे कोठड्याची मामलत राजश्री नबाब शहामतखां यांजकडून दूर करून सालमजकुरापासुन जप्तीचे काम बालाराम आगरवाले यांजकडे सांगून हें पत्र सादर केलें असें. तरी तुम्ही संस्थान मजकूर व खातोली वगैरे कोठड्याचा दाखला आगरवाले यांजकडे वहिवाट अन्वयें देत जाणे. र।। छ २ रविलाखर सु.समानमयातेनवअलफ.

**(शिं.शा.इ.सा.भा.२ कोटा गुलगुले दप्तर)**

(लेखांक ६) बातमीपत्र हुजूर चिटणीसी दप्तरांतील. ता. ५-३-१८०७ इ.येसोबा चरणीं मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. सरकारांत शिलेदार लोकांचे धरणें तलबेकरितां आठ-पंधरा दिवसांपासून बसलें आहे. त्यांचे तोडजोडीस दहा बारा लक्ष पाहिजेत. मेळ लागत नाही. महालातील ठिकाणें चार चौहूकडे गुंतले गेले. राहिले मामलेदारापासून पेस्तरऐवजीं घेऊन व्यवस्था जाहली. लोकांची समजूत न होय याजमुळें निकरास येऊन कारभारी, दिवाण, बक्षी, सबनीस यासुद्धां घेऊन बसले आहेत. रुपया दिल्याखेरीज उठत नाहीत. याजला तजवीज सरकार व राजश्री नबाब आमीरुदौले व कारभारी यांचे विचारें सर्वत्र मुत्सद्दी दिवाण, फडणीस, दरखदार, आहेत. त्यांनी आपले जीवनमाफिक रुपये द्यावयाचे ठरून याद जहाली आहे. तींत :

| | |
|---|---|
| ४०००० दिवाणसाहेबांचे नांवें : | ५०००० शेटजी बालाराम आगरवाले |
| २५००० बक्षी यांचे नांवें | १५००० सबनीस यांचे नांवें |
| २५००० हवालदार सदरदीन, पागनीस मिळोन | १२००० महिपतराव गोमाजी |
| १५००० दाजीसाहेब फडणीस | ५००० आपले नांवें (हुजूर चिटणीस) |

आणखीही नामावळी आहे. ऐवज सध्यां नबाबांनीं द्यावा. पूर्वी पुण्याचे मुक्कामीं बाळासाहेबांनी केलें होते तसें जहालें. नित्यकृत्याचे कठीण. आजचा दिवस गेला उद्याचा कसा जाईल हीं भ्रांती. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

(लेखांक ७) ता. ८-६-१८०७ अज सरकार राजश्री यशवंतराव होळकर ता. मोकदम मौजे हनुमंतपुरा प्रगणे कोंच परगणे मजकुर हा गांव वे.शा.सं.राजश्री भवदेव मिश्र यांजकडे सरकारांतून धर्मार्थ इनाम चालत आहे. मौजे मजकुरीं श्रीहनुमंत स्थळ जागृत पाहून मिश्रजींनीं देवालयाचा जीर्णोद्धार करून गांवनांव ताहरपुरा होते, तें मोडून सर्वानुमते हनुमंतपुरा नाम ठेवून प्रसिद्ध केलें आहे. याच नांवें सनदपत्र करून दिलें पाहिजे. म्हणोन भटजीकडून स्वारींत विदीत झाले. त्यावरून मनांत आणून ब्राह्मण थोर यांनीं हनुमंतपुरा नांव ठेविले हेंच प्रसिद्धीस आणावयाचे ठरून वर्तमान भावी कमाविसदार परगणे मजकुर यांचे नांवें सनद करून हा रोखा तुम्हांस सादर केला असें. तरी हनुमंतपुरा हें नांव कागदोपत्रीं वगैरे विख्यात करून

भटजीकडे सुदामतप्रमाणें भोगवटा चालविणें म्हणोन छ १ रविलाखर मोर्तबसुद.

(लेखांक ८) लक्ष्मीधर मुरलीधर यांस : ता.१९-८-१८०७, सरकारांत नव्या तोफा ढाळावयाच्या त्याचे साचे तैयार करावयाकरिता मेण वजन पांचखंडी तुमचे विद्यमाने खरीदी करून स्वारीचा मुक्काम कसबे भानपुरा येथें आहे. तेथें पोहोचवून देऊन पुन्हां लिहिणें न पडे तें करणें. काम जरूरीचे आणि तुमचा भरवसा जाणून लिहिले आहे. तरी जसा मेळ होइल तसे पाठवीत जात जाणें जाणिजे छ १४ जमादिलाखर. मोर्तबसुद.

(लेखांक ९) ता.३-९-१८०८ हरिभक्तपरायण राजश्री महिपतीबुवा चिदानंद स्वामी बिन नारायणबाबा गुरु नरहरीबाबा परमगुरु सिवदिनबाबा नाथपंथी ढोले गोत्र विश्वामित्र सूत्र अश्वलायन शाखा शाकल वास्तव्यक्षेत्र प्रतिष्ठान गंगातीर : सेवक यशवंतराव होळकर दंडवत विज्ञापना आपण श्रीगुरुप्रसादें अपरोक्ष अनुभवी सर्वकाल निजध्यासीं तत्पर. आपले दर्शनाचा लाभ कसबे भानपूर मुक्कामीं होऊन चरणप्रसादेंकरून कृतार्थता घडली. स्वामी सर्व विषयांपासून व्यतिरिक्त तत्रापि लौकिकरीत्यां सेवा घडावी म्हणून विनंती केली ती मान्य होऊन श्रीगुरुचे इच्छा व ब्राह्मण भोजनानिमित्य सालमजकुर शके १७३० संमत १८६५ चे सालापासून परगणे देपालपूर येथील गांवांपैकीं देह इनाम येणेंप्रमाणें. (१) मौजे हातोद (२) भीलबडोली : येकुण देह दोन खेरीज हक्कदार, इनामदार करून बाकी दरोबस्त अंमल जल, तरु, तृण, काष्ट, पाषाण, निधिनिक्षेपसुद्धां देऊन हें पत्र लिहून दिल्हे असें. तरी आपण हरदूगांव लेखनाअन्वयें हक्कदार व इनामदार खेरीज करून बाकी अंमल आपले दुमाला करून आपण व आपले शिष्यप्रशिष्यादि परंपरेने अनुभवून सन मजकुरपासून सालदरसाल घेत जाऊन सदोदीत चरणसेवेचा लाभ देऊन सेवेत चित्त निमग्न राही ते करावे. रा.छ.११ रजब सु।।तिसामयातेन व आलफ. हे विज्ञापना. मोर्तबसुद **(महाराष्ट्र कविचरित्र नरहरी महिपत, भाग ६ वा, पृ.१९०).**

(लेखांक १०) महेश्वर येथील कानगो, मंडलोई यांचे नांवें : ता.४-१०-१८०८ शिक्के श्रीनर्मदेस महापूर येऊन गांवखेड्यांची वगैरे फार नुकसानी झाली. म्हणोन राजश्री चिमणाजी कृष्ण स्वारीत आले त्यांनी सर्व विदीत केलें व परभारे ही वर्तमान कळलें. गांवगन्नाची रयत व शहरचे लोक फार उदास म्हणोन कळलें त्यांस ईश्वरीक्षोभास उपाय नाही. हल्लीं तुमची सर्वांची खातर दिलभरी व्हावी, गांवखेड्यांची आबादी होऊन शहरची वस्ती चांगली पूर्ववत व्हावी यास्तव सरकारांतून राजश्री रामराव त्रिंबक रवाना करून हें पत्र तुम्हांस सादर केलें असें. तरी पत्र पावलियावर तुम्हीं गांवगन्ना रयतेची व शहरांत शेट सावकार वाणी, उदमी व मारू वगैरे आडाणी लोक, सर्वांची दिलभरी करून परगणे मजकुरची आबादी होऊन शहर, घरें, दुकानें मागती पूर्ववतप्रमाणें करणें जाणिजे, १३ साबान मोर्तबसुद : **(जवरचंद मंडलोई महेश्वर दप्तर)**

(लेखांक ११) ता. ५-१२-१८०८, रा.सिदो बापुजी बेलसरे श्रीक्षेत्र जेजुरी यांस

महाराज यशवंतराव यांजकडून पत्र : पेशजी तुम्हाकडे श्रीक्षेत्र जेजुरी येथील श्रीमार्तंडाची पूजाअर्च्याबद्दल, कडेपठार व श्रीमल्हार गौतमेश्वर महादेव कैलासवासी तीर्थरूप सुभेदारसाहेबांचे छत्रीतील पूजा, वडिलांचे मूर्तिसमेत व सरकारी तलाव, बाग, कुरणे, वगैरे आहेत. याचे कामकाज चालत आलें त्याप्रमाणें साल मजकुरापासोन तुम्हांकडेच बहाल ठेवून परगणे सुपे, बारामती येथील सरगांवडकीचे वतनाची गुमास्तेगिरी यमाजी ढोणे याजकडे सांगितली होती ते दूर करून तुम्हाकडेच चालवून त्याचे उत्पन्नाचा ऐवज क्षेत्र मजकुरचे कारखान्याकडे खर्चास लावून द्यावयाचे ठरून हे सनद सादर केली असें. तुम्ही क्षेत्र मजकुरीं श्रीची पूजाअर्च्या व तलाव, बाग, कुरणे, सरकारी काम इमानेइतबारें करीत जाऊन हल्लींप्रमाणें सुपे येथील सरगांवडकीची गुमास्तेगिरीची वहिवाट सक्रियेने करून ऐवज येईल त्यात गुमास्त्याचे वेतन खेरीज करून, बाकी नेमणुकी बरहुकूम खर्च करीत जाऊन शिवाय ऐवज राहील तो क्षेत्रीचे खर्चास घेत जाणें. सुदामत पूजाअर्चा, नंदादीप, श्रीपाशी मानपान चालत आल्याअन्वयें करीत जाऊन अखेरसालीं कच्चा हिशेब समजावीत जाणें. बागाची लावणी करून बेलफुले श्रीचे उपयोगी लावीत जाऊन तलाव कुरणाची निगेवाणी उत्तम प्रकारे ठेवीत जाणे. श्रीचे जवाहीर, कापड, मांडे वगैरे सरकारी असबाब तुम्हाजवळ असेल त्याची मोजदाद राजश्री खंडो महादेव यांचे विद्यमानें करून तपशीलवार यादी लिहून हुजूर पाठविणें. तुम्ही आपले वेतनाबद्दल सरसालांत घेत जाऊन बाकीचा खर्च श्रींचा श्रीकडे करीत जाणें. सिवाय एक पैसा घेतला असतां मजरा पडणार नाही. अलंकार, वस्त्रें, तिथीपर्वणीस व सणवारास देवावर जाबत्यानें घालीत जाऊन मागती आटोपून ठेवते समयीं चौकशीने सांभाळून ठेवीत जाणें. कांहीं अफरातफर जाहल्यास मर्जी राहणार नाही. समजून लेखाअन्वयें वर्तणूक करणें. जाणिजे छ १६ सवाल. मोर्तब.

हे दहा लेखांक मननीय आहेत. बाकी लेखांक होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें या स्वतंत्र पुस्तकांत पहावयास मिळतील.



**प्रकरण १० वें**

---

# श्रीमंत राजराजेश्वर महाराज यशवंतरावांच्या ''परतंत्र''ते पासून अखेरीपर्यंत

कैफियतकार लिहितात, ''महाराज पंजाबाहून स्वारी फिरल्यावर परतंत्र व्हावयास प्रारंभ झाला. त्यातही हा इरादाच कीं कलकत्ता पहावा. भानपुऱ्यास आल्यावर तोफा सरंजाम कमती. तोफा ओतावयाचा कारखाना सिद्ध करून लाविला. चौऱ्याऐंशीं तोफा लहान मोठ्या ओतल्या.'' सर जान मालकम हेही आपल्या माळव्याच्या रिपोर्टांत याच गोष्टींचा अनुवाद करितात. ते लिहितात कीं ''महाराज पहाटेस उठून ह्या लोकांच्या कारखान्याकडे प्रहरचे प्रहर घालवीत. तहानभूक यांचा प्रश्नच नव्हता. लष्कराच्या अंतर्व्यवस्थेकडेही ते लक्ष पुरवूं लागले. बतावण्याच्या लढाया सुरू करून आपण स्वतः हजर राहून शिपायांत हुरूप आणीत. घोडेस्वार, पायदळ आणि तोफखाना ह्यांचे निरनिराळे स्वतंत्र गट करून त्यांस आपआपसांत झुंझावयास लावीत. जेत्यांस बक्षीस देत. सैन्यांत रोज नवी भरती होई तर जुन्यांस बिदा करीत.'' सारांश, मराठी साम्राज्याची घडी नीट बसविण्यास चतुरंग सेना सिद्ध पाहिजे असें जें त्यांच्या मनानें एकदां घेतलें त्याच्या सिध्यर्थ त्यांनीं आपल्या हाडाची काडें केली. मालकमसाहेब लिहितात कीं या अतिश्रमाचा परिणाम आठ दहा महिन्यांतच त्यांच्यावर दिसूं लागला. या फेरबदलाची जाणीव स्वतः महाराजांसही होऊ लागली. ते कधीं मधीं बाळाराम शेटकडे उद्गार काढीत कीं ''एका क्षणाची आठ (आठवण) दुसऱ्या क्षणांत मला नसते. मला कांहीं तरी औषध दे.'' यानंतर ''महिपती बाबा गोसावी ढोलीबाबा भानपुऱ्यास आले होते.

त्यांचे ठायीं अस्ता बसून उपदेश घेतला. त्यांनीं ब्राह्मणभोजन, देवपूजा व जप करण्याचे सांगितले. दसऱ्यानंतर प्रकृती बेवश होऊन अनिर्वाच्य शब्द वगैरे चेष्टा करण्यास प्रारंभ केला. हुजरे शागीर्द बिलगले. चोळणा नेसून बाडांत नेऊन घातले. त्या नेण्यांत दहापांचास चापटा लाथा मारल्या. बायकांस लपतां हाल झाले. मग बाळाराम शेट व चिमाजीपंतभाऊ कारभारी होते त्यांनी दौलतीस आळा घालून, महाराजांचे बाड वेगळे देऊन जाप्ता केला. हुजरे व गोलंदाज यात दांडगा, ज्वान, बळकट, अशी माणसें निवडून पाहरे नेमून देऊन दरखदाराकडील एकएक कारकून पहाऱ्यावर ठेवण्यांत आले.'' यजमानांची ही परतंत्रता अधूनमधून उसळत असें. यामुळें शेवटच्या तीनचार वर्षातील कारभार कोणाच्या हातचा हे सांगणें बरेच अवघड आहे. लष्कर अवाढव्य झालेलें त्याची व्यवस्था एकटे यजमानच करूं जाणे. सुकाळ दुष्काळ कसाही प्रसंग असला तरी यजमान आपल्या सैन्यास कमी पडूं देत नसत. अशा तऱ्हेनें हें सैन्य एकप्रकारें लाडावलेलेंच झालें होतें. यजमानांची परतंत्रता पाहून लष्कर अस्वस्थ झालें आणि आळीपाळीनें दिवाण, कारभारी, बक्षी आणि शेवटीं राजघराणें यांजपुढें लष्कराचीं धरणीपारणीं सुरू झाली. अमीरखान फौजबंद सरदार, याप्रसंगी तो कांहीं दिवस नागपुराकडे, तर कांहीं दिवस राजपुतान्यांत आपल्यावर लक्ष ठेवून वावरत होता. येक डोळा पोळीकडे, तर दुसरा डोळा इंदूर संस्थानच्या रस्त्यांकडे. तेथील हालचाली लक्षांत घेऊन आपले वर्चस्व सिद्ध करून स्थापण्याकडे तो आपली प्यादीं फिरवीत होता. गफूरखां त्याचा नातलग तसाच अंकितही. या दोघांकडे फौज सरंजाम बळकट, तशी बळकटी संस्थानात कोणा एकाकडेही व्यक्तिशः नव्हती. भाताच्या कणाप्रमाणें हुजूर सैन्य फाकलेलें, फाटलेलें आणि बेबंद असें वागत होते. महाराज परतंत्र तर खरेच, तरी पण त्यांची पूर्व तपश्चर्या लोपली नव्हती. निजामाचें राजकारण, रजपुतांतील वादांचे प्रश्न, रतलाम व धारच्या गाद्यांचा प्रश्न सगळे महाराजांपुढें येऊन उत्तराची व मदतीची महिन्यानुमहिने याचना करून रहात. महाराज वृत्तीवर असल्यास निकाल ताबडतोब व न्यायाचा मिळे. प्रकृती बेताल झाल्यास प्रश्न तुंबून अडकून पडत. ही सर्व राजकारणें पुढें दिलेल्या लेखांकांवरून दिग्दर्शित केलीं आहेत.

महाराजांचे राजकारण येवढ्यावरच थांबलें नाही. इ. स. १८०९-१० या सालच्या इंग्रजी पत्रव्यवहारावरून दिसून येतें कीं इंदूर दरबाराकडून भूज कच्छ येथें महाराजांचा मनुष्य स्थिर झाला होता. इराणांतील तेहरान शहरावरून फ्रेंच सरकारांशीं त्यांचा पत्रव्यवहार चालत असें. कंपनी सरकारच्या पोटांत फाळ पडून इंदूर दरबारास समजावणींचीं पत्रें गेलीं. रूस, फ्रेंचाशीं सलुख करणे ही कल्पना महाराजांचे शिवाय दुसऱ्या कोणास आली नसणार. दरबारांत असलेली माणसे अल्प दृष्टीचीच होती. महाराजांची धारणाशक्ती समजण्याइतकी देखील ताकद त्यांच्यांत होती असेंही दिसत नाही. खानद्वयाबद्दल वरती उल्लेख आलाच आहे. तात्या आळेकर वेळ पाहून दुय्यम

प्रतीचें काम करणारे. धरमाकुंवर हा यावेळीं पुढें सरसावला. धारिष्ट हें त्याचे मोठें शिफारसपत्र. तुलसाबाईची दासी मैनाबाई. तिच्या द्वारे हे गृहस्थ पुढें सरसावले. लष्कराची कोलाहल तात्पुरती यानें शमविल्यामुळें त्याचा शह चांगला बसला. दरबारच्या इतर मंडळींच्या डोळ्यांत तो सलूं लागला आणि कांहीं कालांतरानें भस्मासुराचेंच भाग्य त्याला लाभलें. कारभारांतील अगदी वरच्या दर्जाच्या माणसांचे वर्णन आतांपर्यंत आले. प्रसंगानुसार कांहीं नवीन धोरण बांधून त्याप्रमाणें राज्यकारभारास वळण द्यावयाचें हें या वरच्या अधिकाऱ्यांचे कर्तव्य पण ती लायकी कोठेंच दिसली नाही. दुय्यम प्रतीची माणसें आपआपलीं स्थानें सांभाळून चालत आलेल्या रूढीप्रमाणें कामें काढीत होतीं. त्यांचे काम, आलेले पुढें चालवावयाचें आणि ते त्यांनीं प्रामाणिकपणें केलें आणि कारभाराचा गाडा थोडाबहुत तरी चालू ठेवला. महाराज स्वाधीन असत तेव्हां आश्रितांचा योगक्षेम, मराठी साम्राज्याची बूज, त्याच धोरणानें स्वकीय परकीयांशी उदार व उदात्त वागणूक ही सर्व अखेरपर्यंत तगून होती. हेंही खालील लेखांकावरून स्पष्ट होईल.

कांहीं लेखांकांचा सारांश म्हणून नमूद केला आहे. तो खालील क्रमांकांवरून लक्षांत येणारा आहे. ह्या व्यतिरिक्त पत्रव्यवहार,''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' म्हणोन स्वतंत्र पुस्तकांत पहावयास मिळेल. यात आश्रित व पदरच्यांचें चालविणें ही मराठेशाहीची पूर्वापार चालत आलेली रीती होय. तसेंच व्यक्तिशः राजाचा कोणचाही पंथ असला तरी सर्व पंथांस समतेनें व सन्मानानें वागवून त्यांचा प्रतिपाल करणें हें राजनीतीचे विशेष अंग नजरेस येतें. मराठे दक्षिणेतून उत्तरेत आले. बैराग्यांचे दशपंथ उत्तरेंत जास्ती प्रबळ. त्यांचे संरक्षण व संगोपन उत्तरेंत मराठ्यांनी भेदभाव न धरितां चालविले त्यांचे हें उदाहरण होय. तसेंच शिंद्यांच्या दरबारांत वकील ठेवला त्याचा दर्जा उच्च राहावा म्हणोन पगार दरमहा ४५० साडेचारशें चांदवड शिक्क्याचा मुकरर केला. आपलेंच नाणें चालावें असा स्पृहणीय आग्रह महाराज यशवंतरावांचा दिसतो. कांहीं लेखांकात जयपूर, जोधपूर व कर्नाटक येथील मसलतींचा विचार केलेंला दिसून येतो. जयपूर, जोधपूर यांचा संबंध श्रीमंत पहिले बाजीरावसाहेबांचे वेळेपासून जडला गेला. जयपूरवाल्यानें आपणास माळव्यांत वसविलें ही जाणीव श्रीमंतांस असल्यामुळे तेथील राजकारण त्यांनीं फार नाजुक रीतीनें सांभाळलें. त्यांच्या पश्चात तें धोरण राहिलें नाहीं. त्यामुळें उत्पन्न झालेला घोळ पानिपतावर तर बांधलाच : त्यानें तरी जागृत होऊन कांहीं निकाल पुण्याच्या दरबाराकडून व्हावयास पाहिजे होता. दीनगतीनें वाढणाऱ्या रोगाप्रमाणें हे प्रकरण सोबत्यांस तर भोवलेंच. महादजी आणि तुकोजी निघून गेले. त्यांची देणगी (बांधाची) दौलतराव आणि यशवंतराव यांच्या वाट्यांस आली. तोही वाद अजून तुटलाच नाही. मराठ्यांच्या उत्तरेंतील राजकारणांत हें एक व्यंगच राहून गेलें.

एका लेखांकात मराठेशाहीचे एक विशिष्ट पण अभिनंदनीय अंग दिसून येते.

धार येथील मैनाबाई या राजकारणकुशल होत्या हें जगजाहीर आहे. ''दिवसेंदिवस जमाव फैल करितात. हें तुम्हासही जड, आम्हांस आहेच. त्याचे पोटीं हेंही काम होईल. येविशीं तुम्हास विशेष ल्याहावे असें नाहीं.'' बाईंच्या अंतःकरणाची भाषा चांगलीच मनांतील ठाव दर्शविते. तसेच नरसिंगगड, झाबवा संस्थानाशीं होळकर राजवटीचा संबंध दाखविते. एका लेखांकांत न्यायदान पद्धतीचा नमुना आहे. सरकारी अधिकारी हे केवळ परचक्रापासून रक्षक एवढीच कल्पना नसून व्यापक कल्पना डोळ्यापुढें ठेविली आहे. न्याय त्वरित व स्थानावरच मिळावा, त्यात दीर्घसूत्रीपणा नसावा हे धोरण दिसून येतें.

सारांश, इ. स. १८०८ पासून इ. स. १८११ पर्यंत महाराजांच्या विकृत अवस्थेत राजकारण स्थिरावलें. लष्कर डोईजड झालें. वरिष्ठ अधिकारी वर्ग तटस्थ राहिला. असें असूनही अंतर्व्यवस्था स्तिमित न होतां पूर्वापार ओघ सांभाळून राहिली. असेंच आमच्याप्रमाणें वाचक मत देतील असा आम्हास भरंवसा वाटतो.

सन १८११ चा दसरा आणि दिवाळी निघून गेली आणि कार्तिक शुद्ध ११ चा उल्लेख खालीं दिल्याप्रमाणें आढळतो :

श्रीमंत महाराज राजराजेश्वर यशवंतराव होळकर ह्यांचे निधन. कार्तिक शुद्ध ११ रविवार संमत १८६८ शके १७३३ ता. २७ आक्टोबर इ. स. १८११.

विज्ञापना : तीर्थरूपबाबा साहेबांची प्रकृती कार्तिक शुद्ध १० शनिवारीं वायूचा प्रकोप जास्त होऊन अंग उडू लागलें. यापूर्वी पांच-चार वेळां वाखा याप्रमाणें जाला. श्रीमार्तंड कृपेनें आराम होत गेला. त्याचालीचे उपचार होत गेले. शेवट शनिवारीं सायंकाळीं ज्वरांश जाला. मागील चार घटका रात्र राहतां श्वासाचा उपद्रव पाहून गोदाने, तुला, इत्यादि दानधर्म चालून, पोथीचे पाठ, नामस्मरण त्यात दैवी मानवी उपचार जारी जाहले, परंतु गुणास न येतां रविवारीं प्रथम अकरा घटका वर श्वास लागला. आज भानुवार पावणे दोन प्रहरीं महाराजांस देवआज्ञा झाली. मोठाच अनर्थ झाला. तुम्हांसही खेदाचे पर्वत होतील. परंतु आयुष्य मर्यादेस उपाय नाही. मनाचे सांत्वन करून उदास न राहतां संस्थान व जामघाटाचा जाप्ता यथास्थित ठेवून वर्तमान कळवीत जावें. मोठी अनर्थाची गोष्ट जाली. त्याजसारखा वीर, पराक्रमी, मागेंही झाला नाही आणि पुढेंही व्हावयाचा नाही. सर्वांवर जरब ठेवून जलचरे आदि करून सर्वांस जेर करून वडिलांचे नांवाची शर्थ केली. गैरआरामांत होते तरी सर्वांस दहशत होती. ईश्वर इच्छेपुढें कोणाचा उपाय नाही. उदास न राहणें, म्हणोन आज्ञा. त्यांस उदासीस तो पारावार नाहीं. त्यांनीं कोणे प्रकारें लोभ करून संगोपन केलें त्याचा विसर पडावा ऐसें नाहीं.

(लेखांक १) (ता. ११-५-१८०९) रा. बाळकृष्ण वासुदेव यांचे नांवें यशवंतराव महाराजांकडून कीं दौलतराव शिंदे यांजपाशीं वकिलीचे कामावर सरकार तर्फे रावजी

गोविंद यांजला ठेवून दरमहाची नेमणुक चांदवड रुपये ४५० साडेचारशें तुम्हांकडून देविले असें. तरी चांदवड शिक्का दरमहाचे दरमहा देत जाऊन कबज घेणें. आखेर सालीं महालचे हिशेबीं मजरा दिले जातील. म्हणोन :

(लेखांक २) ता. २२-९-१८०९ यादी प्रांत कर्नाटक येथील मतलब इ. स. १२१९ भाद्रपद मास :

१०००००० नगदी रुपये साल दरसाल. जहागीर चित्रकल किल्लेसुद्धां अजमासें येकुण एक कोटी रुपये नगदी सालाबादी व जहागीर किल्लेसुद्धां ४०००००० चाळीस लक्ष याचा द्यावयाचा करार बशर्थ आमची मदत तुमचे फौजेनें करावी. आम्ही लढाईस सामोरे होऊन आघाडी धरूं. तुमचे फौजेस खर्चास व दारूगोळा देऊं. आमचे खासगत प्रांतांत अंमल जालियावर सदरहू कराराप्रमाणें ऐवज देऊं व मालिक जाग्यावर कायम जाहल्यावर चाळीस लक्ष रुपयाची जागीर किल्लेसुद्धां सनदा करून देऊं. सिवाय कामकाज पडल्यास परस्परें जमियतीनिशीं मदत करावी. तुमचे व आमचे सामलातीनें आमचे मुलखासिवाय नवीन मुलूख व किल्ले सर जाहल्यास निम्मेनिम वाटणीप्रमाणें तुम्ही व आम्ही मिळून घेऊं. मिरजेचे मुक्कामीं फौज आली म्हणजे फौजेस खर्चास देऊं. श्रीमंतांकडील जाबसाल परभार समजाऊन देऊं. सदरहू प्रमाणें जाबसाल माधवराव यशवंत वकील यांचे विद्यमानें उगवून देऊं व घेऊं. **(सरकारी रेकॉर्ड)**

(लेखांक ३) ता. ४-१२-१८०९ कमाविसदार चांदवड यांसी महाराजांकडून कीं चिरंजीव सौ. भीमाबाई बुळे यांजला खाजगत खर्चाचे बेगमीस सरकारांतून परगणे मजकूर येथील मौजे देवगांव, राई, महलखेडी, याप्रमाणें तीन गांवें साल मजकुरापासून खेरीज हक्कदार, इनामदार, जकात, उभामार्ग, बाकी अंमलदरोबस्त सौभाग्यवतीचे दुमाला करून वहिवाट बिनदिक्कत चालविणें. म्हणोन.

(लेखांक ४) ता. २१-१२-१८०९ बालाराम अगरवाले कमाविसदार खासगीः ति.सौ.मा.अहिल्याबाई फणसे हे आप्त व पदरचे यांचें चालविणें अवश्य जाणोन मौजे करंज ता।। माकडोन हा गांव खेरीज हक्कदार, इनामदार, बाईचे खासगी खर्चाचे बेगमीस सरकारांतून द्यावयाचा करार केला आहे तरी चालविणें. म्हणोन.

(लेखांक ५) ता. २९-४-१८११ रा. बाळकृष्ण वासुदेव कमाविसदार पाो रामपुरा यांस महाराजांकडून उपरि. जिनसी पलटणाकडे हिंडोणचे बारूदपैकीं पेशजी साठ मणाची वरात केली. त्याप्रमाणें दारू अद्याप पावत नाहीं म्हणोन बोभाट आला. तरी पलटणाकडे हिंडोणचे दारूपैकीं साठ मण देविली आहे. बिनदिक्कत देऊन पावती घेणें. म्हणोन :

(लेखांक ६) रा.भारमल होळकर यांस ता.३०-९-१८११ महाराज यशवंतरावांकडून : तालुके चोळी येथील मामलत तुम्हाकडे सांगितली होती ती दूर करून सालमजकुरपासून खासगीकडे लावून हें पत्र लिहिलें आहे. तरी ठाणे खासगीचे कारकुनाचे स्वाधीन

करून कबज घेणें. रा।। छ. ११ रमजान. मोर्तबसुद ः

थार्न ह्या इंग्लिश ग्रंथकाराने महाराजांस स्वतः पाहिले होते. तो लिहितो. ''यशवंतराव महाराज सुस्वरूप व तरतरीत होते. डोळ्याचे वैगुण्य जरी होतें तरी त्यांचा चेहरा प्रसन्न व प्रफुल्लित दिसें. बोलण्या चालण्यांत ते उदार व कनवाळू दिसत. त्यांच्या स्वभावांत गुणावगुणाचे मिश्रण निसर्गतःच होतें. प्रसन्नता व क्षोभ, सहजस्थिती व सालंकृतपणा, कोमलपणा व क्रूरता ही निसर्गतःच उभी राहत. ओढून ताणून चंद्रबळ आणणें त्यांच्यात नव्हते.'' डफ लिहितात, ''यशवंतराव महाराज त्या वेळच्या मराठ्यांच्या मानाने चांगले शिकले सवरलेले होते. मराठी व फारसी दोन्हींत लेखन वाचन त्यांस करता येत असें. त्यांचे अक्षर सुवाच्य व वळणदार होते. स्वभाव थट्टेखोर असून इतरांची मने आकर्षून घेण्याची कला त्यांच्यात होती. त्यांचा बांधा ठेंगु, पण हाडापेरानें मजबूत व काटक होता. रंग काळा असून चेहऱ्यावर शौर्य, धाडस व लहर यांची झांक चांगलीच मारीत होती.''

तत्कालीन व त्यांच्या मागून थोड्यांच अवधीत झालेल्या लेखकांचे वरील वर्णन मान्य करून रियासतकार आपला अभिप्राय देतात तो येणेंप्रमाणें *''बाजीराव-दौलतरावांनीं होळकरांची दौलत गिळंकृत केली होती ती यशवंतरावांनीं प्रचंड युद्धें लढून परत मिळविली. या दोघा नेभळटांनीं इंग्रजापुढें हार खाऊन मराठेशाहीचा बोज घालविला होता तो यशवंतरावांनीं वाचविला. मानसन यास हैराण करून इंग्रजांवर मात केली. हा त्यांचा पराक्रम इतिहासांत चिरंतन राहील. मराठेशाहीचे अस्सल पाणी त्यांच्याद्वारें पुनः एकवार चमकलें.''* ही वरील सर्व मतें मान्य करून आम्ही वाचकांस विनंती करितो कीं सोबत जोडलेला महाराजांवरील पोवाडा त्यांनी अवलोकनांत घ्यावा. राजघराण्यांत जन्मून वाढलेला, कालगतीनें वणवण फिरून कधी कांद्यावर तर कधी घोड्याच्या तोबऱ्यातील चण्यावर दिवस कंठून केवळ ध्येयासाठीं इ. स. १७९७ इसवी पासून इ. स. १८०६ पर्यंत स्वबाहु-बुद्धि-बलावर नर्मदेवर शिंद्यांस, पुण्यास पेशव्यास आणि मुकुंदरावर मानसनला आपल्या तेजानें ज्यानी चकीत केलें; स्वध्येयार्थ, कालमान व व्यक्ती कोणीही सहाय नसतां एकाकी राहून आपले तनमनधन सर्वस्वी वाहिलें. त्यांस या कालांतील ''कर्ण'' हीच उपमा अनेकार्थी शोभेल असें आम्हास तसेच वाचकांसही वाटेल अशी आम्हास उमेद आहे.

श्रीमंत महाराजाधिराज राजराजेश्वर यशवंतराव होळकर बहादूर पहिलें यांचेसंबंधीं प्रचारांत असलेला हा पोवाडा त्यावेळच्या हरी बाळा नांवाच्या शाहीरानें केलेला आहे.

(१)

वाहवा जी यशवंतराव बहादूर, सवाई डंका बजा दिया ।। मंदसोर से मारा फिरंगी

जा जमुनाके पार किया ।।धृ।। कूंच किया जब मंदसोर से सवारी चली महाराज कीं ।। चमला नदी पर आ गये महाराज छाती फटी फिरंगो कीं ।। मकुंदरे का पकडा रस्ता भागी फौज फिरंगो की ।। उजाडखेडा तहा एक नाला रिजमंट गोरे पूर्वो की ।। महाराज का शिपाही बंगश खूप किया बर नक्षे का ।। जाकर काटे रिजमंट गोरे टोपिया पानी में बहती ।। चोमासे के दिन है यारो, खूब घटा बादल छाई ।। चमा चम जब बिजली चमके होश फिरंगी भूल गया ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।१।।

(२)

मकुंदरे से भागा फिरंगी जालमसिंगने आन मिला ।। किती तरह से बचाव हमको महाराज का टिका गला ।। जालम कहता सुनी फिरंगी तुमने कुछ नही किया भला ।। इस नदी को नही उतारा अखंड जातचे चमला ।। मुकंदरे पर आ गये महाराज अंगरेजो कीं स्वारी भूलाय ।। तब कोटे को दिया छोडके पाटन के रस्ते चला ।। हाथी उपर लंगर डाला जैसा तैसा पार हुवा ।। कई एक डुब गये कई एक मर गये, तोफखाना भी डूब गया ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।२।।

(३)

महाराज को खबर पोहची बनारस में फिरंगी पडा ।। महाराज कीं हुई तैयारी महाराज रणशूर गाढा बडा कंपू दिया अघाडी मोरे से मोरा भीडा ।। चारो तरफ से बल रही तोफे गुब्बासे का मार पडा ।। गपागप जब भाले मारे फिरंगीका सीर फोडा ।। महाराजने कर दिया हल्ला जा बकरी में नाहर पडा ।। ऐली तरफ का गारत किया पैलीपार जा भगा दिया ।। आ गये महाराज पड गई दहशत कलकत्ता तो लंबा रहा ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।३।।

(४)

लिकसाहेबने चिठ्ठी भेजी जा पहुँची कलकत्ते को ।। हलकारे ने बताई चिठ्ठी लगे आलम सब देखन को ।। सभी कंपन्या मिलकर आई लगे बांचने चिठ्ठी को ।। बनारस पर मारा फिरंगी नही ठिकाना रहने को लिकसाहेब ने भला न किया लगी कंपन्या रोने को ।। महाराजके सवाई झेंडे उडे मथुरा वृंदावन को ।। आया मीरखां नबाब बहादुर सभी पिंढारा साथ लिया ।। शहर फरुखाबाद कानपूर मैनपुरो को फूंक दिया ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।४।।

(५)

फरांसिस का गुलाम इंग्रज फिरंगी बन करके आया शहर फरुकाबाद ऊपर महाराज को दगा दिया ।। इस राजाने कीं कपटाई महाराज से मिला रहा घी शक्कर दी मिजवानी तमाम लष्कर खुशी किया ।। महाराज को कपडे देकर, बडा इसने विलास किया राजा फिरंगी दोने मिलकर, पिछे से छापा लाया ।। दनादन जब गोले मारे मेह नगर मे बरस रहा ।। महाराज यशवंतरावने वहां भी अपना भाला सही किया ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।५।।

(६)

फिरंगीने टोपी उठाके इस राजासे क्या कहा ।। बहोत तडाखे लगाये इनने महाराजने हटा दिया ।। कर्नाटक मे तबूर बाजे सूरपट्ट का ठाना लिया ।। हैदराबाद पर चढाई करके नबाब को भी कायल किया ।। जब शिंदे से हुई लढाई झंडा आशेरपर लगा दिया ।। नागपूर पर भई लढाई गोयलगड का किल्ला लिया ।। फिरंगी आपने दील मे कहता महाराजाने खूब किया ।। चार खूंटमें हो गया नक्षा मार फिरंगी हटा दिया ।। भाई भगा दिया ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।६।।

(७)

तीन पेहर पर चार घडी तक हल्ला किया फिरंगोने जो किल्ले में चिपटे गोरे निशाणगाडा जा इनने ।। फते बुर्जपर चढे फिरंगी लग गये तंबूर बजने ।। महाराज है रेवाडी में खबरा दिन्ही जब जाटोने रेवाडी से चले महाराज आया फिरंगी सामने फिरंगी का मोरा तोडा हल्ला मारा जाटोने ।। इस हल्ले में मर गये गोरे खंदक सारा भर गया । लीकसाहबने छाती कूटी कलकत्ता तो अब लंबा रहा ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।७।।

(८)

भरतपुर कीं मार लढाई फेर वहांसे चल दिया ।। हिंदुस्थान पंजाब पार कर लाहोर का मैदान लिया ।। लाहोरवाला रणजीत राजा संग फौज दो लाख लिया ।। महाराजको मिलने खातर आमरतसर पर चल आया ।। जब दोनो का मिलाफ हुवा आब फिरंगी घबराया ।। यहा लडने का नही ठिकाना कलकत्ता तो लंबा रहा ।। फिरंगीने वकील भेजकर महाराज को समझाया ।। हमने हारा तुमने जीता तो हुवा सो भला हुवा ।। सवाई खंडेराव

देव कीं महाराज पर है छाया ।। हरिबाळाने गाया पोवाडा तमाम लष्कर खुशी किया ।।
भला पोशाख दिया ।। वाहवा जी यशवंतराव बहादुर ।।८।।



# होळकरशाहीचा इतिहास
## विराम काळ
### इ. स. १८१८ ते १८४३
## चार कारकीर्दी


श्रीमंत द्वितीय मल्हारराव होळकर


श्रीमंत मार्तंडराव होळकर


श्रीमंत हरीराव होळकर


श्रीमंत खंडेराव होळकर

**''फक्त आबादी करून महाल जमेवर बसेल असेंच घडावें. यांतच गुजारा सर्वत्रांचा आहे.''**

**प्रकरण ११ वें**

# श्रीमंत महाराज द्वितीय मल्हारराव होळकर यांची कारकीर्द
## इ. स. १८११ ते १८१८ पर्यंतची हकीगत

श्रीमंत सुभेदार राजराजेश्वर यशवंतराव महाराजांचें देहावसान झाल्यावर त्यांचे चिरंजीव मल्हारराव होळकर गादीवर आले. कित्येक इतिहासकार यांस मल्हारराव तृतीय असें म्हणतात. हे जर सत्य धरले तर कैलासवासी सुभेदार तुकोजीराव यांचे चिरंजीव कैलासवासी मल्हारराव हे द्वितीय होतात. पण त्यांस वस्त्रें मिळाली नव्हती आणि ते गादीवरही आले नव्हते. तेव्हां इ. स. १८११ त जे गादीवर आले तेच मल्हारराव द्वितीय होऊं शकतात आणि याच दृष्टीने आम्ही वरती उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें यांस वस्त्रें मिळालेली नव्हती. तशी खटपट इंदूर दरबारानें पुणें मुक्कामीं केली होती पण यशस्वी झाली नाही; तथापि इंदूर दरबारच्या कागदपत्रांवर श्रीमंत मल्हाररावांचा शिक्का सुरू झाला. या सर्व गोष्टींचा विचार हिशेबीं धरूनच आम्हीं वरती श्रीमंत मल्हारराव द्वितीय असा उल्लेख केला आहे.

गादीवर बसण्याचे प्रसंगीं जालमसिंग कोटेकर व लालजी बल्लाळ गुळगुळे आदि-करून मंडळी आली होती. नंतर सरकार स्वारी ढाबळ्यावर छावणीस गेली. तेथून दोन पलटणें, दोन पागा समागमें देऊन राजश्री बाळोजी इंगळे यांची रवानगी खेचीवाड्यांत केली. फौज पलटणें यांची समजूत पाडून पुनः छावणी कोहळ्या गांवीं येऊन केली. या छावणींत असतांना अग्निप्रकोप बहुत होऊन वडिलोपार्जित कागदपत्र व जडजवाहीर भस्मसात झालें. दहा लाखाजवळ नुकसानी पोहचली, असें इंग्लिश लेखक लिहितात. तेथून कूच करून

नजीक भानपूर इंद्रगडाखालीं मुक्काम झाला. तेथें तीन रोज मुक्काम झाला. त्यांत महामारीचे उपद्रवानें शेकडों माणसें गारद झाली. त्रासरूप होऊन तिसरें दिवशीं अर्धरात्रीस कूच केलें. शामगड तालुके गरोठ येथें छावणीस आले. चार महिने तेथेंच काढले. ही सर्व वरील हकीगत इसवी सन १८१३ मधील आहे.

देशीं नत्थु फणसे यांनीं बंड करून महिपतराव होळकर (कै.सुभेदार तुकोजीराव प्रथम यांचे बंधू) याचा मूल खासा व विदुर दोन्ही बगलेत मारून फौज ठेवून उद्योग आरंभिला. यात श्रीमंत पेशव्यांचेंही अंग होते. त्या आधारावर फणसे मजकुर मुलास घेऊन जेजुरीस जाऊन मार्तंडाचे दर्शन केलें. पुढें पुण्यास जाऊन एखादी मसलत उभी करावी, हे वर्तमान इंदुरीं समजल्यावर त्यांस धरून आणावें असा बेत ठरून त्या कामावर तात्या आळेकरांची योजना झाली. त्यावर सरदारांची व फौज पलटणीची दिलजमाई करून एकल्याने फौजा ताबडतोब सेंधव्याच्या घाटावरून तापी उत्तरतीरास दाखल झाल्या. कैलासवासी महाराजांचा व त्यांचे फौजेचा दरारा अजून लोकांच्या स्मरणांतून गेलेला नव्हता. तापीतीराखाली ही अनिवार फौज उतरल्यावर आपणास जड जाईल असें समजून श्रीमंत पेशव्यांनीं फणसे यांसीं बोलण्या चालण्याचे इरादे एकीकडे ठेवून सरंजाम जेजुरीस पाठवून दोन्ही पोरें व फणसे यांस निजलेले हस्तगत करून खंडो महादेव यांचे जिम्मेस केलें आणि फौज तापी उतरूं नये अशी पत्रें फौजेस व फौजवाले सरदारांस व थेट लगत पाठवा म्हणून आज्ञा केली. तेव्हां खंडो महादेव यांनी त्रिवर्ग फौजेंत पोहचून पत्रें दिली कीं तुम्ही तापी न उतरतां आपला मुद्दा घेऊन घाट चढून जावें. फौज पोरें घेऊन घाट चढून गेली. याप्रमाणें कारकीर्दीच्या पहिल्याच वर्षी आलेलें हे गंडांतर टळून गेलें.

पण लष्कराची ही शिस्त मुलुखगिरीवरती अवलंबून होती. मराठेशाहीची व स्वराज्याची स्थापना व घटना करणारे छत्रपती श्रीशिवाजी महाराजांनीं लष्कराच्या भरतीचा व शिस्तीचा जो पाया घातला होता त्यांत कालमानाने फेरफार होत गेले. सैन्यांत वतनीं माणसांचा भरणा छत्रपतींनीं केला. प्रत्येक किल्ल्यावर श्रीमन्महाभारतचा पाठ ठेविला. यामुळें शिपाई गडी केवळ सोल्जर न बनतां क्षात्रवृत्तीचा बनत गेला. स्वराज्यांत यामुळे शिरजोर सोल्जर तो बनला नाही. पुढें स्वराज्याचे साम्राज्य झाले तरी छत्रपतींची शिकवणुक जिवंत होती. शिलेदार आणि बारगीर यातील भेद जातीनिशीं सरंजाम, जहागिरी देऊन स्थिरस्थावर वतनदारी उत्पन्न करणें या सर्व बाबी आतांपर्यंत रोविलेल्या बीजावरील वाढी होत, बांडगुळे नव्हत. कैलासवासी सुभेदार मल्हारराव व तुकोजीराव हे फलटन संस्थानाकडील माणसें व भीमथडीवरील घोडीं यांचाच भरणा करण्याकडे लक्ष देत. काळ व स्थळ पाहून बाहेरचीहीं माणसें ते घेत. पण त्यांचा स्वतःचा दरारा व मुलुखगिरी यामुळें लष्कर मर्यादेत राहू शकलें. बाजारबुणगेही त्यांच्याबरोबर असें पण ते कह्यांत ठेवण्याची कला व शक्ती ह्या उभय सरदारांत होती. पुढें कंपू शिरलें. युरोपियन अधिकारी दाखल झाले. त्यांस धर्माचा व राज्याचा अभिमान व त्यापासून उत्पन्न होणारी कळ कोठून असणार ? सुभेदार तुकोजीरावांच्या कारकीर्दीच्या आखेरीआखेरीस बैदे उत्पन्न होऊं लागले होते. त्यांच्या

पश्चात सगळाच बाजार उघडा झाला. तो आवरण्यासाठीं साध्याकडे लक्ष देऊन साधनांकडे यशवंतराव महाराजांनीं थोडेंबहुत दुर्लक्षच केलें. त्यांस धडाधडीच्या, केव्हां केव्हां तर, उलट्या काळजाच्या माणसांची गरज होती आणि तशीं त्यांस मिळालीही. काळ बदलला होता. त्यामुळे लष्करांत ''खां'' चीच भरती विशेष झाली हे सगळे ''खां'' खाणारेच होते आणि त्यांचा उपयोग महाराजांनीं जसा जेथें दिसेल तसाच करून घेतला. गमावत जाणारें राज्य त्यांनी परत कमावलें. ''पुरूष जरबेचा आणि लक्ष्मी मुखांत'' म्हणूनच या लष्करांतील भस्मासुरास त्यांनी कह्यांत ठेविलें. पण त्यांचे पश्चांत् त्यांची बुद्धी आणि त्यांची शक्ती कोणातच न राहिल्यामुळें हा लष्कराचा भस्मासूर अनावर झाला.

शामगडावरून निघून श्रीमंतांचा मुक्काम रामपुऱ्यास झाला. तेथें शिलेदार यांचा बैदा मोठा झाला. सात दिवस धरणें, एकेक बाडासुद्धां झाले. पाणी देखील बाडांत जाऊं दिलें नाही. त्याची कांहीं तडजोड होत आहे तों अमीरखान येऊन दाखल झाले. तेव्हां मोठाच राडा पडला. मग नबाबाची समजूत गुगलछबडा व निंबाहेडा दोन महाल लावून देऊन काढली. किल्ला कुटुंबास राहण्यासाठीं आणि निंबाहेडा मामलत म्हणून सांगितली. येथें हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, निंबाहेडा हा परगणा कैलासवासी मातोश्री अहिल्याबाई साहेबांनीं आपले शिंदे बंधूंस लावून दिलेला होता. तो बहुधा खासगीकडेच असणार. तेव्हां हा एकंदर अदलाबदलीचा प्रकार विसंगत दिसतो आणि ज्या अमीरखानाची समजूत घालण्यांत आली तोही गादीस चिकटून राहिला असेंही झालें नाहीं. लष्कराची एका अंगाची समजूत होते न होते तो दुसरें अंग कुरकुर करूं लागतें असा आतां प्रकार सुरू झाला. दिवाण गणपतराव हे आलिजाबहादर शिंद्यांकडे पैशासाठीं गेले. शिंद्यांनीं परगणे लावून घेऊन पैसे देण्याचे कबूल केलें. तों गफूरखान व अमीरखान विरुद्ध गेले. तेव्हां ही योजना जेथच्या तेथेंच जिरून गेली. यावर मैनाबाईंनीं बाळाराम शेटशीं संगनमत करून तात्या आळेकरास ग्वाल्हेरीस पाठविले. तात्या कांहीं पैशाची सोय करून कोट्याकडे वळतात तोच त्यांस कळलें कीं, लष्करांत मोठाच बैदा उत्पन्न झाला आहे. ते कोट्यांतच बसून राहिले, म्हणजे ग्वाल्हेरचा हा दुसरा बेतही तसाच जिरून गेला. पुढें गंगराडला मुक्काम असताना मैनाबाईनीं रामदीन आणि माखनलाल या दोन बंधूंस हातीं धरलें. रामदीन फौजबंद होता, तर माखनलाल लक्ष्मीवंत होता. तेव्हां उरफटलेल्या सैन्याचा बंदोबस्त या दोघां बंधूच्याद्वारें करतां येईल असा बाईचा बेत; तर त्या बंधुद्वयांचा बेत कीं तुळसाबाईच्या बाजूस असलेले गणपतराव दिवाण तात्या जोग यांस लुटून घ्यावें. तो पैसा लष्करास द्यावा. असा तऱ्हेनें लष्कर थंडावेल व तुळसाबाईचा पक्ष कमजोर होईल. याप्रमाणें इंदूर दरबारांत लष्कराचे काहुरामुळें पक्षोपपक्ष उत्पन्न झाले. कार्याचें व दृष्टीचें क्षेत्र आकुंचित होत होत वैयक्तिक होऊन बसलें. तुळसाबाईस विरुद्ध पक्षाची गुणगुण कळताच मैनाबाई व रामदीन यांस तुरूंग पहावा लागला. याप्रमाणें दरबारांत आतां स्पष्टपणें दोन तट दिसूं लागले; आणि लष्कर तर जो खायाला घालील त्याचे स्वाधीन त्या दिवसापुरतें. श्रीमंत मल्हाररावापुरतां सर्वांचे मनांत काय तो आदर. बाकी कोणी कोणास पुसत नव्हतें. गंगराड

मुक्कामीं स्वारीचा मुक्काम असतां पलटणवाल्यांनीं हल्ला करून गणपतराव दिवाण यांजला धरून दरवाजावर आणलें. तात्या जोग (विठ्ठल महादेव किबे) सावध होऊन किल्ल्यावर गेले. या मुक्कामाचे वर्णन करीत असतां (मालकमसाहेब लिहितात कीं : ''बाईच्या बाजूचे बारभाईही उलटले. जोतिबा नायकांनीं प्रसंगांवधान दाखविलें नसतें तर प्रसंग मोठाच आला होता. जोतिबानें जय मिळवून जेव्हां बाईच्या समोर गेला तेव्हां बाई बाळराजास मांडीवर घेऊन एका हातांत तरवार उपसून बसलेली होती. ती जोतिबास म्हणाली, ''आमच्या गादीची ज्योत (बाळराजा) सैन्यानें आज विझविण्याचा प्रसंग गुदरला होता. सैन्याच्या ताब्यांत बाळराजा जाण्यापेक्षां या तरवारीच्या द्वारें मी पूर्वजांकडे पाठविण्याचा विचार केला होता. तुम्हीच आज ही ज्योत राहविली व आपलें नांव सार्थ केलें.'' यावरून सैन्याचा हा भस्मासूर किती प्रबल झाला होता हें स्पष्ट दिसेल. सैन्यास अमीरखान आंतून प्रोत्साहन देत होता, अशी मालकमसाहेबांचीही खात्री झाली. सैन्यातील मुसलमानांचा एकंदर आतताईपणा पाहून तुलसाबाईंनीं हुकूम काढला कीं, या उपर लष्करांत हिंदूशिवाय कोणास ठेवूं नये. या हुकमानें पक्षोपक्षांचीं पुनर्घटना झाली ती अशी : एक पक्ष त्यात तुळसाबाई प्रमुख, तात्या जोग मंत्री आणि मराठे शिलेदार आणि सरदार आणि पागा. दुसऱ्या पक्षांत गफूरखान व सैन्यातून सुटलेले असंतुष्ट मुसलमान. या स्थितीत बाळराजे पहिल्या पक्षाचे ताब्यांत असल्यामुळें तोच पक्ष ''राजमंडळ'' असा समजला जाई.

यानंतर विठ्ठल तात्यांच्या कर्तबगारीस प्रारंभ झाला. त्यांनीं मंदसोर येथील शिंद्यांच्या कारभाऱ्यांची भेट घेतली. महिनमहा कांहीं रकम नियमित शिंद्यांस देऊन त्यांच्याकडून लष्कराची मदत मिळविली. या लष्कराचें आधिपत्य अंबाजीकडे होतें. पण हे अंबाजी दोन डगरीवर हात ठेवणारे असल्यामुळें या योजनेचा तादृष उपयोग झाला नाहीं. त्यानंतर गफूरखानाचा बंदोबस्त करण्याचें विठ्ठलपंत तात्यांनीं योजिलें. जावरा येथें तीन बटालियन उभे केलें. हे बटालियन्स तात्यांकडे वळले. गफूरखानास आतून अमीरखान व शिंदे दोघेही अनुकूल, पण दोघांचेही बेत निरनिराळे. अमीरखानास आपलें स्तोम माजवावयाचे होते; पण संस्थान राखायचे होतें. शिंद्यांचे पोटांत संस्थानच स्वाहा करावयाचें होतें. यामुळें त्या दोघांचे पटले नाहीं पण या न पटण्यामुळें संस्थान तगलें. यावेळीं जालमसिंगाचा तात्यांस म्हणजे पर्यायानें संस्थानास मोठा उपयोग झाला. असा हा प्रकार चालत असतांना पक्षोपपक्ष उत्पन्न झालेच; आणि कोठच्याही पक्षाकडून सैन्याचा ससेमिरा स्तब्ध बसवेना. त्यांतच इ. स. १८१५ त महाराजांचें लग्न उभें राहिलें. महाराजांचे संबंधीं पूर्वापार आदर असल्यामुळें तितक्यापुरती शांतता राहून लग्न वैशाखांत निर्विघ्नपणें पार पडलें. सोयरीक त्रिंबकराव देशगावडे यांचे कन्येशीं झाली. समारंभ फार मोठा झाला.

वर वर्णिलेली शांतता तितक्याचपुरती होती. लष्करापैकीं कधी सर्व लष्कर, तर कधीं त्यातला कोणचा न कोणचा तरी भाग बंडाळीत उभा राही. अधिकारी मंडळी आपला हेतू अगर स्वार्थ साधण्यापुरतें बंड उभारलेल्यास हातीं धरीत. स्वार्थ साधला कीं पाठ फिरवायची. याप्रमाणें कोठेंच कांहीं घरबंद राहिला नाहीं. मैनाबाई तुरुंगात गेल्या. तेथेंच

त्यांची इहयात्रा संपली. बाळारामाचीही तीच गत लागली. जातां जातां राहिले तुळसाबाई, दिवाण गणपतराव आणि तात्या जोग. कांहीं काळपर्यंत यांचे संगनमत राहिले. पुढें पुणें दरबाराहून वकील आले. नेपाळांत झालेला इंग्रजांचा जयापजय, त्रिंबकजी डेगळ्यांची मसलत, गंगाधर शास्त्र्यांचा खून यामुळें श्रीमंतांस पडलेला पेच या सर्व गोष्टींचा मिलाफ होऊन श्रीमंतांस पुनश्च इच्छा झाली कीं, मराठा मंडळ पुनः उभारावें. शिंदे दरबारकडेही तसाच प्रेश गेला. या उठावणीचा परिणाम असा झाला कीं उत्तर हिंदुस्थानांतील या दोन जुन्या मराठे सोबत्यांत एकमेळ होण्याचा रंग दिसूं लागला. पेशव्यांचे आज्ञेत राहून जलचरांस तोंड द्यावे असा संकल्प झाला. लष्करी अंमलदारांचा जीव एकदाचा खाली आला आणि त्यामुळें संस्थानांत शांतता नांदेल अशी आशा वाटू लागली. हा तह महत्त्वाचा असल्यामुळें तो जशाचा तसाच आम्ही शेवटीं देत आहोत. हा तह कागदोपत्रीच राहिला. लढाईचा रंग दिसेना तेव्हां लष्करानें पुनः उचल खाल्ली आणि आतां त्याचा बंदोबस्त कसा करावयाचा याचा विचार तुळसाबाई आणि दिवाण हे करूं लागले. तात्या जोगांस या वेळी त्यांनीं वाटाघाटीत घेतले नाही. अमीरखानाचा विचार घेतां चार लाखांची मागणी तो करूं लागला. ते इंदूर दरबारास जमेना. तेव्हां साहजिकच तुळसाबाईचें आणि गणपतरावांचे मन पेशव्यांच्या बाजूला वळून तिकडून मदत पैशाची पहावी अशा खटपटीस ते लागले. या फाटाफुटीचा फायदा अक्टरलोणीनीं घेतला. या इंग्रजी सेनापतीनें अमीरखानाशीं गुप्त तह केला कीं इंग्रजांचे होळकर दरबाराशीं युद्ध झाल्यास अमीरखानानें तटस्थ राहावे. त्यांस मिळालेली जायदाद त्याजकडे इंग्रज सरकार वंशपरंपरा चालवितील. अक्टरलोणीचें हे कार्य राजनीतीविरुद्ध झाले असें इंग्लिश लेखकांनींही दूषिलें आहे.

ह्याप्रमाणें अमीरखान फोडला गेल्यामुळें तो केवळ तटस्थच राहिला नाही, तर इंदूरच्या फौजेतही त्यानें फाटाफुट पाडली. तात्या जोग या वेळेस नजरकैदेंत होते, तरी ते असावध नव्हते. तुळसाबाईंच्या विचारानें दिवाण गणपतराव यांनी दीड लाख रुपये लष्करांत वाटून थोडी बहुत त्यांची समजूत पाडली; व दक्षिणींतील आशा दाखवून त्यांस शांत बसविलें. दक्षिणेंत निघण्याच्या विचारानें इ. स. १८१७ च्या नोव्हेंबरांत हे पुढारी व त्यांचे लष्कर महतपुरास जमले.

गेल्या एकदोन वर्षांत कंपनी सरकार नेपाळांत गुंतले असल्यामुळें हिंदुस्थानांतील कारभाराकडे त्यांचा काणाडोळा झाला होता. नेपाळांतील कार्य विल्हेस लागतांच हिंदुस्थानकडील कारभारांत त्यांनीं सर्व लक्ष घातलें. पुण्यास एलफिस्टनसाहेब डोळ्यांत तेल घालून बसले होते. गव्हर्नर जनरल वेलस्लीच्या मागाहून येणाऱ्या मिंटोने अनेक कारणास्तव शांतता स्वरूप धरलें होतें. त्यांच्यामागून आलेले गव्हर्नर हेस्टिंग्ज हे वेलस्लीपेक्षाही कांकणभर वरचढच होते आणि हिंदुस्थानची भूमी या वेळीं वेलस्लीच्या वेळेपेक्षांही अधिक भुसभुसीत झालेली त्याने पाहिली. वेलस्लीचें सूत्र पण अधिक दमानें त्यानें पुढें चालविलें. बाजीरावांचें कारस्थान, होळकरांची बेबंदशाही, शिंद्यांची पतंगशाही ही सर्व त्यांच्या डोळ्यापुढें होतीं. ही मराठी संस्थानें हतबल झाल्यानें पेंढारी साहजिक

वरचढ झाले होते. तेव्हां ''पेंढांरियांस हतबल करावयाचे आहे त्यांत तुम्ही सर्वांनीं आम्हास मदत केली पाहिजे.'' अशी आग्रहाची विनंती गव्हर्नर जनरलानीं दोस्त संस्थानिकांस केली. संस्थानिकही स्वस्थ बसले नाहीत. सैन्य वाढविण्यास ही संधी चांगली आहे असें पाहून बाजीरावसाहेब त्या तयारीस लागले. आपणही त्यांस जाऊन मिळावे म्हणून होळकरी सैन्य महतपुरास जमा झाले. (उज्जेनीनजीक आगर) व बातमीही आली कीं आणखीन इंग्रजी लष्कर उत्तरेकडून याच रोखानें येत आहे तेव्हां मात्र होळकरी मुत्सद्यांस व लष्करांस पेंच येऊन पडला. आपआपसातील दुही क्षणैक बंद पडली आणि लढाईचें कौन्सिल जमलें. शिपाईगडी लढाईस उत्सुक. एकटे तात्या जोग मात्र त्या पंथात नाहीं. त्यांनीं लढाईचा निषेध केला आणि पैक्याचा मार्गही काढला; त्यांनीं जालमसिंगास दरम्यान घालून लाला ठाकुरदास याचे विद्यमानें दिल्लीचा फिरंगी आक्टरलोणी याजकडील पैगाम आणला कीं तुमचे फौजेचा हिशेब होऊन पैका निघेल तो आम्ही देऊं व तुमचा मुलूख तुम्हाकडे आहे तो आहेच, त्यावर दहा लक्षांचा मुलूख आणखीन अंतरवेदपैकीं देऊन तुम्ही माळव्यांत स्वस्थ असावें. श्रीमंतांकडे जावू नये व आम्हाकडेही सामल होऊं नये. असें बोलणे खचित करून भालवणीची चक्ती जहानसाहेब व मालकमसाहेब (पेंढारी यांचे पारिपत्यांस नर्मदा उत्तर तीरास होते) त्यांजवर आणली. हे राजकारण घेऊन विठ्ठल महादेव पाटणचे छावणीहून आहूरचे मुक्कामीं आले.

''इकडे गणपतराव दिवाण व तुळसाबाई व ज्योती नाईक यांचा विचार खचित होऊन इकडे तिकडे मन न कचरवितां वडिलोपार्जित श्रीमंतांचे गादीशीं क्रिया आहे तिजवरच मुस्तकीम राहून श्रीमंतांकडे जावे. तुळसाबाई व दिवाण यांचे मनांत विठ्ठल महादेव यांजविषयीं पाप होते. त्यांनी शिलेदारांस आंतून फूस दिली. महतपुरास आले तेव्हां विठ्ठल महादेव देवडीवर नजरबंदींत होते. तेव्हां पलटणें फिरंग्याची नर्मदातीराहून उज्जेनीस आली. पुढें लाला सीताराम कायस्थ सरकारांत पाठविला कीं ''तुमचे आमचे बोलणे विठ्ठल महादेव यांचे विद्यमानें ठरले आहे त्याजवर मुस्तकीम होऊन फौजेचा राड दूर करून श्रीमंतांचा सेवाधर्म कायम ठेवून कंपनीच्या घरचीहीं दोस्ती संपादावी. आपला आपलाही ओहदा शाबूत राखावा अशा भावी बोलावयास पाठविलें.'' कौन्सिल एकमुखी होईना तेव्हां लष्करानें आपले उग्र स्वरूप धारण केलें. महाराजांस उचलून घेऊन तुळसाबाईस हतबल करून टाकले. विठ्ठल महादेव पाहऱ्यांतच होते. पलटणवाल्यांनीं दिवाण गणपतरावांस धरून नेऊन पलटणांत बसविले. सारांश, बेबंदशाही पूर्ण कळसास जाऊन पोहचली. मालकमसाहेबानें बंदोबस्त व्हावा म्हणून कडक पत्र लिहिलें. लष्कर नरवर मुक्कामीं गेलें. तारीख २० डिसेंबर इ. स. १८१७ च्या रोजीं तुळसाबाईचा अंत मोठ्या खेदजनक रीतीनें झाला. मालकमसाहेब लिहितात कीं 'हयातीत तिनें कोणावर दया दाखविली नाहीं आणि तिच्या पश्चात कोणीही अश्रु ढाळले नाहींत. आतां लष्करास कोणी नेता राहिला नाही. तेव्हां कांहीं पठाण मंडळ व मराठे मिळून सदरदीन हवालदाराकडे गेलें आणि त्यांस म्हणाले, ''धनी बालराजा, आतां कसें करावें? त्यानें एकच उत्तर दिलें, तुम्ही चौघेही बेडेवाले तसा माझाही येक बेडा

मानावा.'' यात शिलेदारांची हिंमत कांहींयेक राहिली नाही. गफूरखांकडे गेले त्यांनीही हिंमत तोडली. मोठा भरंवसा अमीरखानाचा. भविष्यावरून बुद्धीस विपर्यास झाला. इकडे येतों म्हणून उत्तरें येत गेली. तिकडे आक्टरलोणीशीं मेळ करून त्याची कन्या आपल्या पुत्रास केली. याप्रमाणें फितूर होऊन शिलेदारांस कोणीही अंग न दिल्यामुळें आपले ठिकाणीं बाज खावून ताम्रांनीं पाठ दिल्यावर कोणीही जीव झोकला नाहीं.'' हताश झालेले सैन्य आणि पुढारी कोणी नाहीं, अशा युद्धाचा परिणाम सांगांवयासच नको.

ता. २० डिसेंबर रोजीं जनरल हिस्लाप व कर्नल मालकम यांनीं क्षिप्रा उतरून लढाई दिली. होळकरांस नदीचा आश्रय चांगला होता. नदी उतरून पलटणें पुनः उभी राहतां राहतां त्यांची रोशनबेगच्या लोकांनीं फार नासाडी केली. इंग्रजांचे सातआठशें लोक पडले, तर होळकरांचे तीन हजाराकडे पडले. सरकारी सरंजाम्यांचे पाय उठले. ते समयीं महाराजांबरोबर हुजरातपैकीं शेपन्नास स्वार व ब्रम्हवृंद मंडळी. मागें बायका, देव, जामदारखाना, हत्तीचे निशाण अवघें त्यांनी समेटलें. त्याप्रसंगीं निराभाई याने हत्तीचे निशाण आणले व बायका काढून आणण्यांत सुलतानजी बाइड, हरीबा होळकर, सदरदीनचा जावई, हिरामण होळकर, दलसिंग कुंवर इतक्यांनीं घोडे घालून श्रीमंत सौभाग्यवती जीजीबाईसुद्धां काढून आणल्या. सगळी हकीगत पाहून महाराजांनीं डोळ्यांतून अश्रू काढले. अवघी दौलत गारद झाली.''

सरकार निघून अलोटेस चार घटका दम खाऊन अर्ध रात्रीचे समयीं गडगुचेनजीक दम खाल्ला. तेथें पलटणचीं माणसे, गणपतराव दिवाण व विठ्ठल महादेव यांजला घेऊन आले. जखमी व घोड्यास चंदी मुदपक कांहींयेक नाही. तारीळा येकसारखा. मासाहेबांनीं (कृष्णामासाहेब,) बाडांत कांहीं ऐवज शिलकेस होता त्यातून कांहीं ऐवज देऊन चंदीमुदपक केलें. मग विचार करून विठोबा तात्या यांजला पलटणांतून आणून त्यांची खातरी करून मार्गशीर्षशुद्ध १४ स उभयतांस वस्त्रें दिलीं. राजश्री विठ्ठल महादेव सलुखाचे बोलण्यास मालकमसाहेबांकडे पाठविले. त्यांचीं यांचीं बोलणीं बहुत प्रकारची होऊन कार ठरला. तह ठरून तहनामे यांच्या यादी परस्परें झाल्या. हा तहनामा या प्रकरणाचे अखेरीस दिला आहे. कांहीं ऐवज फौजेचे समजाविशीकरितां मालकमसाहेबांनीं दिला. तहनाम्यांतील कराराप्रमाणें छावण्या झाल्या. मागाहून मालकमसाहेब परामर्शास आले. सरकारस्वारींचा मुक्काम भानपुरीच राहिला. शिलेदारांची वगैरे तोड पाडली. महालानिहाय पागा व शिलेदार यांचा पुढील वीसरोजे वगैरे घरबंध करून कोणेही गोष्टीचा कज्जा ठेविला नाही. दौलतीचा अजमास पाहून शिलेदार जितके ठेवावयाचे तितके ठेविले. भाजीभाकर देणें ती समयास ज्याची त्यांस प्रविष्ट व्हावी. महालाचा बंदोबस्त रसदेची कौडी न घेतां चौ हप्त्यांनी ऐवज घ्यावा असा घरबंध करून, भानपुऱ्याहून इंदुरास येण्याचा विचार करून कार्तिकशुद्ध ५ (पांडव-पंचमीस) इंदुरास दाखल झाले.

महतपूरचे लढाईंत दौलत बरबाद होण्यांत कसर राहिली नाही. इंदूर मुक्कामीं आल्यावर मालकमसाहेब यांनीं श्रीमार्तंडादि देवपूजा आपले फौजेत गोळा करून विठ्ठलपंत

तात्यांचे हस्तें देव्हाऱ्यात पुनः मांडिले. बाकी कांहींएक राहिलें नाहीं. तेव्हां विठ्ठल महादेव यांनीं बैठकीचे पोटीं जवाहीरखाना, कापड, हत्तीचे सरंजाम, घोड्याचे सरंजाम, चांदीसोन्याचे तयार केलें. भांडी बाडांत न ताट न वाट्या न पलंग. सोहलतीचे पोटीं दौलत पुनः उभी केली. दौलतीची माणसें दरखदार मामलेदार वगैरे कोणास उपोशीत राहू दिलें नाहीं. थोड्या बहुतानें स्थापना केली. इंदूर मुक्कामीं आल्यावर वेलस्लीसाहेब हे रेसिडेंट होऊन आले.

याप्रमाणें इ. स. १८१८ च्या आरंभास होळकरांची ''मुलूखगिरी'' संपुष्टात येऊन ते इंदूर निवासी झाले.

सन १७१८ त पहिले मल्हारराव ''काय घेऊं आणि किती घेऊं'' या विचारांत राहून अजापालचे प्रजापाल बनले. त्याबरोबर एका शतकानेंच दुसरें मल्हारराव ''दिलें तितकें घेऊन'' स्वस्थ बसले. येका शतकांतल्या मुलूखगिरीच्या सहवासानें राजा व प्रजा कणखर व महत्त्वाकांक्षीं बनलीं. आतां मुलूखगिरीच थांबली म्हणजे तिच्या साहचर्यानें लाभणारे मार्दवी सद्‌गुणासही राजा व राष्ट्र मुकलें. रानावनांत उन्हतहान सोसून वाढणारा वटवृक्ष कोणीकडे आणि कुंडीत कलम करून लावलेलें व छायेत ठेवलेलें रोपटें कोणीकडे ?

इसवी इ. स. १७९७ पासून इ. स. १८१८ पर्यंतचे वीस एकवीस वर्षांस ''गर्दीका वक्त'' असें नामाभिधान प्राप्त झाले आहे. इ. स. १७९७ पासून पहिल्या दहा वर्षांचा काळ श्रीमंत यशवंतराव महाराजांनीं झगडून मगराचे पोटांत गेलेले माणिक बाहेर ओढून काहडलें. आणि त्या माणकाची नीट जोपासना करण्यास ते लागतात न लागतात तोंच विकृतीने त्यांस पछाडले. सावधगिरींत असतां कामास लागत पण परावलंबच झाला. शेवटीं त्यांचे पश्चात त्यांची आवरणशक्ती कोठें दिसेना. बालराजा, स्त्रियांचा कारभार, चार कारभारी चार परीचे, लष्करांत आवरणारा कोणी नाही, लष्करांत आणि दरबारांत स्वार्थी, व्यसनाधीन पोटभरूंचाच भरणा. प्रत्यक्ष मालक पेशवे अस्थिर बुद्धीचे, शेजारील ''सोबती'' पूर्वापार संबंध विसरून स्वार्थी व आकुंचित बुद्धीचे, अशा स्थितींत समोरील पक्षाकडे चौकस, पाताळयंत्री व राजनीतीच्या सर्वांगानीं परिपूर्ण अशा सामुग्रीनें सज्ज ईस्ट इंडिया कंपनी. अशा एकंदर प्रसंगांत ''सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः'' या न्यायानें श्रीमंत कृष्णा मासाहेब व विठ्ठल महादेव जोग (किबे) यांनी दौलत राखिली हे पूर्वजांचेच पुण्य म्हणावयाचे. 'गर्दी का वख्त' याचे थोडक्यांत पण मुद्देसूद वर्णन विठ्ठलपंत तात्यांच्या लेखणीतून उतरलेले वाचकांस सादर करीत आहोत ते असें. पत्र ता. २३ फेब्रुवारी इ. स. १८१८ रा. भारमलदादांचे नांवें.''संस्थानी पागा, सरंजाम, शिबंदी वगैरे खर्चायास जागा चार गावडे व शहराची सोय तितक्यानें गुजारा चालत नाही व बैद्याबखेड्यामुळें चार गांवडीं त्यांचीही तसनस झाली. ठिकाण खर्चास नाहीं. कर्जही कोणी देत नाहीं. तेव्हां आधार भरंवसा तर सारा आपला आणि या प्रसंगी आपणही पेंचात. न लिहावें. परंतु दुसरें कोणास ल्याहावें जाणोन गुजाऱ्याची योजना व्हावी. श्रीमंत मातोश्री कैलासवासी यांच्या घाटाचें

काम चालू केलें त्याचे खर्चास सरकारांतून दोन गांव लावून दिले. ते फौजेचे बखेड्यामुळें बरबाद झाले. तेव्हां तेथील पैसा उत्पन्न होऊन घाटाचें काम चालतें हें कळतच आहे. येविसींचे मनावर धरलें असतां दौलतीस श्रेयस्कर, आपल्यास यश म्हणोन विस्तारपूर्वक लिहिलें असेल. त्यांस येथील जालें वृत्त आपल्यास कळलेंच असेल. दौलतींत जीव कोठून असावा ? बारामास झाले फौजेचे आपसांचें बखेडे यांत महाल मुलखांची बरबादी किती ? चवघे हरामखोर मिळून दौलतीची व्यवस्था दुसरियांची होऊन राहिली. दौलतीची वारापाणी झाली. तेव्हां सर्वस्वी माथ्यावर घेऊन सावकारांचे पेचात येऊन कैलासवासी यांचे पुण्यप्रतापेकरून ताम्रांच्या दौलतीचा प्रसर दिवसेंदिवस वृद्धिंगत अशा प्रकारे त्यांचेच अनुमते कीं सरदारी मूळ दौलतीचा बंदोबस्त करावा. या कारस्थानाचे बंदोबस्तास प्रवर्तक होऊन फक्त सावकारांचेच पेंचात पुष्कळ. हे आपल्याही ध्यानांत. तेव्हां विस्तार लिहूं तो काय? संस्थानाचे खर्चास चारगांव व घाटाचे दोन गांव सरकारांतून लावून दिले. त्याचीच आबादी इस्तवारी चांगली करावी आणि जिकडील तिडके खर्चाची व्यवस्था होत जावी. आतां फौजफाट्यांचा बखेडा तर राहिला नाहीच. श्रीमंत भीमाबाई बुळे यांजलाही ताम्रानें भेटीस बोलावून आदर सत्कार चांगला करून लष्करांत पाठविणार. येथील बाहेरील उपद्रव महाल मुलखास कोणताही राहिला नाहीं. फक्त आबादीच करून महाल जमेवर बाद बसे असें घडावें यातच गुजारा सर्वत्रांचा. इकडून मातोश्रीसाहेबांचे कामास व आपले कामास आळस होणार नाहीं. हें खचित समजावे. सुबत्ता जाली म्हणजे इकडून बनेल तो उपर खर्चाची घडून येईल. आपण चिंता न करावी बहुत काय लिहिणें. **(सरकारी रेकार्ड)**

श्रीमंत दुसरें मल्हारराव यांच्या कारकीर्दीतील पहिल्या सात वर्षाचे हकीगतीची रूपरेषा वर दिलीच आहे. ही कारकीर्द पुढें आणखी पंधरा वर्षे चालली, तरी पण आम्ही येथेंच मुक्काम केला आहे. याचें कारण इ. स. १८१८ च्या तहाने होळकरशाहीचे स्वरूप पार बदलून गेले. इ. स. १७१८ पासून १८१८ पर्यंत ही राजवट सर्व हिंदुस्थानभर कांहीं विशिष्ट धोरणांनीं स्वतःचे बुद्धीने वावरत होती. इ. स. १८१८ च्या तहानें बुद्धीला आणि पराक्रमाला आळा बसला. तेव्हां गादीवर व्यक्ती तीच असली तरी कार्यदिशा बदलली. म्हणोन ज्या ठिकाणीं शंभर वर्षांपूर्वी प्रारंभलेली कार्य दिशा थबकली तेथेंच इतिहासकारानें थबकणें क्रमप्राप्तच आहे. तेव्हां या मागें वर्णिलेली वस्तुस्थिती विशद होणार आहे असें कांहीं लेखांक सारांशरूपानें समाविष्ट करीत आहोत. ह्या शिवाय अधिक लेखांक ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' म्हणोन स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध झाले आहेत, ते पहावे.

श्रीमंत सुभेदार तुकोजीराव प्रथम व महाराज यशवंतराव होळकर व दुसरें मल्हारराव होळकर ह्यांचे कारकीर्दीत म्हणजे इ.स.१७९६ तागाइत इ. स. १८१८ पर्यंत इनाम, जहागीर, धर्मादाय, इस्तमुरार वगैरे गांवे दिल्याबद्दल सनदा पुढें नमूद करीत आहोत.

| अ. नं. | **हल्लींचे वंशज** | **जिल्हा, परगणा** | **गांवे** | **देणगी उत्पन्न रु.** | **देणगी सन इसवी** |
|---|---|---|---|---|---|
| | (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | विश्वनाथ गणेश शास्त्री इनाम धर्मादाय | रामपुरा मनासा | शेमळी व लसुरड्या | रु. १७७२ | इ. स. १७९६ |
| २ | आसाराम भवानीराम इनाम नानकार | नेमावार काटाफोड | पळासी | रु. १३२५ | इ. स. १७९६ |
| ३ | बिहारीलाल जोशी इनाम धर्मादाय | जि. इंदूर | रिझलाय | रु. २६१५ | इ. स. १७९६ |
| ४ | मदनलाल मोतीलाल इनाम धर्मादाय | जि.नेमावर | बोडधा व मालागांव | रु. २३७५ | इ. स. १७९९ |
| ५ | श्रीद्वारकानाथ मंदिर इनाम देवस्थान | जि. महतपूर | खेडला | रु. १९९ | इ. स. १७९९ |
| ६ | गणपतजी कानुगो इनाम सर्व्हिस | जि. नेमाड भिकनगांव | खेडा | रु. ४३६ | इ. स. १८०० |
| ७ | गोपाळदास, अयोध्या इनाम धर्मादाय | महेश्वर | कैरयाखेडी | रु. १४३१ | इ. स. १८०२ |
| ८ | केशवभट नरहरभट इ.धर्मादाय. | खरगोण | रणगांव | रु. २९०० | इ. स. १८०४ |
| ९ | राघवदास पितांबर इ.धर्मादाय | रामपुरा | कुंडाल्या | रु. २११ | इ. स. १८०४ |
| १० | रामलाल पंठ्या इ.देवस्थान | नेमावर | शेमळी | रु. १०५४ | इ. स. १८०४ |
| ११ | राणा शिवनाथसिंग. इ.सर्व्हिस | नेमाड | रातळी, पुतळा | रु. १८८७ | इ. स. १८०५ |
| १२ | शंकरसिंग मंडलोई इ.सर्व्हिस | नेमाड | चाटली, डोंगरगांव वगैरे | रु. १४६० | इ. स. १८०५ |
| १३ | शंकर रामचंद्र फडणीस इ.जहागीर | नेमावर | बापच्या | रु. १८५६ | इ. स. १८०६ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १४ | यशवंतराव नारायण वागले इ. स. नानकार | नेमावर | पिपलकोट वगैरे | रु.१५०३७ | इ. स. १८०६ |
| १५ | राधेशाम गोपालकृष्ण. इ.धर्मादाय | महेश्वर | बढा | रु. ३५०० | इ. स. १८०८ |
| १६ | शिवजी गणपत शुक्ल इ.धर्मादाय | नेमाड | निसरपुर, मलवाडी | रु. ४३८ | इ. स. १८०९ |
| १७ | जेतकरण मंडळोई इ.सर्व्हिस | इंदूर | शहादा देव | रु. १५७९ | इ. स. १८०९ |
| १८ | काशीनाथ वासुदेव शास्त्री इ.धर्मादाय | देपाळपूर | बिजेपूर | रु. ११४३ | इ. स. १८०९ |
| १९ | माणकचंद जती इ.धर्मादाय | इंदूर. | कायथखेडी, हरण्याखेडी | रु. ५१६२ | इ. स. १८०९ |
| २० | निहालसिंग सरदारसिंग जमीदार. इनाम सर्व्हिस | महतपूर | निपान्या, सिधीकपूर | रु. ४२५० | इ. स. १८०९ |
| २१ | केशवराव मार्तंड इ.सर्व्हिस | गरोठ | बढ्या | रु. २०७७ | इ. स. १८१२ |
| २२ | केशव रामचंद्र अग्निहोत्री | नेमाड | खरगूण, टेंमला | रु. ४५५९ | इ. स. १८१२ |
| २३ | गजसिंग मंडलोई इ.सर्व्हिस | नेमाड, | लवाणी, खंडलाइ | रु. ५५६ | इ. स. १८१२ |
| २४ | समस्त ब्राह्मणगडावरील इ.धर्मादाय | महेश्वर | बढवी | रु. १३१४ | इ. स. १८१५ |
| २५ | फत्तेसिंग साहेबराय जमी इ.सर्व्हिस | महतपूर, तराणे | रूपाखेडी | रु. ३३४७ | इ. स. १८१५ |
| २६ | दौलतसिंग जमीदार | महतपूर, | तराणा, सागानेरा | रु. ४६४८ | इ. स. १८१५ |
| २७ | माधवराव बाबुराव वाघमारे, कन्यादान | इंदूर, | सावेर, भोंडवास | रु. १६०४ | इ.स. १८१७ |
| २८ | सरदार माधवराव विनायक किबे. इ. जहागीर | इंदूर, | देपाळपूर, राहू व बनेड्या | रु.१९६७६ | इ.स. १८१८ |

२९ राव जसवंतसिंगजी नेमावर हिरापूर वगैरे रु. १८०० इ. स. १८१८
इस्तमुरार

विशेष सूचना : देणगीचे स्वरूप संक्षिप्तांत आहे. त्याचा खुलासा खाली दर्शविले प्रमाणें

| | | |
|---|---|---|
| इ.जा. | म्हणजे | इनाम जहागीर |
| इ.स. | '' | इनाम सर्व्हिस |
| इ.ध. | '' | इनाम धर्मादाय |
| इ.दे. | '' | इनाम देवस्थान |
| इ.ना. | '' | इनाम नानकार |
| इ.मु. | '' | इस्तमुरार ठराव |

(लेखांक १) इ. स. १८१५ पुणें रेकार्डपैकीं : दौलतराव शिंदे व मल्हारराव होळकरांची परस्परें एकवाक्यतेनें चालोन श्रीमंताचे मर्जीप्रमाणें वर्तावें. येविसींचे ठरावाची कलमबंदी. सीतआशेर मयातेन व अलफ.

श्रीमंत स्वामींची सेवा तुम्ही व आम्हीं पेशजी पासोन एकवाक्यतेने चालोन एक निष्ठेने करीत आलो त्याप्रमाणें सबाह्यांतर एक दिलाने वर्तणूक करून ज्यात श्रीमंत स्वामींचा संतोष त्यांस जपत असावें. कलम १

भोंसले आपले स्नेही यांसी स्नेह यथापूर्वक आहे त्याप्रमाणें ठेवून त्यांचीही एकदिली करून घ्यावी. परस्परें स्नेह उपयोग येकमेकाचे करीत जावे. मीरखानाविषयीं त्यांचे मनांत कल्पना आहेत, त्याविषयीं त्यांची खातरी करून मीरखानाचा किस्सा त्यांसी होऊं नये. काहत करून द्यावी. कलम १

श्रीमंत स्वामींची सेवा तुम्ही आम्हीं पूर्वीपासोन एक विचारें करीत आलों त्याप्रमाणें पुढेंही करून ज्यांत स्वामींचा संतोष तेंच करण्यांत येईल. कलम १

भोसले यांचा आपला स्नेहभाव चालतो त्याप्रमाणें इकडूनही स्नेहभाव चालेल. दुसरा अर्थ नाहीं. मीरखानविषयीं त्यांचे मनांत संशय असलियास त्याविषयीं त्यांची खातरी करण्यांत येईल. कलम १

चार रुपये मुबादला सावकारी कर्ज दाखल द्यावे म्हणोन तुम्हाकडील कारभारी याचे बोलणे त्यांस जो ऐवज देणें नेमांत येईल त्याची दुसालांत व्याजासुद्धां फडशा करून द्यावयाची व्यवस्था कशी करून देणें, महाल लावून देणें किंवा वराता महालावर करून सही करून देणें. त्याप्रमाणें ऐवज सावकारास अविछिन्न पावावा त्यांत उणेअधिक होऊ नये येविसींची खात्री करून द्यावी. कलम १

चार रुपये मुबादल्यास आपलेविसीं सावकारापासून घ्यावयाचे त्याचा फडशा घेतल्या दिवसापासून बारा महिन्यांनीं निमे महालानिहाय मामलेदार याजकडून देविला जाईल. बाकी निमे पुढें दुसरें सालचे अखेरीस फडशा करून देऊं. याप्रमाणें सावकाराशीं आपण खातरजमा करून बोलण्यांत येईल त्याप्रमाणें आपणाकडून निभावणी घडण्यांत अंतर होणार नाहीं. कलम १

महाल मुलूख आफतर झाले आहेत त्यांची आबादी होऊन भरभराटीस यावे याजकरितां मामलेदार सावकार नेमून बंदोबस्ताची पैरवी कर्तव्य तशी करूं. कलम १

पवारांकडील महाल सोडून देण्याविसीं श्रीमंत स्वामींची आज्ञा आहे. त्याप्रमाणें महाल सोडून द्यावें. कलम १

महाल सोडून देणेंचा श्रीमंतांचा आशय आपण कळविला. त्यांस आपल्याकडे पवारांचे महाल आहेत ते आपण सोडून दिले म्हणजे आम्हीही पवारांचे महाल सोडून देऊं. कलम १

कलमबंदी ठरेल त्याप्रमाणें निभावणी तुम्हांकडून अकृत्रिमपणें घडावी. येविसीचीं खात्री असावी. कलम १

कलमबंदीची यादी ठरण्यांत आली त्याप्रमाणें आम्हाकडून अकृत्रिमपणेंच निभावणी घडेल. आपणही असेंच लक्ष राखून निभावणी घडेल तें करावें. कलम १

मेवाड प्रकरणी राणाजी उदास आहेत. त्यांस आपल्याकडोन त्यांचा संतोष राहील त्याप्रमाणें आम्हांकडूनही घडेल. कलम १

वेगूं वगैरे महाल पूर्वीपासोन तुम्हांकडे आहेत. ते पक्षीं आम्हाकडील उपद्रव लागणार नाहीं. कलम १

नीमपुरा सोदे येथील जमिनीचा मजकुर पहिलेपासून वहिवाट जिकडे चालत आली असेल तिकडे चालेल. दिक्कत पडणार नाही. कलम १

अंबाड येथील सरदेशमुखी सुदामतपासून चालत असतां अलीकडे कमाविसदाराकडून हरकत पडते. त्यांस कमाविसदारास निक्षून ताकीद करून कदीमपासून चालत आल्याप्रमाणें चाले तें करावे. कलम १

अंबाड येथील सरदेशमुखी सुदामतपासून चालत आल्याप्रमाणें पुढें निर्वेध चालेल. कलम १

यादी लिहून दिल्याप्रमाणें कराराची एक प्रत आम्हाकडे आहे. त्याबरहुकूम आपले कडूनही घडण्यांत यावे.

(लेखांक २) दिवाण खासगीस मल्हारराव महाराजांकडून पत्रः ता.१७-६-१८१६ कीं कैलासवासी तीर्थरूप मातोश्री अहिल्याबाईसाहेब यांच्या छत्रीचे व घाटाचे काम बंद आहे. तेथील टाकी चालू झाली पाहिजे म्हणोन खर्चाकरितां मर्दान्यापैकीं मौजे तेलिया भटयाण व पिंपलघूण ही दोन गांवें नेमून दिली आहेत. तरी काम भारमल होळकरामार्फत सत्वर चालू करणें म्हणोन.

**श्री**

तहनामा ता. ६ जानेवारी इ. स. १८१८

महाराज मल्हारराव होळकर यांसी कंपनी सरकारचा जाहलेला तह तारीख ६ जानेवारी इ. स. १८१८.

तहनामा आनरेबल ईस्ट इंडिया कंपनी आणि सरकार महाराज मल्हारराव होळकर व त्यांचे वारीस व पुढें त्यांचे जागी होणार ते यांमध्ये ठरविला. ब्रिगेडियर जनरल सर जान मालकम पोलिटिकल एजंट. गव्हर्नर-जनरल ईस्ट इंडिया कंपनीचे तर्फेनें सर जान मालकम हे लेप्टनेंट जनरल सर टामस हिस्लाप बारोनेट सेनापती मद्रास आणि दक्षण फौज त्यांचे आज्ञेवरून संपूर्ण मुखत्यारी मोष्ट नोबल फरासीस मारक्विस हेस्टींग इंग्रज पाछयाचे मंत्री गव्हर्नर जनरल कौंसलात कंपनी बहादूर यांनीं नेमले. सारे हिंदुस्थानचे कारभारावर यांजकडून आणि तात्या जोग पूर्ण मुखत्यार महाराज मल्हारराव होळकर यांजकडून.

१. महाराज मल्हारराव होळकरांचा सल्ला जाहला. कंपनी सरकार कबूल होतात ही हरएक राजा व हरएक तुफान लढाई सरकार महाराज मल्हारराव होळकर यांचे मुलखांत करतील त्यांसी शिक्षा केल्याविना सोडणार नाही. महाराज या कारणावरून कबूल होतात कीं माझी फौज लावून हरएक दुसरें रीतीनें ज्याप्रमाणें लागेल त्याप्रमाणें सहाय्य होईन आणि इंग्रज सरकार वारंवार तद्वत् साहाय्य होतील. महाराज मल्हारराव होळकरांचे मुलखांत. कलम

२. महाराज मल्हारराव होळकर कबूल होतात कीं इंग्रज सरकार नबाब मीरखानासी बंदोबस्त केला आहे तो आम्हास मान्य आहे. इंग्रज सरकारानें त्या बंदोबस्तास मुलखाची जामिनगिरी नबाब अमीरखान व त्याचे वारीस यांस दिली यांजवर आमचा दावा बेदावा केला आहे. कलम

३. प्रगणे पंचपहाड व डिग व गंगराड व आहूर वगैरे जे राजा जालमसिंग कोटेवाले यांस भाड्यानें दिली आहे ती महाराज मल्हारराव होळकरानें त्या सरदारास आक्षई देऊन आपला संबंध सारा ते प्रगणे सोडून दिल्हेत. कलम

४. महाराज मल्हारराव होळकर कबूल होतात  कीं माझें सारें घेणें खंडणीचे आणि सर्वे रीतीचे जमाबंदीचे जे मजकडेस आहेत, किंवा होते रजपुतान्यांत ह्या रीतीचे राजे उदेपूर, जयपूर, कोटे, बुंदी, करोली वगैरे सारे इंग्रज सरकारास देतो. कलम

५. रामपुरा बसंत, रानीपुरा, बेलिया, निमसराई, इंद्रगड, बुंदी, लाखेरी, समेदीबमय गांवदाई वगैरे ठिकाण बुंदीचे पाहाडाचे उत्तरेचे आहेत त्या गांवांवरून मल्हारराव होळकर सारी आपली सत्ता सोडून देतात. कलम

६. सातपुड्याचे पहाडाचे दक्षण देशास सर्व जे गांव आहेत व त्यांजवरील सारी सत्ता सेंधव्याचे किल्ल्यासह वर्तमान दोन हजार वासलातसुद्धां आणि खानदेशांतील गांव जे आहेत ते आणि दुसरें गांव आंबाड व दुसरें निजाम व पेशवे यांचे मुलखांत मिश्रित जाहले अहेत ते इंग्रज सरकार यांस सोडून देतो. कलम

७. ह्या तहनाम्याकडून मुलूख दिला म्हणोन इंग्रज सरकार बांधले जातात कीं मल्हारराव होळकर यांचे मुलखांतील सलामती ठेवावयाकरितां परके दुरमान दूर ठेवावयाकरितां फौजेची सहाय्यता करावी ही फौज अशी सामर्थ्याची असावी कीं जी ह्या कार्याच्या योग्य असेल, ही फौज ठेविली जाईल. जेथे इंग्रज सरकार निश्चय करील कीं जागा बरी आहे तेथें आणि महाराज मल्हारराव होळकर कबूल होतात कीं कांहीं चांगली बंदोबस्ताची जागा तिचा सरंजाम ठेवावयास द्यावी. कलम

८. महाराज पूर्ण आज्ञा देतात कीं इंग्रजी फौज जी कांहीं आपले मुलखासंबंधीं लढणार तिनें सर्व प्रकारचे सामान विकत घ्यावें. दाणा आणि सर्व रकमा खाण्याच्या आणि सर्व जातीच्या वस्तू, पोशाख व जेवढे गुरे गाडे आणि उंट ह्या फौजेत लागतील तेव्हढे यांजवर जकात घेऊं नये. कलम

९. मल्हारराव होळकर लिहून देतात कीं कंपनी सरकार दोस्त व आश्रित व हरयेक दुसरें राजे यांजवर कोणेयेक प्रकारे लढाई व दुःख करूं नये. कदाचित वाद पडल्यास जे कंपनी सरकारास त्याचे वाण्याचे काट्यांत तोलून निश्चय करून ठरविले त्यांस महाराजांनीं पूर्ण मान्य करावें. महाराज कबूल करितात कीं इंग्रज सरकारचे मान्यतेविना वकील हरयेक परराज्यास पाठवू नये आणि येऊं देऊं नये आणि परराज्यासीं व्यवहार ठेऊं नये. कलम

१०. इंग्रज सरकार कबूल होतात कीं महाराजांचे हरयेक मुलें सोइरें आश्रित रयत व सेवक ह्यांचा कोणे रीतीनें आम्हासीं संबंध नाहीं. त्यांस महाराज मुकत्यार आहेत. कलम

११. महाराज मल्हारराव होळकर कबूल होतात कीं फौज आहे ती काढून टाकावी. जमाबंदीच्यानें समावेल यापेक्षा अधिक ठेवूं नये. अद्यापी कबूल होतात कीं तीन हजार घोड्यांच्यापेक्षां चाकरीत कमी येऊं नये. जी इंग्रज सरकारचे फौजेसंगें लढेल त्या फौजेच्या रोजमुऱ्याकरितां चांगला बंदोबस्त केला पाहिजे. कलम

१२. महाराज कबूल करितात कीं नबाब गफूरखा यांस द्यावे. त्याचे सांप्रत जायदात संजीत मल्हारगड व ताल मंडावल व जावरा व बर्डावदा हे सर्व गांव पिंपल्या खंडणी आणि सर्वाचें उत्पन्न हा मुलूख त्यांचे वंशपरंपरा नबाब आणि त्याचे वारसाइ सिबंदी परगण्याची आणि स्वतःचे चाकर याशिवाय सरकारचे चाकरीस सहाशें घोडे निवळ चाकरीकरितां हमेश ठेवावे आणि गांवांचे उत्पन्न वाहडल्यास त्याजबरहुकुम फौजही वाढवीत जावी. कलम

१३. इंग्रज सरकारचे हुकमासिवाय मल्हारराव होळकर कबुल होतात कीं आपले चाकरीस विलायती लोक अथवा मकरानी लोक ठेऊं नये. कलम

१४. ह्या पत्रेंकरून सला आणि दोस्तीचा संबंध जाला आहे तो वृद्धी होऊन चालावा म्हणोन कबुलायत आलीं कीं इंग्रज सरकारचा येक आबरूदार मंत्री महाराज मल्हारराव यांजकडेस राहावा आणि महाराजांस आज्ञा आहे कीं आपला वकील गव्हर्नर जनरलकडेस पाठवावा. कलम

**श्रीसरस्वत्यैनमः**

**होळकरशाही मुलखाची जमाबंदी**

शके १७३९ संमत १८७४ ता. ३० जानेवारी इ. स. १८१८

''सन १८१८ इसवीचा तह जान मालकम व विठ्ठल महादेव ह्यांचे विद्यमानें चर्मण्वती तीरावर झाला. त्यांत ठरल्याप्रमाणें.

यादी जमा महालानिहाय सरकार राजश्री मल्हारराव होळकर सु।। समान अशेर मयातेन व आलफ. मिती पौष वद्य ८ मुक्काम चर्मण्वती तीर.

कमाल जमेची बेरीज रुपये

| खालसा अंमल | | | कंपनी इंग्रेज | | |
|---|---|---|---|---|---|
| ५००००० | प्रगणे | रामपुरा | १०५००० | संस्थान | बुंदी, लाखेरी |
| २६००० | ,, | संधारे | २०००० | ,, | डोंगरपूर, बासवाडा |
| २५००० | ,, | सुनेल | २०००० | ,, | सोपूर |
| १५००० | ,, | रायपूर | १५०००० | ,, | कोटे खंडणी |
| २०००० | ,, | कोठडी | ३५०००० | ,, | जयपूर खंडणी |
| ४०००० | ,, | माचलपूर | १२५००० | ,, | थाळनेर |
| ४०००० | ,, | जिरापूर | २५०००० | ,, | सुलतानपूर |
| ८०००० | ,, | नारायणगड | ३००००० | ,, | नंदुरबार |
| ७०००० | ,, | देवळे प्रतापगड | ५०००० | ,, | रावेर |
| ८५००० | ,, | नरसिंगगड | ३०००० | ,, | आंढमवद |
| २०००० | ,, | नेमावर पंच महाल | २५००० | ,, | न्याहळोद वगैरे देह |
| ४००० | ,, | सुंदरसी | ७५००० | ,, | उत्राण |
| ३०००० | ,, | पाटण केशवराय | ४०००० | ,, | गाळणा |
| २५०००० | ,, | इंदूर | १७५००० | ,, | चांदवड |
| १५०००० | ,, | देपाळपूर | ३००००० | ,, | आंबाड |
| ६०००० | ,, | सावेर | ४०००० | ,, | शेवगांव |
| २५००० | ,, | बेटमे | २०००० | ,, | कोरहाळे |
| १५००० | ,, | कायथे | ५०००० | ,, | देपूर |
| १५०००० | ,, | तराणे | २५००० | ,, | वेरूळ |
| २००००० | ,, | महतपूर | ३०००० | ,, | सिदूरघोदलगांव |
| १०००० | ,, | ब्राह्मणगांव | ४००० | ,, | मौजे आडगांव |
| १५००००० | ,, | सरकार बिजागड | ३००० | ,, | वडझिरे, पाडे वगैरे |
| १०००० | ,, | हासलपूर | ८००० | ,, | नरसूल कसबा |
| ५०००० | ,, | आलमपूर | ४००० | ,, | कांडापूर दक्षण |
| २७५००० | ,, | कोंच | ५००० | ,, | काष्टी चंदनपुरी |
| ५०००० | ,, | वाफगांव वगैरे देह | १२००० | ,, | जांबगांव |
| ३०८२० | ,, | चांदवडपैकीं खानगी देह | २०००० | ,, | संस्थान इंद्रगड खातोली |
| ० | मौजे | आडगांव पाो नासिक | २५००० | ,, | पाो आंतूर |

० मौजे बडझिरे वगैरेदेह २ १००००० पाो डग
पाो डिंडोरी. ३,००० १२५००० पाो गंगराड
० तलेण पाो लाटाहेडी. देह १
----------------------
२३,७९,८२० २५,६६,०००

६५,००० भीमाबाई बुळे यांजकडे
४०,००० संस्थान झाबवे
२५,००० प्रगणे चिखलदे
------
६५,०००
--------
२४,४४,८२०

१४,४५,००० नबाब मीरखान व नबाब गफुरखान यांजकडेस
१०,३५,००० नबाब मीरखान.
१,००,००० प्रगणे पिढावा
१,००,००० गुगुलछबडा
२,७५,००० ,, टोंक
३,००,००० ,, सिरोंज
१,७५,००० ,, निंबाहेडा
८५,००० ,, रामपुरा खुर्द
-----------
१०,३५,०००

४,१०,००० नबाब गफूरखान
८०,००० प्रगणे मल्हारगड
१,२५,००० ,, जावरे
३०,००० ,, बरडावद
३०,००० ,, पिंपळोदा
१,००,००० ,, तालमंडावल
४५,००० ,, संजीत
---------
४,१०,०००
----------
१४,४५,०००

तेरीज एकंदर रु.

| | | | |
|---|---|---|---|
| २३७९८२० | खालसा अंमल | २५६६००० | कंपनी इंग्रेज |
| ६५००० | भीमाबाई बुळे | | |
| १४४५००० | नबाब मीरखान, गफुरखान | | |

एकूण आकार -------------

६४५५८२० रु.

**सरकारी रेकॉर्ड, बुळे साो व दिवाण खाजगी रेकार्ड**

## श्रीम्हाळसाकांत

जानेवारी इ. स. १८१८

रोजकीर्द सुभेदार श्रीमंत राजश्री मल्हारराव होळकर.

तहाअन्वयें सोडचिठ्या दिल्या. पौषमास. कंपनी अंग्रेज बहादूर व सरकारचा समेट होऊन त्यांजकडील टामससाहेब व मालकमसाहेब यांचे विद्यमानें नजीक मंदोसर मुक्कामीं दोस्ती झाली. सबब त्यांजकडे महाल येणेंप्रमाणें द्यावयाचे ठरून त्या संबंधी सोडचिट्या देणें ते महाल, बरहुकुम यादी मखलसीची.

१ नारो बाबूराव यांस कीं कंपनीबहादूर व सरकारचा समेट होऊन दोस्ती जाहली सबब प्रगणे अंबाड त्यांजकडे द्यावयाचे याजकरितां हे पत्र सादर केलें असें तरी तुम्ही प्रगणे मजकूर येथील दखलगिरी साहेब बहादूर यांजकडे देऊन पावती घेणें म्हणोन पत्र.

१ सदरहू अन्वयें महालानिहाय पत्रें

५ प्रांत मालवा तहत हिंदुस्थान

१ संस्थान बुंदी १ प्रगणे लाखेरी १ प्र. करवरसमंदी देहे

१ संस्थान इंद्रगड वास तोली १ प्राो रामपुरा खुर्द बालेकिल्ला

..........................................................................................................

२ प्रांत नेमाड १ किल्ले सेंधवा विद्यमान चिमणाजी कृष्ण १ प्राो. आंबाड

६ प्रांत खानदेश

१ प्रगणे उत्राण विद्यमान जोती माने.

१ प्राो आडावद.

४ विद्यमान रामदास आगरवाले.

१ प्राो गाळणा बालेकिल्ला. १ प्राो सुलतानपूर.

१ प्राो नंदुरबार. १ प्राो थाळनेर बमयगढी.

--------

६

८ स्वदेश

१ ताो कोरहाळे, १ ताो देपूर. १ प्राो चांदवड बालेकिल्ला, देशमुखी खेरीजकरून. वि. रामदास अगरवाले.

१ प्रगणे वेरूळ. १ कसबे सीवूर धोदलगांव. १ कसबे नगरसूल.

१ मौजे वाफगांव वगैरे नऊ गांव विद्यमान खंडेराव मोरेश्वर. १ मौजे अस्तगांव

१ मौजे जांबगांव प्रगणे गांडापूर. ३ पांडवझिरी व आडगांव. १ प्राो अंबाड

--------

२१

एकूण एकवीस पत्रें महालची दिल्ही. छ. ९

सही. विठ्ठल महादेव

**हुजूर फडणीसी सरकारी रेकार्ड**

**श्रीसरस्वत्यैनमः**

यादी होळकर सरकारांत महतपूरचे लढाई पूर्वी संस्थानिक लोकांकडून टाक्याचा ऐवज येत होता त्याजबद्दल व हल्लीं येतो त्याज ब।। इसवी सन १८१८ सालची यादी.

रुपये

१८१६२४८ महतपूरचे लढाई पूर्वी टाक्याचा ऐवज येत होता तो.

३५०००० संस्थान जयपूर फसली सन १२२७ फसलीचे साली इंग्रेज सरकारांत टाका लावून दिला त्या पत्रकावरून.

८३३३३३ संस्थान उदेपूर फसली सन ११७५ (इ. स. १७६५) चे यादी अन्वयें.

३५०००० संस्थान कोटे संमत १८१८ चे यादीवरून.

१०५००० संस्थान बुंदी फसली सन १२२७ साली इंग्रेज सरकारकडे टाका लावून दिला त्या पत्रकावरून.

२०७०० संस्थान सोपर सन १२२८ फसलीचे यादीवरून.

२६७१५ संस्थान इंद्रगड संमत १८०५ चे यादीवरून.

२०००० संस्थान डोंगरपूर सन १२२७ फसली इंग्रेज सरकारकडे लावून दिला त्या यादीवरून.

७५००० संस्थान झाबवे यादीवरून.

१४००० संस्थान खातोली प्रांत हडोती संमत १८७५ चे यादीवरून

१२००० संस्थान करोली येथील ठरावाचा दाखला सापडत नाही पण फसली सन ११८३ चे साली वसुली जमा झाली त्याप्रमाणें.

२००० संस्थान पिपले करवड फसली सन ११८३चे तालेबंदावरून.
७५०० संस्थान बांसवाडा संमत १८२४ चे यादीवरून ३००० पैकीं.

----------

१८१६२४८

१५८५१४-३-० हल्लीं सरकारांत टाके येतात ते हल्लीं शिक्का.

३०००० संस्थान पाटण केशवरायजीचे.
६९६२७-३-० संस्थान नरसिंगगड.
५८८८७ संस्थान देवळे प्रतापगड.

---------

१५८५१४-३-०

**सरकारी रेकार्ड हुजूर फडणीसीवरून**

इसवी इ. स. १८१८ चा तह व त्याच्या आनुषंगिक प्रांताचा तपशील ह्याचा खुलासा सरकारी कागद पत्रांवरून नमूद केलेला आहे. या तहाच्या अन्वयें भिजत पडलेली प्रकरणें आपोआप बाहेर आली. हा इतिहासकारास फायदाच होय. इ. स. १८१८ चा तह म्हणजे रोगाची वृद्धी होऊन त्यावर झालेली शस्त्रक्रिया होय. वरील शस्त्रक्रियेनें अलग पडलेले अवयव म्हणजे पर्यायानें इंदूर दरबारानें सोडलेल्या सोडचिठ्याच होत.

पुढील प्रकरणांत जोडलेला पत्रव्यवहार व इतर संस्थानसंबधीचे कागद पाहिले म्हणजे या कालातील जमाबंदी व सुटलेल्या जहागिरी यांचे चित्र म्हणजे संस्थानचें बहिरंग व अंतरंग होय. श्री देवी अहिल्या मातोश्रींच्या छत्रीचा प्रारंभ करून ''गर्दीच्या वख्ताचे'' अंतास ती पूर्ण झाली म्हणजे या दुर्घट प्रसंगीं मातोश्रींचे छत्र जणू काय रक्षणच करीत होतें असें दाखविलें. भारमलदादा या वयोवृद्धापुढें तरूण विठ्ठलपंत तात्या (किबे) या वीस वर्षांचे समालोचन करून जुन्या माणसांस नमस्कार करून नव्या कालास प्रारंभ करितात, अशा अर्थांचे द्योतक असें हे पत्र आहे. आम्हीही तात्यांस अनुसरून हा भाग येथेंच समाप्त करून पुढच्या भागाकडे वळतो. अर्थात इ. स. १८१९ पासून इ. स. १८८६ पर्यंत जाऊं.



## प्रकरण १२ वें

# श्रीमंत महाराज द्वितीय मल्हारराव होळकर यांची कारकीर्द

## इ. स. १८११–१८१२

### सुभा राजश्री मल्हारराव होळकर आवर्जा फसली सन १२२१

इजाफत जमा इसवी सन १८११-१२

१ नबाब मीरखान आमिरूदोले.

२०००० छ १ त।। छ५ मशारनिल्हे यांजकडे सरकारांत पुणें प्रकरणीं तीन लक्ष रुपये खर्चास घेणें ठरले त्यापैकीं मार्फत नबाब गफुरखां पावती राजे जालमसिंगजी यांचे नांवें. चांदवाडी शिक्का अदा असेंत. म्हणोन नबाब गफुरखां यांचे नावें.

दादो भगवंत निसबत गफूरखां. छ १ रोजीं.

१ संस्थान डोंगरपूर विद्यमान राव जसवंतसिंग.

५०००० माहे जिल्हेज ऊर्फ पौष मास छ २१ त।। छ २५ रोज. यांस कीं राजश्री जगन्नाथ राजाराम फौजपलटण समेत रवाना केलें आहेत यांजकडे खर्चाकरितां रुपये पन्नास हजार तुम्हाकडून देविले असें. तरी सदरहू पन्नास हजार रुपये संस्थान मजकुरपैकीं मशारनिल्हेकडेस माफी विसाजी साबाजी सुभेदार.

१ संस्थान बांसवाडा विद्यमान कुंवर उमेदसिंग.

५०००० माहे जिल्हेज ऊर्फ पौष मास छ २१ रोज. यांस कीं राजश्री जगन्नाथ राजाराम सरकारांतून फौजपलटणेंसह रवाना केलें आहेत. सबब यांजकडेस खर्चास रुपये पन्नास हजार तुम्हाकडून देविले असें तरी सदरहू पन्नास हजार रुपये देऊन कबज घेणें म्हणोन वरात छ२४ मार्फत विसाजी साबाजी.

१ संस्थान देवळे प्रतापगड विद्यमान रावत सामतसिंग
माहे रविलावल उर्फ चैत्र मास छ ११ त।। छ ५ सरकारांत हलकाऱ्यांच्या छड्या पाहिजेत यास्तव मुजरद हलकारे जोडी रवाना करून हे पत्र लिहिले असे. तरी तुम्ही हलकाऱ्याच्या छड्या सुमारी ३०० तीनशे चांगल्या बासाच्या खेरादिया कडून रंगवून तयार करवून स्वारीत पावत्या करणें. खर्चास रोजमरा देणें. कालूराम हलकारे नथोबखतसिंग छ १३ शिक्का.

१ संस्थान नरसिंगगड पाटण विद्यमान दिवाण सोभागसिंग.

३१००० माहे जिल्हेज ऊर्फ पौष मास छ ६ त।। छ १० रोज.

३०००० बापु विष्णु यांजकडे पलटणाचे तनखे ऐवजीं तीस हजार रुपये तुम्हांकडून देविले असें तरी सदरहू महालचलणी तीस हजार रुपये मशारनिल्हेकडे देणें. वरात छ ९ वार होऊन परभारे गेली. सदरहू ऐवज जमा करून बापूचे नांवें लिहिला.

१००० खंडो त्रिंबक यांजला कामगिरीमुळें नबाब मीरखां यांजकडे पाठविले होते तेथें खर्चास पावले नाही. सबब मशारनिल्हेचे ऐवजीं मोहगम खर्चास एक हजार रुपये तुम्हाकडून देविले असें तरी सदरहू संस्थान मजकुरीं महालचलणी देऊन कबज घेणें.

**हुजूर फडणीसी रेकार्ड**

## श्रीम्हाळसाकांत

ता. १५ फेब्रुवारी इ. स. १८१२

राजश्री भारमल होलकर गोसावी यांसी. अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित लाडाबाई व तुळसाबाई होळकर विनंती उपरी. अलिकडे तुमची पत्रें वरचेवर न येतां मासपक्षांत एखादे पत्र तेंही संकलित लिहण्यांत येते त्यावरून फार करून उदासीचे भाव दिसून येतात. याचें कारण काय ? सरकार परलोक पावले. त्यांचे मागें सर्व प्रकारे हिंमत देणें, दूरंदेशीनें पोक्त सल्ला सांगून वडीलपणें न्यूनाधिक पाहणें, समयोचित जे सला सुचविणें येविषयीं भरोसा तुमचा. वर्तमान ऐकतांच तुमचें येणें स्वारीत होऊन सर्वांस दिलासा देऊन दौलतीचा लौकिक चिरंजीवाचे हाते वृधिंगत नेणें हे उचित असोन येण्याचा आळस केला. सरकार वियोगामुळें उदासी किंवा अन्यत्र अंदेशा मनांत. याचे वास्तविक कळत नाही. दौलतीचे सर्वोपरी छत्र

गेलें या खेदास पारावार नाही. तुम्ही त्या लोभांत निविष्ट तेव्हां उदासीचेंही आश्चर्य नाहीं. परंतु दौलतीचे ओघास तुम्हांसारख्यांनीं आलग असावें हें अप्रशस्त. यावर मनांत कोणतीही कल्पना न आणितां तेथील कामकाजाचा बंदोबस्त करून एकवेळ स्वारींत जरूर यावयाचें करावें. आपले ठिकाणीं खिन्नपणें राहवे असा समय नाहीं. हें तुमचेही ध्यानांत असेलच. त्याची पैरवी दिवसेंदिवस दृढतर राखून काडीमात्र संशय न आणितां पत्रदर्शनीं स्वार होऊन येऊन पोहचणें. समक्ष आल्यावर तुमचे मनातील विकल्प दूर होऊन पुढील हकीगत कर्तव्यता मनांत येऊन घरीबाहेर तुमचे पोक्तपणास सारेंच चांगलें दिसेल. याचा सर्वात्म विचार करून एकवेळ यावयाचे करणें. प्रगणे ब्राह्मणगांव व बागदरा व चेनपूर येथील सनदापत्रें पाठविली आहेत. मशारनिल्हे कळवतील हे वास्तविक जाणोन सरकारचे मागें हरएकविसीं सुचविणें, सांगणें, उचित आहे. यास्तव शपथपूर्वक सहस्त्र अंदेशे व उदासी एकीकडे ठेवून अगोदर येण्याचा बेत जरूरीनें करून प्रशस्त अंतःकरणें जल्द येऊन पोहचणें. र।। छ सफर सु।। इसने आशरमयातेन व आलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती. मोर्तबसुद.

**सरकारी रेकॉर्ड**

**लेखांक ३** **श्रीम्हाळसाकांत**

ता. १६ जुलाई इ. स. १८१२

श्री म्हाळसाकांत चरणीं तत्पर
यशवंतराव सुत मल्हारराव होळकर

राजश्री कुंवर सिवलाल कमाविसदार तालुके गरोठ परगणे रामपुरा गोसावी यांसी अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर सु।। सलासअशरमया तेनवअलफ तालुके मजकुर येथील मामलत सरकारांतून सालमजकुरीं तुम्हाकडे मखत्यानें आहे तरी तालुके मजकुर येथील गांव तीर्थरूप कैलासवासी (यशवंतराव) बाबासाहेब होळकर यांचे छत्रीचे खर्चाकरितां खासगीकडे मौजे साठखेडा व मौजे शेवळी रुपांची एकूण दोन गांव लावून दिले आहेत. दोन्ही गांवचा ऐवज मखत्यांत मुजरा दिला जाईल. जाणिजे. ६ रजब बहुत काय लिहिणें. मोर्तबसुद.

**कोटा रेकॉर्ड**

**लेखांक ४** **श्री म्हाळसाकांत**

ता. २० सप्टेंबर इ. स. १८१२
भाद्रपद शुद्ध १४, संमत १८६९

राजश्री जालमसिंगजी झाले गोसावी यांसी. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर राम राम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल

लिहित जाणें विशेष. जयपुरवाले हमदा (फिसाद) होऊन नबाब महमदशाह यांसी मुकाबला केला हे वर्तमान कंपू यांस कळतांच त्यांनीं आपले तलबेची आडबीड सोडून नबाबाचे मदतीस दरकूच येतांना किल्ले मजकुरीं सरकार अंमल बुणगे वगैरे ठेवण्यास प्रशस्त, हरयेक कामास किल्ल्याचा साहेरा राहून रसद येण्याची सोहलत पडेल म्हणोन. कंपुवाल्याचा विचार व याप्रमाणेंच किल्लेवाल्यास सूचना लाविली. परंतु त्यांनी विचार न करितां बाईसाहेबांचा हुकूम येथें मुक्काम करूं नये, हीच निकड लावोन तोफा मारण्यास सिद्ध जाहले. तोफ चालू जाहल्यास पुढील इराद्यास कमती पडेल ही सलाह लालसिंग यानें ठेरावोन ओढीस न पडतां कूच करून गेले. सरकारांत सविस्तर वर्तमान दर पै कळत आहे. ऐसियासीं परभारें किल्लेवाल्यांनीं आपली अक्कल खर्ची पाडली. यात सरकारतर्फेचा सुभा नबाबाचे मनांत काय गेला असेल ? महमदशखां व कंपूवाले सरकारनक्षावर नमूद. त्यांची हमराई कशी राहिली असेल रजवाड्यांत छलछिद्राचे पाहणें. ते त्यांचे निदर्शनास आलियावर दबाबाचा पर्याय कोणता ? याचे मनन तुमचे व राजश्री लालाजी बल्लाळ यांचे ध्यानांत न यावे ऐसें नाही. इकडे सर्वेपरी आपली खातरी. सूक्त असुक्त सुचविणें तसेंच बरोबर राखणें येविसीं वडीलपणे तुमच्या भरवंशावर व लालाजीबाबाही सर्व जाणोन असता प्रसंगास असें व्यत्यय टाळून तुमचे दौलतविसीं जपणें याचा देशवरांत बाह्यात्कार प्रस्फोट होण्याची कसर कोणती राहिली ? राजश्री नबाब आमिरूदौले सर्व विचारें दूंरदेसी किल्लेवाले यांचे आचारावरून त्यांचे मनांत दुसरें यावयाचे नाही. कदाचित आले असतां त्याचे माथा वोझें व राजश्री नबाब गफूरखां समजवान, तेव्हां वाकडे मोजतील असें नाहीं. कंपु व फौजेत चहूंघरचे चार. ते आपलाले जागा आणखी मनांत आणिले तर मसलत जडभारी पडून रजवाड्यांत दरज दृष्टीस पडल्यास ते आपले काबूस चुकणार नाहींत. याचा अंदेशा तुम्ही व लालजीबाबांनीं न केल्यास दिवसमानाचे माहात्म्य. अस्तु. सरकारांतून किल्ले मजकुरचीं जप्ती चिरंजीव परशराम होळकर याजकडे सांगोन पत्रें रवाना जाली आहेत. सरकारनक्षाचा भार श्रीमार्तंडावर. त्याचे कृपेने आजपर्यंत निर्वाह जाहला. पुढें आवलंब सर्वेपरी तोच आहे. इतकें विस्तारें लिहिण्याचें कारण, आजपावेतों तुमचे जपण्यामुळें पडलें नाहीं. याचे मनन मशारनिल्हेसहित राहून मुनासब दिसेल तैसे घडावे. तीर्थरूप मातोश्री बयासाहेबांचा हुकूम किल्लेवाले यांस पोहचला. त्याचे पत्रचिठ्ठी कांहीं शाबूद असल्यास जाहला विचार ठीकच मोजण्यांत येईल. चिठ्ठीपत्र पाठवून द्यावे. र।। छ १३ रमजान सु।। सलासआशर मयातेनवअलफ बहुत काय लिहिणें हे विनंती. **(शिं.शा.इ.सा., भाग २, पृ. १४२)**

**लेखांक ५** **श्रीम्हाळसाकांत**

ता. २० सप्टेंबर इ. स. १८१३

मिती भाद्रपद वद्य ११ सोमवार

राजश्री गोविंदराव बुळे गोसावी यांसी. अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर राम राम विनंती उपरी. संस्थान नरसिंगगड येथील सरकार मामल्याची

वहिवाट सरकारांतून सन आर्बा आशर साल मजकुरापासून तुम्हाकडे सांगावयाचा करार करून हे सनद लिहिली असें. तरी तुम्ही संस्थानमजकुरचे मामल्याचे कामाची वहिवाट पेशजीप्रमाणें करीत जाऊन सरंजामानिसीं सरकार चाकरी करीत जाणें. रवाना छ २४ रमजान आर्बा आशर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती मोर्तबसुद.

शिक्का मल्हारराव होळकर यांचा.

**सरकारी रेकार्ड**

**लेखांक ६** **श्री**

ता. १६ जून इ. स. १८१४
ज्येष्ठ वद्य १३

राजश्री माखणलाल जोशी कमाविसदार प्रगणे इंदूर गोसावी यांस.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर दंडवत सु।। खमस अशर मयातेन वअलफ. राजश्री बापुजी आनंदराव निसबत शार्गीदपेशा यांजकडे मौजे पिंपल्या व सुकल्या हरदु गांवची जमीन चालत आली. हल्लीं तुम्हाकडील अडथळा पडतो म्हणोन पंत मशारनिल्हेनीं इंदूर मुक्कामीं विदीत केलें. ऐसियासी यांजपासी कैलासवासी मातुश्री बाईसाहेबांच्या सनदा आहेत. त्याअन्वयें वहिवाट चालत आल्याप्रमाणें चालवून पुढें दिकत न पडे व पुनः बोभाट न ये तें करणे. जाणिजे छ २७ जमादिलाखर बहुत काय लिहिणें.

**लेखांक ७** **श्रीम्हाळसाकांत**

ता. १८ नोव्हेंबर इ. स. १८१४
अर्बी सन १२१५

राजश्री गोविंदराव बुळे गोसावी यांसी. अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर रामराम विनंती उपरी. तीर्थस्वरूप सौभाग्यवती बाळाबाई प्रसूत होऊन पुत्र जाहला. सबब सरकारांत सालमजकुरीं ऐनजमेवर दरसदे रुपये ३ तीनप्रमाणें आहेर-पट्टीबद्दल ऐवज घ्यावयाचा तो राजश्री रावजी गोविंद निसबत खासगी यांचे तसलमातीस आजमासे येणेंप्रमाणें बद्दल यादी :

| रुपये | |
|---|---|
| २००० | प्रगणे चिखलदे. |
| २००० | संस्थान झाबवा. |
| २००० | संस्थान नरसिंगगड पाटण. |
| ----- | |
| ६००० | |

एकूण सहा हजार रुपये तुम्हाकडून देविले असें. तरी तुम्ही सद्दहु सहा हजार रुपये महालचलणी मशारनिल्हेकडे देऊन कबज घेणें. रवाना छ ५ जिल्हेज. सु।। खमस आशर मयातेन व आलफ बहुत काय लिहिणें हे विनंती मोर्तबसुद.

| |
|---|
| श्रीम्हाळसाकांत चरणीं तत्पर<br>यशवंतराव सुत मल्हारराव होळकर |

**हुजूर फडणीसी रेकार्ड**

**लेखांक ८ श्रीम्हाळसाकांत**

ता. ३० एप्रिल इ. स. १८१५

राजश्री केशवराव राम गोसावी यांसी. अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित तुळसाबाई होळकर दंडवत विनंती, उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहीत जाणें. विशेष आपले येथें चिरंजीव राजश्री मल्हारराव बाबा यांचे लग्नाचा निश्चय वैशाख कृष्ण द्वितीया गुरुवारी होऊन शरीर संबंध राजश्री त्र्यंबकराव देशगावडे बीडकर यांची कन्या वधु नेमस्त केली आहे तरी तुम्हीं सहपरिवारें येऊन मंडप शोभिवंत करणे. रवाना छ १९ जमादिलावल सु।। खमस आशार मयातेनवआलफ़ बहुत काय लिहिणें. हे विनंती. मोर्तबसुद.

**संस्थान पळसी जिल्हा नगर येथील दिवाण पळसीकर रेकॉर्ड**

**लेखांक ९ श्रीम्हाळसाकांत**

ता.१३ डिसेंबर इ. स. १८१५

कृष्णभक्त हरीबाबा आकुलनेरकर. गोसावी यांसी स्नेहपूर्वक तुळसाबाई होळकर दंडवत सुाासीत आशरमयातेन आलफ. लष्करात लोकांचा बखेडा, त्यात आळा बंधन राहिले नाही. याजमुळें माणुसमात्र काबूंत न राहतां आपले जागा विचार करून सर्वत्राचे गंगाकुरण होऊन दंगा करण्याचा प्रयत्न. या प्रसंगास अनुसरून सरकारांत फौजेचे आगत्य व सरदारीत ओढताण आहे. तेव्हां ज्याचे त्यापरी राखून खर्चाचीही सरबरा होत गेली. तथापि लोकांची निकड विशेष जाणून प्राणांत संकट पाहून सडेस्वारीनें ठाणे गंगराड येथें येणें जाहलें. हे वर्तमान परस्परें तुम्हास कळेल. रुपयाचे जागा दोन देऊन पुरे पडावयाचें नाही असें पाहून असा विचार करणें प्राप्त जाला. इतःपर या संकटाचें परिमार्जन होऊन सरकारचा नक्ष, दाब राहिला पाहिजे. यास्तव हें पत्र सादर केलें असें. तरी पत्र पावतांच सरकार खात्री अन्वयें तसा यत्न करून एक दिवसाची ढील न करितां लाख दीड लाख पावेतों ऐवजाची सरबरा करून हुजूर यावयाचें करणें. समय संकटास कोठूनही काम होऊन येणें. सर्व तुमचे ध्यानांत व तुमचाही विचार सरकारचे लक्षांत. परंतु या समयास बाहेर

लिहिणें बोलणें यास ठिकाणच नाहीं. याचें पुरतें मनन करून सदरी लिहिल्याअन्वयें बेत करून फार लौकर येऊन पोहचणें. याशिवाय एक दोन सावकर चांगले पतीचे तुमचे खातरीचे असतील त्यांस बोलून बरोबर घेऊन येणें. ते व तुम्ही आलियावर तुमचे विचारे सावकाराकडे महालचा वगैरे ऐवज लावून देऊन त्यांसी व्यवहार करण्यांत येईल. सरकारांतून केल्या व्यवहाराची निभावणी करण्यात येईल. याअन्वयें त्यांसी बोलून घेऊन येणें. चिरंजीव बाबासाहेब लेकरूं. आम्ही केलें पाहिलें नाहीं. प्राप्त प्रसंगीं तुमचा भरंवसा त्याप्रमाणें निदर्शन घडून पत्रोत्तर पर्याये न येतां लिहिल्या घाटाआन्वयें ऐवजाची सजल पाडून एक क्षणाचा विलंब न करितां येऊन पोहचावें. जाणिजे. छ ११ मोहरम बहुत काय लिहिणें. मोर्तबसुद.

**सरकारी रेकार्ड**

**लेखांक १०** **श्रीम्हाळसाकांत**

ता. २१-१२-१८१५

कृष्णभक्त हरीबाबा आकोलनेरकर गोसावी यांसी स्नेहांकित तुळसाबाई होळकर दंडवत सु।। सीतअशरमयातेनवअलफ. येथील अडचणीचे प्रसंग या तरेचे. स्वारी गंगराडेस येऊन आठदहा दिवस जाले. ऐवजाचा वेळ लावून तुमचे येणें सत्वर जाले पाहिजे. यांजकरितां तुम्हाकडे पेशजी मुद्दाम पत्र रवाना जालेच आहे. दिवसगत लागल्यानीं हें पत्र सादर केलें असें. यावेळीं मनुष्यमात्राची परीक्षेची वेळ. अशा समयास प्रसंगास तुम्ही जाणतां. सरकारांत तुमची खातरी. यावर पेशजी लिहिल्याअन्वयें मेळ लावून पत्र पावतांच मुक्काम मजकुरीं फार फार लौकर येऊन पोहचणें. जाणिजे छ १९ मोहरम बहुत काय लिहिणें. मोर्तबसुद.

**सरकारी रेकार्ड**

**लेखांक ११** **श्रीम्हाळसाकांत**

ता. २२ मार्च इ. स. १८१६

राजश्री कमाविसदार वर्तमान भावी प्रगणे इंदूर गोसावी यांस. अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर दंडवत रामराम सु।। सीत आशर मयातेनवआलफ. शके १७३७ युवनाम संवत्सरे वेदमूर्ती राजश्री मेघःशामभट बीन गणेशभट औंदकर ब्राह्मण उपनाम उपाधे गोत्र काश्यप सूत्र कात्यायन शाखा माध्यंदिन वास्तव्य कसबे इंदूर यांनीं सरकारांत इंदूरचे मुक्कामीं येऊन विदीत केलें कीं कैलासवासी मालेराव बाबा होळकर यांचे उत्तरकार्याचे समयीं शंभर बिघे पृथ्वी देऊन सनदा करून दिल्या. दरम्यान इंदुरास गर्दी जाहली. त्यात सनदा गेल्या. त्या पुनः सरकारांतून कृपा करून नूतन दिल्या पाहिजे म्हणोन. त्या वरोन मनास आणितां हे थोर सत्पात्र ब्राह्मण यांचे चालविणें सरकारास श्रेयस्कर जाणोन पुनः पूर्ववत्प्रमाणें सनदा.

१३ कसबे मजकुरी बाग आंबराई सहित त्यात जमीन बिघे बागाईत लायक.

८७ गांवगन्नापैकीं बिघे.

२५ मौजे गाडराखेडी येथील जमीन येथील जमीन लायक जिराइत बिघे.

२५ मौजे बोऱ्या येथील लायक जिराइत बिघे.

२५ मौजे धरणावदा येथील लायक जिराइत बिघे.

१२ मौजे पिंपळ्या गाडरी येथील लायक जिराइत बिघे.

---

८७

----

१००

एकूण बिघे जमीन शंभर त्यात लायक बागायत बिघे १३ व लायक जिरायत बिघे ८७ इनाम करून ही सनद सादर केली असें. तर तुम्ही सदरहू शंभर बिघे जमीन जल, तरू, तृण, काष्ठ, पाषाण, निधी निक्षेप सहित इनाम यांजकडे यांचे पुत्रपौत्रादि-वंशपरंपरा पूर्ववतप्रमाणें चालवीत जाणें. प्रतीवर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करितां सनदेची नक्कल घेऊन हे अस्सल सनद भटजीपासी भोगवटीयास परतोन देणें. जाणिजे. छ.२२ रबिलाखर बहुत काय लिहिणें.

**होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें**

## श्री

गोसाव्याची हाजरी. गणेश गीर गोसावी व जमात सुाासबाआशरमयातेनवआलफ इ. स. १२२६ माहे जिल्हेज कार्तिकमास छ.१ रोज बुधवार मुक्काम महेश्वर (इ.स.१८१६)

| | | | |
|---|---|---|---|
| १ गणेशगीर महंत | १ ओंकारसिंग | १ मोहनपुरी | १ सीधगीर |
| १ भगवानपुरी | १ मोतीगीर | १ शीवगीर | १ गजराजगीर |
| १ हरपतगीर | १ रेवाभारथी | १ लक्ष्मणगीर | १ नथुगीर |
| १ केवळगीर | १ हीरागीर | १ सुकलालगीर | १ लक्ष्मणगीर |
| १ बलदेवगीर | १ रुपगीर | १ किसोरगीर | १ हीरागीर |
| १ मोहनागीर | १ मनरूपगीर | १ आमरगीर | १ चमलेगीर |
| १ सुमालगीर | १ दौलतगीर | | |

याशिवाय बरीच नांवें आहेत.

**''गोसाव्यांचे फौजेस तनखा मिळाल्याचे पावतीचा नमुना.''**

श्रीमंत राजश्री बाबासाहेब साहेबांचे सेवेसी. आज्ञाधारक गणेशगीर व लक्ष्मणगीर मनोनारायण विनंती विज्ञापना ऐसीजे. आम्ही संस्थानमजकुरी महेश्वरी सरकारांत जमयतसुद्धां चाकर होतो त्या तलबा भरून पावलों.

| | |
|---|---|
| ९५-०६-० माहे साबान | ९२-६-० माहे रमजान |
| ९५-०८-० माहे शवाल | ९९-०-० माहे जिल्काद |
| ९५-०६-० माहे जिल्हेज | ६१-६-० माहे मोहरम |
| ५६-१२-० माहे सफर | |

एकूण पांचशें पावणेश्यान्नव रु. अखेर रूखसती पावेतों भरून पावलो. तलबेविशीं कज्जा राहिला नाही. हे आपले खुशीनें लिहून दिल्ही. सही. मिती माघ शु।। ४ संमत १८७३ हे विज्ञापना. निशाणी त्रिशुळाची.



**प्रकरण १३ वें**

# श्रीमंत महाराज द्वितीय मल्हारराव होळकर यांची कारकीर्द
## इ. स. १८१६

इ. स. १८१६

यादी श्रीमंत सरकार मल्हारराव होळकर : टाक्याबद्दल.

७२७०० संस्थान देवळे प्रतापगड येथील सरकारटाक्याचा ऐवज सदरीं लिहिल्या सालीं घेणें. अलीकडे फौजेचा उपद्रव बहुत. आफत सुलतानी वगैरे याजमुळें मुलुख पायमलींत आला. सालाबाद ऐवजाची सरबरा होय. यासंबंधात सरकारांतून फसली सन १२२६ चे सालापासून संस्थानिकाचे विचारें येणेंप्रमाणें.

| | | फसली सन | ऐन | तहकूब | बाकी |
|---|---|---|---|---|---|
| ५०००० | संमत १८७३ | सन १२२६ | ७२७०० | २२७०० | ५०००० |
| ५५७०० | संमत १८७४ | सन १२२७ | ७२७०० | १७००० | ५५७०० |
| ५७७०० | संमत १८७५ | सन १२२८ | ७२७०० | १५००० | ५७७०० |
| ५९७०० | संमत १८७६ | सन १२२९ | ७२७०० | १३००० | ५९७०० |
| ६०४०० | संमत १८७७ | सन १२३० | ७२७०० | १२३०० | ६०४०० |
| ------ | | | ----- | ---- | ----- |
| २८३५०० | | | ३६३५०० | ८०००० | २८३५०० |

याशिवाय वहिवाट कलमें येणेंप्रमाणें पैकीं हल्लीं चालत आहेत.

१ बाजारची चुंगी दररोज शाक तरकारी व घास विक्रीवर उगाई.

१ आठवे रोजीं रविवारचा बाजार भरतो त्या दिवशीं.

१ पसारी याचे दुकानावर चुंगी हिंग जिरे हळद वगैरे घेणें.

१ बाहेरील गूळ येतो त्याजवर पाटीस दोनशेर व डोइवोझ्यास पावशेर.

--

२

१ बलाई यावर नित्य सरपणाची मोळी.

१ सुरजपोळ दरवाजावर हुकूम सरकारचा. किल्ल्या सरकारांत राहतात.

..........

२०७०० संस्थान सोपूर. येथील सरकारी वहिवाट संमत १८६० (इ.स.१८०३) विद्यमान भवानराव पांडुरंग सदरहूचे वहिवाटीत संस्थानिकांनीं गांव देह ११ लावून दिले. त्याची लावणी सरकारांत कमाविसदार यांनीं करावी व ऐवजाचा आख राजांनीं बांधून द्यावा. त्याप्रमाणें वसूल घ्यावा. बाकी राहिली तर त्याचे देवाल संस्थानिक. अलीकडे दंगा झाला व जान बत्तीस अंमल झाला तेव्हांपासून वसूल सरकारांत न आला.

७५००० संस्थान झाबवे येथील तीन हिश्शे अंमल सरकारचा व एक हिस्सा राजाकडील जाऊन सरकारी अंमल परभारे बुळें यांजकडे.

१५००० खालसे गांवचा अंमल. ३५००० उमराव, कोठड्याचा टाका सुदामतप्रमाणें.

२५००० जकात सायरपैकीं एक हिस्सा जाऊन बाकी सरकार अंमल.

७५००० येकुण आकार रुपये

याशिवाय कलमें.

१ आपले अंमलापैकीं गांवें राजानें जबरदस्तीनें घेतले ते सुटून आले पाहिजेत.

२ मौजे शिवगड व रंभापूर कुंवर प्रतापसिंग याजकडे आहेत.

२ काळ्यापिटोल वगैरे दोन गांवे राजाचा दिवाण कोठारी याजकडे आहेत तीं घ्यावयाची याचा आकार सालिना अजमास.

५००० रंभापूर, २००० शिवगड, ५००० काळ्यापिटोल वगैरे.

येकुण बारा हजार रु. १२०००

ह्या परगण्याची हद्द रतलामपासोन दाहोदपावेतों लांबी कोस २५ पंचवीस.

..........

८५००० संस्थान नरसिंगगड येथील ठराव कैलासवासी महाराज असतांना होऊन ठरले. कीं कमाविसदार राहील त्यांस संस्थानिकानीं पट्टीफाळा गांवगन्नातून द्यावा व खेरीज वहिवाट :

१ अलीकडे पांच सात वर्षांत नदी अलीकडे खुजनेर येथें सरकारचे ठाणें राहून त्याजखाली गांवें २४० यांचा अंमल येत आहे. तेथें दाखल्यास त्यांजकडील दप्तरीं मात्र आहे.

१ पहिले, पाटणांत सरकारची हवेली तेथें कमाविसदार राहत असें परन्तु तेथें अलीकडे वहिवाट नाही.

**हुजूर फडणीसी सरकारी रेकार्ड**

**लेखांक १२ श्रीम्हाळसाकांत**

ता. ११-७-१८१७

राजश्री बापुजी रघुनाथ गोसावी यांस. अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारराव होळकर रामराम सु।। समान आशर मयातेनवआलफ. तुम्ही सरंजामासुद्धां सरकार-महालात येऊन महेश्वरनजीक मुक्काम करून तालुके चोळी येथें जमियत पाठवून गांव दरोबस्त लुटून बरबाद केला व पुढें संस्थानाकडे वगैरे उपसर्ग द्यावयाचा बेत, म्हणोन सरकारांत विदीत जाले, ऐसियासी इकडील महालीं उपद्रव देऊं नये, असें सरकारांतून एक दोन वेळां लिहिण्यांत आलें असतां अद्यापवर सरकार महालचा शह न सुटतां परगण्यांत धूम चाललीच आहे. यातील परिणाम कसा याची योजना झालीच असेल. आजपावेतों इकडील महालीं उपसर्ग तुम्हांकडील लागला त्याची सबुरीच झाली. त्यावर पुन्हा आगळीक होऊं लागली याजकरितां हे पत्र तुम्हांस सादर केलें असें. तरी सरकारांतोन पेशजी लिहिण्यांत आले असतां परतोन महालांत उपद्रव देण्याचें कारण काय? इतक्यावर संस्थाननजीक मुक्काम आहे तेथून महेश्वरचे वगैरे महालीं गांवगन्ना कोठें काडीमात्र उजाड, बिघाड न होतां चिजवस्त, गुरेंढोरें नेलीं असतील तीं माघारी देऊन, दुसरें मार्गे कूच करून जाणें. येविषयींचे पुन्हा बोभाट आला असतां परिच्छिन्न सरकार उपयोगी न पडतां सरंजाम रवाना करण्यांत येईल. हे स्पष्ट समजून फिरोन लिहिणें न पडे तें करणें जाणिजे. छ २५ साबान बहुत काय लिहिणें. मोर्तबसुद.

**विठ्ठलराय कानुगो महेश्वर रेकार्ड**

**लेखांक १३ श्रीम्हाळसाकांत**

ता. ११ जूलै इ. स. १८१७

चिरंजीव भीमाबाई बुळे यांसी तुळसाबाई होळकर आशीर्वाद उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जाणें विशेष. तुम्ही सरंजामसुद्धां नावडातावडीवर मुक्काम करून राहिला. सिबंदीचे कोचवणींत आल्यामुळें राजश्री भारमल होळकर यांजला संस्थानीं लिहून त्यांजपाशीं ऐवज मागतां म्हणोन समजण्यांत आले. ऐसियासीं तुम्ही सरंजाम घेऊन पवाराचे

महालीं गेलां, त्यामुळें पवारांकडील बापू रघुनाथ तालुके चोळीकडे येऊन तेथील बरबादी करून सरंजामासुद्धां बाराद्वारीसी मुक्काम करून संस्थानावर रूख दिला. पेशजी एक वेळ येऊन महालची नुकसानी केली. पुन्हा आतां तुम्हाकडून त्याचे पारिपत्य न होतां अधिक उपद्रवाचे मात्र कारण केल्यांत विशेष काय? इकडून तुमचा उपद्रव व तिकडून त्यांचा दोन्हीकडून संस्थानचे जागाची खराबी. भारमल होळकर संस्थानीं, तेथील मर्यादा राहील यात कल्याण, ती गोष्ट मनांत न आणितां त्यांजला कोचवण करणें हें चांगलें नाहीं. इतःपर संस्थानीं व सरकार बिजागड वगैरे येथें काडीमात्र तोशीस लागू न पावतांच पत्र पावतांच कूच करून चिखलद्याकडे जाणें. येविशीं लिहिणें न पडे तें करावें. रा।। छ २५ साबान बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. मोर्तबसुद.

**विठ्ठलराव कानुगो महेश्वर यांचे रेकार्ड**

**लेखांक १४ श्रीम्हाळसाकांत**

ता. १४ जानेवारी इ. स. १८१८

राजश्री भारमल होळकर गोसावी यांस. अखंडितलक्ष्मी अलंकृत विनंती उपरी. सरकारची व कंपनी इंग्रेज बाहदर यांची दोस्ती होऊन कोणे गोष्टींचा किलाफ राहिला नाहीं. यांजकडील सरंजाम नेमाड प्रांतांत महेश्वरावरून हरयेक कामानिमित्य येतील जातील त्याची हरयेक विषयीं बरदास्त राहून कोणे विषयीं व्यंग न पडले पाहिजे यास्तव हें पत्र लिहिले आहे. तरी दोस्ताकडील कोणीही आले असतां रसद फर्मास करतील त्यांस जपून कोणे विषयीं बोभाट न ये तें करणें. सरकार जिल्ह्यांतही कोणी हरामखोरीस प्रवृत्तक होईल त्याचेंही पारपत्य चुकावयाचें नाहींत. कोणेविषयीं द्वैतार्थ न ठेवितां बरदास्त राखणें र।। छ ६ राबल सु।। समान आशेर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणें हे विनंती. श्री मोर्तबसुद.

**सरकारी रेकॉर्ड**

श्री म्हाळसाकांत चरणीं तत्पर
यशवंतराव सुत मल्हारराव होळकर

**श्रीसरस्वत्यैनमः**

यादी होळकरांकडील महाल व गांवखेडीं इनामी, सरंजामी, स्वदेश, खानदेश, नेमाड, माळवा वगैरे प्रांतांत वहिवाटीत चालत आहेत त्यांचा तपशील. (राजश्री महिपत रावजीचे माहितीने यादी केली.) संमत १८७१ म्हणजे इ. स. १८१४
प्रांत स्वदेश.

१ प्रगणे चांदवड खेरीज मोकासा इनाम.

१ तालुके कोरहाळे सरंजामी मोकासा सिरके.

१ तालुके देपूर खेरीज जहागीर चासकराची. बाकी अंमल सरदेशमुखी व मोकासा व बाबती सरंजामांत असे.

१ परगणे वेरूळ मोकासा सरंजामी.

१ परगणे आंबाड हा महाल कैलासवासी थोरले सुभेदार यांनीं पातशहापासून इनामी सनदा करून आणल्या होत्या. देशी आल्यावर कांहीं दिवसांनीं श्रीमंतांपासोन खेरीज मोकासा व सरदेशमुखी करून सरंजामांत लावून घेतली.

१ परगणे सेवगांव निमे शिंदे व निमे होळकर.

१ स्वदेशपैकीं नवगांव, जहागीर.

१ कसबे मांडवगण हा गांव मोंगलकडोन निंबाळकरांस जहागीर होता. तेथील पाटीलकी कैलासवासी थोरले सुभेदार यांनीं घेतली तेव्हां त्या गांवांत दुसऱ्याचा अंमल नसावा याजकरितां निंबाळकरांस सेवगांवपैकीं एरंड गांव देऊन मांडवगण दरोबस्त आपल्याकडे करून घेतले. पुढें माधवराव लक्ष्मण वकील मोंगलाचे लष्करांत आपले तर्फेने होते त्यांचे हातें मोगलाकडे बोलणें लावून मांडवगण निंबाळकरांचे सरंजामांतून वजा करून कैलासवासी तुकोजीबाबा सुभेदार यांचे नांवें सनद करून आणली. मोगलाईतून गांव आम्हाकडे जाहला असें. निंबाळकरांस सांगोन सेवगांवपैकीं गांव निंबाळकराकडोन माघारें घेतले. मांडवगणच्या सनदा मोगलाइकडून आणल्या त्या नारोपंतनानांनीं जामदारखान्यांत ठेविल्या आहेत. मांडवगण श्रीमंतांकडून नाहीं, मोंगलाचें देणें आहे.

७ श्रीमंतांकडून : १ वाफगांव, १ आळे, १ मणचर, १ लोणी व्यंकनाथ, १ निंबगांव खळी, १ कोरेगांव, १ लाखणगांव.

१ मौजे बिबवी येथील पाटीलकी घेतली ते समयीं सरकार आमलाचा मक्ता रू. १६०० ठराऊन गांव आपल्याकडे करून घेतला. मक्तियाचा ऐवज श्रीमंतांचे हिशेबी जमा धरून द्यावा लागतो.

१ नगर, सुलगांव, पाटोदे परगणा विंचूरकरांकडे होता. तेथील पाटीलकी कैलासवासी तुकोजीबाबा सुभेदार यांनी घेतली. त्या गांवचे आकाराप्रमाणें देपूरपैकीं गांव विंचूरकरांस देऊन नगरसूल आपल्याकडे करून घेतले.

१ मौजे जामगांवप्रमाणे गांडापूर हा गांव श्रीमंतांकडून सरंजामांत. याचा दाखला श्रीमंतांचे हिशेबी आहे.

२ मौजे सेदुर धोंधलगांव देह दोन खेरीज मोकासा जाधवांकडील याचा मक्ता आठ हजार रुपये, शोध घ्यावा.

१ मौजे नीमच परगणे धांधरफल येथील पाटीलकी बजाजी मतकर याची होती. याजकरितां तेथील मक्ता ठरावून घेऊन गांव मतकराकडे दिला. मक्तियाचा पैका श्रीमंतांचे हिशेबी जमा धरून द्यावा लागतो. ठरावाचे आखांचे स्मरण नाहीं. पेशजी श्रीमंतांकडील हिशेब नव साला झाला त्यांत बेरीज आहे.

१ मौजे बोहळी नजीक पंढरपूर हा गांव प्रतिनिधींनीं पंढरपूरचे अन्नसत्राचे खर्चास दिला आहे.

३ मौजे आडगांव, वडकीचे प्रगणे नाशिक व मौजे पाड परगणे दिंडोरी येकुण देह तीन श्रीमंतांकडोन सरंजामांत.

१ कर्नाटक प्रांतीं टिपूनें राधीचे नांवें गांव करून दिला. त्याचे नांव माहीत नाहीं. राधीचा कारभारी नरसोबा परभारें वहिवाट करीत होता.

१ गाजुदीनखानापासोन सत्तावीस किल्ले घेऊन श्रीमंतांस दिल्हे. ते समयीं चांदवडचा किल्ला आपल्याकडे घेतला.

..........................................................................................................................................

**प्रांत खानदेश**

१ प्रगणे सुलतानपूर व नंदूरबार दोन्ही महालपैकीं मोकासा बांडे व दाभाडे मक्ता रु. १००००० एक लाख द्यावे असा करार. बाकी श्रीमंतांकडोन सरंजामांत.

१ प्रगणे रावेर खेरीज मोकासा लिंगोजी राऊत व दुमालेगांव. बाकी सरंजामांत.

१ प्रगणे गाळणा किल्ल्यासुद्धां खेरीज दुमाले सरंजामांत.

१ प्रगणे उत्राण दुमाले सरंजामांत असें महाल श्रीमंतांनी दिल्हा. तेच समयीं थोरले सुभेदार यांनी श्रीमार्तंडाकडे दरसाल रुपये १४००० नेमून दिल्हे.

१ प्रगणे थालनेर खेरीज मोकासा दाभडियाचा. बाकी अंमल सरंजामांत असें. या महालपैकीं परभारें.

    ४ मावशीबाईकडे देहचार. १ करवंदी, १ सांगवी, १ पिंपराल, १ अजनाड, १ ढमढेरे यांजकडे १ दहीवद.

..........

४

बाकी खालसा अंमल.

१ प्रगणे अडावद येथील पांच गांव पिराजी पिसे यांजकडे देऊन बाकी ढमढेरे यांजकडे सरंजामांत.

५ फुटगांव येथील पाटीलकी थोरले सुभेदार यांनीं घेतली. याजकरितां श्रीमंतांकडोन गांव सरंजामांत लाऊन घेतले. १ न्याहळोद, १ कापटणें, १ मांडल, १ वडजाइ, मुंगठी.

एकूण पांच गांव.

..........................................................................................................................................

**प्रांत नेमाड रेवातीर दक्षिण भाग**

१ प्रगणे खरगोण तालुके सुमारी अठरा १८ खाो मोकासा फतेपुरकर पवारांचा तो

सरकारांत श्रीमंतांनीं जप्त केला आहे. याचा पैका श्रीमंतांस द्यावा लागतो. बेरीज स्मरणांत नाही. श्रीमंतांचे हिशेबीं आहे.

३ बडवाणीकर राजाकडोन कैलासवासी थोरले सुभेदार व गौतमाबाई यांजकडे दिल्हे. हे तीन महाल १ सेंधवें, १ ब्राह्मणगांव, १ नागलवाडी. श्रीमंतांकडोन नाहींत.

१ बिजागड किल्ला.

**प्रांत सत्यांसी रेवा उत्तरतीर सरंजामांत**

१ प्रगणे महेश्वर, दरोबस्त.

१ तालुके चोळी, बाईसाहेबांस.

१ तालुके बागदरा, भागवतांकडे.

१ तालुके करही, संक्रोजी सितोळे.

१ प्रगणे चिखलदे, बुळ्यांकडे.

..........................................................................................

**प्रांत माळवा सरकारांतून सरंजाम जहागीर**

१ जांब खुर्द.

१ प्रगणे इंदूर, कुशलगडसुद्धां.

१ थोरली जांब व हरसोले सटवाजी राजोळे सरंजामांत.

१ बीजलपूर मावशीबाईकडे.

बाकी खालसा अंमल बमयतालुके

| | | |
|---|---|---|
| १ प्रगणे कायथे. | १ प्राा॰ देपाळपूर. | १ प्राा॰ मल्हारगड. |
| १ प्राा॰ पिढावा मय कोठड्या. | १ प्राा॰ रामपुरा, भानपुरा. | १ प्राा॰ सिरोंज. |
| १ संस्थान डोंगरपूर, बासवाडा. | १ संस्थान देवळे प्रतापगड. | १ नेमावर पंचमहाल. निमे होळकर व निमे शिंदे. |

१ हिंगळाज किल्ला जयपुरकर राजाचा, थोरले सुभेदार लाहोरची स्वारी करून आल्यावर अडीच वर्षे मोर्चे बसवून शेवटीं लढून घेतला.

आपलेकडील सरंजाम्यांकडे.

१ प्रगणे सावेर वाघमारे यांजकडे.

१ ,, सुंदरशी ढमढेरे.

१ ,, तराणा फणशांकडे.

१ ,, महतपूर थोरले वाघांकडे.

१ ,, बेटमा माधवराव वाघांकडे.

१ ,, जावरा भागवत व खटके यांजकडे.

१ प्रगणे रायपूर नलगे यांजकडे.
१ ,, जिरापूर, माचलपूर लांभाते यांजकडे.
१ ,, संघारा वाघमारे, म्हस्करांकडे.
१ ,, पंचपहाड दिवाणांकडे.
१ ,, बरडावदा पळसीकरांकडे.
१ ,, पाटण व झाबुवे बुळ्यांकडे.
१ ,, नारायणगड बारगळांकडे.
१ ,, पिंपलोदा महाडिकांकडे.
१ ,, हसलपूर सटवाजी राजोळे यांजकडे.
१ ,, आबेर मंडोजी ढमढेरे यांजकडे.
१ मौजे अंबाड सुभानजी लांभाते खेडकरांकडे.

..........................................................................................................................................

**प्रांत हाडोती सामलात शिंदे, होळकर, पवार**

१ संस्थान कोटे खंडणी अगोदरची ४००००० अलीकडे थोरले सुभेदार पानिपताहून आल्यावर जयपुरकर माळवे प्रांतीं अंमल बसवावयासी फौजेसुद्धां आले ते समयीं कोटकर सुभेदारांस सामील होऊन लढाईत बहुत कामीं पडले. सबब खंडणीपैकीं रु. १००००० सुभेदारांनीं सूट देऊन बाकी रु. ३००००० ठराव केलें त्याची वाटणी दरशेकडा ३८-८-० होळकर, ३८-८-० शिंदे व २३ पवार याप्रमाणें चालत आली. कोट्याचा हिशेब आपलेकडे आहे.

१ संस्थान सोपर खंडणीची वाटणी कोट्याप्रमाणें.

१ ,, खातोली खंडणी आपल्याकडील मख्ता रु. १००००० महदपूरकर वाघाकडे.

१ ,, इंद्रगड व करवर समेदी याजपैकीं निमे शिंदे निमे होळकर.

१ ,, देवळे प्रतापगड.

..........................................................................................................................................

**प्रांत मेवाड**

१ हाडोती व धुंधाड या दोहोंमधीं पातशाही किल्ला रणथंबर आहे. त्याचे तळवटीं सेरपूर पंचमहाल म्हणोन तालुके आहेत तेथें होळकर, शिंदे या दोघांचा अंमल होता. रणथंबर किल्ला जयपूरकरांनीं दगा करून घेतला त्या समयीं सेरपूर पंचमहाल दाबून आपला अंमल त्यांनीं करून घेऊन होळकर शिंदे यांची ठाणीं उठवून दिल्ही.

१ परगणे पाटण केशवरायचे हा महाल बुंदीकराकडोन श्रीमंत व होळकर शिंदे यांजकडे आहे. तिन्ही वाटण्या बरोबर. त्यांत श्रीमंतांकडील वाटणी शिंद्यांनीं आपल्याकडे करून घेतली. याजमुळें एक हिस्सा होळकर व दोन हिस्से शिंदे येणेंप्रमाणें चालत आली.

१ संस्थान बुंदी येथें श्रीमंतांकडील नजर ठरली त्याची मामलत होळकर शिंदे यांनीं मख्तीयानें केली. अगोदर मख्ता रु. ६०००० उभयतांनीं श्रीमंतांस द्यावे. असें कांहीं येक दिवस चालत आलें. अलीकडे विसाजीपंत बिनीवाले यांची स्वारी त्या प्रांतीं गेल्यावेळीं त्यांनीं दरसाल रू १०००० दहा हजार चढ बसविला. तेव्हांपासून रु. ७०००० सत्तर हजार द्यावे लागतात. निमे होळकर, निमे शिंदे. या ऐवजास बुंदीकरांनीं परगणे गणोली हा महाल लावून दिला असें.

१ प्रगणे लाखेरी बुंदीवाल्याकडोन बाईसाहेबांस चोळी खर्चाकरितां दिले आहे.

१ प्रांत खेचीवाडा येथील बलीभद्रसिंग खेची राजा होता. त्याजकडोन श्रीमंतांकडील खंडणीचा पैका मागील सालचा येणें राहिला होता. त्यांस विसाजीपंत बिनीवाले त्या प्रांतीं गेल्यावर त्यांनीं जोर पोहचवून राजास धरून आणून पैका मागूं लागले. बलभद्रसिंगास पैका मिळेना. त्याचा व थोरले सुभेदार यांचा भाऊपणा होता. सबब तो तुकोजीबाबा सुभेदारांचे गळां पडोन त्यांजपासोन रुपये २७६००० विसाजी पंतांकडे भरणा करविला आणि खेचीनें या ऐवजी प्रगणे गुगर, छबडात्र, पापडोन तिन्ही महाल गहाण ठेवून लिहून दिल्हे. तेथील सिबंदी महाल मजकुर दरसाला रु. ४०००० करार करून खत लिहून दिल्हे. ऐवज सव्याज सिबंदीसुद्धां भरोती झाल्यावर महाल खेचीचे माघारें द्यावे असा करार. हे तिन्ही महाल त्रिबंकजी इंगळे यांजकडे पागेच्या सरंजामांत लावून दिल्हे आहेत.

................................................................................................................................

**प्रांत धुंडाड**

२ प्रगणे रामपुरा खुर्द बमयकिल्ला व प्राो टोंक दोन्ही महाल किल्ल्यासुद्धा जयपुरकर राजे यांनी थोरले सुभेदार यांजला खंडणी खेरीज दिले.

४ चोरू पिंपळु वगैरे देह चार जयपुरकर राजे यांनीं गौतमबाईस चोळीस दिले. अलीकडे अहिल्याबाईसाहेबांकडे चालत होते बामणगांवसुद्धा.

१ संस्थान जयपूर येथें श्रीमंत व होळकर शिंदे यांच्या फौजा जाऊन खंडणी ठरेल तो ऐवज तिघांनी बरोबर घ्यावा. याप्रमाणें विसाजीपंत बिनीवाले यांचे कारकीर्दीपासून तह जाहला असें. जयपुरचा हिशेब आपल्याकडे.

................................................................................................................................

**प्रांत जाटवाडा**

३ प्रांत जाटवाडा. कैलासवासी खंडेराव होळकर कुंभेरीचे स्वारींत मृत्यू पावले. त्यांचे छत्रीचे खर्चास सुरजमल जाट यांनीं तीन गांव दिले आहेत गांवांचा तपशील.

१ मौजे तमरेल, १ मौजे सेत, १ मौजे गांगरसोली.

................................................................................................................................

**प्रांत बुंदेलखंड**

१ प्रगणे कोंच हा महाल दरोबस्त सरंजामांत.

१ प्रगणे आलमपूर वगैरे देह १५ कैलासवासी थोरले सुभेदार यांचे छत्रीकडे अन्नसत्र वगैरे खर्चाकरितां कैलासवासी दादासाहेबांनीं इनाम करून दिल्हें.

५ मोमाणीं वगैरे देह ५ नरवर प्रांतांतील. गांवांचीं नांवें माहीत नाहीत. वाघोलीकर जाधवाकडील कमाविसदार सिपरी कोल्हारास होता. त्याजकडे आपले पांच गांव सांगितले होते. अलीकडे वहिवाट कोणाकडे याचा शोध करून पाहवे. हे गांव नरवरवाले यांनी बापुजी होळकर त्या प्रांतीं गेले होते तेव्हां दिल्हे आहेत.

१ तालुके सालोण.

..........................................................................................................................................

**प्रांत अंतर्वेद**

८ प्रांत अंतर्वेद विसाजीपंत बिनीवाले यांचे कारकीर्दीत साता वर्षांचे स्वारींत महाल आपल्याकडे होते.

| | | |
|---|---|---|
| १ प्रगणे सकुराबाद | १ प्रगणे मोरहेडा | १ प्रगणे सिकंदरा खुर्द |
| १ प्रगणे अकबराबाद | १ प्रगणे कन्नोज | १ प्रगणे गंगेरी पंचलाणा |

..........................................................................................................................................

६

१ प्रगणे गणमुक्तेश्वर हा महाल व तेथील देशमुखी तुकोजीराव होळकर सुभेदार यांनीं घेतली.

१ दिल्ली नजीक संताबाई कै. थोरले सुभेदारांची कन्या शांत झाली. तेथें संतपुरा गांव नवीन बसविला आहे.

येकुण आठ ८

१ परमुलखी जागोजागी सामलांत फौजेचा जोर. खंडणी ठरल्याचा तह पहिला चालत होता त्याचा तपशील दरशेकडा

५३-६-० श्रीमंत. २३-५-० होळकर. २३-५-० शिंदे,

येकुण वाटणी शंभर १०० प्रमाणें.

अलीकडे विसाजीपंत बिनीवाले यांनीं तह ठरविला दर शेकडा

५३-६-० श्रीमंत. २१-५-० होळकर. २१-५-० शिंदे. ४-०-० पवार

एकूण वाटणी शंभर १०० प्रमाणे.

प्रांत मारवाडांत जयाजी शिंदे दगा होऊन मारले गेले. सबब थोरले सुभेदार यांनीं मारवाडची वाटणी घेतली नाहीं. शिंदे यांसच दिल्हीं.

१ मेवाड प्रांतीं पहिलेपासून होळकर शिंदे यांचा टाका अगर खंडणी नव्हती. अलीकडे शिंदे यांनी जबरी करून त्यांच्या राज्यांत खंडण्या ठरवून महाल घेतले. त्यांची

वहिवाट पाहून होळकरांनीं प्रगणे निंबाहेडा व राणीखेडा केळीबिजोदा व नंदवाई तालुका वगैरे गांव घेतले.

१ स्वदेशपकीं वैजापूर, कापूस वडगांव वगैरे विसा हजाराचे गांव दादासाहेबांनीं हरकुबाईस जहागीर दिल्हे. त्या गांवांपैकीं हरकुबाईंनीं जानेफळ हा गांव विसोबा लांभाते यांसी दिल्हा. वरकड गांवची वहिवाट अलीकडे कोण करितात याची माहिती नाहीं.

१ चांदवडची देशमुखी थोरले सुभेदार यांनीं पातशाहीपासून घेतल्यावर पेशजी रूसुम चालत होता. त्याजवर दहा रुपये सेकडा जास्ती जमेवर घ्यावे असें कागद पातशहापासून करून आणले. त्या दहा रूपयांपैकीं तीन रु. देशपांडे याजकडे देऊन बाकी आपल्याकडे ठेविले असेंत.

१ गाळण्याची देशमुखी अलीकडे कैलासवासी तुकोजीबाबा सुभेदार यांनीं घेतली त्याचे कागदपत्र गिरीभाऊकडे दिल्हे आहेत.

.....................................................................................................................

सदरहू यादी राजश्री महिपतरावजीचे स्मृतीनें लिहून पाठविली आहे. याचे दाखले श्रीमंतांचे येथील दप्तरांत व त्यांच्या नकला आपले येथील दप्तरांत आहेत. त्याप्रमाणें वहिवाटही चालत आली आहे. परस्पर रूजू आहे.

सांप्रत अलीकडे पवार व ओढेकर वगैरे यांचे महालखेडी दबलीं असतील त्यांची माहिती आपल्यास आहेच. संमत १८७१ विक्रमी (इ. स. १८१५).

**होळकर सरकार यांचे फडणीसी रेकार्ड**



**प्रकरण १४ वें**

# मंदसोरचा तह आणि नंतर

मंदसोरचा तह ता. ६ जानेवारी इ. स. १८१८ मध्ये झाला. इ. स. १८०२ मध्यें वसईचा जो तह झाला त्यामुळें मराठेशाही दुभंग झाली. मराठेशाहीचें, भरतखंडाच्या इतिहासांत, कांहीं विशेषत्व आहे. ह्या शाहीच्या पूर्वी मुसलमान शाह्या झाल्या. तत्पूर्वी एत्द्देशीय हिंदुराजांच्या अनेक राजवटीही होऊन गेल्या. राजकारणाचा, किमानपक्ष तीन हजार वर्षांचा, हा जो प्रवाह भरतखंडांत वाहत होता, त्या वाहण्यांत कांहीं गोष्टी या भूमीवर स्थिर रूपानें राहिल्या व वाढल्याही. जोंपर्यंत अशोक, विक्रमादित्य व हर्षवर्धनासारखे एतद्देशीय सम्राट राज्य करीत होते तोंपर्यंत राजनीतीचीं तत्त्वे विद्वत्-परिषदांमधून वदली जात आणि त्यांचा निष्कर्ष कृतींत आणणारे हे राजे पर्यायाने समाजाचे पोशिंदे आणि विद्वानांचे सेवक असत. बाह्यात्कारें सर्व राजवैभव हे उपभोगित, पण प्रजेच्या कल्याणाच्या बाबी विद्वानांच्या डोक्यांतून व मुखांतून ज्या निघत त्याच हे सम्राट कृतींत आणीत. स्वतःच्या कल्पनेनें वागणारे ते नसत. यामुळे ''विद्वत्परिषदा बोलत आणि राजे हालत'' असा हा ओघ इसवी सनाच्या एक हजार वर्षांपर्यंत या भरतखंडांत कमीअधिक प्रमाणानें अखंड चालू होता.

इ. स. १००० पासून पांच-सहा शतके पठाण, तुर्क आणि मोंगल यांच्या राजवटी झाल्या. कांहीं कला यांच्या कालावधींत उन्नत झाल्या होत्या हें खरें, पण त्यांचें राजनीतीचें धोरण व ध्येय ही भरतखंडवासियांच्या ध्येय व धोरणापासून अगदीं भिन्न होतीं. विद्वत् परिषदा त्यांस अवगत नव्हत्या. प्रपंच आणि परमार्थ यांचे भेदाभेद त्यांचे गांवींही नव्हते.

कांहीं आधिभौतिक शास्त्रे त्यांच्यांत जन्मास आली होती ही गोष्ट खरी, पण निवृत्ती आणि प्रवृत्ती आणि त्याचा संगम अगर संग्राम यांचा त्यांस गंधही नव्हता. वैयक्तिक इंद्रियसुखापलीकडे त्यांच्या विचारांची धाव गेलेली नव्हती. कनक, कांता हीच त्यांच्या डोळ्यांपुढें दृष्य ध्येये होती. सारांश, राज्यकर्त्याची संस्कृतीच जेथें इतकी आकुंचित तेथें राज्यकारभार लोकांच्या सुखाला कितीसा साधनीभूत झाला असेल याची कल्पनाच करायची.

अशा ह्या दुःसह व प्रतिगामी परिस्थितीतून भरतखंडास मुक्त करण्यासाठीच क्षत्रियकुलावतंस गोब्राह्मण प्रतिपालक छत्रपती श्रीशिवाजी महाराजांचा अवतार झाला. त्यांच्या अवतार कालांपासून मराठेशाहीचा उदय व उत्कर्ष झाला. ही राजवट लोकांमधूनच उद्भवली असल्यामुळें लोकांच्या सुखदुःखाशी समरस झाली होती. यांचे राजकारण म्हणजे अशोकादिकांनीं घालून दिलेल्या वळणाच्या पायावर; मुसलमानांनीं घातलेल्या फक्त चांगल्याच गोष्टीवर भर देऊन आपली स्वतःची अशी लोकोपयोगी राजकारणी संस्था उभारावयाची. यालाच इतिहासांत राजकारणाची पुनर्घटना म्हणावयाची. मराठे राजवटीचें हे प्रथम लक्षण होय. ही इमारत उभारीत असतां, दुसरीही एक विशिष्ट गोष्ट मराठ्यांनीं उभारली ती ध्यानांत घेतली पाहिजे. अशोक हर्षादिकांचा कारभार ''एका खांबावरची द्वारका'' होती. मुसलमानी राजवटीत अकबराचे उदाहरण राज्यकारभाराचा उत्तम नमुना म्हणून घेण्यासारखें आहे. पण त्याचीही ''द्वारका एकाच खांबावरची'' होती. आतां काल बदलत चालला होता. त्याला अनुरूप अशी घटना इ. स. १७०८ नंतर मराठ्यांनीं घडवून आणली. या घटनेला इंग्लिश इतिहासकार ''मराठा कॉनफिडरसी'' म्हणजे ''मराठा संयुक्त मंडळ'' असें म्हणतात. याचाच अर्थ असा की राजसत्ता केवळ एकमुखी न राहतां अनेकांच्या सल्लामसलतीनें चालावयाची. सारांश, या तीन कालांतील म्हणजे अशोकाचा, अकबराचा आणि मराठेशाहीचा बंध लाविला तर पहिली (अ) विद्वतपरिषदेने केलेंले ठराव कृतीत आणणारी, लोकांतूनच उद्भवलेली वैयक्तिक राजशक्ती; (आ) अकबराची राज्यघटना बाहेरून सद्हेतु प्रेरीत सुरू केलेंली वैयक्तिकच राजशक्ती आणि तिसरी म्हणजे मराठेशाही (इ) ही लोकांतूनच उद्भवलेलीं, परंपरेच्या विद्वानांनीं ठरवून टाकलेली, अनेकांच्या मदतीनें कार्य करणारी राजघटना होय. सारांश, राजकारणात मागील दोन बंधांपेक्षा हा बंध अधिक सुसंघटित व प्रागतिक होता हें निर्विवाद आहे.

असें हें राज्यमंत्र प्रथम पाउणशें ऐशीं वर्षें आपल्याच प्रांतांत म्हणजे स्वदेशांत वावरत होतें. इ. स. १७१८ पासून त्यानें सीमोल्लंघन करीत करीत बहुतेक भरतखंड आपल्या ताब्यांत आणलें आणि शेवटलाच घास तोंडी पडायचा तो इ. स. १८०२ वसईचा तह झाला. या तहाचे परिणाम लक्षांत येण्यासाठीच वरील विवेचन केलें आहे. तह व्हावयाचाच तर तो या संयुक्त ''मराठा मंडळ'' बरोबर त्यांच्या संमतीनें व्हावयाचा; पण दुर्दैवाने पंतप्रधानांस आपल्या स्थानाची जाणीवच नसल्यामुळें आपली कातडी शाबूत ठेवण्यासाठीं सर्व शरीराची त्यांनी नासाडी केली. शिंदे, होळकर, भोसले यांची आपआपसांत जरी मनें शुद्ध नव्हती तरी या तहाचे भावी दुष्परिणाम त्यांचे लक्षांत आले; पण तेही आपली एकी

करूं शकले नाहीत. इ. स. १८०३ पासून १८०६ पर्यंत एकएकटे झगडून अखेरीस ब्रिटिश सत्तेच्या आहारीं ते गेले. सारांश, इ. स. १८०२ ते १८०६ या पांच वर्षांच्या अवधीत मराठा मंडळाचे पंचप्राण विलग झाले; आणि ज्या कार्यकारण परंपरेनें हे नवीन राज्ययंत्र उत्पन्न झाले होते ते राजकारण स्तिमित झाले; उरला सुरला प्राण इ. स. १८१८ त स्तिमित होऊन सर्व राजकारण थंड पडलें. मुलूखगिरी भूतकालीन झाली आणि मंदसोरच्या तहांतील एका कलमानें तर स्पष्ट ठरवून टाकिलें कीं श्रीमंत पेशवे अगर त्यांचे वंशज यांस महाराजे होळकरांवर अगर त्यांचे वंशजांवर कोणचाही राजकीय हक्क सांगणें अगर चालविणें हें करूं देणार नाहीं. म्हणजे पर्यायानें, मराठे राजवटीचें एक अंग अशा स्वरूपानें चालत आलेले हें होळकर राजवटीचे स्वस्वरूप नष्ट झालें, पण अशा शब्दावडंबरानें ही राजवट स्वतंत्र झाली असें म्हणावें तर तसेंही नाहीं. या तहाच्या दुसऱ्या कलमांनीं कांहीं प्रांत ब्रिटिशांकडे गेला. पूर्वीचेच नोकर यजमानाचीच जायदाद घेऊन स्वतंत्र राजे बनले. राजपुतान्यांतील राजेरजवाडे आतां होळकरांच्या मांडलिकत्वातून मुक्त झाले. होळकरांची सैन्यसंख्या ठराविक होऊन बसली आणि दुसऱ्या कोणच्याही राजेरजवाड्याशी बोलणें करावयाचे ते ब्रिटिशांचेच मार्फत झालें पाहिजे असें ठरलें. सारांश, मराठा राज्यघटनेतील एक शतकपर्यंत स्वतंत्रतेनें व अनिर्बंधानें वाढत गेलेलें हे एक अंग तेथून निसटून इंग्रजांच्या राज्यरूपी वृक्षाच्या छायेत येऊन पडलें. म्हणजे त्यांची स्वतःची गती थांबली. एका शतकांत म्हणजे इ. स. १७१८ ते १८१८ या कालांत जें कांहीं कमाविले होतें, जी घटना अंतर्बाह्य घडवून आणली होती ती आतां येथें विराम पावली. वृद्धीची आशा आणि दिशा खुंटली. हा या तहाचा परिणाम झाला. ही स्थिति त्या वेळच्या कर्त्या सवर्त्यांसही उमगून गेली होती हे मागें आलेल्या विठ्ठलपंत तात्यांनीं भारमलदादांस लिहिलेले पत्रावरून दृष्टोत्पत्तीस येईल. भारमल होळकरांनीं थोरले मल्हाररावांपासून आतापर्यंत सगळी होळकरशाही पाहिली होती; व तिचे अंतरंगांत ते वावरले होते आणि विठ्ठलपंत तात्याबद्दल असें म्हणतां येईल कीं ''सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः'' म्हणजे ते काळवेळ पाहून वागणारे राजकारणी पुरूष होते. अशा दोन कर्त्या पुरूषांचे विचार त्या पत्रांत पहावयास मिळतात.

कैफियतकार म्हणतात त्याप्रमाणें ''बैठकीचे पोटीं जवाहीरखाना कापड, हत्तीचे सरंजाम, घोड्याचे सरंजाम चांदी सोन्याची भांडी बाडांत न ताट व वाट्या न पलंग'' अशी अंतर्बाह्य स्थिती झालेली. मेजर व्ह्यान्स आग्न्यु यांनीं इ. स. १८१८ फेब्रुवारींत सर जान मालकम यांजकडे जो अहवाल सादर केला त्यात ते लिहितात, ''लढाईपूर्वी होळकरांची दौलत चौसष्ट लक्षांची होती; ती तहानंतरच्या व्यवस्थेने पंचवीस लाखांवर उतरली आहे आणि तीही मेघराज यांचे कृपेवर अवलंबून.'' सारांश, तात्यांनीं म्हटल्याप्रमाणें ''दौलतीचें वारापाणीच झाले.'' अशा एकंदर निराशेच्या स्थितीत तात्यांनीं जी तोंडमिळवणी घडवून आणिली तिजसंबंधांत कैफियतकार लिहितात. ''सोहलतीचे पोटीं दौलत पुनः उभी केली. दौलतीचीं माणसें दरखदार मामलेदार वगैरे उपोशीत राहूं दिले नाही. ज्याचे अन्नोदक उठले त्यांस त्यांनीं तरी काय करावें? त्याजला स्थलांतर करणें प्राप्त झालें. ऐसे थोडे पांच-चार असाम्या. वरकड थोड्याबहुताने स्थापना केली.'' सारांश, पंचवीस लाखांच्या आंत येऊन

बसलेली ही दौलत ''फक्त आबादी करून महाल जमेवर कसे बसविले'' हेंच आतां पहावयाचें आहे आणि तें सर्व कर्तृत्व तात्यांचेच आहे. तेव्हां या भागाच्या आरंभी हेच ब्रीदवाक्य राहील, *''फक्त आबादी करूनच जमेवर बसेल असेंच घडावें. यातच गुजारा सर्वत्रांचा''* ज्या पत्रांकाबद्दल वरतीं उल्लेख केला आहे त्यात मातोश्रीसाहेबांचे घाटाची वाटाघाट झाली आहे. त्याचें ही उत्तरः तात्यांनीं अशा बिकट स्थितींत व्यवस्था करून दिली ती याप्रमाणें. ''संस्थानाचे खर्चास चार गांव व घाटाचे खर्चास दोन गांव सरकारांतून लावून दिल्हे. त्यांचीच आबादी इस्तवारी चांगली करावी आणि जिकडील तिकडे खर्चाची व्यवस्था होत जावी. इकडून मातोश्रीसाहेबांचे कामास आळस होणार नाही. सुबत्ता झाली म्हणजे उपर घडून येईल.'' म्हणजे पर्यायानें मातोश्रीसाहेबांचे कामाची सुरुवात करून दिल्ही.

सर्व बाजूंनीं आकुंचित होऊन ''राज्याचें'' बनलेले ''संस्थान'' इंदूर; आतां त्याची व्यवस्था राजश्री विठ्ठलपंत तात्यांचे हातांत आली. त्यावेळच्या दरबाराच्या स्थितीचें वर्णन मेजर अग्न्यूसाहेबांनीं याप्रमाणें केलें आहे. ''राजेसाहेब अकरा वर्षांचे आहेत. नेहमी दरबारांत हजर असतात. कारभार पत्रव्यवहार त्यांचे नांवाने चालतो. त्यांचे मातोश्रींचे नाव केसराबाई आहे. त्या बाई महत्त्वाकांक्षी नसून आपलें काम भलें व आपण भलें या वृत्तीच्या दिसतात. दिवाण गणपतराव हे नामधारी दिवाण आहेत आणि खरी सत्ता व कर्तृत्व विठ्ठल तात्यांकडे आहे. या दोघा कारभाऱ्यांचे मोठे रहस्य आहे असा कांहीं प्रकार दिसत नाही. विठ्ठलपंत तात्या गणपतराव दिवाणांचा बाह्याकारी जितका मान ठेवावयाचा तितका ठेवतात. बाकी कारभार जो करावयाचा तो आपल्या स्वतंत्र विचारेंच करितात. ब्रिटिशांची मर्यादा राखून आपला सर्व कारभार संस्थानास हितावह होईल तितका करण्याकडे त्यांचे लक्ष आहे.'' आणि जोपर्यंत हे धोरण ते सांभाळून आहेत तोपर्यंत ब्रिटिश सरकारने त्यांस पाठिंबाच द्यावा अशी शिफारस आग्नुसाहेबांनीं केली आहे. सारांश, यावेळीं संस्थानची सर्वस्वी सत्ता विठ्ठलपंत तात्यांचेच हाती आली होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मंदसोरच्या तहानंतर एकंदर राज्याची जी वाटणी झाली तिचा तपशीलवार खुलासा मागील भागांत केलाच गेला आहे. परंतु त्या यादीचे ठोकळ तेरीज माहितीसाठी खाली देत आहोत :

तेरीज एकंदर मंदसोरच्या तहामुळे राज्याची वाटणी झाली ती :

| | |
|---|---|
| २५,६६,००० | कंपनी इंग्रेज यांजकडे. |
| २३,७९,८२० | होळकर सरकार यांजकडे. |
| ६५,००० | श्रीमंत भीमाबाई बुळे यांजकडे संस्थान झाबवे थांदले पेटलावद चिखलदे. |
| १०,३५,००० | नबाब मीरखान पिढावे, टोंक, सिरोंज, निंबाहेडा, गुगलछबडा व रामपुरा खुर्द. |
| ४,१०,००० | नबाब गफूरखान, मल्हारगड, जावरे, बर्डावद, पिंपलोद, तालमडवल व संजीत. |
| .............. | |
| ६४,५५,८२० | |

सारांश, होळकर सरकारच्या चौसष्ट, पासष्ट लाखापैकीं होळकर संस्थानाकडे 'तेवीस लक्ष एकुणऐंशीं हजार आठशें वीस.' म्हणजे पूर्वीच्या उत्पन्नाचे एकतृतीयांश जवळ राहिले. दोनतृतियांश बाहेर गेले. मेजर आग्नुसाहेब आपल्या अहवालांत लिहितात कीं ''होळकर संस्थानाकडे हे जे चोवीस लाख राहिले ती गणती कागदोपत्रीच आहे. पण हातांत नऊ लाखांपेक्षां देखील कमीच पडले आहेत.'' इतकी आमदानी संकुचित झाली होती. त्याच अहवालांत आग्नुसाहेब खर्चाची बाजू मांडतात ती आठ लक्ष तेवीस हजार सहाशें एकवीस हा महाराजांचा स्वतःचा, कुटुंबाचा व नोकरांचा खर्च आहे. तीन हजार लष्कर महाराजांनीं ठेविले पाहिजे असें तहांतलें कलम. त्या लष्कराचा खर्च सोळा लक्ष बेचाळीस हजार एकशें बासष्ट म्हणजे एकंदरीत होळकर संस्थानचा खर्च चोवीस लाख पासष्ट हजार सातशें त्र्याऐंशीं. उत्पन्नाची बाब अगदी, उत्तमोत्तम धरून चोवीस लक्ष बेचाळीस हजार आठशे वीस व खर्चाची बाब आतांच वर पाहिली आहे.

असा हा कारभार विठ्ठल महादेव किबे यांच्या हातीं येऊन पडला. तो त्यांनीं कसा निभावला तो आतां पाहूं.

आग्न्युसाहेबांचे मते देवी अहिल्याबाईची कारकीर्द हा होळकर राजवटीचा सुवर्णकाळ होता आणि तो तसा होताही. विठ्ठलपंत तात्यांचेही ध्येय तो काल परत आणावा असें होते. आग्न्युसाहेब आपल्या अहवालाचे अखेरीस इ. स. १८१८ चे आकडे देऊन देवी अहिल्याबाईसाहेबांच्या कारकीर्दीचेही आंकडे समोरासमोर देतात. ते येणेंप्रमाणें.

| इ. स. १८१८ चे | उत्पन्न | श्री देवी अहिल्याबाईंचे कारकीर्दीतील उत्पन्न |
|---|---|---|
| होळकरांची आमदनी | ७,६९,५०० | २२,२१,५०० |
| खंडणी | १,१५,००० | २,३५,००० |
| मीरखानाची जायदाद | ५,७०,००० | ९,५०,००० |
| गफूरखानाची जायदाद | ३,००,००० | ४,१०,००० |
| जालमसिंगाची देणगी | १,३०,००० | ३,३०,००० |
| ब्रिटिश सरकारला दिलेल्या प्रांताची खंडणी | ७,५०,००० | ७,५०,००० |
| ब्रिटिश सरकारास दिलेल्या प्रांतांचे उत्पन्न | ४,६८,००० | १८,३२,००० |
| | ............... | .................. |
| | ३१,०२,५०० | ६७,२८,५०० |

ह्यावरून दिसून येईल कीं देवी अहिल्याबाईंच्या वेळची आमदनी शेकडा ५५ उतरून गेली आहे. ही झालेली हलाखी अनेक कारणांनीं बनत गेली. देवींच्या वेळची शांतता, न्यायप्रियता व प्रजावात्सल्य पुढें राहिली नाहीत. त्यांच्या वेळच्या अधिकारी वर्गाची

असलेली उदार मनोवृत्ती, पुढें पुढें मावळत गेली. परकीयांचा आणि त्यांच्या संस्कृतीचा प्रवेश जोरानें झाला. या अनेक कारणांचा समुच्चयानें विपरीत परिणाम झाला; आणि सद्गुण आणि संपत्ती यांनीं संस्थानाकडे पाठ फिरविली. तीच स्थिती पुनः परत आणण्याची उच्च महत्त्वाकांक्षा विठ्ठलपंत तात्यांनीं धरलेली होती. मालकमसाहेब हे त्या ध्येयास मान तुकवीत, तरी पण हें थोडेबहुत अशक्यच आहे असें ते बोलूनही दाखवीत. मालकमसाहेबांनीं आपलें मत आपल्या लिखाणात येणेंप्रमाणें नमूद केलें आहे. (१) देवी अहिल्याबाईंजवळ भरपूर गंगाजळी होती, आता गंगाजळी शुष्क झाली आहे. (२) देवीची साधनसामुग्री, माणसाचा पाठपुरावा अखंड होता. आजही दोन्हीही नाहींत असें म्हणावें लागतें. (३) देवीचा दरारा व वशिला अखंड होता. आज त्यांतील कांहींच उरलेलें नाहीं. सारांश, मालकमसाहेब म्हणतात ''तात्या आशावादी आहेत, प्रयत्नवादी आहेत. याबद्दल त्यांची पाठ थोपटली तर पाहिजेच, पण सगळ्या दौलतींत हा एकच जीव तेवढा आहे आणि कालाचा ओघ अंतर्बाह्य विपरीत दिशेने वाहत आहे तरी पण आमच्याकडून होईल तितकें त्यांस प्रोत्साहनच दिले पाहिजे.'' साहेब बहादुर पुढें लिहितात, ''बेचिराख झालेली खेडी पुनः त्यांनी वसविलीं आहेत. महतपूर, देपाळपूर, नारायणगड, बेटमा, हासलपूर आणि असेंच कांहीं दुसरें परगणे दीर्घकालाच्या पट्ट्याने दिलेले आहेत नमुन्यासाठीं एका महालाचा पट्टा पहावयास मिळेल. सायरची जमाबंदी इजारे लावून दिल्हीं आहे. झाबव्याच्या राज्यांतून रुपयामागें दोन आणे होळकर सरकारचे लागू करून घेतले. नरसिंगगडकडून पहिलें ऐंशीं हजार येत होते. मध्यंतरीं हे उत्पन्न पडून राहिले होते. इ. स. १८१९-२० त पस्तीस हजार वसूल झाले. नरसिंगगडचा पट्टा पत्रव्यवहारांत आपणास पहावयास मिळेल. सारांश, बाहेरचे आणि आतील संबंध जे आतापर्यंत निर्जीव झाले होते, ते तात्यांनीं सजीव केलें.

इ. स. १८१७ त होळकरांची जमाबंदी रुपये ४,४१,६८९ होती, ती इ. स. १८१९ त रुपये १६,९६,१८३ झाली. पहिल्या वर्षी जमाबंदी वसूल करण्यांत शेकडा ३५ ते ४० खर्ची पडत, तो खर्च आतां शेकडा १५ वर उतरला. एकतर घरांतील लष्कराचा बखेडा उरला नव्हता आणि शेजारीपाजारी इंग्रजांची सत्ता लष्करासह वावरूं लागली. या इंग्रजी सत्तेचा जनतेच्या मनावर समाधानकारक परिणाम त्याकाळीं झाला.

(इ. स.१७९८-१८१८) ''गर्दी का वख्त'' म्हणजे परकीयता व अराजकता यांची लाट उसळली होती. कोठेंच धरबंद उरला नव्हता. आता मंदसोरचा तह झाला. त्याच सुमारास मध्य हिंदुस्थानांतील लहान थोर राजेरजवाडे, जमीदार, पुंडांचे पुढारी अशा नानाविध मराठे, रजपूत व मुसलमान सत्ताधारी व नामधारी यांच्याशीं सामदामादि मार्गांनी संधान राखून इंग्रजांनीं सार्वभौमत्व संपादिले. अक्षरशः कोठेही कागदोपत्रात सार्वभौम हा शब्द नसला तरी परिस्थितीने तो शब्द कृतीत व वृत्तीत बाणला होता. गेल्या वीस वर्षांत शस्त्रधारी जनतेखेरीजकरून बाकीच्या सर्व जनतेत अशांतता, अस्वस्थता आणि अधीरपणा उत्पन्न झाला होता. शेतेची शेते व गांवचे गांव ओस पडून राहिले होते. मालकमसाहेबांनीं धारण केलेंल्या धोरणानें शांतता प्रस्थापित झाली. त्यांस सहायक अधिकारी मिळाले तेही काळवेळ

पाहून वागणारे होते. सारांश, एका बाजूस एतद्देशियांचा धिंगाणा तर दुसरें बाजूस परस्थांचा धिम्मेपणा, उद्योग, त्यामुळे जनप्रवृत्ती आपोआप परस्थांकडे वळली. लोकांच्या डोळ्यांपुढें दोन राज्यपद्धती दिसू लागल्या. तुलनेनें ते इंग्रजांच्या बाजूस वळले. अनेक वर्षांच्या अस्वस्थतेमुळें बनत गेलेली घाबरट वृत्ती मधून मधून उचल घेई. त्याचे उदाहरण मालकमसाहेब आपल्या एका लेखांत देतात. एके दिवशीं सकाळींच असा प्रकार घडला की श्रीफळ एकाच्या हातांत आले आणि त्यांस अशी सूचनाही आली की त्याने ते दुसरें कोणाचे तरी हातांत द्यावे आणि त्यांस तशीच सुचनाही द्यावी. अशा स्थितीत श्रीफळ हातोहाती किती तरी दूर गेले. त्यांची संख्याही वाढली. कोणास त्याचा उमज पडेना. तेव्हां असलीं पांचपन्नास फळें घाबरट घाबरट मुद्रेने पांचपन्नास पटेलांनीं साहेब मजकुराचे तंबूत आणून रास केली. पुनः काय प्रसंग उद्भवतो अशी धास्ती सगळीकडे उद्भवली. साहेब मजकुराने हसतमुखानें त्या लोकांची समजूत घातली की कोणीतरी संत महंतांनीं लोकांस हा दिलदिलासा दिला आहे कीं आता दुर्दिन गेले, शांतता स्थापित झाली आणि म्हणून श्री या फलरूपाने सर्वत्र नांदणार आहे. सारांश, साहेबाच्या नेहमीच्या तडजोडीच्या वृत्तीनें आणि मधुर वाणीनें लोकांस पुनः धीर आला. अशा अनेक गोष्टींचा परिणाम होऊन गांव व घर पुन्हां वसू लागले. पुंड जे झाले होते ते आतां वतनावर येऊन काम पाहू लागले. याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे साहेब मजकुरांनीं तात्यांचे हस्ते त्यावेळीं घरगणती व शिरगणती केली तिचेच आकडे खाली देत अहोत.

सन १८१७ मध्ये १६६८ गांव ओस होते यातील इ. स. १८१८ त २६९ गांव वसले; इ. स. १८१९ त ३४३ गांव व इ. स. १८२० त ५०३ गांव वसले.

म्हणजे जसजशी शांतता प्रस्थापित होत गेली तसतशी सालोसाल गांवांची वस्ती वाढत गेली आणि शेवटीं मूळच्या साडेतीन हजार गांवांपैकीं केवळ पांचशेंच गांव वसायाचे राहिले होते. ही स्थिती इ. स. १८२० ची होय. तात्यांस अशी आशा होती कीं अशी स्थिती सतत पांच वर्षे चालल्यास अहिल्याबाईंचे रामराज्य लोकांस पुनः दिसेल.

ज्या पद्धतीनें तात्यांनीं ही क्रांती घडवून आणली तिचे कांहीं नमुने सरकारी कागदांवरूनच देत आहोत. ठाकूर, टाकेदारांकडील हप्ता दरसाल वाढवीत जाऊन पांच वर्षाच्या अखेरीस, तिप्पट उत्पन्नाचेकडे धाव घेतलेली लेखांक १ वरून दिसून येईल. लेखांक २, ३ यात पूर्वीची वहिवाट जमा धरून तिच्यावर नवीन वहिवाट व उजळणी कशी केली हे दिसून येईल.

त्याचप्रमाणें राजघराण्यातील व्यक्तीच्या सुखसोयी पडत्या काळांतही त्यांच्या दर्जाप्रमाणें केलेली कार्यकर्त्यास भूषणावह आहे. श्रीदेवादिकांकडे पूर्वापार चालत आलेल्या देणग्या तितक्याच उदार वृत्तीने चालविलेल्या लेखांक ४ वरून व ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या स्वतंत्र पुस्तकावरून दिसून येतील. आदर सत्कार लेखांक ५, ६ या वरून दिसून येईल. सन्मान तर झाला आहे पण तो आपल्या पद्धतीनें, परकीयांच्या पद्धतीने नाही. हें त्यांत विशेष आहे. दानधर्माचे अनेक लेखांक आहेत पण एका लेखांकात

तपशीलवार मजकूर आल्यानें तो विशेष विचारार्ह झाला आहे. अवदीच, औदुंबर, बाविशे, श्रीमाळी, श्रीगौड, आद्यगौड, नार्मदीय, गुजरगोड, पल्लीवाल, खेडावाल, दसोरा व जंबू इतके ब्राह्मणांतील भेद एकत्र झालेले दिसतात म्हणजे मराठ्यांचे राज्य येथें येण्यापूर्वी हे सर्व भेद क्वचितच एकत्र झाले असतील. सहभोजन झाले किंवा नाही हें जरी सांगतां आलें नाही तरी सहआसन झालें हे खचित. ही एक गोष्ट मराठ्यांच्या साम्राज्याने घडवून आणली असें म्हणण्यास हरकत नाहीं. लिंगार्चनाकडे मुक्यांची व आंधळ्यांची ही सोय झालेली दिसते. होळकर राजघराणें हें स्वतः स्मार्त असून श्रीविष्णूसहस्त्रनाम, श्रीसूर्य नमस्कार, श्रीसप्तशतीपाठ, श्रीगणपती सहस्त्रनाम, श्रीतुळशी प्रदक्षिणा, श्रीअश्वत्थ प्रदक्षिणा, श्रीगीतापाठ, श्रीरुक्मिणी स्वयंवरपाठ, श्रीआदित्यपाठ, श्रीभागवतपाठ, श्रीव्यंकटेशस्त्रोत्रपाठ, श्रीअध्यात्मरामायण पारायण, ह्या सर्वांस भेदभाव न धरितां सम सम आदरानें उचलून धरतात. यावरून राजेपणाची त्यांची कल्पना किती उदार होती हेंहीं लक्षात येईल; आणि हे सगळे अशा वेळीं घडून येत होतें की राज्यलक्ष्मीबरोबर धातुलक्ष्मी ही दोन तृतियांश बाहेर गेली होती. संस्थानाबाहेर देखील क्षेत्रांचा व देवादिकांचा समाचार घेतलेलाही याच लेखांकांत दृष्टीस पडेल. (होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें हे पुस्तक पहावे.) सारांश, मराठा मंडळ मोडलें तरीपण ''हे राज्य देव ब्राह्मणांचे आहे'' ''तीर्थक्षेत्रें अवघीं मोडलीं, कांहीं राहिलीं तुम्हाकारणें'' हा श्रीसमर्थांचा मंत्र मात्र अजून चालू राहिला होता. सारांश, मराठा राजवटीचा वृक्ष दुभंगला जाऊन होळकर राजवट ही इंग्रज राजवटीच्या सावलीखालीं जरी आली तरी मुळेपाळें तिनें अजून सोडलीं नव्हतीं, हें स्पष्ट दिसेल.

श्रीमंत केसराबाई (कृष्णाबाई) संबंधानें मालकमसाहेबांनीं फार उदार विचार प्रगट केलें आहेत. ते लिहितात की बाईचें वय तिसांचे आत असून कामकाजांत चांगले लक्ष घालतात. वृत्ती शांत असून, दिमाख मुळींच नाहीं. स्वतःचा लौकिक व्हावा अशी वृत्ती नसून मातोश्रीसाहेबांचे (देवी अहिल्याबाई साहेबांचे) कार्य अखंड चालावें अशीं मात्र तळमळ त्यांस आहे. त्यांचे नांवाचा शिक्का त्यांची वृत्ती दर्शविते. ''श्रीम्हाळसाकांत चरणीं तत्पर अहिल्याबाई कारकीर्द कृष्णाबाई होळकर.''

मंदसोरचा तह झाला म्हणजे पर्यायाने मुलूखगिरी बंद पडली. आतांपर्यंत आठ महिने छावणींत आणि चार महिने घरीं असा शतकभर जो प्रघात चालला होता तो अजिबात बंद पडून बारा महिने घरींच राहणें प्राप्त झाले. राज्ययंत्राची बहिर्मुखता बंद पडून एकच अंग आतां उरले – अंतर्मुखता. जो वाडा बांधावयास तात्यांनीं हाती धरला तो त्यांच्या एकंदर वृत्तीला अनुरूपच होता. जुन्या पायावर नवी इमारत हे काम इ. स. १८१८ त सुरू करून इ. स. १८२० त त्यांनी पुरे केलें. रेसिडेन्टसाहेब तो वाडा पाहण्यास आले होते. दोन तीन लाखांकडे खर्च झाला असेल, असें त्यांचे उद्गार बाहेर पडले. या वाड्याकडे पाहिलें म्हणजे शनिवारवाड्याचे स्मरण झाल्याशिवाय राहत नाही. शनिवारवाड्याकडे जातांना बुधवार पेठेतील दोन्ही बाजूची कापडाची, सुगंधीची दुकानें येथेंही त्याच नमुन्यावर वसलेली आहेत शनिवारवाड्याभोवतीं सरदारांचे वाडे जणू काय कोट करून उभे होते येथेंही सरदार बुळे, खासगीवाले, किबे,

फडणीस, दिवाण, पागनीस, चिटणीस इत्यादिकांचे वाडे राजवाड्याचे भोवती कोट करूनच उभे होते. आज त्यांतले कांहीं शिल्लक आहेत. सारांश, मराठे राजवटीतींल ही घटना अजूनही येथें जीव धरून होती व अजूनही थोडीबहुत धुगधुगी धरून आहे.

छावणीतला आयुष्यक्रम हा रानावनांत धक्केबुक्के खाऊन शीतोष्ण सहन करून जीवन वाढणाऱ्या वटवृक्षाचें चित्र होय; तर शहरात बारा महिने राहून व्यतीत होणारें आयुष्य हे काचेच्या घरांत लावलेल्या रोपट्याचे नाजूक जीवनाचे चित्र होय आणि तोच प्रकार येथें सुरू झाला. मर्दुमकीस वाव उरला नाही. ठरवून दिलेल्या कक्षेंतच वावरावयाचे; डोळ्यापुढें क्षात्रवृत्तीचें ध्येय नाही आणि ब्राम्हतेजाचे मुळांतच शिक्षण कसेबसे चाललेले. तशा परिस्थितीत श्रीमंतांचे, जहागिरदाराचे व आश्रितांचे, चारित्र्य कसें टिकणार? साहजिक, संपत्ती हाताशी पण डोक्याशीं कांहींच कार्य नाही, डोळ्यासमोर कांहीं ध्येय नाही, असा प्रकार सुरू झाला.

(लेखांक १) ता. १५-२-१८१९ ''ठाकूर, टाकेदार व खेडे, मौजे वगैरे आबाद चा नमुना'' तालुके झकणावदा परगणे पेटलावद येथील उत्पन्नावर सरकारांत टाका दरसाल वाढत्या प्रमाणात. संमत १८७५, टाक्याचा आकार १३७५ संमत १८७६, टाक्याचा आकार १८७५. संमत १८७७, टाक्याचा आकार २३७५ संमत १८७८, आकार २८७५. संमत १८७९, आकार ३३७५ संमत १८८०, आकार ३८६६ गांवखेडी उजाडीमुळे उत्पन्न कमी झालें होतें ते संमत १८७५ पासून नवीन बंदोबस्त करून संमत १८८० चे सालांत मूळ रकमेवर टाका कायम केला असें. तरी आता आबादी इस्तवारी करून सरकारी टाका ठरावाप्रमाणे देऊन आपले ठिकाणावर कायम राहून सरकार चाकरीत दक्षता ठेवीत जाणें म्हणोन ठाकून झकणावदा यांस पट्टा करून दिला.

छ. १९ रविलाखल.

(लेखांक २) ता.१५-६-१८१९ प्रगणे जिरापूर कमाविसदार. विठ्ठल महादेव यांजकडून पत्र. जिरापूर जमीदारांनीं वतनासंबंधी सरकारांत येऊन अर्ज केला. त्यावरून ठराव केला तो :

१ नानकार मौजे दुपाड्या तो चालवावा.
२ दामी ऐन पट्टे असतील त्याजवर दरशेकडा रुपये ५ प्रमाणें
१ भेटी. शाळू व उन्हाळू मिळून दर गावास रुपये १० प्रमाणें
१ जकातीवर, जकातसंबंधी खर्च वजा करून बाकी ऐन जमा राहील त्याचा हिस्सा ६ वा.
१ जिरायत जमीन बिघे सुमारें ९००.
१ दप्तरचा दाखला कचेरी व सायरचा घेणें.
१ रयत लोकांत नात्रे होतील त्यांस भेटीचा एक रुपया नात्रेवाल्याकडून.
१ दौत पूजन सालांत एक वेळा रुपये ५.

येकुण कलमें आठ यांची वहिवाट जमीदार यांची चालवून सरकार कचेरीत चाकरी

घेत जावी. पटवारीपणाची वहिवाट असेल ती सरकारांत जप्त करून ऐवज जमा होईल तो सरकारांत जमा करून द्यावा.

(लेखांक ३ ता. २३-७-१८१९) इज्जतअसार मैराळभाऊ कमाविसदार प्रगणें पाटोदे सलामहू अजतर्फ कप्तान हेनरी पाटंजरसाहेब बहादूर कलेक्टर सुभे अहमदनगर मुक्काम पुणें सलाम. पेठ येवलें येथील पाटीलकी निम्मे होळकरसाहेबांची व निम्मे राजाराम नाईकाची. त्यांस विठुजी नाईक राजाराम पाटलासी भांडत आहे. त्याची पंचाइत अदालतींत व्हावी. निमे पाटीलकी होळकरसाहेबांची ते मामुलीप्रमाणें चालविण्याविषयीं वकीलनिसबत मशारनिल्हे यांनीं जाहीर केलें. त्याजवरून हुकूम केला जातो की नाईक आपसांत भांडत आहेत त्याचा फैसला होईल. मात्र होळकरसाहेबांचे निम्मपाटीलकीस हरकत करणेचे कारण नाहीं, मामूलप्रमाणें चालविणें. मौजे नगरसूल प्रगणेमजकूर येथील पाटीलकी दरोबस्त होळकर सरकारांची आहे त्याचेही मामूलप्रमाणें मानपान लमाजमा चालत असेल त्याप्रमाणें चालविणे म्हणोन.

(लेखांक ४) ता. ११-१०-१८१९ रा. वर्तमानभावी कमाविसदार सरकार बिजागड स्नेाा मल्हारराव होळकर दंडवत शके १७४१ श्रीक्षेत्र ओंकारेश्वर नर्मदा उत्तरतीर यांजकडे सरकारी पूजा, नैवेद्य, नंदादीप व चौघडा इत्यादि सरकार बिजागड येथील नेमणुकीअन्वयें पेशजीपासून चालत आली. अलीकडे दंग्याबेहद्यामुळें वर्ष दोन वर्ष सरकारांतून ऐवज वेळेस न पावल्यामुळें चौघडा चालावयाचा दिक्कत पडली. म्हणोन रा.रामभट यांनी स्वारींत इंदूर मुक्कामीं विदित केलें. त्यावरून मनास आणितां श्रीकडील पूजा नंदादीप चौघडा वगैरे चालत आल्याअन्वयें चालवायाचें करून नेमणुकीचा तपशील येणेंप्रमाणें.

५३६ येकुण नेमणुक खर्च. नंदादीपास तूप बारमाही रु. ३६ नैवेद्य रोजींना, बारामाही खर्च रु. ६४ पूजासाहित्य बारामाही रु. ६ शिवरात्रीबद्दल अभिषेक, ब्राह्मण भोजन लघुरुद्र रु. ६१, नगारखान्याकडे खर्च रु. बारामाही; ६ इसम आकार खर्च रु. २६४ पुजारी खर्च बारमाही रु. १०० नौबत मढाइस्तव ५.

ह्याप्रमाणें येकुण पांचशें छत्तीस रुपये द्यावयाचे तरी तुम्ही निम्मे माघ मासीं व निम्मे वैशाख मासीं महालचलण सालदरसाल देत जाणें. अस्सलपत्र पुजारी ब्राह्मणाकडेस देणें. जाणिजे छ.२२ जिल्हेज (मोर्तबसुद)

(लेखांक ५) इ.स.१८२० रोजकीर्द ता.१३ जून इ. स. १८२० : जमाखर्च इजाफत जमा विठ्ठल महादेव याजकडील. जनरल मालकमसाहेब विलायतेस जातात. सरकारांत निरोप घ्यावयास आले सबब बहुमान देण्याकरितां जवाहीर वगैरे खरीदी.

२,५०० पोची हिरकण्याची. गुजारत राजाराम संभुराम.

१,१०० कंठी मोत्याची एक सरी मोती ४२ पन्हे ५ हिरे ९ पदकास.

६० पदक हिरकण्याचे लाल सुमारी ९ गुजारत हीरालाल पन्नालाल.

................

३,३६०

८,१७३-७-९ खासगीकडील दागिने खरीदी विद्यमान गोपाळराव गोविंद गानू दिवाण खासगी.

३,००० खासगीकडील दागिने खरीदीपैकीं अंगठी हिऱ्याची.

८०० काकणजोड हिरेमाणकांचा उज्जेनीपैकीं

१,३०० शिरपेच हिरकण्या व पन्याचा

२,२५० इंग्रजांचे मेजवानीचे वेळीं. भूजबंद हिरकण्याचा १,८००, पोची हिरकण्याचा ४५०

२७५ कंठी मोत्याची, भगवतीदासपैकीं एक सरी

३८३-७-९ शिरपेच जयपुरी जोरावरमलपैकीं

१६५ चांदीचा सरंजाम. घोड्याचा डुमची वगैरे

...............

८,१७३-७-९

.................

११,८३३-७-९

(लेखांक ६) चौथें जार्ज गादीवर आले. त्यांचे तर्फेनें जनरल मालकमसाहेब वकील आहेत सबब.

३,४५० जमाखर्च इजाफत जमा विठ्ठल महादेव यांजकडील : नवे पातशाहा विलायतेस गादीवर बसले सबब जनरल मालकमसाहेब त्यांचे तर्फेनें वकीलीवर आहेत सबब बहुमान पोशाख वगैरे.

२,७०० जनरल मालकमसाहेब. १,००० कंठी मोत्यांची, ५०० शिरपेंच व १,२०० हत्ती येक.

७०० वेलस्लीसाहेब; ३५० कंठी मोत्याची, ३५० शिरपेंच

याप्रमाणें दिले. विद्यमान राजश्री गोपाळराव गोविंद गानू खासगी.

**होळकर सरकारचे रेकार्ड**

(लेखांक ७) ता. ७ जून इ. स. १८२० श्रीमंत बुळे निसबत होळकर सरकार व झाबवेवाले राजे यांच्यामधील तंट्याचा निकाल. अधिक जेष्ठ वद्य १२ संमत १८७६ मुक्काम नालछे नजीक मांडव. तहनामा कलमावर बोलणें ठराव प्रगणे झाबवे सरकार श्रीमंत मातोश्री भीमाबाई बुळे. इंग्रेज बहादुर सरजान मालकमसाहेब यांचे रूबरू राजश्री भीमसिंगजी झाबवेकरादेखत बोलणें ठरले. विद्यमान धोंडो सदाशिव विभूते दरखी आमीन प्रगणे मजकूर.

१ तहनामा अकरा कलमी होऊन त्यात हेंच ठरविलें गेलें कीं, झाबवे प्रगण्यांत उमराव ठाकूर लोकांच्या कोठड्या (ठिकाणे) जीं जीं आहेत त्यावर सर्व अंमल पूर्ववत बुळे यांचाच चालेल. ठाकूर लोक आज्ञेत न राहिले तर त्यांची जप्ती करून खाणें

उपजीविकेची व्यवस्था करावी वगैरे.

१ तालुके रंभापूर, खंडाळे, ढाढणवास, माथासुळा, वगैरे गांवे राजाजींनी दाबली व रंभापूर कुंवर प्रतापसिंगास दिले. तरी सरकारी जागा देविल्या पाहिजे, म्हणोन प्रश्न साहेबांस करतां त्याजवर सर जान मालकमसाहेब हुकूम देतात कीं तुमचे मालक मुलखाची मालकी करीत होते त्यांचेनीं जागा त्यावेळीं घेववल्या नाहीत, त्यांनी मुरवत केली. आतां आम्हाकडून कशा देववाव्या. झाबवेवालेही तुमचेच आहेत. मेहरबानी ठेवावी.

१ या प्रगण्यावर भोपावरचे एजंटचा उपर राहील वगैरे कलमांत तह झाला. सदरहू तहावर साक्षी (१) ब्रम्हगीर निंबाजी होळकर सरकार तर्फेचे वकील (२) लाला किसनप्रसाद वकील (३) लाला ख्यालीराम निसबत मालकम. (४) नारोपंत नाना काटाफोडकर (५) बापू रामचंद्र मामलेदार संस्थान रतलाम.

**(फॉरेन रेकार्डपैकीं तहाचा सारांश)**

(लेखांक ८) यादी नरसिंगगड प्रकरणीं मजकुराची (इ. स. १८१९-२०)

| | |
|---|---|
| ७९,२५१ | ऐनटाका सुदामत वहिवाट रुपये बुंदीशिक्का. |
| ४,३५० | सिवाय कलमें सुदामत शेरी नजराणा १३५०, दरबार खर्च सरकार ३,००० वगैरे. |
| ............. | |
| ८३,६०१ | |

१ अलीकडे संमत १८७४ सालीं लढाई जाहल्यावर ठराव जाहला. विद्यमान राजश्री विठ्ठल महादेव जोग (किबे) यांजकडे रूपराम बोहरा कारभारी नरसिंगगड यांनी येऊन अर्ज केला कीं, मुलखाची खराबी झाली यामुळें टाका पुरा पडत नाही. कुंवर चेनसिंग सरकारांत कैद झाले. सबब सहासाला जाब बोलण्यांत आला. सालोसाल किस्तबंदी ठरावून दिली रुपये ८५,००० सालमशाई किस्तबंदी बरहुकूम घेत जावें. पुढें, सहा सालें पुरी झाल्यावर सुदामत टाका चालत आल्याप्रमाणें रुपये घ्यावे. बाकी राहिले ते सालें पुरी जाहल्यावर निकास करून घ्यावा. सालें तपशील. संमत १८७४ रु. २५,०००, संमत १८७५ रु. ३५,०००, संमत १८७६ रु. ४५,०००, संमत १८७७ रु. ५५,०००, संमत १८७८ रु. ६५,०००, १८७९ रु. ७५,०००, एकूण तीन लक्ष रुपये.

१ संमत १८८० (इ. स. १८२४) पुरा टाका रु. ८५०००. कमाविसदाराचे नेमणुकीसुद्धां करार १ कित्ता ठराव झाला ते समयीं.

१ विठ्ठल महादेव याजकडील जहगीर गांव मौजे, कासरोद देऊन पत्र करून दिले गांव अदमासे २००० चे.

१ रावजी त्रिंबक याजला सालाबादी देणेंचा करार रुपये ५०० पांचशें.

७ सिवाय कलमें सात. गांवगन्ना सूत अधोडी, मेटी मामलेदार, फडफरमास व

सरकारांत पुत्रोत्सव, किंवा लग्न कार्य जाहल्यास घोडा, अहेर, जवाहीर नजर. सांप्रत राजाचे वंशाची नक्कल झाली, सबब नजराणा. दिवाळीपट्टी, स्वारांचा व प्याद्यांचा खुराक वसूलीस येतील तेव्हां.

येणेंप्रमाणें कलमाचा अंमल.

**(सरकारी हुजूर फडणीसी दप्तर)**



**प्रकरण १५ वें**

# राजश्री विठ्ठलपंत तात्यांची कामगिरी इ. स. १८२६ फेब्रुवारीअखेर समाप्त

''माळवा इन ट्रांझिशन'' या ग्रंथाचे संपादक सीतामहू संस्थानचे राजपुत्र यांवर श्रीमहालक्ष्मीची जशी कृपा आहे तशी श्रीसरस्वतीचीही आहे. त्यांनीं जो ग्रंथ इंग्रजीत प्रसिद्ध केला आहे त्या ग्रंथांत स्थानिक माहितीचा फायदा वाचकांस त्यांनीं दिला आहे. स्वतः ते रजपूत असल्यामुळें या क्षात्रवृत्तीच्या समाजाची हकीगत व स्थिती ते जितक्या खोलीनें व सहानभूतीनें वर्णू शकतील तितक्या तऱ्हेनें दुसरा कोणी परका करूं शकता ना. माळव्यांत असलेल्या रजपूतांचे, ऐतिहासिक दृष्ट्या, हे ग्रंथकार दोन विभाग पाडतात. इ. स. ८०० ते इ. स. १२०० पर्यंतच्या चार शतकांत विजयी रजपूतांनीं आपापली राज्यें सर्व उत्तर हिंदुस्थानभर पसरविलीं होती. त्यांचपैकीं कांहीं रजपूत राजे माळव्यांत स्थिरस्थावर झाले होते. मुसलमानांची लाट आर्यावर्तात आल्यावर, स्थिर झालेल्या रजपूत राजांशीं त्यांची गाठ पडली. एकीच्या अभावीं ही रजपूत राज्यें हतप्रभ झाली. पुढें मोंगलांची राजवट सुरू झाली. त्यांनीं रजपूतांचें क्षात्रतेज ओळखून त्यांस लष्करांत मोठमोठ्या जागा दिल्या. त्यांच्या बाहुबलावर बहुतेक आर्यावर्त नर्मदोत्तर मोगलांच्या अंमलाखालीं गेला. आपल्या कृपेतील माणसांस माळव्यांत मोगल बादशहांनीं जमीदार, इनामदार वगैरे करून त्यांस स्थिरस्थावर केलें. पहिली रजपूत मंडळी एवढ्या कालावधीत हतप्रभ होत होत राजपदावरून जमीदार पदावर येऊन उतरले होते. तेव्हां दोन्ही पक्ष जरी एकाच पदाला येऊन ठेपले होते तरी पहिला पक्ष आपली पूर्वीची थोरवी विसरला नव्हता. दोन्ही पक्ष रजपूतांचेच. तरी पण

आम्ही ''आद्य'' या भावनेने व अभिमानानें पहिले दुसऱ्यापासून फटकून वागत होते. यामुळें दोन्ही पक्षांत अभेद्य तट उभा राहिला होता. ही फाटाफूट इ. स. १७२० च्या सुमारास मराठ्यांच्या फायद्यावर पडली आणि आज म्हणजे इ. स. १८२० चे सुमारासही ब्रिटिशांचे फायद्यास रुजु झाली. ती कशी तें आतां पुढें सांगांवयाचें आहे.

माळव्यांत जसे हे रजपूत आले तसेच त्यांच्या पूर्वीही भिल्ल येथें स्थाइक झाले होते. या भिल्लांचा व रजपुतांचा समागम होऊन एक नवीनच जात उत्पन्न झाली ही जात ''भिल्लाळे'' या नांवानें ओळखली जाते. इंदूर संस्थानांत नेमाडचे भागांत या लोकांचा भरणा विशेष असून भूमिये जहागिरदार जे आहेत ते बहुतेक सर्व भिल्लाळेच आहेत. या भिल्लाळ्यांत रजपुतांचा जसा शूरपणा उतरला आहे तसा त्यांचा मूळचा चपळपणा व साधी राहणी हींही कायम आहेत. श्री देवी अहिल्या मातोश्रींनीं या दोन्ही वर्गांस सुखासमाधानात ठेवून त्यांना राज्याचे भारदस्त स्तंभ बनवून ठेविले होते. 'गर्दीका वख्त' मध्ये राज्ययंत्राचें दडपण खिळखिळें होऊन गेलें. शौर्याचा उपयोग स्वार्थाकडे होऊ लागला आणि ''ज्याच्या हातात ससा तो पारधी'' असा प्रकार होऊन बसला. मंदसोरच्या तहानें, उठलेल्या या उफाळ्यास, आळा पडला. मालकमसाहेब व त्यांचे दुय्यम अधिकारी यांस अखिल माळव्याचा बंदोबस्त करावयाचा होता; व विठ्ठलपंत तात्यांसही इंदूर संस्थानात शांतता प्रस्थापित करावयाची होती. उठलेल्या या वावटळीस स्थिरस्थावर करणें हे तात्यांस इष्ट तर मालकमसाहेबांस आवश्यक, यामुळें संगनमत व सहकार्य सहज घडून आले, त्याचा तपशील येणेंप्रमाणें:

| नंबर | नांव | | ठराव |
|---|---|---|---|
| १ | रावरतनसिंग सिव्हाना, बखतगड इत्यादि | १ | होळकरांनीं सातशें साडेअठ्ठ्याहत्तर रुपये देण्याचें ठरले. ठराव ता. १३-५-१८२० रोजीं झाला. |
| २ | नादीर पटेल | २ | रु. २५६४ वार्षिक होळकर कचेरींतून देणें. जामपासून नालछापर्यंत प्रांताची राखण. बंडबखेडे झाल्यास जबाबदारी. |
| ३ | भिमानसिंग | ३ | हा नादीर पटेलचा मुलगा. इ. स. १८२० च्या मे मधें नादीर हद्दपार झाल्यावर संबंध चालू ठेविला. |
| ४ | राव खुशालसिंग | ४ | याला वर्षाचे रु. ८६१५ ब्रिटीश, शिंदे, होळकर आणि भोपाळकडून मिळायचे. |
| ५ | दिवाण सालमसिंग | ५ | यांस होळकर, शिंदे, यांजकडून सालिना रु. ७६७५ मिळायचे. |
| ६ | राव नवलसिंग | ६ | यांस रु. ५४०० वार्षिक शिंदे होळकरांकडून मिळायचे. |

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | सोभागसिंग | ७ | यांस शिंदे, होळकर भोपाळकडून वार्षिक रु. ४२५० मिळायचे. |
| ८ | राव भेरूसिंग | ८ | यांस शिंदे, होळकर, भोपाळकडून वार्षिक रु. ६४४९ मिळायचे. |
| ९ | मुकुंदसिंग | ९ | यांस शिंदे, होळकराकडून सालिना रुपये १५४० मिळायचे. |
| १० | अनुपसिंग | १० | यांस शिंदे आणि होळकराकडून सालिना रुपये ८५२ मिळायचे. |
| ११ | सालमजी, हटेसिंग | ११ | शिंदे, होळकर, भोपालकडून सालिना रु. ३४२६ मिळायचे. |
| १२ | साहेबसिंग | १२ | फक्त होळकराकडून सालिना रु. ८०० मिळणें. |
| १३ | राव अचलसिंग | १३ | ,, ३५० मिळणें |
| १४ | सांवतसिंग | १४ | ,, १००० ,, |
| १५ | नाहरसिंग | १५ | ,, १९० ,, |
| १६ | सालमसिंग | १६ | गवताचे हक्काबद्दल जमीन सारा कमी केला. |
| १७ | प्रतापसिंग | १७ | फक्त होळकराकडून रु. ९६० सालिना. |
| १८ | गुलाबसिंग | १८ | ,, ६०० ,, |
| १९ | नवलसिंग | १९ | ,, ४० ,, |
| २० | गिरवरसिंग | २० | ,, ४३० ,, |
| २१ | हाटेसिंग | २१ | ,, १६०० ,, |
| २२ | राव रतनसिंग | २२ | ,, ११५० ,, |

होळकर सरकार आणि धार सरकार यांजमध्यें बिजोड आणि देपालपूर सन्निध असलेल्या कांहीं जमिनीबद्दल प्रश्न उद्‌भवला. सीमेचा प्रश्न सुटण्यास कठीण जाऊं लागला तेव्हां ही जमीन मालकीची न ठरवितां गोचराई म्हणून सोडून देण्याचा ठराव दोन्ही संस्थानांस मान्य झाला.

| | | | |
|---|---|---|---|
| २३. | खुशालसिंग | २३. | हिरापुरचे जहागिरीवर हक्क सांगू लागला. ठरलें की पांच वर्षे पगरस जहागीर ठेवायची. त्यानंतर वार्षिक रु. ६०० होळकर सरकारास द्यावे. ठराव ता.२०-५-१८२० |
| २४. | मोहनसिंग | २४. | याचे वडिलास खेड्यांतील नोकरीस बिघे ३०० जमीन सरकारांतून सुटली होती. |

| | |
|---|---|
| | त्याचे पश्चात जमीन खालसा केली. इ. स. १८२० मध्यें ठरलें कीं बिघे १०० मोहनसिंगास इनाम द्यावे. |
| २५. भिमानसिंग | २५. नादीरसिंगाकडे दुर्जनपुर घाटाचे बंदोबस्ता- साठी खेडी हे गांव ठेवले होते. आतां होळकर सरकारचे मनांतून गांव खालसा करण्याचें आलें; आणि ठराव जहाला तो. खेडी गांव भिमानसिंगाकडे राहवे; पांच वर्षांनंतर रु. ६०१ सालिना सरकारांत भरावे व घाटाचे संरक्षणासाठीं रु. १५० वजा पडतील. |
| २६. परबतसिंग व रघुनाथसिंग, जमीदार शेमरूड | २६. शेमरूड घाटाचा बंदोबस्त ठेवावा. देवी अहिल्याबाईंच्या वेळीं मालावर जो कर वसूल करीत तोच यांनीं करणें. |
| २७. तेजा तडवी | २७. यातडवी (म्हणजे मुख्य) अनुयायांपैकीं सात जणांस होळकर सरकारांनीं नोकरीस ठेवायचे, सात वर्षांनंतर बिघ्यामागें रुपया १ भरणा करावा. मह्, जामचा बंदोबस्त ठेवावा. जबाबदारी त्याजवर. ठराव ता. २५-१-१८१९ |
| २८. भिमान तडवी | २८. सिमरोल घाट आणि सिंगवर यांचा बंदोबस्त करणें. |
| २९. राव भेरोंसिंग गोंड | २९. हिरापूर आणि त्याजवर अवलंबून असणारे गांव होळकर सरकारकडून मिळावे. फसली १२३५ नंतर वार्षिक रु. ६०० सरकारांत भरावे. |
| ३०. ठाकूर रघुनाथसिंग | ३०. गोगुमे आणि बीसखेडी होळकर सरकाराने देणें. सन १२३० फसली नंतर वार्षिक १५०० रुपये सरकारांत त्यानें भरावे. |

येणेंप्रमाणें रजपूत जुने नवे, भिल्लाळे व भिल्ल आणि गोड इत्यादिकांचा, ब्रिटिश सरकारचा सल्ला घेऊन, मध्यस्थीनें, बंदोबस्त तात्यांनीं केला. हा सर्व प्रकार इ. स. १८२० डिसेंबरचे आंत संपूर्ण झाला. राज्याचे पोटांत शांतता स्थिरावली; मारामारी, लुटालूट, यांस आळा बसला; आणि लोकांची दिलजमाई होऊन शेतीकडे व उद्योगधंद्याकडे निर्धास्तपणें लोक अंगमेहनत करूं लागले.

ज्याप्रमाणें, शेतकऱ्यांची व पूर्वीचे इनामदार व जमीदार यांची स्थिरस्थावरता मालकमसाहबांचे सल्ल्यानें व सहायानें तात्यांसाहेबांनीं घडवून आणिली, त्याचप्रमाणें दुसरी ही एक महत्त्वाची गोष्ट राज्यकारभारांत तात्यांनीं घडवून आणली. आम्हां हिंदु-लोकांमध्यें माणसांची गणती करण्यास मन कचरते. घरातली स्त्री-पुरुषांची संख्या व उत्पन्नाचा आकडा बाहेर न फुटेल तितके बरे असें वाटत असते ही आजची स्थिती. तर शंभर सव्वाशें वर्षांखाली जनतेची वृत्ती यासंबंधात किती नाजूक असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. पण त्या स्थितींतही तात्यांनीं सर्व संस्थानची शिरोगणती घडवून आणली. राज्यकारभारातले हे अंग सुव्यस्थित राज्य चालण्यास व प्रगती घडवून आणण्यास किती आवश्यक आहे हे सांगावयास नको. ही शिरोगणती परगणेवार नमूद आहे. ती खाली देतो.

| अ.नं. | परगण्याचें नाव | | | गांव, कसब्याची संख्या | | लोकसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | महतपूर | .... | .... | २१३ | .... | ४४१०१ |
| २ | माचलपूर | .... | .... | ५६ | .... | १२१६२ |
| ३ | रायपूर | .... | .... | २१ | .... | ६४८३ |
| ४ | देपाळपूर | .... | .... | १३९ | .... | ३४३१० |
| ५ | जिरापूर | .... | .... | ६४ | .... | १२०७३ |
| ६ | हासलपूर | .... | .... | १७ | .... | २५३८ |
| ७ | सुनेल | .... | .... | २६ | .... | ८४७१ |
| ८ | सावेर | .... | .... | १०८ | .... | २२८६४ |
| ९ | सुंदरशी | .... | .... | ११ | .... | ५४१६ |
| १० | बेटमा | .... | .... | ४२ | .... | ७६१७ |
| ११ | इंदूर | .... | .... | १८५ | .... | ४१४६१ |
| १२ | शहर इंदूर | .... | .... | १ | .... | ६३५६० |
| १३ | होळकरांची छावणी | | .... | ० | .... | २०००० |
| १४ | कायथा | .... | .... | २२ | .... | ६६१८ |
| १५ | नंदवाई | .... | .... | २३ | .... | १९३८ |
| १६ | सोनारा | .... | .... | ८ | .... | ५१३३ |
| १७ | भानपुरा | .... | .... | ४९ | .... | १३४०६ |
| १८ | तराणा | .... | .... | १४१ | .... | २६१७१ |
| १९ | रामपुरा | .... | .... | ४६४ | .... | ७३४८९ |
| २० | नारायणगड | .... | .... | ४९ | .... | २२५७७ |
| २१ | काटकूट | .... | .... | १२ | .... | ४८६ |
| २२ | महू छावणी | .... | .... | १ | .... | १३००० |
| २३ | मालवा आणि दक्षिण छावणी | | | ० | .... | २७३१ |
| २४ | महेश्वर | .... | .... | १४ | .... | ११४८६ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २५ | चोळी | .... | .... | ५ | .... | १४३६ |
| २६ | खरगोण | .... | .... | ५६ | .... | १९०९२ |
| २७ | चेनपूर | .... | .... | २९ | .... | २२०१ |
| २८ | बलवाडा | .... | .... | २९ | .... | ३९७५ |
| २९ | बासवा | .... | .... | ३५ | .... | २८१८ |
| ३० | महमदपूर | .... | .... | २७ | .... | ५३२० |
| ३१ | मरदाना | ... | .... | ११ | .... | १५४८ |
| ३२ | अमलाथा | .... | .... | ८ | .... | ७६९ |
| ३३ | ऊन | .... | .... | १३ | .... | १७१० |
| ३४ | जलालाबाद | .... | .... | ३२ | .... | ४९२५ |
| ३५ | भिकणगांव | .... | .... | १५ | .... | १६९९ |
| ३६ | नागलवाडी | .... | .... | ६ | .... | ९६५ |
| ३७ | बरूड | .... | .... | ११ | .... | ६७६ |
| ३८ | बमनाळा | .... | .... | ४ | .... | ७०८ |
| ३९ | ब्राह्मणगांव | .... | .... | (खुलासा नाही) | .... | ५२७ |
| ४० | धरगांव | .... | .... | ८ | .... | ५६५ |
| ४१ | रसीदपूर | .... | .... | ६ | .... | ६६९ |
| ४२ | सांगवी | .... | .... | ३ | .... | ५६९ |
| ४३ | अकबरपूर | .... | .... | १ | .... | ६३ |
| ४४ | नांदरी | .... | .... | ३ | .... | २३६ |
| ४५ | सरसगड | .... | .... | ३ | .... | २८५ |
| ४६ | आखेपुरा | .... | .... | ११ | .... | ९३६ |
| ४७ | बागदरा | .... | .... | ७ | .... | १४९९ |
| ४८ | नेमावर | .... | .... | २४ | .... | ४४९७ |
| ४९ | राजोर | .... | .... | २४ | .... | ९५३८ |
| ५० | काटाफोड | .... | .... | ३० | .... | ८७०० |
| ५१ | हरणगांव | .... | .... | १६ | .... | १९५७ |
| | | | | ------ | | -------- |
| | | | | १९८१ | | ५,२५,९१४ |

ही शिरोगणती झाली ती अगदी परिपूर्ण झाली असें जरी म्हणतां येत नाहीं तरी प्रारंभ म्हणून ते कार्य अवलोकिलें पाहिजे. दिसून आलेली व्यंगे दर खेपेस दुरुस्त होत जातां जातां ही शिरोगणती राज्यकारभाराचा पायाच झाला आहे. माळव्यांत हल्लींही, विशेष वस्ती हिंदूची व त्याच्या खालोखाल मुसलमानांची. त्यावेळीं जी गणती झाली ती कुटुंबवार

झाली. एकंदर हिंदु कुटुंबे १०७१२७ व मुसलमान कुटुंबे ४९३३, मुसलमानांची संख्या इतकी कमी असूनही त्यांच्या हितसंबंधाकडे व धार्मिक भावना सांभाळण्याकडे सरकारचे चांगलें लक्ष असें. एका लेखांकात मजकूर आहे तो; रुपये ११० सरकारांत ताबूत सालाबाद होत आहे त्याजकडे. तसेच रामपुरा येथील कमाविसदारासपत्र गेलें कीं, हिंदू-मुसलमान या उभयतांचा किस्सा पेशजीपासून चालत आला. हल्लीं त्यांची समजूत ठरली त्यांतील अभिप्राय हिंदूकडील श्रीमारुतीची अर्चा करून देवालयाचा कोट तयार करावा व ब्राह्मणाकडील शिवालय नूतन बांधून द्यावे; व मारुतीजवळील महजीत पाडली ती बांधून द्यावी; व दुसरी महजीत निमाज पढावयास नूतन करून द्यावी. याजला खर्च अडीच तीन हजारपर्यंत लागेल. मुजरा देण्यांत येईल. मारुतीजवळील महजीतींत मुसलमानांनीं जाऊं नये. नवीन महजीतींत जात जावे येविषयीं लेख लिहून घेणें. ही राजनीती आजकालची नव्हे. छत्रपती शिवाजी महाराजांनीं तिचा अवलंब केला होता. श्रीमंत सुभेदार मल्हाररावांनीं श्रीखेडापतीचे प्रकरणात तीच नीती अवलंबिली; आणि तिचेच अनुकरण इ. स. १८३० त झालेले आपणास वरील महजीती प्रकरणी दिसत आहे. माळव्यांत आल्यावर मराठ्यांनीं राजेरजवाड्यांशी 'पगडीबदल भाई', रजपूत राजस्त्रियांशीं राखीबंधन आणि मुसलमानांचा ताबूत या गोष्टींचा अंगिकार करून आपली उदार राजनीती प्रगट केली.

आतापर्यंतचे सर्व वर्णन मालकमसाहेबांच्या अहवालावरूनच नमूद केलें आहे. सरकारी कागदावरूनही जी माहिती मिळते तीही कांहीं उताऱ्यांतून आम्ही त्या ग्रंथांत देत आहोत. त्यावरून तात्यांची नजर चौफेर कशी फिरत होती हे ही दिसून येईल. तसेच सरकारी कामासाठी आधीं पदरमोड करून मागाहून सवलतीनें भरपाई करून घेतली. दानधर्म पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणेंच चालू ठेविला होता. इंग्रज सरकारशीं संबंध घडल्यामुळें मेजवान्या बहुमान यांचे धोरण, कोल्हापूरचे जगदगुरू इंदुरीं येतात त्यांचा बहुमान; माहूर क्षेत्रीची देणगी; गांवें उद्ध्वस्त झालेली आबादी करण्याबद्दल अभयपत्रें. गढ्या जीर्ण झालेल्या परत बांधविणें; कोंच परगणा होळकर सरकारकडे आलेला एका लेखांकावरून दिसतो. (ता. २३-१२-१८२४) अज सरकार मल्हारराव होळकर. ता. पाटील पटवारी मौजे धमोरी ऊर्फ उमरी प्रगणे कोंच. रा.बळवंतराव गोपाळ याजकडून विदित झालें कीं मौजे मजकूर संसार बेगमीस आम्हाकडे चालू आहे. सरकारी पत्र बुंधेल्याचे कागदपत्र होते ते गहाळ झाले. वहिवाट मात्र चालू आहे. तरी नवीन सनदपत्रें करून दिल्ही पाहिजे. त्यावरून ''श्रीमंतांनीं सनद सादर केली'' म्हणोन. या सर्वांवरून होळकर सरकारची दानत उदार दिसते; नबाब मीरखान हे होळकरांनीं वाढविलेले. तहानंतर कांहीं भाग त्यांस मिळाला असें असतां कांहीं इनामासंबंधीं होळकरांनीं लिहिलें असतां मानलें नाहीं.

अशा स्थितीत होळकरांनीं आपला शब्द राखणेकरितां दुसरें गांव देऊन शब्द राखला. (याजबद्दल सर्व पत्रव्यवहार ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या ग्रंथांत आपल्यास पहावयास मिळेल.)

रोजकीर्दीचा उतारा इ.स.१८२१ चा नमुना म्हणून आम्ही खालीं देत आहोंत.

३२४५३२ ऐनजमा महालानिहाय चौथे हप्त्याबद्दल सरकारांत येणें विद्यमान विठ्ठल महादेव.

चैत्र शुद्ध १५ कमाविसदारा मार्फत.

| | | |
|---|---|---|
| ३२६६९ | परगणे इंदूर मार्फत सदरूदीन हवालदार. | |
| ६३६२ | सरकार बिजागड, विद्यमान माधवराव गणेश कमाविसदार. | |
| ५८७५ | परगणे बेटमे. वि.चिटको बल्लाळ कमाविसदार. | |
| १०९६३ | '' | तराणे आबाजी बळवंत कमाविसदार. |
| १२७७८ | '' | सावेर विद्यमान भिकाजी नारायण कमाविसदार. |
| ३३८७१ | '' | महतपूर विद्यमान बाळाजी गोपाळ निसबत कमाविसदार, |
| १३१०१ | '' | जिरापूर, माचलपूर विद्यमान बळवंत अप्पाजी कमाविसदार. |
| ४१२१ | '' | रायपूर विद्यमान माधवराव रामचंद्र कमाविसदार. |
| ४३५८ | '' | संधारे विद्यमान मल्हार बाबाजी कमाविसदार. |
| १५१४९ | '' | नारायणगड विद्यमान त्रिंबकराव काशी कमाविसदार. |
| ८०२१० | '' | रामपुरा विद्यमान लक्ष्मण केशव कमाविसदार. |
| ११३२५ | '' | चंदवासा. विद्यमान गोविंदराव गंगाधर कमाविसदार. |
| ९२०० | '' | नेमावर पंचमहाल हरणगांव, काठाफोड वगैरे. विद्यमान धोंडो जनार्दन ४४५३ कमाविदार. भगवंतराव मल्हार ४७४७ कमाविसदार. |
| ११८३ | तालुके चोळी विद्यमान बापुजी विठ्ठल निसबत कमाविसदार. | |
| ३४४२७ | परगणे देपाळपूर विद्यमान कृष्णाजी विठ्ठल कमाविसदार. | |
| ५०२५ | '' | तालुके झार्डा, कंजार्डा, जामुन्या विद्यमान केशवराव कमाविसदार. |
| १४२६ | '' | परगणे सुंदरसी. विद्यमान बापुजी कृष्ण कमाविसदार. |
| १०५०० | '' | खासगी देहायपैकीं वसूल विद्यमान भिकाजी नारायण कमाविसदार. |
| ८०० | '' | परगणे हासलपूर विद्यमान चिटको बल्लाळ कमाविसदार. |
| ६००१ | '' | तालुके कोठडी विद्यमान बापुजी पांडुरंग कमाविसदार. |
| ५२५० | '' | परगणे सुनैल. विद्यमान राजाराम बल्लाळ कमाविसदार. |
| ९३५० | '' | संस्थान नरसिंगगड विद्यमान जनार्दन मोरेश्वर कमाविसदार. |
| ८००० | तालुके आलमपूर, सालवण विद्यमान माधवराव बल्लाळ कमाविसदार. | |
| २५६३ | परगणे कायथे विद्यमान गोपाळराव कृष्ण कमाविसदार. | |

--------

३,२४,५३२

सदरहू तीन लक्ष चोवीस हजार पांचशें बत्तीस रुपये शिक्का महालचलण, विठ्ठल महादेव यांजकडे रदकर्ज ऐवजीं लिहिणें असें.

राजश्री विठ्ठलपंत तात्यांची कारकीर्द पुढें चालू :

कागदोपत्रीं तात्या जोग या नावानें इंदूर संस्थानच्या दरबारांत व ब्रिटिश सरकारच्या तत्कालीन पत्रव्यवहारांत प्रसिद्ध असलेले या गृहस्थाचें खरें नांव विठ्ठल महादेव किबे असें आहे. हे कऱ्हाडे ब्राह्मण यांच्या मोर्तबावरून एकवीरा देवी यांची कुलदेवता असावी, असें दिसतें. पुढें श्रीगणेशाची स्थापना व पूजा कुलदैवत म्हणून झाली असावी. कऱ्हाडे ब्राह्मणांत देवी व श्रीगणेश हीं दोन्हीही दैवतें बहुतेक कुटुंबांत आढळतात.

श्री देवी अहिल्याबाईसाहेब यांच्या कारकीर्दीत महेश्वर येथें हरी सदाशिव जोग यांची मोठी पेढी होती. या जोगांच्या पेढीवर बाळाजी महादेव व विठ्ठल महादेव किबे हे उभयतां बंधु कारकून होते. हरी सदाशिव जोग यांजकडे श्रीमंत सरदार बुळेसाहेब यांच्या वतीनें दोन वेळा झाबवा व नरसिंगगड ह्या दोन्ही ठिकाणचे मामले होते. अशा तऱ्हेनें कारकुनी व कमाविसी या दोन्ही कामांत हे दोघे किबे बंधु प्रविष्ट झाले होते. कालांतराने महेश्वर मुक्कामीं श्रीमंत यशवंतराव महाराज हे फौजेनिशीं आले, तेव्हां बाळाजी किबे यांस सांगितलें कीं, तुमचे कनिष्ठास आमचे समागमें द्यावे. तेव्हां वडील बंधु म्हणाले ''हाजर आहे.'' परंतु यांनीं बाहेरवास पाहिला नाही, आपण यांचा सांभाळ करावा. महाराजांनीं कूच होणें समयीं तात्यांस समागमे घेतले. याप्रमाणें तात्यांचा राजद्वारीं प्रवेश झाला.

यावेळीं होळकर सरकारांत दोन तीन कंपू पलटणाचे होते. त्यापैकीं फूलन कंपूत तात्यांचा प्रवेश झाला. त्यावेळीं तात्यांनीं हिशेब वगैरेची माहिती तर मिळविलीच पण आखून दिलेल्या कामाबाहेरही लष्कर खात्याची अंतर्बाह्य माहितीही संपादिली. फुलनसाहेब गेल्यावर त्या कंपूचें काम वर्दी रपोट सारी कामें तात्यांसाहेबांकडे आली म्हणोन सरकारांतून ऑफिसर लोकांस हुकूम झाला. सारांश, ज्या खात्यात कारकून म्हणोन तात्या प्रविष्टले त्या खात्याच्या प्रमुखपदावर ते तात्यासाहेब म्हणून आरूढले.

शिंदे होळकरांचे युद्ध उज्जेनी, इंदूर या प्रांतांत अधूनमधून चालले होते. या युद्धांत तात्या हजर असत हे सांगणें नकोच. तेथून श्रीमंत होळकर दक्षिण प्रांतीं पुण्याचे बाजूस वळले. होळकर पुण्यास येतात हे वर्तमान श्रीमंत पेशव्यांस समजतांच श्रीमंत शिमरूचीं पलटणें पुण्यास ठेवून आपण पळाले. ते वेळेस जी लढाई झाली त्यावेळी फूलन कंपूचें काम तात्यांसाहेबांकडेच होते. त्या कंपूचे तोफेजवळ तात्यांसाहेब यांनीं उभे राहून लढाई चालविली. तेव्हां या कंपूची मार (मारा) जास्ती होऊन तोफेसी तोफ भिडावयाचा सुमार आला. तात्यांनीं सरकारास (होळकरांस) निरोप पाठविला कीं आमचें लढाईचें काम झालें. आतां स्वारांचे काम आहे. सरकारांनीं स्वारांस हुकूम द्यावा. श्रीमंत यशवंतराव महाराज कंपूजवळ आले आणि काम पाहून तात्यांसाहेबांस शाबासकी दिली. होळकरांचा विजय होऊन पुण्यात मालक कोणी राहिले नाही. पुण्याहून निघून श्रीमंत यशवंतराव महाराज परत माळव्याकडे वळले व तेथून उत्तरेस पंजाबापर्यंत गेले ही सविस्तर हकीगत मागें येऊनच गेली आहे. इ. स. १८०५-०६ त श्रीमंत महाराज होळकर आणि ब्रिटीश सरकार यामध्यें

दोस्तीचा तह झाला त्यावेळीं बाळाराम शेट हे कर्ते मुत्सद्दी होते. तेव्हांपासून त्यांच्या मृत्युकालापर्यंत बालाराम हेच अग्रगण्यांमध्ये मोडत असत. इ. स. १८११ त श्रीमंत यशवंतराव महाराज कैलासवासी झाले आणि त्यांच्या पश्चात त्यांचे चिरंजीव श्रीमंत मल्हारराव दुसरें गादीवर आले. ते अल्पवयस्क असल्यामुळें तुळसाबाई ह्या बाळारामांच्या विचारानेच प्रथम प्रथम कारभार पाहत होत्या. त्यावेळीं मुख्य दिवाण गणपतराव नारायण होते. त्यांच्या व्यतिरिक्त तात्या आळेकर, कुशाबापु बक्षी, सदरदीन हवालदार, वामनदाजी फडणीस,पागनीस दिनकरराव व अमीरखान ही मंडळी कारभारांत वावरत होती.

श्रीमंत मल्हारराव महाराजांचे लग्नाचा विचार इंदुरास करण्याचा होऊन बाळाराम शेट वगैरे मुत्सद्दी व श्रीमंत तुळसाबाईसाहेब यांनी तात्यांस सांगितलें कीं लग्नकार्य आलें. याला ऐवजाची मिसल तुम्ही लावावी. तात्यांनीं कार्यसिद्धी घडवून आणली आणि तेव्हांपासून त्यांची गणना मुत्सद्यांत होऊं लागली.

ह्या पुढील हकीगत म्हणजे होळकरशाहीवर आलेल्या अभ्रांची मालिकाच होय. दिवाण नांवाचेच राहिले. अमीरखान व गफूरखान पोरांचे थोर होऊन मुळावरच उठले. सैन्यांत हिंदु, मुसलमान, घोडदळ, पायदळ, बारभाई पागा अशा अनेक चिंधड्या होऊन, बसल्या पैशास ठिकाण कोठेंच नाहीं. एकमेकास खाण्यास उठले. अशा समयीं पेशव्यांकडून इंग्रजांविरुद्ध बोलावणें येतांच तात्पुरती एकी झाली. तुळसाबाईचा वध झाला. दिवाणास व तात्यांसाहेबांस पहाऱ्यांत ठेवण्यापर्यंत लष्कर उद्दाम झालें होतें. सावरता कोणीच राहिला नाही. शेवटीं होळकरांचे सैन्य हार गेले. तेव्हां मासाहेबांनीं तात्यांस बोलावून सांगितले ''आतां तुम्ही राज्याचा बंदोबस्त अंग्रेजाशीं भेटून तह करून हे राज्य कायम करून तुम्हांवेगळें कोणी नाहीं.'' याप्रमाणें तात्या प्रमुख पदावर इ. स. १८१८ त आले. त्या वेळेपासून त्यांनीं राज्यकारभाराच्या निरनिराळ्या शाखांतून कोणकोणती कामगिरी केली हे मागें सविस्तर आलेच आहे. तात्यांच्या मदतीने मालकमसाहेबांनीं केवळ होळकरशाहीचाच नव्हे पण माळव्यांतील व राजपुतान्यांतील राजेरजवाडे यांचा बंदोबस्त करून दिला.

होळकरशाहीच्या ऐन पडत्या काळात लाखो रुपयांचा सावकारी जिम्मा घेऊन व त्यांचा भरणा करून, बेदील झालेल्या फौजेच्या धरण्यापारण्यांतून मुत्सद्यांस व राजघराण्यास मुक्त केलें. महतपूरच्या लढाईत दौलत बरबाद होण्यात कसर राहिली नव्हती, अशा स्थितीत तात्यांनी सोहलतीचे पोटी दौलत पुनः उभी केली. इ. स. १८१८ त कमाल जमाबंदी रुपये २०,००,००० ची तर खर्च रुपये २५,००,००० चा, इ. स. १८२६ त रुपये ३२,००,००० वर उत्पन्नाचा आकडा चढला. जी दौलत त्यांनी उभी केली ती डौलदार, इभ्रतदार, सर्वांस आनंददायी आणि मंगलकारक करून दिली.

निरनिराळ्या पेठा, गंज, पुरे, बाजार वगैरे बसवून सांप्रतच्या पण त्यावेळीं नव्या असलेल्या इंदूर राजधानीची मांडणी तात्यांचे हातची आहे. आज शहरांत असलेला जुना राजवाडा आणि त्याचप्रमाणें त्यांचा स्वतःचा जुन्या राजवाड्याच्या पिछाडीचा वाडा त्यांच्या देखरेखीखाली उभे राहिले. इ. स. १८२१ च्या ताळेबंदास दसरा पोशाख

सालाबादी या सदरांत रुपये ७६० खर्ची पडून त्याचा तपशील येणेंप्रमाणें दर्शविला आहे. रु.३५२-११-० खुद्द विठ्ठल महादेव आणि बाकीची रकम त्यांचे हाताखालील कारकुनास दिली. ह्याच साली खालील रकमा सरकारांतून दिल्या गेल्या.

| | |
|---|---|
| १८९-६-० | विठ्ठल महादेव यांस पुत्र झाला सबब कापड वगैरे सरकारांतून. |
| ५१७५-३-९ | दिवाळीची ओवाळणी. |
| ७५-०-० | सौभाग्यवती गंगाबाई, विठ्ठल महादेव यांची कन्या मोहरा ५ |
| २७९०-१४-३ | कन्येस पुत्र झाला माहे मार्गशीर्ष, संमत १८७९ (इ.स. १८२२) |
| १५८-१२-० | इ.स.१८२२ त विठ्ठल महादेव यांचे कन्येस पुत्र झाला. (साखर घेऊन आलेल्या मंडळीस वस्त्रें.) |
| १७७०-१३-० | गडगनेर खर्च इ. स. १८२४ विठ्ठल महादेवांची कन्या जीजीबाईचें लग्न झाले त्याजकडे. |

सारांश, तात्या कारभाराचें काम करीत असतां त्यांजवर राजघराण्याचे प्रेम व आपुलकीची भावना ही किती वाढली होती हे या वरील जमाखर्चावरून लक्षांत येण्यासारखें आहे.

याप्रमाणें पांच-चार वर्षे राजास राज्य व प्रजेस सुखसमाधान असें चालले. इ. स. १८२६ चे माघमासीं तात्यांचे पाठीस फुटकलीं झाली. त्याचा उपाय करताना गुणावह न होतां दिवसेंदिवस अधिक होत चालले. छावणीतील डाक्टर उपाय करीत होते. त्यानें छावणींत हवा खाण्यास नेले. एक दिवस तेथें होते. तेथें कांहीं प्रकृतीस ग्लानी विशेष आढळून आली. तेव्हां फाल्गुन वद्य ५ प्रातःकाळीं घरास आले. घरी येतांच सर्व प्रायश्चित्तपूर्वक तुळा केली. तों शरीर व्यापून अवसान काल प्राप्त झाला. पंचमीस अर्धरात्रीचे समयी दत्तक घ्यावा असें ठरवून, लेकीचा मूल घ्यावा असें मासाहेब महाराज, दरखदार, सरदार, आश्रित, शास्त्री, पुराणिक वगैरे अवघे बोलावून सर्वानुमते निश्चयांत आणून, सूर्योदयात प्राक दत्तविधान होऊन मुलगा मांडीवर घेतला. नंतर वद्य ६ दीड प्रहर दिवस चहडतां देहावसान झालें. नंतर बडेसाहेब आले. त्यांनीहीं बहुतच गमी मानली. तात्यांसारखा माणुस गेला. आमची भेट झाली नाही. त्यांसंधीत बाईनें सहगमनाविषयीं आग्रह विशेष केला. मग मासाहेब व बडेसाहेब यांनी खात्री केली तेव्हां महकूब होऊन दहन केलें.

याप्रमाणें, कारकून, पेढीचे व्यवस्थापक व अखेरीस राज्यकार्य धुरंधर होऊन पन्नासीचे आंतच तात्यांचे देहावसान झाले. त्यांच्यासंबंधी अधिक माहिती मिळावयास पाहिजे. पण जी थोडी बहुत दरबारी व इंग्रेजी कागदावरून मिळाली आहे तीवरून देखील त्यांची योग्यता मोठी ठरते.

मराठेशाहीतील राजनीती कर्ते रामचंद्रपंत अमात्य आपल्या लेखनांत चौथे प्रकरणीं सकल नृपकार्य उल्लेखून म्हणतात. ''परंतु केवळ नृपानें स्वतःच कांहीं धंदा करीन म्हणता होतो असें नाहीं. याकरितां हा सकल राज्यकारभार चालववया कारणें आपले प्रतिनिधी प्रधान करावे लागतात. हे प्रधान म्हणजे इहलोकीं राज्यकृत संपादनामुळें नृपांची विश्रांत,

धर्मप्रतिपालनामुळें परलोकपंथीची दीपिका, तद्नुरूपच यथोक्त नृपगुणतुल्य प्रधानाचे गुण असावे. प्रधान म्हणजे कुलीन, कृतकर्मे, कार्याकार्य विचक्षण, शास्त्रज्ञ, राजधर्म-विशारद, पापभीरु स्वामी सेवक भाव जाणून वर्तेत, देवतैकनिष्ठ, दर्शनीय सदय, शूर, सधैर्य, समंजस, स्फुटवक्ता, निरालस्य, निर्व्यसनी, निष्पाप, पुण्यशील, उद्योगशील, अतीत-अनागत कार्यसूचक, अलालुची, अहिंसक, सामदाम भेददंड संधीविग्रह मित्रभेद मित्र संधानादि अनेक उपाये शत्रुसंधानी चतुर इत्यादि गुणसंपन्न असें पाहून त्यांस प्रधानकी सांगांवी.'' रामचंद्रपंत यांनीं पंचेचाळीस वर्षेपर्यंत मराठेशाहीची सेवा करून ती तगविली. स्वानुभवानें व स्वउदाहरणानें राजनीती लिहिली. त्यांचे वेळी व त्यांचे पश्चातही ही प्रधानपरंपरा कोणत्याही राजवटीस शोभणारीच झाली. श्रीछत्रपती शिवाजी महाराजांचे अष्टप्रधान, पहिले चार पेशवे, नाना फडणवीस, ग्वाल्हेरचे जिवबादादा, नागपूरचे कोल्हटकर यांच्याच पंक्तीत बसण्याची तात्यांची योग्यता आहे ही सर्व मंडळी ''अशी मशी जीवी''(कलम बहादूर व तलवार बहादूर) अशी होती. नानाच मात्र थोडे अपवादक होते, पण त्यांची लंगडी बाजू होळकर, शिंद्यांनीं सावरून धरली होती. इंग्लडच्या इतिहासांत ''इंग्लिश स्टेटसमेनसेरीज'' निघालेली आहे. त्याच धर्तीवर वर निर्दिष्ट केलेंल्या एतद्देशीय राज्यकार्य-धुरंधरांची माला शोभण्यासारखी आहे. अस्तु. तात्यांचे गुणांचे आता निराळे वर्णन करण्याचे प्रयोजन नाही. वरती निर्दिष्टलेल्या गुणांपैकीं बहुतेक गुण त्यांच्यांत होते.

मंदसोरचा तह झाल्यावर होळकरशाहीच्या व्यवस्थेसंबंधांत जो पत्रव्यवहार तात्यांनीं केला त्यांत त्यांची कुशलता दिसून येते. पैशापेक्षा मान, दर्जा आणि कौटुंबिक अभिमान यांस पायरीपायरीनें अधिक मानून दक्षिणेतील होळकरांचे हक्क शाबूत राहतील अशी दक्षता घेतली. मालकमसाहेब अगदीं गोड स्वभावाचे, पण तात्यांची चिकाटी त्यांना अति जिकिरीची वाटली. मागण्यामध्यें देखील तात्यांनीं तरतम भेद ठेविलाच होता. त्यांत पहिल्यांदा खानदेश आणि दक्षिण येथील जहागिरी इनामाबद्दल उल्लेख केलेला आहे. त्याचप्रमाणें होळकरांच्या आप्त इष्टांस दिलेल्या देणग्यांबद्दल तात्यांनीं आग्रह धरला आहे. खासगी ही स्त्रीधन म्हणून राखिलीच पाहिजे आणि शेवटी कांहीं देणग्या अशा नमूद केल्या आहेत कीं त्यांबद्दल दरबार तटस्थ राहील, ज्याचे त्याने पाहून घ्यावे. ही सबंध यादी आम्ही पुढें सादर करीत आहोंत.

तात्यांस त्यांचे हयातीतच ता. १४ मार्च सन १८१८ रोजीं जी सनद दिली आहे तींत खालील शब्द आहेत.''तुम्ही सरकार चाकरीचे उपयोगी, पहिलेपासून पदरचे, तुमचे हातून कंपनी इंग्रेजबहादूर यांजकडील मसलत समेटांत होऊन दौलतीस उपयोग बहुत पडला सबब मौजे राऊ परगणे इंदूर व मौजे बनड्या हे दोन गांव इनामी दिले आहेत. वगैरे.'' तात्यांचे नांवें इंदूर महालांत जुन्या इंदुरात श्रीऋख्मेश्वर महादेव या नांवाचें मंदिर असून एन्डाउमेंट डिपार्टमेटकडून त्यांस वार्षिक नेमणुक रुपये १२६-९-० ची आहे.

जी यादी इंग्रेज सरकारकडे पाठविली तींत तरतम भेद दाखविला. ती खाली देत आहोत. तात्यांचें जेवढें वर्णन शक्य होते तेवढें कागदपत्रांचे सहायाने केलेंच आहे.

तह झाल्यावर पुण्याहून दिगर वगैरे गांवांची यादी आली तीपैकीं गांवाचें बोलणें व न बोलणें. याजबद्दल सु।। आशरीन मयातेनवआलफ सन १२२९ फसली माहे जिल्काद ऊर्फ भाद्रपद मास छ.४ मुक्काम इंदूर.

४५ सरकार खासगी व धर्मादाय अन्नसत्राकडे वगैरे.

१ परगणे उत्राण श्रीजेजुरीकडे मार्तंडाचे खर्चास.

६ स्वारीतील अन्नसत्राकडे, १ प्रगणे सेवगांव, ५ न्याहळोद वगैरे देहपांच

१ मौजे बोहली श्रीपंढरपूरचे अन्नसत्राकडे.

१३ कितागांवे १३ सरकार वहिवाटीस वाफगांव वगैरे देह ९ पिसोर ४.

२४ खासगीकडें ३ आडगांव वगैरे, १ जामगांव, १० प्रगणे थालनेरपैकीं, १ काठापूरपैकीं, १ प्रगणे वेरूल, १ सिहूर, १ धोधलगांव, ४ कापूस वडगांव वगैरे व १ कोरहाळेपैकीं कलवड, १ प्रांत कर्नाटक मलीकवड.

......

४५

महाल तीन ३ व देह बेचाळीस ४२ चालू आहेत १७ वाफगांव वगैरे ९ व आडगांव वगैरे ३ केलवड १ पिसोर ४ एकुण १७ चालू होणें. २८ ते महाल ३ तीन व देह २५ पंचवीस येकुण ४५.

७ सरकारांत खासगीकडे करून घ्यावयाचे. सरकारांत वहिवाट न झाल्यास साहेबाकडे वहिवाट रहावी. ते :

२ सकेप व नांदूर सिंगोटे बजाबा व श्रीपतराव मैराळ याजकडे आहेत. ते सरकारांत वहिवाटीस राहावे. हे नच झाले तर साहेबाकडे वहिवाट रहावी. उभयतांस देण्याचे कारण नाही.

२ प्रगणे पाटोदेपैकीं निंबोण, रायपूरगांव बारगळाकडील. सरकार वहिवाटींत आले तर सोडवावे.

१ म्हाळूंगे इंगळे यांजकडे होते तें.

१ आस्तगांव जोतीहून कडील सरकार वहिवाटीस करून घ्यावे. त्यांजकडे राहू नये.

१ मौजे वडांगली तालुके देपूर मानभावाकडेस.

.....

७

३० सरकारचे आप्त मंडळी व कारकून व धर्मादाय वगैरे दिगर गांवे आहेत ती ज्याची त्यांस देवविण्याची. ह्या गांवाबद्दल सोडविण्याचे बोलणें बोलावें.

३ भीमाबाई बुळे प्रगणे चांदवडपैकीं रूई १, महारखेडे १ व देवगांव

१ जिवाजी फणसे मौजे नांदुर्डी चांदवडपैकीं

२ गणपतराव नारायणः कायथगांव चांदवडपैकीं १ व शेवगांवपैकीं १

१ इसरदीन हवालदार देपूरपैकीं

१ सैयद बाडे देपूरपैकीं सुरेगांव

१ पांडुरंग सदाशिव सुपेकर टाकळी प्रगणे अंबाड

१ जांबळी (नंदुरबार) गोपिकाबाई होळकर

१ पायेगांव वाघमारे

१ सटवाजी देशमुख सीरूड (सुलतानपूर)

१ जनकोजी लाभांते रूई (अंबाड)

१ खंडो महादेव करसूल (चांदवड)

१ अंबाराम शास्त्री (मालसा)

१ दिनकर भिवराव पागनीस तीथपुर आंबाडपैकीं

१ गिरमाजी व्यंकटेश फडणीस कालदे नंदुरबारपैकीं

३ बालाराम अगरवाले; काष्टी, चंदनपुरी व वडेल

६ धर्मादाय चांदवडपैकीं : १ पिंपल दाजी पुराणिक, १ जळगांव, सदाशिव भट उपाध्ये, १ बोपावेर, वेणीमाधव पुराणिक,

१ सरवाल (नंदुरबारपैकीं) रामचंद्र भट उपाध्ये १ बलवेड सिताराम शास्त्री, (थाळनेरपैकीं) व सीवणगांव अयाचित बाबा येकुण सहा

१ राणोजी सानफा. लारह (देपूर)

१ फणसे निफाड व कसनगांव चांदवडपैकीं

१ रघुजी होळकर (कनसुरे)

येकुण ३०

५२ तेथें सोडावयाविसी बोलावयाचे कारण नाही. ज्याचे ते परभारे बोलून आप आपले गांव सोडवितील १ सांगवी मावशीबाई, १ बाबाजी गोसावी, १ सदाशिवभट, १ माधवराव दिक्षित, १ भास्करभट, १ जीवनराम वैद्य, १ गोपालभट अग्निहोत्री, ३ पूर्णपात्री विनायकभट, १ बापुभट दशपुत्रे, १ बाबाजी सिद्ध, १ ताहराबादकर गोसावी, १ तिमया गोसावी, १ आत्माराम गोसावी, १ चिंचवडकर देव, १ भारदे गोसावी, १ भानुदास गोसावी, १ अष्टावधानी बुवा, १ रामचंद्र गोसावी, १ दीक्षित रामदास स्वामी, १ अमृतरायजी, १ झुंग्याचा मठ, १ महंत खुशालगीर. १ गोसावी बाबा. १ बैरागी किसनदास, १० फकीर लोकांकडे, १ व्यंकटनरसी, १ बुळेजाहूर, ३ मतकर, २ माधव निराजी, १ नारायणराव भागवत, १ ढमढेरे तळेगांवकर, १ सिवराम हरी, १ आत्माराम सिवराम, १ चंद्रसिंग राऊळ, १ पुरंधरे, १ खांडजोशी, खंडागली, १ ताथवडीकर भैरवाकडे वैजापूर,

येकुण ५२ जहागिरी :

२३ महालचे पोटांत दुमाले गांव आहेत. ते महाल सुटल्यावर देणें ते सरकारांतून होईल तीन महालपैकीं प्रगणे उत्राणपैकीं देह ११. प्रगणे शेवगांवपैकीं देह ११ व वेरूळपैकीं देह १.

.....

१५७ एकशें सत्तावनपैकीं महाल ३ गांवें १५४

**होळकर सरकारचे हुजूर फडणीसी रेकार्ड**

ह्याप्रमाणे तात्यांचे कामगिरीचें वर्णन सादर केलें असें. आता त्यांच्या वंशजांची माहिती, त्यांचे सरकारांतून झालेले गौरव वगैरे बाबी यथावकाश कालानुक्रमाने पुढें येतीलच.

आतां हे प्रकरण येथेंच पूर्ण करून पुढील कारकीर्द पाहूंया.



**प्रकरण १६ वें**

---

# इ. स. १८२६ ते १८३३ व श्रीमंत मार्तंडराव होळकर हे गादीवर आले त्यांची कारकीर्द, ता. १७-१-१८३४ पासून

मागील प्रकरणांत तात्यांची कामगिरी व कारकीर्द येऊन गेली. मराठेशाहीचें रूपांतर झालेलें आपण पाहिलें. होळकर राजवट मराठेशाहीचें एक विशिष्ट अंग म्हणून जन्मास आली. एक शतकभर ती कामगिरी यथाशक्ती व यथामती बजावली. या राजवटीची अंगें व उपांगें मागील भागांत आपण पाहिलीं. शास्ता कोणी न राहिल्यामुळें बजबजपुरी माजली. ही झाली घरची स्थिती. मराठेशाहीचे प्रमुख चालक कर्तव्यपराङ्मुख झाले. त्या शाहीच्या इतर अंगांतूनही पूर्वीचें तेज राहिलें नाहीं, मुख्य ''पेशवाई'' अस्तंगत झाली. त्या वेळीं होळकरशाहीही अस्तंगतच व्हायची. पण पूर्व पुण्य उभे राहून कालानुरूप योग्य कर्ता पुरुष पुढें उभा राहिला आणि पडती इमारत त्यानें सावरून धरली. इतकेच नव्हे; तिच्यांत डागडुजी करून नवजीवन ओतले. सारांश, होळकर राजवटीचे गंडांतर दूर करणारा तो धन्वंतरीच भेटला असें म्हणतां येईल. शब्दार्थानें आणि लाक्षणिक अर्थानेंही हें सत्य आहे की तात्यांनीं होळकरांचे देव देव्हाऱ्यांत बसविले. ते तात्या आपलें कार्य उरकून इ. स. १८२६ त स्वर्गवासी झाले.

त्यांचे पश्चात कारभार रावजी त्रिंबक चांदवडकर करूं लागले. तो ता. ७ मे इ. स. १८२७ पर्यंत कारभार केला. खावंदाचे संधान ठेवून काम केलें नाहीं. सबब कारभाराचीं वस्त्रें दामोदर काशी किबे यांसी झालीं. त्यांनीही इ. स. १८२७ च्या नोव्हेंबर

अखेर वहिवाट केली. परंतु बंदोबस्ताची गोष्ट दिसून आली नाही. मासाहेब व महाराज एक विचार करून अप्पाजी कृष्णराव हे फिरंग्याचे साहेबीत वागलेले. यांचे कर्तृत्वाची व सौजन्याची कीर्ती परस्परे ऐकण्यांत विशेष. हे इंग्रजांचा संबंध सोडून आलेले. त्यांचीं व सरकारचीं बोलणीं होऊन कारभाराची सोप झाली. या दौलतीस अनोळखी, परंतु सौजन्यतेचे पोटीं सर्वांस आपलेसे करून दौलतीस आळा घातला. पुढें चैत्र मासीं यजमानांचे अनुषंगे महेशावतीस नर्मदातीरी सोम याग ब्राह्मणांकडून करवावा असें ठरवून वेदमूर्ती राजश्रीनारायण बाबा तळेगांवकर सत्पात्र पाहून त्यांजकडून आधान सिद्ध करून विधीपूर्वक सोम (यज्ञ) केला. सरकारस्वारीही प्रसंगास गेली होती. अनुष्ठान मोठें परंतु खावंद पुण्यवान अंतःकरणपूर्वक मनोत्साहः व कारभारी सुशिक्षित. इतिकर्तव्यता निर्विघ्न सिद्धीस जाऊन समारंभ फार मोठा होऊन कारभारियांचे जपण्याचे पोटी शोभाही अद्वितीय झाली. धरला वेतन राहतां पैकाही विपुल लागला. ब्राह्मणांचा लौकिक, कीर्ती बरीच झाली. पुढें पुनः इंदुरास आले. पुढें पांच सात महिन्यांची वहिवाट एकविचारें बरीच चालली. त्यांत ज्याच्या माथा ओझे त्याजला खावंदाचे संधान ठेऊन सर्वांचे मनोधारण राहील ते करावे हे नेक सल्ला. त्यात मार्गाची गोष्ट नसल्यास न रुचली त्यांसी भवतव्यतानुरूप अनुभव प्राप्त होऊन दौलतीचा क्रम चालावयाचा तसा चालतच होता. पुढें दरम्यान इ. स. १८३० मध्ये खर्चाची तारांबळ होऊन फौजेत बलवा झाला. हुजुरचे मोती तबेल्याचे बारगीर कांहीं बडतर्फ होते त्यांनी अप्पाजी कृष्णराव घराहून येत होते ही बातमी राखून, बाजारात आडवे होऊन, दिवाण यांचे हातास हात घालून तनखेविषयीचा जाब बोलून खिस्सा केला. आपसांत तरवार चालून अप्पारायाचे उजवे हातास जखम झाली. त्या समयास श्रीपतराव कर्नल म्यान्याजवळ होते. त्यांनी दोन बारगिरांवर हात चालविला. नित्याची धरणीपारणीं चाललींच होती. बारगिरांचा बखेडा असतां त्यात तमाम लोक बेदील असतां खर्चावाचून हैराण. दरम्यान मातादीन मेजर हा पलटणाचे खर्चाविषयीं मागांवयास गेला. पलटणवाल्यांनीं दंगा करून दिवाणाचे घरावर चालून गेले आणि त्यांचे वाड्यापुढें तोफ आणून उभी केली. यानंतर अप्पाजी कृष्णराव यांस सरकारवाडा मना झाला.

कारभार खासगीकडे सुरू झाला. नंतर मासाहेब यांनीं ऐवज काढून तबेले व पागा-पलटण, शिलेदार, शागीर्दपेशा आदिकरून दामदस्त खर्चास देऊन वर्षाची खातरी करून बैदेवाल्यांस काढून दिले. सरंजाम दुरुस्त ठेवला. अप्पारावची मंडळी कैदेत ठेवली, कारण तीन साल हिशेब घ्यावयाचा सबब अटकविले होते. त्यांनीहीं कागदपत्र आकारून दाखविला. सरकारची व त्यांची पावती फारकती झाली. दरम्यान गोपाळराव बाबा व सखारामबापू कापडणीस यांजला अप्पारावांनीं काढून दिले होते, ते आले. त्यांजला सरकारांतून पुनः वस्त्रें झाली. कामावर बहाल झाले त्याच संधीस कृष्णाजी मुकुंद, कैलासवासी यशवंतराव महाराजांचे वेळेस बक्षीगिरीची वस्त्रें दिली होती ते बहाल झाले. गोपाळराव बाबा व सखाराम बापू यांनी अप्पारायासी तसदी बहुत केली. परंतु त्यांनीं प्रथम जो कागद आकारून दिला त्याजला पुनः टाक न लावितां पावती फारकती करून उज्जेनीस निघून गेले.

पुढें दौलतीस दिवाण नाही. रखमाबाईस (किबे) उज्जेनींहून आणले. नंतर मासपक्ष इंग्रजांचे छावणींत होते. त्यांची खातरी मासाहेबांनीं करून दिवाणगिरीचीं वस्त्रें श्रावण वद्य १३ रविवार ता.४ सप्टेंबर इ. स. १८३१ इसवींत गणेश विठ्ठल किबे यांस झालीं. साडेतीन वस्त्रें दिली व मोत्यांची कंठी व शिरपेंच देऊन कलमदान त्यांचे जिम्मेस केलें. त्यांजला आज्ञा झाली की दिवाणगिरीचे काम करावे परंतु कारभार दरोबस्त मासाहेब करीत होत्या.

पुढें इ. स. १८३२ ता. २६ आक्टोबरांत छत्रीचे दर्शनास भानपुरा येथें स्वारी जाण्यास निघाली. समागमें बोर्तिकसाहेब व गोषमहमदखान (नबाब गफूरखानाचा पुत्र) कांहीं सरंजाम बरोबर घेऊन होता. सरकार स्वारी भानपुऱ्यास दाखल होऊन छत्रीचे दर्शन घेऊन छत्रीचे काम पाहून मर्जी बहुत प्रसन्न झाली. महाराजांचे महापूजा करून पोशाख, कंठी, सिरपेच वगैरे जवाहीर भेट करून दीपोत्सव मोठा केला होता. तेथें नक्षत्रपात झाला.

एक घटका दिवस येईतोपर्यंत तारे तुटले. नंतर शांती करून स्वारीचा कूच होऊन गेल्या मार्गानेच माघारीं येऊन उज्जेनीस आले. तेथें तीन रात्री राहून श्रीमहांकाळेश्वराची पूजाअर्चा जेथील तेथें यथास्थितीत झाली. परंतु तिसरें मजल्यास क्षेत्रींचे ब्राह्मणांनीं देवदर्शन घेऊं दिलें नाही याजमुळें सरकार मर्जी खप्पा झाली. बाणगंगेस कूच करून द्विरात्र राहून नंतर स्वारी सरकारवाड्यांत दाखल झाली.

पुढें अप्पाराव यांजला आणावयास महाराजांनीं प्रेश पाठविला. ते कुमाऊचे पहाडांत होते. ते बोलावण्याची लगट करून आणविले. ते उज्जेनीस येऊन दाखल झाले. सरकारवाड्यांत येऊन चढेदम तिसरें मजल्यावर गेले. तेथें सर्वत्र मंडळीच्या भेटी झाल्या व सरकारची भेट झाली. महाराजांनीं सर्वत्र मंडळीस आज्ञा केली कीं तुम्ही अप्पाराव यांजविषयी मनातील संशय सोडून आपलाले कामावर दुरुस्त रहावे. त्यांजलाही सांगितले की तुम्ही दरखदार मंडळीविषयीं अंतःकरणीं किंतु न आणितां सरकारकाम करून रहावे. नंतर दोन प्रहरचे संधीस मासाहेबांकडे महाराजांनीं अप्पाराव यांस नेलें. अप्पारावांनीं मासाहेबांस पांच मोहरा नजर करून नंतर पुनः तिसरें मजल्यावर गेले. सरकारांनीं आज्ञा केली कीं त्यांचेबरोबर सर्वांनीं जाऊन बिऱ्हाडी पोहचवावे. त्याजवरून सारी मंडळी बरोबर जाऊन पानसुपारी घेऊन आपापले घरास आले.

महाराजांचे शरीरास बेआरामी होती. परंतु बाह्योपचारें बहुतसे कोणास समजूं दिले नाही. भानपुऱ्याहून स्वारी आल्यावर मग स्वारीशिकारी मना झाली. श्रावणमासीं एक वेळ छत्रीवर स्वारी गेली. त्यावर निजूनच होते. सागरकर वैद्य व्यासजी उपचार करीत होते. राजयक्ष्मारोग, दिवसेंदिवस शरीर क्षीण झाले. अप्पाराव कारभारास प्रवर्तक झाले. त्यांनींही तुळा करून ब्राह्मणास दानधर्म बहुत करविला. आश्विन शुद्ध १४ रविवार तारीख २७ आक्टोबर इ. स. १८३३ रोजीं अंतकाल सूर्योदयापासून तेरावें घटकेस होऊन श्रीमंत मल्हारराव महाराज स्वर्गवासी झाले.

श्रीमंत मल्हारराव महाराज इसवी सन १८११ त गादीवर आले. त्यावेळीं त्यांचे वय तीन वर्षांचें होतें असें कागदोपत्रीं आढळतें. तेव्हां त्यांचा जन्म इ. स. १८०८ त

झाला असें धरून चालता येईल. म्हणजे मृत्युसमयीं ते पंचविसीच्या आतबाहेर होते असें धरून चालावें. पहिली सहा सात वर्षे फौजेच्या बखेड्यांतच गेलीं. मंदसोरच्या तहाने शांतता प्रस्थापित झालीं. त्यानंतर सहा सात वर्षे तात्यांचे कामगिरीमुळें गाडी मार्गावर आली. तात्यांच्या पश्चात सहा सात वर्षांत तितकेच कारभारी आले आणि गेले. भाग्य इतकेंच की गाडी मार्गावरून घसरली नाही. तात्यांचे पश्चात आलेल्या कारभाऱ्यांत अप्पाजी कृष्णराव कांहीं कर्तृत्ववान् दिसतात. त्यांची कारकीर्द इ. स. १८२७ ते १८३१ आणि १८३२-३३ च्या सुमारास कांहीं थोडा काळ. या काळामधील जो थोडाबहुत पत्रव्यवहार उपलब्ध झाला आहे तो कांहीं पुढें येईल व कांहीं पत्रव्यवहार ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' ह्या स्वतंत्र पुस्तकांत पहावयास मिळेल. त्याकाळांत आपले गेलेले हक्क परत मिळविण्याचा प्रयत्न चाललेला दिसतो. वसूलबाब वाढविण्याच्याही पट्टेकबुलायती दिसून येतात. या कालांत होळकरांची कैफियतवजा एक मार्मिक लेख मंदसोरचे तहासंबंधानें विवेचन (होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें या पुस्तकांत) पहावयास मिळेल. तो लेख कदाचित् अप्पाजी कृष्णराव यांचे देखरेखीखालीं तयार झाल्याचा संभव आहे. तो लेख कृष्णामासाहेब यांचेतर्फेचा आहे. लेखक कायदेपंडित दिसतात. तहासंबंधाची टीका काटेतोल आहे. त्यांस कांहीं उत्तर मिळालेसें दिसत नाही. हे अप्पाजी कृष्णराव पुढें चतुर्थाश्रम स्वीकारून त्यांनी श्रीक्षेत्र उज्जेनी येथें देह ठेवला. त्यांच्या समाधीसंबंधीं श्रीमंत हरीराव महाराजांच्या कारकीर्दीत सरकारांतून व्यवस्था झाली. हें उभयपक्षीं भूषणावह आहे. ती हकीगत महाराजांच्या कारकीर्दीत पुढें येईलच. मराठी राजवटीच्या ज्या विशिष्ट खुणा आहेत त्यांपैकीं ही एक होय कीं मुत्सद्दी यांची सेवा ध्यानांत घेऊन त्यांचे पश्चात देहावसानसमयीं सरकारांतून त्यांचा झालेला गौरव. तो असा तात्यांचे संबंधात दिसून आला तसाच तो अप्पाजींच्याही संबंधात दिसून येतो. खासगीवाल्यांचे घराण्यांत पहिल्या दोन पुरुषांच्या और्ध्वदेहिकास दरबारांतून मिळालेला मान जमाखर्ची नमूद आहे.

मंदसोरच्या तहानें राज्ययंत्राची एक बाजू म्हणजे बहिःपराक्रम ऊर्फ फारेन पालिसी म्हणजेच मुलूखगिरी बंद झाली. उरली बाजू अंतर्व्यवस्था ऊर्फ होम पालिसी. आतां या अंतर्व्यवस्थेकडे सरकारांनीं अगर त्यांच्या सल्लागारांनीं लक्ष द्यावयाचें, एवढेंच काम मात्र उरले. तात्यांनीं पायवाट घालून दिली, पण ती पुढें फारशी मळली गेली नाही. राजेसाहेब अल्पवयस्कच; कारभारी आले गेले. इंग्रजी राजवटीच्या घनदाट छायेंत ही कारकीर्द गेली. या कारकीर्दीत एक प्रकारची अंतर्बाह्य स्तब्धताच होती म्हणून हिला आणि पुढच्याही कारकीर्दी मिळून होळकरशाहीचा ''विरामकाळ'' आम्ही समजतो.

या कारकीर्दीचा पत्रव्यवहार जो मिळाला त्यावरून उत्पन्नाच्या बाबी ध्यानांत येतात. टांकसाळ, गुन्हेगारी, मिठाचे हासील, कुणबिणीस कर्ज, आफिमचा उजारा, कलाली, चौत्रा-लष्कर बाजार, बनजाऱ्यांचा तांडा, पांढरी, जकात, राबणुक, घरभाडे, इत्यादि. या बाबी एकदम बसविल्या असें नाही, अनुभवानें त्या अस्तित्वांत येत गेल्या. सिरस्ते पडत

गेले. मागील कारकीर्दीचे जे थोडे बहुत जमाखर्ची कागद नमूद करण्यांत आले आहेत त्यात असलेल्या कांहीं बाबी आज येथें दिसत नाहीत; तर आफिमीची बाब नवीन दिसते. हें उत्पन्न केव्हांपासून सुरू झालें, त्याची वाढ कसकशी होत गेली आणि त्याचा विनियोगही कसा झाला हें पाहिलें पाहिजे. सारांश, उत्पन्नाच्या आणि खर्चाच्या बाबी, त्यांचा उगम, उत्कर्ष आणि अपकर्ष हें एक शास्त्रच आहे. राज्यकारभाराच्या शास्त्रांत हे शास्त्र अंगीभूत झालेलें आहे. प्रत्येक राष्ट्रानें आपल्या दृष्टीने व मगदुराप्रमाणें तें ठरविलें पाहिजे. कांहीं लेखांकांतील ''ताईसाहेबांची मर्जी नाहीं'' इत्यादिकांवरून राजघराण्यातील स्त्रिया त्याकाळीं तरी राजकारणांत लक्ष घालीत आणि कारभारी लोक त्यांस वचकत, हें दिसून येते. धर्मकृत्यांत राजपुरुष, राजस्त्रिया व त्यांचे सल्लागार तात्काळ लक्ष घालीत. भानपुऱ्यास नक्षत्रपात झाला, लगेच त्यांनीं शांती केली हें वर आलेंच आहे. श्रीक्षेत्र महेश्वरीं देवावर मद्याचा अभिषेक झाला हें कळतांच त्याची दुरुस्ती लगेच झाली. गंगातीरावरील अनुपशहर व कर्णवास येथील समाचार घेण्यांत आला. सारांश, छत्रपती शिवाजी महाराजांनीं अष्टप्रधानांचे व्यवस्थेत धर्माध्यक्षांची जी विशिष्ट पद्धत अंतर्भूत केली ती पद्धत, जरी तें पद नव्हते तरी, होळकर राजवटीत चालू होती. तिचे दुसरें उदाहरण म्हणजे चातुर्मासामध्यें दोन महिनें कलालांची व भडभुंजाची दुकानें सर्व रियासतींत सररहा बंद असत, त्याबद्दल सक्त हुकूम. कैलासवासी सुभेदार तुकोजीराव प्रथम यांनी श्रीक्षेत्र जेजुरी येथें देवासंन्निध असलेले खाटकाचे दुकान उठविलें. याचा उल्लेख त्यांचे कारकीर्दीत आलेलाच आहे. हिंदु-मुसलमानांचा मंदिर-मसजिदीबद्दलचा प्रश्न मिटविलेला आहे. अनुष्ठानें, दानें, इनामें, आरोग्यसंपादन इत्यादि धार्मिक वृत्तीचीं अनेक अंगे दिसून येतात. अनुष्ठानाकडे असलेले ब्राह्मण सदाचारी असावे याबद्दल कटाक्ष. असाच एक उल्लेख श्रीमंत पंतप्रधान पहिले बाजीरावसाहेब यांचेही पत्रांत आहे. तसेंच, अनुष्ठानाचे ब्राह्मणाची बदली दरमहा करावी असाही उल्लेख आहे. हेतू हा कीं सर्व ब्राह्मणांचे पालन पोषण होऊन, वशिल्यास आळा पडावा. देवाकडे हत्ती घोडेही दिले आहेत. उद्देश कीं देवांचे उत्सव त्यांच्या दर्जाप्रमाणें शोभावे. तेथें कृत्रिमता, वंचना नसावी. देवाचे आपण सेवक आहोत या भावनेचे ते दर्शक आहे. या भावनेनेच शिंद्यांनीं आपली गादी उज्जेनीस न ठेवितां ग्वाल्हेरीस नेली. तसेंच कोकणांतील फळेफुले इकडे आणून लावण्याचा प्रयत्न हे सर्व सेव्यसेवक भावनेचें दर्शक आहे. परगणे थांदले पेटलावद येथें तयार होणारे कोरे कागद, तसेच रामपुरा, भानपुरा येथील दगडाच्या खाणी, नेमाड जिल्ह्यांतील बडवाहा येथील लोखंडाच्या खाणी, स्थानिक संपत्ती होत. द्वितीय तुकोजीराव महाराजांचे कारकीर्दीत या सर्व संपत्तीचा परामर्श घेतला जाई, हें पुढें दिसून येईल.

सोंदे, मोघे, गिराशे वगैरेंचा बंदोबस्त करण्यासाठी महालोंमहाल सुटलेले हुकूम पाहण्यास मिळतात. ब्रिटिश सरकार कित्येक वर्षेपर्यंत भिल्ल-पेंढारी यांचे बंदोबस्तांत गुंतले होते. अखेर संस्थानिकांचे सहाय्याने या लोकांस त्यांनी कह्यात आणिलें. पुढाऱ्यांस इनामे व उत्पन्नाच्या बाबी लावून देऊन, अनुयायांस शेतकीसारख्या उद्योगधंद्यांत लावून दिलें. या राजनीतीचा प्रतिध्वनी या लेखांकांत दिसतो. शहर इंदूर येथील श्रीगोपाळ मंदिराची

स्थापना ता. १६ एप्रिल इ. स. १८३२ रोजीं श्री कृष्णामासाहेब होळकर यांचे हस्तें झाली; झाबवा संस्थान होळकर सरकारांचे अंकित होतें हें स्पष्ट दिसते. तद्वत कांहीं लेखांकांवरून इंग्रज सरकार व होळकर सरकार यांच्या मुलाखती, मान-मरातिब, भेटी परतभेटी, यांचे दाखले म्हणून पाहावयास मिळतात. भेटी परतभेटीचे खर्च केव्हा व कसे पडत याचेही उल्लेख त्या त्या काळी व कारकीर्दीत येऊन गेले आहेत.

कांहीं लेखांक सारांशरूपानें खाली देत आहोंत. त्यावरून ह्या कारकीर्दीचा आढावा लक्षांत येईल.

(लेखांक १) ता.१४-२-१८२९ रा. त्रिंबकरावजीस अप्पाजी कृष्ण यांजकडून :

१ माजीचे कारकीर्दीचे कच्ची झडतीची नक्कल पाठविली आहे, चौकशी करून जल्द लिहून पाठवावे.

१ सरकारवाड्यांत देवपूजेजवळ साहेब, मना करीत असता, गेला म्हणोन लिहिले. त्यांस पेशजी एक चकती वाड्यांत कोणी जाऊं नये म्हणोन बडेसाहेब यांची घेऊन पाठविली आहे. ती राजश्री लक्ष्मणपंतास पुसोनसाहेब लोक येतील त्यांस दाखवीत जावी; म्हणजे उपद्रव होणार नाहीं व बंगला तयार होईपावेतों मावशीबाईची जागा नीट करून ठेवावी. तेथें साहेबलोक उतरतील. उगीच खिस्सा करीत जाऊं नये.

१ हरीबा होळकर यांचा गदेला फाटला असल्यास दुसरा करून द्यावा.

१ खासगीच्या गांवाबद्दल मजकुर लिहिला तो कळला,
म्हणोन वगैरे... ....

**(विठ्ठलराय कानगो महेश्वर दप्तर)**

(लेखांक २) इ. स. १८३० श्रीमंत गुरु भक्तिपरायण वर्तमान सकल ऐश्वर्य निधान धर्मपरायण धर्मसंरक्षण सदा यशवंतरमाविराजित राजमान्य कृष्णाबाई होळकर यांसी प्रति शुभचिंतक कल्याण वांछित दिवाकर बाल महतमचा महानुभाव संस्थान मठ हरजागा कारळ आशीर्वाद फाल्गुन शुद्ध ३ स्वकीये स्वानंद वैभव विलेखणी संतोषास कारण होत असावें. विशेष आम्ही आपणापासोन स्वार जाहलो तो अति दुर्गम मार्ग क्रमून श्रीगुरुप्रतापें पौष वद्य ५ स कसबे कारळमठ मजकुरीं सुरक्षित असो. यानंतर भागानगरास जाण्याचा निश्चय चैत्रमासी केला आहे. तेथें गेल्यावर आपण आज्ञा केल्याप्रमाणें राजेसाहेब चंदुलाल बहादुर यांसी भाषण करून अवंतर मजकुर निवेदन करून जो मजकूर होईल तो लिहिण्यांत येईल. आपण भक्तिपरायण आहात तेव्हां हे कार्य श्रीगुरुकृपेकरून होऊन येईल. वरचेवर पत्र पाठवून संतोषवीत असावें. हा आशीर्वाद.

(लेखांक ३) इ. स. १८३१ यादी सरकारचे महाल सरकारांत व परभारे लागले, ते शके १७५२ संमत १८८७ माहे जानेवारी इ. स. १८३१ भोपावर वकील बळवंतराव व जगन्नाथ देशमुख यांचे दप्तर.

| | | |
|---|---|---|
| २४६२२०० | जमाअजमास सरकारांत हल्लीं चालू महालमुलूख. | |
| | १९,६९,५०० | प्रांत माळवा व रामपुरा, भानपुरा, संस्थान नरसिंगगड, संस्थान झाबवे मिळून आकार सदरी. |
| | १,५८,७०० | प्रांत नेमाड, नेमावरपैकीं महाल मिळून. |
| | ६५,००० | प्रांत स्वदेशपैकीं वाफगांव, चांदवड, साहनकी वगैरे. |
| | ५,००० | वतनबाबी गांवगन्ना पाटीलक्या, देशमुखी हक्क. |
| | १,९०,००० | प्रगणे कोंच प्रांत बुंदेलखंडपैकीं. |
| | ७४,००० | संस्थान देवळे प्रतापगड इंग्रज बहादुराचे हस्ते ऐवज सरकारांत. |
| | ................ | |
| | २४,६२,२०० | |
| २५,५८,००० | सरकार कंपनीकडे गेलेला मुलूख. | |
| २१,९९,००० | इतरांकडे गेलेला मुलूख : मीरखानाकडे जहागीर १४,००,०००, | |
| ................ | गफूरखानाकडे जहागीर ४१००००. इतरकोटा वगैरे ३८९००० | |
| ७२,१९,२०० | तहाच्या पूर्वीचा होळकरी मुलूख. | |

(लेखांक ४) ता. १६ एप्रिल इ. स. १८३२ श्रीगोपाळ मंदिर शहर इंदूर येथील श्रीराजवाड्यानजीक. ''शिलालेख''

## श्रीगणेशाय नमः

श्रीगोपाळकृष्णाय नमः स्नुषा तुकोजीराजस्य यशवंत प्रभोः प्रिया कृष्णाख्या मंदिरं चक्रे सुंदरं कृष्ण भक्तितः ।।१।। तत्रश्री विक्रम शके वाष्टाष्टेंदु १८८९ संमिते ।। शालिवाहन तो वेद शर शैलधराभिते १७५४ ।।२।। संवत्सरे शोभनाख्ये चैत्र कृष्णादिमे तिथौ ।। सोमेस्वाती सिद्धियोगे करणे तैतिलेसति ।। गोपालकृष्णं मिथुनेलग्ने सा स्थापयत्सति ।। अनेन गोपीनाथः प्रीयतां भक्तवत्सलः ।। संमत १८८९ (इ. स. १८३३).

लेखांक ५ ता. १८-८-१८३२ इ. झाबवाराजे यांचे महाराज मल्हारराव होळकर यांस विनंती पत्र. (अस्सल पत्र हिंदी भाषेत, त्याचे भाषांतर.) सिद्धश्री इंदूर महाशुभस्थान सर्व उपमालायक सदा विराजमान राजश्री महाराजाधिराज राजराजेश्वर सुभेदार सवाई मल्हारराव होळकर आलिजाबहादर यांचे सेवेसी झाबव्याहून महाराजे परतापसिंगजी कुंवर रतनसिंगजी रामराम विज्ञापना. इकडील मजकूर कीं, थांदल्याचे मामलेदार भाऊ गोपाळरावजी तसेच पेटलावदचे दरखदार धोंडो सदाशिव विभूते मामलेदार हे आमच्या विरुद्ध श्रीमंतास कांहीं लिहितील तर आमची बाजू ऐकून घेऊन महाराजांनीं विचार करावा. आमची व

या परगण्याची लाज, शरम, सर्व आपले हातीं आहे. सर्व आम्ही आपलेच असून आपल्या आज्ञेबाहेर नाही म्हणोन वगैरे.

**(होळकर सरकार दप्तर)**

(लेखांक ६) ता. २ आगस्ट इ. स. १८३३ (सरकारचा हुकूम) श्री जगन्नाथ श्रीहरिद्वार वगैरे उत्तर प्रांतीं व दक्षिणेस तुळजापूर, पंढरपूर, वगैरे क्षेत्री मातोश्री अहिल्याबाईसाहेबांनीं जागा बांधविल्या व बागफळे वगैरे केलें आहेत. तेथील वहिवाटीत कोठेकोठे खलेल पडती ते न पडतां पेशजीप्रमाणें वहिवाट चालावी. तीर्थस्वरूप कैलासवासी खंडेरावबाबा यांची छत्री कुंभेरीस आहे. तेथील खर्चास भरतपूरकर यांनीं तीन गांवें लावून दिल्हे आहेत, ते चालू परंतु अलीकडे भरतपुरकरांच्या गृहकलहामुळें कारभाऱ्यांनें गांव जप्त करून घेतले. त्याजकरितां लाला दोतीराम येथील चकत्या देऊन पाठविले असतां गांव मोकळे होऊन छत्रीचे खर्चास लागले नाहींत. पुजारी वगैरे इंदूर मुक्कामीं येऊन बसले आहेत. याजकरितां गांव मोकळे होऊन तेथील खर्चाची व्यवस्था चालवावी.

(लेखांक ७) ता. २ जानेवारी इ. स. १८३३ इ. (सरकारी दप्तर) साहेबांचे सेवेसी, आज्ञांकित गोपाळराव गोविंद गानू खासगीवाले. कृतानेक आशीर्वाद विज्ञापना मुक्काम छावणीनजीक सागर येथें स्वस्तीक्षेम असो विशेष. आज्ञा घेऊन निघालो ते संकेताप्रमाणें मंडळीसह साहेबाबरोबर दरकूच त्यांचे अनुषंगे शुद्ध ७ मंदवारीं मुक्काम मजकुरीं दाखल झालो. (ता.२९-१२-१८३२) त्या दिवसापासोन आज्ञापत्र नसल्यानें चैन पडत नाही. सरकारस्वारी इंदुरास दाखल झाली म्हणोन साहेबांकडून कळलें. परंतु आद्योपांत कळलें नाहीं. त्यांस पत्री साकल्यार्थ कळविण्याची आज्ञा व्हावी. इकडील मजकुर येणेंप्रमाणें.

लाटसाहेब काल शुद्ध भौमवारीं प्रातःकाळीं चार घटका दिवस चढतां येऊन दाखल झाले. भेटीचा योग कालच तृतीयप्रहरीं होऊन मेजवानीसह सरंजाम आदिकरून हत्ती, घोडी, जवाहीरसुद्धां प्रथम भेटीसच नजराणा करुन मुलाखत उत्तम प्रकारे झाली. त्यांजकडील दोन मुसाहेब सामोरे येऊन हत्तीवरच भेट होऊन नंतर कोठींत लाटसाहेबांची भेट झाली. मकनाटसाहेब हे मुख्य मुसाहेब आहेत. हे बाहेर येऊन आंत घेऊन गेले.

साहेबांनीं सरकारकडील वर्तमान पुसून बहुत खुशवक्तीनें बोलणें झाले. आपलेकडील मजकूर बोलावयाचा त्याची यादी करुन फारशी तर्जुमा रबिनशनसाहेबास समजाविला. त्यांनीं मकनाटसाहेबास दाखवून बोलणें करवितो असें बोलले.

काल भेट झाली. आज यादी समजाविण्याची असें आहे. इतक्यावर घडेल तसे मागाहून डाकमार्गे सेवेसीं कळविण्यांत येईल. लाटसाहेब परवाचे दिवशीं जाणार. खटले वगैरे आजबाब सर्व निघून गेले. सडेसाहेब मात्र आहेत. धारवाले व देवासवाले यांच्या भेटी कालच जाहल्या. भोपाळवाले वगैरे यांच्या भेटी आज होणार. उदईक आपलेकडींल परत मेजवानी होऊन परवाचे दिवशी जातील. येथें मेवा चांगला मिळाला. शेव मेवादाणे १०० सेवेसीं हलकाऱ्याबरोबर देऊन भोयासमागमें पाठविले आहेत. प्रविष्ट होऊन उत्तराचीं आज्ञा व्हावी.

# श्रीमंत मार्तंडराव होळकर यांची कारकीर्द

श्रीमंत मल्हारराव महाराज (दुसरें) हे ता. २७ आक्टोबर १८३३ रोजीं कैलासवासी झाले. कांहीं जीव होता ते समयीं बापू होळकर यांचा पुत्र आणून महाराजांचे मांडीवर दिला. ते समयीं बडेसाहेब जवळ नव्हते. नंतर महाराजांस बाहेर आणल्यावर बडेसाहेब येऊन मासाहेबांची खात्री करून छावणींत गेले. दहन करून बापु होळकर यांनी उत्तरकार्य केलें. दानधर्म उत्तम प्रकारचा झाला. दहावें दिवशीं मासाहेब यांचा निरोप घेऊन आप्पाजी कृष्णराव माघारें उज्जेनीस गेले. चौदा दिवस झाल्यावर मासाहेब यांनी रखमाबाईस (किबे) बोलावून आणून खात्री करून फौजेत त्यांजकडून खर्चास देवविले आणि कारभार रखमाबाई (किबे) व सरकारतर्फे सखाराम बापू कापडणवीस करूं लागले. पुढें मार्तंडराव होळकर (बापु होळकरांचा पुत्र) गादीवर बसविण्याविषयीं रेसिडेंट यांजकडून कलकत्यांस लिहून, सरकारांतूनही चकती पाठवून तेथून सदरचा जाब आणून, नंतर तेथें मुहूर्ताची योजना करून पौष शुद्ध ७ शुक्रवारी संमत १८९० शके १७५५ ता.१७-१-१८३४ चा नेम ठरून ताईसाहेब (मल्हाररावांची बायको गौतमाबाई) यांचे मांडीवर देऊन, दत्तविधान करून गादीवर मुलास बसवून, नांव मार्तंडराव होलकर ठेवून दरोबस्तानीं नजरा करून, कारभार चालीस लागला. या नजरांची यादी आम्ही पुढें देणार आहोत. सदर दत्तविधानसंबंधीं ताईसाहेबांची अनुकूलता निखालस नव्हती; आणि मल्हारराव महाराजांनीं अंतकाल समयीं आप्पाजी कृष्णराव यांजला सांगितले कीं, महेश्वरी हरीराव होळकर आहेत, त्यांजला आणून गादीवर बसवावे. परंतु मासाहेबांनी अप्पाराव यांस बुका लाविला तेव्हां हा जाब तितकाच व तसाच राहिला. रखमाबाई यांजकडून राघवपंत सप्रे व सखारामबापु कापडणवीस कारभार करून महालच्या तोज्या आणून फौजेस खर्चास दिले. याप्रमाणें क्रम चालता झाला. मासाहेब यांनी दरखदार व सरदार व मानकरी यांजला बमय आश्रित मंडळीसुद्धा वस्त्रें देऊन बहुमान केला.

(लेखांक ८) ता. १७-१-१८३४ **(सरकारी रेकार्ड)** यादी सरकार मार्तंडराव होळकर मुहूर्ताने प्रथम गादीवर बसले पौष शुद्ध ७ शुक्रवारी दोन प्रहर अभिजित मुहूर्तावर. सबब नजरा जाहल्या खालीलप्रमाणें.

| | नांव | मोहरा | पुतळ्या |
|---|---|---|---|
| १ | गणेश विठ्ठल किबे. पोशाख व | १ | ० |
| १ | नारायणराव राम पळसीकर | १ | ० |
| १ | गोपाळराव गोविंद खासगीवाले | १ | ० |
| १ | बळवंतराव मल्हार हुजूर फडणीस | १ | ० |
| १ | मुकुंद | १ | ० |
| १ | निळकंठ गिरमाजी हुजूर चिटणीस | १ | ० |
| १ | दाजी रघुनाथ | १ | ० |
| १ | गोविंदराव मुनशी | ० | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| १ | x x अनंत सबनीस | १ | ० |
| १ | रघुपत हरिहर निसबत टाकसाल | ० | १ |
| १ | आबाजी बल्लाळ | २ | ० |
| १ | माधवराव गणेश कमाविसदार सरकार बिजागड | १ | ० |
| १ | माणिकराव शिवराम किल्ले हिंगलाजगड | १ | ० |
| १ | धोंडो सदाशिव दरखी आमीन पेटलावद | १ | ० |
| १ | विठ्ठल केशव कमाविसदार थांदलें | १ | ० |
| १ | मैराळ गोमाजी | ० | १ |
| १ | रावजी बापूजी | ० | १ |
| १ | शिवचंद कोठारी, मार्फत रतनचंद कोठारी | ७ | ० |
| १ | रतनचंद कोठारी कमाविसदार नंदवाय | १ | ० |
| १ | मल्हार निंबाजी कमाविसदार नेमावर | १ | ० |

इत्यादि, बहुमान. कापड पोशाख आश्रित मंडळी, सरंजामी, संस्थानिक, कमाविसदार, कारकून, शागीर्दपेशा, सोयरे मंडळी, गणपतीबुवा बडोदेकर, धर्मादाय, फौज, जरीपटका, सिलेदार, सावकार वगैरे मंडळीस बहुमान वस्त्रें दिल्ही. त्याचा आकार रुपये ६९६५६-१३-९ हिशेबीं दर्ज आहे.

श्री. मार्तंडराव गादीवर आल्यावर काय व कशा घटना घडून आल्या त्या आपण पुढील प्रकरणांत पाहूंया.



**प्रकरण १७ वें**

# श्रीमंत मार्तंडराव होळकर यांच्यानंतर श्रीमंत हरीराव होळकर यांची कारकीर्द

## इ. स. १८३४ ते १८४०

संस्थान महेश्वर येथें श्रीमंत हरीराव होळकर अटकेंत होते, त्यांनीं कारस्थान करून अप्पाराव यांजकडील मंडळी अनुकूळ करून कांहीं बाहेर निघण्याचा उद्योग केला. तो न समजतां रामचंद्र अप्पा वगैरे इंदूर मुक्कामीं धरले गेले. त्यांजला दोन महिने अटकेंत ठेवून सोडून दिले. नंतर पुनः सुलतान अप्पा व बलअप्पा जमादार कर्नाटकी यांजला परभारें दमदिलासा देऊन त्यांजकडील अरब व मकराणी व भिल्ल भामटे जमा करून ते पौष शुद्ध ९ तारीख १९ जानेवारी इ. स. १८३४ दीड प्रहर रात्रीस मंडलेश्वर बाजूनें चढवून बंदुकीचा ताशेरा देऊन नीट सरकारवाड्यावर चालून आले. वाड्यांत शिरून ज्या ठिकाणीं हरीराव होळकर होते तेथें जाऊन, कवाडाची कुलपे तोडून, बाहेर काढून श्री. मार्तंडाचे चौकांत आणून, गादीवर बसवून शहरात द्वाही फिरवून बंदोबस्त करून रामा किल्लेदार व लक्ष्मणपंत आबा वगैरे तेथील मंडळी कैद करून, मारहाण करून ज्यांनीं हरामखोरी केली होती त्यांचे पारिपत्य केलें. हे वर्तमान इंदुरास दुसरें दिवशीं समजलें. नंतर तेच वेळेस मानकरी तबेला व मोती तबेला व पागा तयार करून त्यांत मुखत्यार भगवंत अनंत व गोपाळरावबाबा खासगीवाले व बापू सरमंडळ यांजला समागमें देऊन महेश्वरीं रवाना केलें. त्याप्रसंगी बापाजी बल्हेगांवकर, रावजी त्रिंबक यांनीं शेपन्नास पायदळ

ठेविलें होते. तिकडे महेश्वरी सरकारांनीं कांहीं जमिनीवर तोफा पांच सात पडल्या होत्या त्या तयार करून फडावर चढवून नवीन शिबंदीचा जमाव करून लढाईचे हमराईत होते. महाराज बाहेर निघाले नव्हते त्यापूर्वी इस्टूरसाहेब यांची बदली होऊन मुंबईस गेले, ते वेळेस सहस्त्रधारेवर दहा-पांच साहेब जमा होऊन पांच सात मुक्काम करून कौन्सिल करून हा करार नमूद करून इस्टूरसाहेब मुंबईस गेले. नंतर हरीराव होळकर बाहेर निघाले. ते इकडून त्रिवर्ग ब्राह्मण सरंजाम घेऊन चढे दिलाने महेश्वरास गेले. जांबेचा घाट उतरून सोमाखेडीपर्यंत गेले. पुढें जावें तो किल्ल्यांत जमाव ऐकून थिजून राहिले आणि इंदूर मुक्कामीं पत्र आलें कीं पलटणाची व तोफांची रवानगी करून द्यावी. त्याजवरून मासाहेब यांनीं हुकूम करून खंडो पांडुरंग याजकडे पलटणचें काम होते त्याजला सांगितलें की तोफा व सरंजाम जाऊं द्यावा. त्याजवरून बजरंग पलटणपैकीं व दोन तोफा मातादीन कप्तान व शहरसिंग आजीटन हे मुखत्यार पलटणांत करून रवाना केलें. ते शेमरूडचे (= सिमरोल) वाटेनें घाटाखालीं उतरून लगेहात मातादीन व शहरसिंग कप्तान वगैरे आफिसरांच्या मुसक्या बांधून तोफेवर बसवून कऱ्हीवरून बारद्वारीं जाऊन सलामीच्या तोफा करून लाईन बांधून उभे राहिले.

नंतर पलटणवाल्यांनीं हुजूर हलकारा पाठविला कीं आम्ही सरकार चाकर आहों हुकूम होईल तेथें येऊन उतरूं. हे वर्तमान चोळी मुक्कामीं गोपाळराव बाबा खासगीवाले भगवंत अनंत निसबत पागनीस यांजला समजलें आणि पागेवाले यांजलाही जाहीर झालें, तेव्हां उभयतांचे धैर्य सुटल्यावर बारगीर व भले लोक कांहीं शेपन्नास महेश्वरीं जाऊन सरकारांस भेटले. तेव्हां गोपाळराव बाबा व भगवंत अनंत यांजला इंदुरास येणेची शिरवणी झाली. जसे तसे कोणी पाठलाग केला नाही परंतु आपसांतील फूट नजरेस पडल्यामुळें बहुतेक प्रकारें इंदुरास आले. नंतर भगवानसिंग पागे यांजला जांबेस रवाना केलें. तिकडून महेश्वरवाल्याचें ठाणे जांबेस आलें. पागे मशारनिल्हे हेही कूच करून हुजूर आले. नंतर छावणीतून राबिनसनसाहेब व जानसनसाहेबांनीं मासाहेबांकडे येऊन बोलणें बोलूं लागले कीं आपसांत फिसाद नसावी. याभावीं सांगून येथून सरंजाम पाठवून त्यांजला घेऊन यावें.

तो इंदूर मुक्कामीं फौजेचा रोळा तनखेविषयीं मनस्वी होऊन पागे यांनीं दोन दिवस हुजूर कचेरीत धरणें देऊन बसले आणि तनखेचा फडशा करून घेतला आणि तोच क्रम पाहून पलटणवाले व शिलेदार व शागीर्द पेशावाले तमाम यांनीं रोळा केला. तनखेचा जाब उलगडून घेऊन तमाम फौजेचा आख तुटोन संधान महेश्वरीं यजमान साहेबांकडे लाविले. तेथें रोळा झाल्यामुळें रखमाबाई चिरंजीवासुद्धां निघोन छावणींत गेल्या. तेथून बसेटीस माधवराव मल्हार याजला महेश्वरीं पाठविलें कीं सोरटीनसाहेब यांचे विद्यमानें भेट घेऊन तह व्हावा, याजकरितां पाठविलें, ते मंडलेश्वरीं जाऊन मसलत बोलूं लागले. तों जाब हातात न ये आणि हुजूर भेट जाहली नाही. सबब रंग ओळखून माघारें बाईपाशीं आले. छावणीत महेश्वरींहून ठाणीं आलीं ती बडगोंदे वगैरे येथें येऊन इंदुरास माघ वद्य २ ता.२५ फेब्रुवारी इ. स. १८३३ रोजीं दाखल झाली. दुसरें दिवशीं आपसांतील

हुजरातीचे मोती तबेल्यातील बापू नेवासकर व खंडो पांडुरंग हे उभयतां अग्रेसर होऊन मंडळी धरून घेतली आणि मोती तबेल्यांत दाखल केलें. त्यापैकीं कासीटी होळ, हुन्नरराव पुंजाजी व कासीमान्या यांजला श्रृंखलाबंधन करून मंडळीसुद्धां महेश्वरीं नेले.

इंदूर मुक्कामीं मोतीसिंग कुंवर आमझरेवाला आला. आणखीन सरंजाम समागमें होता.जुने इंदूरचे कचेरींत राहून महालाचा बंदोबस्त त्यानें केला. तो दुसरें दिवशीं उदेसिंग राऊळ महेश्वरींहून वाड्यांच्या बंदोबस्तासाठीं रवाना केला. तो येथें येऊन दाखल झाला. वाड्यांत येऊन ताईसाहेबांचे हुकमाने बंदोबस्त करून महेश्वरास श्रीमंत हरीराव होळकर यांजला आणावयाकरितां पागा, शिलेदार, हत्ती, पालखी व चौघडा बमय निशाणासुद्धां पळसीकर बाबा समागमें देऊन रवानगी केली. ते तेथें जाऊन पोंहचले. सरकारची भेट होऊन वस्त्रें जवाहीर देऊन इंदूर मुक्कामीं यावें म्हणून विनंती केली. साहेबांचेही म्हणणें पडले कीं ''तुमने इंदूर को जाकर आपने घर का बंदोबस्त करना. हम साथ हैं '' नंतर फाल्गुन शुद्ध ५ पंचमीस स्वारी कूच होऊन शुद्ध ८ अष्टमीस ता.१८ मार्च इ. स. १८३४ ला येऊन दाखल झाले. समागमें नवीन फौज चौदा हजार अरब मकराणी वगैरे होते. नंतर साहेब लोक बरोबर होते त्यांजकडील शंभर स्वार व एक कंपनी बरोबर होती. साहेबांचें व ताईसाहेबांचें म्हणणें पडलें कीं नवीन फौजेचे कारण नाहीं. यांचा हिशेब करून दूर करून द्यावे. त्याजवरून सुलतान अप्पा याजला बोलावून खात्री केली कीं तुम्ही हुजूर असावे आणि लोकांस निरोप द्यावा. त्याने हुकुमास बजावून माणुस शेरातोराच्या प्रसंगीं पडून हुकमास उजूर न करितां दामदस्त हारसाल फौजेस बरखास्ती घातली. नंतर रखमाबाई यांनी किबे छावणीहून महाराजांस भेटल्या. गणेश विठ्ठल किबे हे नजर गुजरून छावणीस गेले. रेवाजी फणसे येऊन दाखल झाले महाराजांची व त्यांची भेट झाली. चैत्रशुद्ध १स कूच करून शहरात स्वारी येऊन तीन घटका दिवसास विठ्ठल महादेव किबे यांच्या वाड्यांत दाखल झाले. पंचमीस सरकारवाड्यांत दाखल झाले. ते वेळेस तोफा झाल्या. साहेब लोक बरोबर होते. वाड्यांत आल्यावर साहेब लोकांस पानसुपारी, अत्तरपान करून छावणीस बिदा केलें. श्रीरामनवमीच्या मुहूर्तावर सूर्योदयापूर्वी दत्तविधान होऊन मासाहेबांचे मांडीवर बसवून ''यशवंतराव सुत हरीराव होळकर'' याप्रमाणें झाल्यावर कचेरीत गादी घातली. तेथें सरकार येऊन गादीवर बसले. प्रसंगास रेसीडेंट ब्याग, सोरटीन, राबीनसन व जानसन वगैरे दहा बारा साहेब होते. समारंभ उत्तम प्रकारचा झाला. तोफांचे आवाज एकसारखे चारघटकापावेतों होत होते. आम, खास दरबार भरला. मुत्सद्दी मंडळींच्या नजरा गुजरल्या. नंतर मासाहेबांकडे जाऊन पायावर डोकी ठेवून जवळ बसले त्यांनीं शंभर रुपये ओवाळणी खिजमतगारास दिली.

वैशाखमासीं रेवाजी बापू फणसे यांजला दिवाणगिरीची वस्त्रें देऊन कारभारास आरंभ केला. महाराजांची कन्या सकुबाई यांचे लग्न वैशाख शुद्ध १३ स झाले. रेवाजी बापू यांचे चिरंजीव राजोजीराव फणसे यांजला दिल्हीं. नंतर कामाचा ओघ चालला. पुढें महेश्वरीं मंडळी जी कैद होती त्यांचे समेटाचे बोलणें हरकचंद याचे होऊन दोन रुपये सरकारांत

नजराणा देऊन मोकळीक करून नंतर इंदुरास आले. मर्जी मंडळीचे ठिकाणीं अप्रशस्त. दरम्यान माधवराव मल्हार निसबत फडणीस नवलेकर व सखारामबापू कापडणीस उभयतांनीं कचेरीस येण्याची सुरुवात केली हे सरकारांनीं पाहून बेमर्जी झाली. शहरापार करून दिले. गादीवर बसल्यानंतर पुढचे सालीं म्हणजे इ. स. १८३५ चे फेब्रुवारीत महाराजांचे लग्न गिरगुणे यांची कन्या हिराबाईशी झाले. (हल्लीं गिरगुण्याचे वंशज चोळी गांवचे इनामदार आहेत.) समारंभ मोठा झाला. त्यांत मुख्य खंडोपंत होते. त्यांजला राजोजीराव फणसे यांचे हाताखाली सोप करून पलटणचे कामाची वस्त्रें दिली आणि महालची घालमेल ही त्यांचेच हातून व्हावी. खंडोपंत यांचा कारस्थानीचा व दौलतीत, पलटणें, पागा, सिलेदार वगैरे यात आकस सबब बाबा फणसे यांस सहन न होय व कामाकाजाविषयीचा बस न चाले, सबब दगडू गौळी सरकारचे अंतरंगातील असामी तेही सामलात करून आरोप हरबाण्याचा करून त्यांजला कैद करावे हा सल्ला नेमांत आणून हुजूर कांहीं कारणास्तव बोलावणें पाठवून मशारनिल्हेस आरसे महालांत नेऊन नंतर बोलणीं झाली. तसेंच फणसे उभयतां बंधु दसऱ्याचे कचेरींत येऊन कांहीं गोलंदाज व पलटणचे आफिसर सामलात करून कैद करावें हा बेत. या नंतर खंडोपंत तात्यांस धरून श्रृंखलाबंधन करून बरोबर एक कंपनी व शंभर स्वार पागेचे देऊन हिंगळाजगडास पावते केलें. याप्रमाणें अधिकाराचे जागेवर कोणी राहिलेसे दिसत नाहीं.

नंतर मानकरी, तबेल्यातील बारगीर कांहीं एक फितुरांत शिरून, दिवाणाचे घरीं दहा दिवस निकडीचें धरणे देऊन बसले. बहुतांपरीं सांगितले व रोजमुरेही द्यावयास सिद्ध झाले. परंतु बारगीर तोडीवर न घेतां निखालस आकसीचा जाब. तेव्हां माधवरावदाजी दरम्यान पडून कांहीं रोजमुरे कबूल करून धरणें उठविलें. परंतु बालमुकूंद वगैरे बारगीर यांचे मनांत दगलबाजी सरकाराशी. यामुळे गैरमर्जी करण्यांत कसर जाहली नाही. चाकर असतां रोजमुरे न घेतां गैरशिस्त मुद्देवार जाब घालूं लागले. सबब पलटणवाल्यास हुकूम देऊन आश्विन शुद्ध ५ संमत १८९१ (ता. २७ सप्टेंबर इ. स. १८३५ रोजीं) प्रहररात्र गेल्यानंतर तोफा सुरू झाल्या. त्यातून पांच पंचवीस असाम्या मरणोन्मुख होऊन तळमळ करून खतम झाल्या. असें झाल्यानंतर बारगीर जे फितुरांत होते ते काढून दिले. बाकी पागेचा बंदोबस्त सरनौबतीचे काम शेख यांजकडे सांगितले. हिंगलाजगडचे किल्ल्यावर खंडो पांडुरंग होते. नंतर जलचरांकडून त्यांजविषयीं बोलणें लागले की, सोडून द्यावे. त्याजवरून खंडो पांडुरंग याजला सरकारांनीं मोकळीक केली. खंडोपंत कांहींएक दिवस उज्जेनीस राहत होते. पुढें कर्मानुसार बुद्धीस व्यत्यय येऊन शिबंदी दोन तीन हजार ठेवून दहावीस घोड्यानिशीं रघुकुंवर सामलात. परंतु अग्रेसर खंडो पांडुरंग होऊन संमत १८९२ भाद्रपद वद्य २ स (ता. २६ सप्टेंबर इ. स. १८३६ रोजीं) चाल करून सूर्योदयाचे पूर्वी सरकारवाड्यावर आला. अगोदर भवती खुनानी वगैरे व खासबरदार उमरावसिंग वगैरे सामलात होतेच. तेव्हां त्यांनीं खंडोबास दरवाजे खुले करून शिबंदीसुद्धां घेतले. खंडोपंतांनीं शागीर्दपेशाचे कामावर कारकून होता त्याजला जातीने हाक मारून तसेच पुढें गादीपासीं येऊन मासाहेबांकडे गेले. तेथून ताईसाहेबांकडे गेले.

सरकार ज्या खोलीत निजले होते तेथेंही दाराशी थोडीबहुत धक्काबुक्की केली.

ही बातमी राजाभाऊ फणसे याजला श्रृत झाली. तसेच पाठीस ढाल पडताळून बजरंग पलटणचे लोक व कांहीं बारगीर सामल करून नजरबागेंत दाखल झाले. इकडे ताईसाहेब सरकारास जाऊन भेटल्या. जास्त हिंमत पोहचून काहडण्या खिडक्यावाटे सोडून पलटणचे लोकांस बारगीर बमय तंबूर आरसे महालांत घेऊन शेदोनशें लोक जमा झाल्यावर बाहेर निघाले. आणखीही पलटनचे लोक, बारगीर वर घेतले. त्यांनीं सफेजंगीस सुरुवात केली हे वर्तमान खंडोपंत, रघुकुंवर यांस समजता ते बेहिंमत झाले. खंडोबा व रघुकुंवर तसेच इतरांची प्रेते तंगड्यास दोर बांधून चिंचेचे झाडास टांगून दिली. कित्येक मेवाती व खासबरदार फितुरांत होते ते फाशी दिले. याप्रमाणें ही ''खंडुगर्दी'' समाप्त होऊन अंतःकलह थांबला.

यावेळीं फणसेच कारभार करीत होते. गणपतराव फणसे (रेवाजींचे कनिष्ठ चिरंजीव) कांहीं कारणास्तव महाल सोडविण्याविषयीं हरकचंदशेट याजला घेऊन सरकारी लवाजमा समागमें घेऊन कलकत्त्यास गेले. तों आपसांत हरकचंदशेट यांसीं व गणपतराव फणसे यांसी वैमनस्य येऊन गेले तसेच परत आले.

बडेसाहेबांनीं (रेसिडेंट) यांनीं सरकारांशीं मुद्दा घातला कीं, फणसे दिवाणगिरीचे कामावर नसावे. त्याज धरून रेवाजीस महेश्वरीं कार्तिकमासीं मार्गस्थ केलें. तेथें गेल्यावर कांहींएक दिवस राहून पुनः इंदुरास आले. नंतर त्यांचा व हरकचंद व माधवसिंग यांचा आपसांत हिशेबाचा लढा पडला. दरम्यान आबाजी किबे यांजकडून सरकारची बाकी पांच साडे पांच लक्ष देणें निघाले. ते हुजूर दाखल करून त्यांनीं पावती सरकारची घेतली. इ. स. १८३६ नंतर उज्जेनीस गेले तेथेंही कांहीं दिवस होते. नंतर काळ जाहला.

या नंतर सरकार कारभार जातीनें करूं लागले. कामात कृष्णा जामदार व शिराजु मुनशी, हाफिजखां, बाळाजी नाईक व गंगाराम भाऊही होते. कांहीं दिवस याप्रमाणें चालल्यावर साहेबांची ताकीद झाली कीं तुम्ही कोणी तरी दिवाण केलाच पाहिजे. तेव्हां आबाजी बल्लाळ किबे तराण्याचे मामल्याचे कामावर होते. तेथोन आणून साहेबांचे सल्ल्यानें आबाजींस दिवाणगिरीची वस्त्रें दिली. कारकीर्द मुखत्यारीनें दीड मास केल्यास पुढें महाराज साहेबांचे मनात आबाजींविषयीं किंतु आला. त्या उप्पर भवानीदीन महूचे छावणीत होते. त्याजला गंगादीन जमादाराबरोबर पंचवीस स्वार देऊन आणावयास पाठविलें. दुसरें दिवशीं भवानीदीन येऊन सरकारांची भेट होऊन बोलणें चालणें होऊन मसलत झाली. यावर बक्षीसगिरीची वस्त्रें दिली. आबाजींनीं व भवानीदिन यांनीं उभयतांनीं एक विचारें काम करावे. परंतु सर्व कामें मुखत्यारीनें भवानीदिनच करीत होते. दिवाण मात्र नांवांचे. उभयतांची कारकीर्द अजमासे तीन वर्षे होती.

या भवानीदिनासंबंधानें इंग्लिश लेखकांचे मत असें आहे कीं हा हलक्या वृत्तीचा, पाताळयंत्री माणूस होता. महाराजांचे मनावर वेळोअवेळीं खोट्यानाट्या गोष्टी घालून आपण त्यांचे हितचिंतक आहोत असें त्यांस भासवी. महाराजास पूर्णपणें कह्यांत आणून लोकांवर त्यानें जुलूम चालविलें. लोकांच्या कागाळ्या महाराजांकडे येत त्याचप्रमाणें इंग्लिश रेसिडेंट

सरप्लाड यांजकडेही जात. सरप्लाड यांनीं महाराजांची भेट घेऊन त्यांचे कानावर संपूर्ण हकीगत घातली. हाताखालील अधिकाऱ्यांवर जरब ठेवून कामाकाजांत लक्ष घाला असें त्यानें महाराजांस सांगितलें. महाराजांनीं त्याप्रमाणें सुरुवात केली. गंगाजळी शुष्क झालेली आणि वार्षिक उत्पन्न रोडावत चाललेले त्यांचे नजरेस आले. भवानीदिनाच्याही लक्षांत हा प्रकार येऊन गेला. त्यानें सगळे घोंगडे आबाजी बल्लाळ किबे यांचे गळ्यात अडकवून दिले. महाराजांनीं दोघांसही अटकेत ठेविले. घालमेल झालेल्या रकमेचा निम्मा अंश प्रयत्नाअंतीं सरकारचे हातीं आला. चौकशीअंतीं किबे हे निरपराधी आहेत असें दिसून आल्यावरही रेसिडेंट त्यांच्याबद्दल कांहीं करू शकले नाहीत.

याच सुमारास महाराज आपली पूर्वीच वृत्ती सोडून कामकाजांत लक्ष घालूं लागले. यानंतर म्हणजे इ. स. १८४१ पासून पुढील तीन वर्षांत झालेल्या गोष्टी पुढच्या प्रकरणांत सांगण्याचे करूं.

चालू प्रकरणांत निवेदिलेल्या व्याप्तीवर प्रकाश पाडणारा कांहीं सरकारी कागदांचा उल्लेख करून हे प्रकरण संपवितो. लेखांक १ यात श्रीमंत हरीराव महाराजांच्या कारकीर्दीच्या आरंभी जमा व खर्च काय होता ते दाखवितो. पंचवीस लाखाकडे दोन्हीही बाजू गेलेल्या दिसतात कांहीं लेखांक होळकरशाहीची साधनें यांत पहावयास मिळतील. त्यात संस्थानातील देवस्थानें व संस्थानच्या हद्दीबाहेरील देवस्थानें संस्थानच्या मालकीची त्यांची व्यवस्था कशी चालते, तसेच छत्र्यांची व्यवस्था, सरदार बुळे यांचे राज्याशी असलेले संबंध, खानदान घराण्यांची वृत्ती, त्यांत उत्तम दिसून येते. प्रजेची दाद कशी घेतली जात असें; हरीराव महाराज आपल्या पूर्वजांचे स्मरण ठेवून पुण्यतिथीस गांवांत मिरवणुक काढीत. यापूर्वी हा प्रकार झालेला नाही अतएव हे त्यांस भूषणावह आहे; अंतरव्यवस्था तीवरून पडलेला प्रकाश दर्शविणारा; इ. स. १८३२ मध्यें इंग्लडांत सुधारणेची जी मोठी लाट उसळली ती बेंटिंक व लार्ड मेकाले यांच्यासह हिंदुस्थानावरही आली. तिचे कांहीं अल्प तुषार एतद्देशिय संस्थानांतही येऊन पडले. लेखांक २ वरून लष्करी खात्यांत नवीन पद्धतीची शिस्त सुरू केल्यानें नवीन खर्च कसा उद्‌भवला हें दिसून येते. मराठी राजवट सुरू झाली ते वेळी स्वदेशी सैन्य होतें. प्रत्येकाची भाकर त्याचे स्वतःचे जमिनीवर मिळणारी असल्यामुळें सरकारावरती ओझें नव्हते. प्रत्येक शिपाई थोडाबहुत वतनदार असल्यामुळें आपल्या वतनासाठी तरी तो अंतःकरणपूर्वक लढे. पुढें लढाईचा पेशाच बनला. या पेशामुळें जिकडे अधिक पैसा तिकडे वळायचे ही वृत्ती बळावली. स्वदेश व स्वसंस्कृती हा प्रश्नच उरला नाही. आकुंचित झालेल्या क्षात्रवृत्तीला छत्रपतींनीं जो उजाळा दिला होता तो तितकाच राहिला. स्वराज्यातच परक्या सरकारचे हस्तक होऊन बसलेले सैन्य वावरूं लागले. त्यातच पठाण अरबांची भर पडली. धरबंद कोठेंच राहिला नाही. याच्यापुढील पायरी म्हणजे कवायतीचा शिरकाव व हीं कवायत शिकविण्यासाठीं ज्या युरोपियनांचा आश्रय केला तेच पुढें फितूर झाले, हे होळकर शिंद्यांच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. आतां नवीन पद्धतीचे कपडे सुरू होऊन बाह्य गोष्टींचाच दिमाख वाढला. अंतरंग क्षात्रवृत्तीचे बनावें, स्वधर्माचे

पालन व्हावे व स्वदेशरक्षणीं देह झिजावा म्हणून छत्रपतींनीं घालून दिलेला श्रीमद्भारतीचा रोजच्या पाठाचा दंडक याचा मागमूस राहिला नाही. अशा स्वरूपांत चालू असलेल्या क्षात्रवृत्तीचे चित्र या लेखांकानें आपल्या डोळ्यापुढें उभें राहतें. लेखांक ३ जमीदार इंदूर यांचा पूर्वापार संबंध दाखवितो. लेखांक ४ सरदार बुळ्यांनीं दिलेली सनद व त्यावर होळकरांचा शिक्का या दृष्टीने महत्त्वाचा आहे. बुळे यांच्या सनदांचा सरकारांत अजून बोलबाला आहे हे सरकारांस भूषणावह आहे. लेखांक ५ त तत्कालीन उत्पन्नाच्या बाजू दृष्टोत्पत्तीस पडतात. लेखांक ६ त दरखदार लोकांची महालवार यादी दर्ज करण्याचे दोन हेतू आहेत. सरकार व सेवक उभयतांसही पूर्वापारचे स्मरण राहणें इष्ट आहे.

लेखांक ७ त श्रीमंत हरीराव महाराजांचे कारकीर्दीचा जमाखर्च आला आहे. चार लक्षांची तूट आहे. लेखांक ८ त सरदार बुळे यांजकडे त्यांचे परगणे आले. त्यामुळें अंतरव्यवस्थाही त्यांजकडे असल्याचे रेसिडेंटसाहेब त्यांस कळवितात. लेखांक ९, १० त संस्थान झाबवे येथील, होळकरांशीं मांडलिकत्वाचा संबंध स्पष्ट होतो. तसेच विठ्ठलपंत तात्यांची कीर्ती त्यांचे मागें राहून त्यांच्या वंशजास उत्तेजक होते. वगैरे लेखांक ११ या प्रकरणाच्या शेवटीं अनुक्रमें घेतले आहेत.

(लेखांक १) जमाखर्च संमत १८९०-९१ चा सोबत जोडला आहे.

(लेखांक २) यादी पलटणाकडे खर्चास इ. स. १२४४ फसली. (इ. स. १८३३-३४)

| | |
|---|---|
| १३०० | पलटणाकडे दसऱ्यानिमित्य वगैरे. |
| १५० | टोप्या सफेत पंच व कुंडल व चांद नवीन आफिसर लोकांचेकरितां टोप्या ५ करावयास चांदी, वगैरे खर्चाबद्दल. |
| ३० | रेशीम विलायती. आफिसर लोकांच्या कुडत्या ३० व तुरुकस्वारांच्या कुडत्या २५ शिवविल्या त्यांस कोर सोनेरी व रुपेरी लावली, त्यात व कुडत्यांस शिवावयास तोळे ३० दर १ प्रमाणें. |
| १५ | धागा मारवाडी. वजन दरशेरी दीड मलजी दरजी. |
| १०० | बुदामे सोनेरी व रूपेरी डजन ८० दर डजन सव्वा रुपये. |
| ५-०४-० | दोरण पिवळी तुरुकस्वारांच्या कुडत्याला लावावयास गज १७५. |
| ५७ | बुदाम कुडत्या सुनारी ९००० कथील वजन मण व मुजरी. |
| ३९३-१२-० | कलाबूत सोनेरी व रुपेरी आफिसर लोकांच्या कुडत्या सुमारी ३० त्याजकडे तोळे १६० सोनेरी तोळे ८० दोन्ही मिळून आकार सदरी. |
| ५०० | पितळ. टोप्यांकडे वजन गुजारत मनसुखदास कसारा. |

सदरची चिठ्ठी बाळाजी रामचन्द्र याजवर करून देवावे. **(सरकारी रेकार्ड)**

(लेखांक ३ ता. २५-३-१८३६) मश्रुलअनाम तेजकरण मंडलोई परगणे इंदूर यांस कीं तुम्ही हुजूर विनंती केलीं कीं, सरकारांतून हत्ती बक्षीस दिल्हा, त्याचे भूषणास नगारा, निशाण असावे. यास्तव कृपा करून आमचे येथें कदीम नगारा निशाण आहे. हल्लीं चालू नाही ते समागमें चालविण्यास परवानगी व्हावी त्यावरून मनास आणितां तुम्ही सरकारपदरचे

हत्ती दिला ते पक्षी तुमची विनंती ध्यानास आणून हें पत्र जारी केलें तरी नगारा निशाण चालवींत जाणे म्हणोन.

(लेखांक ४ ता. १०-७-१८३६) (शिक्का होळकरांचा) कमाविसदार वर्तमान भावी परगणे थांदले गोसावी यांस स्ने।। चिमाजीराव बुळे दंडवत शके १७५८ राजश्री धोंडो सदाशिव यांनी हुजूर इंदूरचे मुक्कामी विनंती केली कीं, प्रगणें मजकुरची आमीनीची आसामी देऊन थोरले सुभेदारांनीं सनदा व पत्रें करून दिल्या होत्या. मध्यंतरी भुजंगराव पवाराचे गर्दीत गांव दग्ध झाला. त्यात आमचे गृहास अग्नि उपद्रव होऊन कागदपत्र भस्म झालें. त्यांस कृपा करून नवीन पत्रें जाहली पाहिजेत. त्यावरून मनास आणितां तुम्ही पूर्वापार पदरचे चालविणें प्राप्त जाणोन मागील वहिवाट चालत आल्याप्रमाणें नेमणुक : २५० वेतन जातीस. ५१ माणुस एक बारमाही एकूण रु. ३१० महाल चलणी तीनशे एक शिवाय गांवगन्ना भेटी पंत मशारनिल्हेस पुत्रपौत्र वंशपरंपरा देत जाऊन लिहिण्याचा दाखला ठेवीत जाणें.

## श्रीम्हाळसाकांत

जमाखर्च सुभा श्रीमंत होळकर सरकार चंद्र १ माहे जिल्काद संमत १८९० इसवी इ. स. १८३३ फाल्गुन मास तागाइत मार्गशीर्ष मास संमत १८९१ मुदत माहे १० बा।।

श्री बाकी सालगुदस्त.

२५७४७२५-११-९ जमा साल मजकूर.

१८००१३०-०२-९ ऐन जमा.

७७४५९५-०९-० इजाफत जमा.

------------------------

२५७४७२५-११-९

ऐन माल रु.१४३१९४०-५-९ व शिवाय जमा रु. ३६८१८९-१३-०

येकुण १८००१३०-०२-९

ऐनमाल महालानिहाल वसुली जमा रुपये

| | |
|---|---|
| १३०९०० | प्रगणे इंदूर. जमा मार्फत उदेसिंग राउळ, चिमणसिंग हरकचन्द, व बाळाजी रामचन्द्र |
| ४०५२६५-८-० | प्रगणे रामपुरा |
| ४६,४९५-८-० | सरकार बिजागड |
| १,३६,२०० | प्रगणे महतपूर |
| १६,७७१-७-० | '' तराणे |
| ३९,७०९ | '' जीरापूर व माचलपूर |
| १४,६०० | '' नेमावर |
| १,३७,३७६-८-० | '' देपाळपूर |
| २०,००० | '' संधारा |

| | |
|---|---|
| ५,२२६ | '' सुंदरशी |
| १८,०५१ | प्रगणे कायथे |
| ४३,३३५ | '' सुनेल व ताो कोठडी |
| २५,१८३ | '' बेटमे |
| ३४,९०० | '' चंदवासा |
| १४,२३६ | '' रायपूर |
| ६५,८५१ | '' नारायणगड |
| २६,१०० | '' आलमपूर |
| ७,४१५ | '' हासलपूर |
| ४,६०० | '' काटाफोड |
| २०,००० | '' झार्डा, कंजार्डा, जामुण्या |
| १,३५० | '' ताो नंदवाई |
| १,२२६ | कसबे तल्हेण |
| २,१५५ | मौजे रघुनाथपुरा वगैरे |
| ३०,००० | प्रगणे पाटण श्री केशवरायजीचे |
| ९१,५५३-००-९ | '' कोंच |
| २९,४४३-०८-० | संस्थान देवळे प्रतापगड |
| ३०,२५१ | संस्थान नरसिंगगड |
| २५० | प्रगणे नागलवाडी |
| ५,९४६-१४-० | देशमुखी प्रगणे चांदवड |
| ९,१५५ | संस्थान महेश्वर |
| ४८,३८७ | प्रगणे सावेर |

...................

१४३१९४०-०५-९ रोकड भरणा इंदूर व महेश्वर सावकाराकडे
३,६८,१८९-१३-० सिवाय जमा

७९०००-००-० नजराणा महालपैकीं. वगैरे

| | |
|---|---|
| ५००० प्राो इंदूर | १७००० प्राो महतपूर |
| ४००० प्रो सावेर | १०००० सरकार बिजागड |
| ६००० प्राो सुनेल संधारा कोठडी | २५००० प्राो रामपुरा |
| ५००० प्राो जिरापुर, माचलपूर | ४००० प्राो आलमपूर |
| ५०० प्राो कायथे | ४०० प्राो सुंदरशी |
| १०० प्राो चोळी | २००० सुरजमल ठाकूर गांगरुणकर |

.........
७९०००

१२३७८७-११-० कमावीस जमा

८०४०५ मंडळी महेश्वरी कैदेत होती त्यांजबद्दल ठराव.

| | |
|---|---|
| ७००० | गोपाळ गोविंद |
| ५००० | माधवराव मल्हार |
| २००० | सखाराम पांडुरंग |
| ३०००० | भगवंत अनंत |
| १०००० | बापाजी पांडुरंग |
| २००० | लक्ष्मण परशराम |
| १००० | लालाजी राजाराम |
| २००० | त्रिंबक महादेव |
| २०० | दिनकर वामन |
| ७०५ | रामा किल्लेदार |
| २५०० | खंडो लालाजी |
| .............. | |
| ८०४०५ | |

| | |
|---|---|
| २००० | माणिक शिवराम |
| ६४७५ | खंडो पांडुरंग |
| २६४८३-११-० | काशी वाहूळ |
| ५४२४ | पंचमसिंग खासबरदार |
| २७०० | पांडुरंग राजाराम |
| ३४४७६ | पेशकसी जमीदाराकडील. महालानिहाय. |
| ६७० | आफिमीचे हासलाबद्दल. |
| १३० | बंदुकी वगैरे विक्रीबद्दल. |
| ११६५७१-१०-० | कारखान्याकडील जमा सरकार स्वारी गादीवर बसल्या वेळीं व चिरंजीव सकुबाईचे लग्नामुळें आहेर. बाकी हुजरातपागा व शागीर्दपेशा, चंदीउचापत वगैरे वगैरे. |
| ................... | |
| ३६८१८९-१३-० | |

तेरीज ऐन जमा

| ऐनमाल | सिवाय जमा |
|---|---|
| १४३१९४०-५-९ | ३६८१८९-१३-० |
| ............................................................ | |
| | १८००१३०-२-९ |

इजाफत नफा रुपये.

२७९१९१ सरकारी कलमाबद्दल.

| | |
|---|---|
| २५२९०७-४-० | मातुश्रीसाहेब यांजकडील ऐवज घेतला तो. |
| ६२५० | सरकारी जामदारखान्यापैकीं. |
| १५०० | चिरंजीव सौभाग्यवतीबाईकडील जमा भवानदीन. |
| १८२५६-१४-० | खासगत देहायपैकीं वसूल विद्यमान विनायकराव गोपाळ. |
| २७६-१४-० | महेश्वरापैकीं कलमें सालाबाद. |
| .................. | |
| २७९१९१-००-० | |

४९५४०४-९-० गुजारतवार सावकारी वगैरे.

| | |
|---|---|
| २१७८२-०-० | गणेश विठ्ठल किबे याजकडून देवविले, गणेशदास किसनाजी खाते बाकीबद्दल. बरहुकूम ताळेबंद. |
| २०४३००-०-० | चिमणराम साहेबराम याजकडील ऐवज सरकारांत घेऊन बाळाजी रामचंद्र याजकडे देवविला. |
| १५०१९९-९-० | कारखान्याचे तालेबंदी देणें. जीनसीपलटण, जामदारखाना पोत्याकडे, हुजरात पागा वगैरे. |
| १०००००-०-० | चिमणराम साहेबराम याजकडील ऐवज हुजूर पोत्याकडे. |
| १३९२३-०-० | महेश्वर येथील खर्चाकडे ऐवज. |
| २०००-०-० | मुलूखचंद. |
| १०००-०-० | गोसावीमंडळ परशरामगीर वगैरे. |
| १०००-०-० | विष्णू आबाजी. |
| १२००-०-० | मीर अकबरअली. |
| .................... | |
| ४९५४०४-०-० | |

..................

७७४५९५-९-०

तेरीज जमा साल मजकूर

| रु. | ऐन जमा | इजाफत जमा |
|---|---|---|
| | १८,००,१३०-२-९ | ७,७४,५९५-९-० |

एकंदर जमा ..........................

२५,७४,७२५-११-९

येणेंप्रमाणें जमा असें.

पैकीं खर्च रुपये.

२२२७३९६-१२-९ ऐन खर्च.

३४७०२८-१५-० मुजाफत खर्च.

४००८७९-१५-३ तहवेल खर्च.

१८२६८१६-१३-६ शाहिरू खर्च.

......................

२२२७६९६-१२-९

येकुण खर्च रु. २५७४७२५-११-९

तहवेल कारखानेवार रुपये

३०२६३५ पागा हुजरात चंदी; रातब, वगैरे महाल एकंदर.

२१८३७-०४-० पीलखाना रातब लागवड.

१३९३७-०३-९ हवेली कारखान्याकडे.

३३९२० जिनसी पलटणाकडे तोफखान्यासुद्धां लागवड.

४७५३-०५-९ सुतरखाना, उष्ट्रखाना, निसबत.

९३१-१०-६ सिबीका महाल खाो.

२३८७-१३-० कुंवराकडे खर्च.

२३२८-१३-३ फरासखान्याकडे.

३३५९-०१-० शिकारखान्याकडे.

६७-००-३ जामदारखाना.

८७-०७-० नगारखाना.

७८८९-०६-० रथ कारखाना.

६४८९-०३-९ थट्टीकडे.

१७०-११-० कोठीकडील बैल.

५६-००-० कुणबिणी.

...................

४००८७९-१५-३

शाहिरू खर्च रुपये

१२९६७६७-२-३ बद्दल मुशाहिरा खर्च

७२६६-००-० कारकून मंडळीकडे.

२१७४३१-००-० शिलेदार मंडळी.

४५७१५९-०१-६ पागा हुजरातकडे.

२५८९००-११-० जिनसी पलटणाकडे.

८१८५८-०३-३ शागीर्द पेशाकडे.

२७४१५२-०२-६ नवीन सिबंदीकडे ऐवज भवानीदीन व उदेसिंग राऊळ व

................. परशराम यशवंत यांचे मार्फतीने पडला तो बरहुकुम ताळेबंद.

१२९६७६७-०२-३

५३००४९-११-३ खेरीज मुशाहिरा खर्च.

२३१९८-११-६ धर्मादाय.

४२२७-१०-९ तेवज खर्च.

२६८९-७-० इनाम खर्च.

५०२८७-९-३ लग्न समारंभ खर्च.

१२७२-००-० गंगोदक खरीदीकडे.

३०१४-०५-६ बाडाकडे.

६३०-००-० नुकसानी.

१०२१४७-१४-० सावकारी खर्च बट्टा, व्याज, मनोती, पोतदारी.

२००-००-० बक्षीस खर्च.

८८७-००-० गीरास टाका.

१२५-००-० मंडळीपैकीं बापू शिक्केनवीस मृत्यू पावले सबब खर्च.

४९१-०३-० उचित खर्च.

१८०-००-० कामगारी खर्च कुंभेरचे गांवाबद्दल.

२५४८२-११-३ साहेबलाल, लाटसाहेबास वस्त्रें व जवाहीर वगैरे पाठविले.

१०५७-०४-६ दीपवाळी खर्च.

९१८-०२-६ पेटिया खर्च (शिधा).

६३३०-०७-० खैरात खर्च.

३३७५-०२-९ देवस्थान खर्च.

८३५-०३-९ फाग खर्च.

२५६-०९-६ मयताना खर्च.

१०४७९-०७-६ देणगी खर्च खाते.

१७८३६५-१४-६ खासगी खर्च.

१०५३५५-००-० किता नजराणा महेश्वर बरह्या याद.

१००००-००-० जवाहीर कंठा मोत्याचा.

५०००-००-० सरकार बिजागड येथील मामल्याचे घालमेलीत हरलाल कुंवरजीकडून आले ते.

१४५०-००-० हुजरातपैकीं.

५०८६०-१४-६ जिनसी पलटणपैकीं.

७००-००-० शागीर्द पेशापैकीं.

५०००-००-० प्रगणे देपाळपूर येथील.

..................

१७८३६५-१४-६

२५-०६-३ बागाकडे लागवड.

२८०-१३-९ बंदीवान खाते.

१०५८९-०४-६ पोशाख.

३८१७-०८-० रोशनाई.

२९६३८-०३-९ बहुमान खाते.
२२५१-०२-३ दप्तर खर्च.
१५४-००-९ लवाजमा.
१२९६२-००-३ छत्र्या कैलासवासीच्या कसबे इंदूर २९६२-०-३ कसबे भानपूर १००००.
९८-११-० खलिते खर्च.
५०४२-१३-९ मुदबकाकडे.
३३९-०१-९ संवत्छर प्रतिपदा खर्च.
९१६-१०-० बाजे खर्च.
४४०-०६-० आहेर खर्च.
२४४३-१३-० श्रीमार्तंड व तिसरा चौथा मजला मिळोन.
६५-०४-६ औषधी खर्च.
४४-१३-० दुखवटा खर्च.
२२८-१०-६ जखमीना खर्च.
१६००३-०५-३ दसरा खर्च.
८२-०४-६ स्वारी खाते.
२७६४-११-६ गादीवर स्वारी बसल्यावेळीं.
७२३३-१४-० सरकार निसबत खर्च.
१८२७५-००-० मोघम खर्च. घास, सरपण, द्रोण पत्रावळी वगैरे मिळोन.

..................
५३००४९-११-३
....................
१८२६८१६-१३-६
मुजाफत खर्च रुपये.

२३६२३८-१५-० कारखान्याकडे शिलका व तसलमातीस घेणें.
११०७९०-००-० गुजारतवार हिशेब येणें.
९०००० चंदी उचापत खाते.
१०००० महेश्वरी नर्मदेस महापूर येऊन रयतेचे नुकसानीबद्दल तगाई खर्च.
२००० गणपतराव फणसे याजकडे ओंकारेश्वर येथील कामगारी.
३२०० लागबागेचे खर्चास मार्फत लक्ष्मण प्रल्हाद.
१९०३ चिरंजीव सौ. सकुबाईकडे कापड महेश्वर मुक्कामीं.
७९५ हाफीजखां मेवाती यांस मांडवनजीक बियाबानी यात्रेस बंदोबस्ताकरितां पाठविले.

१९२५ चिमणसिंग हरकचंद याजकडे पंचमसिंग खासबरदार कडील येणें.

२०० खासगीकडील विनायकराव गोपाळ यांस खर्चास.

६६२ चिमाजी बुळे यांजकडे कापड.

१०३ गोपाळ मंदिराकडे कापड.

..............

११०७९०

..................

३४७०२८-१५-०

| | | |
|---|---|---|
| तेरीज एकंदर खर्च | ऐन खर्च | मुजाफत खर्च |
| | २२२७६९६-१२-९ | ३४७०२८-१५-० |
| | येकुण | २५७४७२५-११-९ |

येकुण पंचवीस लक्ष चौऱ्याहत्तर हजार सातशें पंचवीस रुपये पावणे बारा आणे खर्च.

**(हुजूर फडणीसी सरकारी रेकॉर्ड)**

(लेखांक ५) इ. स. १८३६ महाल प्रगणे थांदल, पेटलावद येथील शिवायजमेचे आकाराबद्दल उमराव, ठाकूर यांजकडील आहेरपट्टी, नजर, चौथाई, दंड, फाळा वगैरे राजकीय हक्क वसूल होऊन सरकारांत जमा झाले. विद्यमान धोंडो सदाशिव विभूते दरखी अमीन (इ.स.१८१८ तागाइत १८३६ पर्यंत त्याचा हिशेब)

५०७-०-० श्रीमंत मल्हारराव होळकर यांचे लग्नाचा आहेर प्रत्येक ठाकराकडून आला. इ.स.१८२५ रायपुरा, बुडायता, पाराबोरी, उमरकोट, नोगांव, बावड, करवड, घुगरी, बडबेट, अंतरबेला, गेहेंडी, सारंगी, झकणावदा, जामली व कोदली मिळून.

१०५७२-०-० नजराणा, गुन्हेगारी, कर्ज चौथाई, इमारतपट्टी, वगैरे (तपशीलवार खुलासा सरकारी कागदीं आहे परंतु विस्तारभयास्तव एकंदर आंखच दर्जविण्यांत आला आहे.) तालुके निहायची नांवें मात्र खालीलप्रमाणें आहेत. सारंगी, खवासा, रायपुरा, बुडायता, पाराबोरी, जामली, करवड, उमरकोट, घुगरी, कसारबर्डी, झकणावदा बडबेट, बावडी, अंतरवेला, नोगांव, कोदली, गेहेंडी, सुरवाड्या, उदेपुरिया, हणमंत्या, छारयेणमेंडत्यवाली, केसपुरा, बोहऱ्याचे मुल्लाजी, निसबत राजाजीकडील असाम्या. कोठारी ताराचंद व भिल्ल असाम्या. मिळून गुन्हेगारीचे.

................

११०७९-५-०

येणेंप्रमाणें आकार शिवायजमा असें. **(दरखदार थांदले पेटलावदचे दप्तर)**

(लेखांक ६) इ. स. १८३६ च्या बजेटवरून तपशील : यादी होळकर सरकारचे पदरी महालवार, दरखदार मंडळी सनदी पूर्वापार कायम आहेत. त्यात कांहीं थोरले सुभेदार व अहिल्याबाईसाहेब, यशवंतराव महाराज, यांचे सनदेअन्वयें चालू आहेत. इंदूर शहराव्यतिरिक्त महालवार ही दरखदार मंडळी आपले जिम्मेचें काम करून सरकारी नफानुकसानीचे दाखले संपादन करून ठेवण्याबद्दल यांचे काम आहे. यातील नांवें कांहीं पूर्वीची असून कांहीं हल्लींच्या वंशजांची आहेत.

| अ.नं. | परगणे आणि नांव | दरखदार मय हुद्दा | सालियाना दरखाचा आकार |
|---|---|---|---|
| १ | विठ्ठल आत्माराम शिरस्तेदार | प्रगणे इंदूर | ५६४ |
| २ | दत्तात्रय निळकंठ चिटणीस | '' | ४०५ |
| ३ | कृष्णराव बळवंत दप्तरदार | '' | २८८ |
| ४ | गणेश मंगेश मुजुमदार | '' | ४५३-०४-६ |
| ५ | गंगाधर मार्तंड असामदार | '' | १५३ |
| ६ | सदाशिव रामराव शिरस्तेदार | '' | ०५७-१२-० |
| ७ | गंगाधर कृष्ण असामदार, देपाळपूर | '' | १३०-१४-० |
| ८ | रावजी केशव शिरस्तेदार, सावेर | '' | ६६६-०३-० |
| ९ | सदाशिव रामराव हु.फ.शिरस्तेदार सावेर | | ४५१-०१-० |
| १० | धोंडो सदाशिव विभूते हाल वारीस कृष्णराव गंगाधर विभूते दरखी आमीन, पेटलावद | | ३३७-०८-० |
| ११ | शंकर मोरेश्वर अकबारनवीस, सावेर | | १९७-०४-० |
| १२ | मार्तंड शंकर शिरस्तेदार, पेटलावद | | ३०३-१२-० |
| १३ | पेमसिंग किल्लेदार, भानपुरा | | २५१-०१-० |
| १४ | शंकर श्रीपत असामदार, रामपुरा | | २१३-००-० |
| १५ | मल्हार शिवराम शिरस्तेदार, सुनेल | | २९८-०२-० |
| १६ | गोविंद रामचन्द्र शिरस्तेदार, सुनेल कोठडी | | २४३-००-० |
| १७ | नारायण बळवंत सरदेशमुख, सुनेल | | १११-००-० |
| १८ | शंकर सखाराम पोतदार, भिकनगांव | | २१६-१३-६ |
| १९ | गोपाळ लक्ष्मण शिरस्तेदार, भिकनगांव | | २२३-०८-० |
| २० | बलवंत गणेश कोठारी शिरस्तेदार, शेगांव | | ४०८-००-० |
| २१ | अमृतराव लक्ष्मण घुले सरदेशमुख, लवाणी | | १०५-००-० |
| २२ | जगन्नाथ सखाराम सरदेशमुख, निसरपूर | | १३२-००-० |
| २३ | शांताराम गणेश दरखी आमीन, कन्नोद | | ३३९-१५-० |

| | | |
|---|---|---|
| २४ | विनायक कृष्ण फडणीस, कन्नोद | २५३-०२-० |
| २५ | कृष्णराव गोपाळ शिरस्तेदार, कन्नोद | ७४९-०४-० |
| २६ | शंकर नारायण मुजुमदार, महतपूर | ३१८-००-० |
| २७ | भगवंतराव माधव बक्षीगिरी, महतपूर | २१६-००-० |
| २८ | माधवराव भैयाजी बक्षी, तराणा | १८०-००-० |
| २९ | गोविंदराव माधव शिरस्तेदार, आलमपूर | ४८०-००-० |
| ३० | यशवंत श्रीपत शिरस्तेदार, गरोठ | १३६-००-० |
| ३१ | दत्तात्रय कोंडो मुजूमदार, गरोठ | २९८-०२-० |
| ३२ | काशीनाथ मार्तंड शिरस्तेदार, इंदूर | ३०३-१२-० |
| ३३ | आनंदराव लालजी निसबत केशव मार्तंड शिरस्तेदार भानपुरा | ३६०-००-० |
| ३४ | गुलजार बेग जमादार, खरगोण | २०४-००-० |
| ३५ | भिकाजी हरी सरदेशमुख, खरगोण | २५३-०२-० |
| ३६ | मीरमेहमुदअलीखां हाल, आमीन | आकार कळला नाहीं. |

येणेंप्रमाणें दरखदार सनदी असून हल्लीं बदल्या करण्याचा प्रघात पडल्याचे ज्याचे त्याचे योग्यतेप्रमाणें महालवार बदल्या होऊन कामे घेतली जात आहेत.

(लेखांक ७) इ. स. १८३६-३७ जमाखर्च सुभा राजश्री श्रीमंत हरीराव होळकर सरकार : १७९८४०० जमा : जिल्हे इंदूर, जिल्हे नेमाड, जिल्हे रामपुर भानपुर, जि.नेमावर महदपूर व टांका कोंच, पाटण केशवराय, नरसिंगगड, देवळे प्रतापगड, रघुनाथपुरा वगैरे सुद्धां.

पैकीं खर्च रुपये २१४२५०० यातबद्दल मुशाहिरे पागाहुजरात, सिलेदार स्वार ११२५ जिनसी पलटण असाम्या ४८३५ शागीर्दपेशा असामी ११६५ व कारकून मंडळीसुद्धा : बाकी कांहीं नसून फाजील खर्च मात्र ४,८८,३०० पडला आहे.

(लेखांक ८) इ. स. १८३६ (सही इंग्रेजीत जानबाक्स रेसिडेंट यांची) राजश्री चिमाजी अप्पा बुळे यांचे कैफियतीचे जबाबी छ ६ माहे मे इ. स. मजकूर.

१ ठाकुर दुर्जनसिंग डहीकर व काळूबाबा धरमरायकर व रजपा नाईक दसाणेकर इलाखा चिखलदे हे महालांत चोरी करून उपद्रव देतात यांचा बंदोबस्त झाला पाहिजे त्यांस हे त्रिवर्ग चिखलदे इलाख्याचे आहेत व आपण त्यांजकडून टाका घेत आहात यास्तव आपणास मुनासब आहे कीं जमियत ठेऊन त्यांजला आपले काबूत ठेवावेत. अंग्रेज सरकारकडून जमियत मिळेल हा भरवसा ठेऊं नये.

१ चिखलद्यास पेशजी स्वार रहात होते ते दरम्यान उठविले सबब पुनः कायम व्हावे म्हणोन लिहिले ऐसियासी चिखलद्यास स्वार ठेवणेची जरूरत नाहीं कारण पर इलाखा असल्यानी सरकारी स्वार ठेवणेचा शिरस्ता नाहीं.

१ मौजे उडदा प्रगणे आखराणी येथील बैल आपले इलाख्याचे भिल्लांनीं चोरून नेले. त्याची कैफियत आपलेकडे आहेच. त्याप्रमाणें बैल भिलांकडून परत करून देवावेत.

सदरहूप्रमाणें कलमें ध्यानीं येतील. **(सरदार बुळेसाहेब दप्तर)**

(लेखांक ९) संमत १८९३-९४ इ. स. १८३७ पेटलावद परगण्याचा इजारा झाबवेराजे यांस पांच साला मुदतीने दिला होता त्याजबद्दल कबुलायत.

सिद्धश्री इंदूर महाशुभस्थान सर्व उपमालायक सदा विराजमान राजश्री महाराजाधिराज श्रीमंत सुभेदार श्रीहरीरावजी होळकर सरकार बहादुर झाबव्याहून राजे रतनसिंगजी यांचा कृतानेक राम राम विज्ञापना. कबुलायत लिहून देत अहो ऐसीजे. परगणे थांदले पेटलावदची मामलत आमचे कडे रा.रा.बडेसाहेब बहादुर जानबाक्ससाहेब रेसिडेंट इंदूर यांचे मार्फतीने पांचसाला ठराव जाहला तो खालीलप्रमाणें.

१७५००१ पांचसाला मुखत्यारी महाल खर्च व देवस्थान, धर्मादाय व इनाम जमीन नेमणूक वगैरे खेरीज ठराव केला त्याचा तपशील संमत १८९४ तागाइत संमत १८९८ पांचसाला दर साल आंख रुपये ३५००० रुपयेप्रमाणें पांचसाला आकार सदरी.

सदरचा वसूल दोन किस्तीनें कार्तिक शुद्ध १५, १७५०० व चैत्र शुद्ध १५ असें रुपये ३५००० सालचे देत जाऊं, महालचलणी. महाल खजिन्यात भरणा करूं. भरणा न केल्यास शिरस्तेप्रमाणें व्याज देऊं.

शिवाय कलमा.

१ महाल किंवा सायर नाके सुदामतप्रमाणें आहेत तसेंच राहतील. रयतीस जुलूम जास्ती करणार नाहीं.

१ महाली झेंडे किंवा निशाण आहेत ते तसेच कायम ठेऊं.

१ परगण्यातील इनाम, देवस्थानें, वर्षासनदार, नेमणुकदार, वगैरे हक्क सुदामत पाळले जातील.

१ पांच साला पट्टा आम्हास करून दिला. याची सालें पुरी होतांच सरकारांतून मामलेदार येतील त्यांचे सुप्रत बिनदिक्कत ठाणें खाली करून देऊं.

१ महालची आबादी ठेऊन जास्त आबादीबद्दल कोशीस करूं.

सदरहु मक्त्याचे हप्ते साहेब बहादुर यांचे मार्फतीने जमा करीत जाऊं आणि पोट कलमा केल्याप्रमाणें वर्तणूक ठेऊं. कमी जास्त करणार नाही. ता.१ जमादिलावल सन १२४७ फसली. संमत १८९४.

**(सदरहू कबुलायत सरकारी रेकार्ड व दरखी अमीन विभूते दप्तर)**

(लेखांक १०) ता. ६ जानेवारी सन १८४०, हिंदीत खलिता : त्याचे भाषांतर मराठी झाबव्याचे राजाकडून : सिद्धश्री इंदूर महाशुभस्थान सर्व उपमालायक सदा विराजमान्य राजेश्री महाराजाधिराज श्रीमंत हरीराव महाराज होळकर आलिजाबहादूर यांचे शेवेसी. झाबव्याहून महाराज रतनसिंगजी यांचा रामराम. इकडील समाचार श्रीजीचे कृपेकरून उत्तम आहे.

आपलेकडील नेहमी हित चिंततो. आपल्याशिवाय दुसरी गोष्ट नाही. उपरि येथें आमचेकडे फाल्गुन वद्य ३ चे लग्न आहे व माघशुद्ध १ मंगळवारी मांडवा आहे. आपण आमचे मालक असल्याने चार दिवस पूर्वी येथें आगमन झाल्यास विशेष शोभा येणार आहे. येथें सर्व आपल्या हुकमांच्या गोष्टी आहेत. आमच्यावर नेहमी कृपादृष्टी राहत जावी. हे विज्ञापना. मिती पौष शुद्ध २ संमत १८९६ **(होळकर सरकार रेकॉर्ड)**

लेखांक ११, ता.१४-९-१८३८ आबाजी बल्लाळ किबे यांस गंगाधर शिवराम याजकडून संस्थानीं दरम्यान कामाकाजांत प्रबुद्ध कोणी नव्हता. यामुळें कामाचा ओघ न चाले हें सरदारांच्या ध्यानांत येऊन आपली योजना होऊन आषाढ वद्य ६ गुरुवारी वस्त्रें बहुमान होऊन कामाचा मार्ग पूर्वीसारखा चालला आहे. वर्तमान राजश्री गोपाळरावजींनीं लिहिलें. त्यावरून बहुत संतोष झाला. इकडील हे घरोब्याचे विचार, आपली दरबारांत वागणूक राजेश्री कैलासवासी विठ्ठलपंत तात्या यांचे सांप्रदायाप्रमाणें स्नेहवृध्दी ठेऊन वरचेवर पत्रें पाठवीत जावीं. म्हणोन. **(सरकारी रेकॉर्ड)**



## प्रकरण १८ वें

# श्रीमंत हरीराव महाराज होळकर यांची कारकीर्द अखेर श्रीमंत द्वितीय तुकोजीराव महाराजांचे दत्तविधान

## इ. स. १८४१ ते १८४४ जून अखेर

सन १८४१ त रेसिडेंट साहेबांच्या सूचनेवरून श्रीमंत महाराज हरीराव होळकर हे राज्यकारभारांत लक्ष घालूं लागले. दुयम प्रतीच्या अधिकारावर त्यांनीं माणसें नेमण्याचा इ. स. १८४० च्या जुलईपासून क्रम सुरू केला. ज्या नेमणुका केल्या त्यांचा सारांशरूपानें खुलासा खालीलप्रमाणें आहे. पूर्ण पत्रव्यवहार ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या पुस्तकांत नमूद असल्यानें फक्त नाम निर्देश येथें करीत आहोत.

१. राजश्री धोंडो विश्वनाथ यांस कीं तुम्ही लिहिण्याचे कामांत बहुत हुशार जाणोन, शहर इंदूर येथील अदालतीवर मराठी लिहिण्याचे कामीं दरमहा रु.२० वर नेमणूक केली आहे. पगाराशिवाय कोणतेही गोष्टीची गरज व मतलब न ठेवितां काम दुरुस्त करीत जाणे म्हणोन. ता. १९-७-१८४० इसवी.

२. राजश्री आमतन्यासारखां तुम्हांस बहुत हुशार जाणोन शहर कोतवालीचे कामीं दरमहा रु.४० वर मुकरर केलें आहे. काम बहुत हुशारीनें, बंदोबस्त, चौकी, गस्त, रात्रीची निगेवाणी, उत्तम प्रकारें ठेवणें. शहरचे चोरीचा बंदोबस्त ठेवीत जाऊन रिश्वत कोणाकडून न घेतां पगाराशिवाय कोणतेही गोष्टीची गरज ठेऊं नये. म्हणोन वगैरे ता. १९-७-१८४० इसवी.

३. राजश्री रतनचंद कोठारी यांस तुमची परवर्ष करणें सरकारांस मंजूर होऊन तुम्ही शिपाईगिरींत हुशार व जिवावर उदार अशी खातरी जाणून कुमेदानी हुद्दा रिजमंट दुसरीचा तुम्हांकडे सांगितला आहे. दरमहा रु. १०० तरी काम खबरदारीनें करून, घोडे दुबळे न होय, हत्यारें वगैरे व्यवस्थित ठेवणें, कवायत वख्तावर घेणें वगैरे कामें खबरदारीनें घेऊन व करून की ज्यांत नेकनामी जाहीर होईल. म्हणोन ता.६-१२-१८४० इसवी.

४. राजश्री अबदुल रहिमानखां यांस. सरकारांत तमचे लिहिणे पसंत होऊन मुनशीगिरीचें काम तुम्हांकडे मुकरर करून दरमहा हल्लीं शिक्का १०० रु नेमून हें पत्र सादर केलें आहे. काम हुशारीनें, खबरदारीनें करीत जाणें. तनखेशिवाय कोणे गोष्टीची दरकार ठेवूं नये. म्हणोन ता.६-१२-१८४० इसवी.

५. राजश्री हाफीजखां यांस तुम्ही सरकार पदरचे पुराणे चाकर मेहनतही बहुत केली. करितां तुम्हांकडे बक्षीगीरीचें काम मुकरर करून इज्जत वाढविली. तरी आपलें काम वाटणीतनखा, फौजेची व बंदोबस्त बक्षीगिरी वगैरे काम हुशारीने करणें दरमहा रु.२०० हल्लीं शिक्का मिळतील ता.६-१२-१८४० इसवी.

६. राजश्री त्रिंबक गिरमाजी यांस. तुम्ही पूर्वीपासून सरकार पदरचे व इदबारी. करितां ओहदे काम चिटणिसीचें याजवर मुकरर करून दर महा रु.१०० वर मुकरर करून हे पत्र लिहिलें आहे. पत्रें, दस्तऐवज, सनदा, माली मुलकी वगैरे काम खूब खबरदारीनें करावें व खराब व लांच वगैरापासून वेगळें राहून कोणतेही गोष्टीची गरज न ठेवितां, आपली तनखा घेत जाऊन लिहिल्याअन्वयें आमलांत आणावें. म्हणोन ता.१९-१२-१८४० इसवी.

७. राजश्री नारायणराव राम पळसीकर यांस. तुम्ही जुने नोकर खैरख्वाह व सरकारांत परवर्षी करणें आगत्य सबब नायब दिवाणाचा ओहदा तुम्हांकडे आहे, तो महकूब करून पुरा दिवाणगिरीचा ओहदा देण्यांत येऊन तनखा रु. ५०० पांचशें हल्लीं शिक्का नेमून मुकरर करण्यांत येऊन हे सनद लिहिली आहे. तरी दिवाणगिरीचे कामांत बहुत खबरदारी राखून, मुलखाचे आबादीस व रयतेचे तकलीफीस बहुतशी कोशीस करीत जाऊन दरोबस्त दिवाणाचे काम फार हुशारीने करावे. तनखेशिवाय सरकारचे हुकमाखेरीज कोणतेही गोष्टीची गरज ठेऊं नयें. तुमचा इतबार दिनबदीन जादा वाढेल हें जाणून काम करावे. म्हणोन ता.२२-६-१८४१ इसवी.

८. चि. राजश्री बाळाजी नाईक यांस. तुम्ही सरकारचे खैरख्वाह, इनामदार, जाणोन तुम्हांस ओहदे शागीर्दपेशाचे काम मुकरर करून दरमहा रु. २०० मुकरर करून ही सनद सादर केली आहे तरी दप्तरची दुरस्ती हुशारीनें ठेऊन काम करीत जाणें. तनखेशिवाय कोणतीही जरूरी न ठेवितां गफलत सुस्ती न ठेवितां काम करीत जाणें. म्हणोन ता.१३-२-१८४१ इसवी.

९. राजश्री हाफिजखां बक्षी यांस. तुमचे नेक चलन पाहून पुरा बक्षीगिरीचा ओहदा कायम केला आहे व आतां तुम्हांस दरमहा रु.३०० हल्लीं शिक्का मिळत जाईल. तरी

फौजेची तनखा वाटणी, स्वार, वरदी, हत्यारे यांची पाहणी करून घोडे तंदुरस्तींत ठेवणें, कवायत घेणें, वगैरे कामें करून इतर गोष्टीची जरूरी ठेवूं नये. म्हणोन ता.२२-६-१८४१ इसवी.

महाराज स्वतः काम करीत असलेचें प्रत्यंतर वरील कामाचे व्यवस्थेवरून लक्षांत येणारे आहे. यावेळीं श्रीमंतांची प्रकृती असावी तशी नसल्यामुळें रेसिडेंसीत पुढील कालासंबंधीं वाटाघाट सुरू झाली. त्या वाटाघाटींत दिसून आले कीं, गादीस दोन वारस दिसतात. श्रीमंत हरीरावांची मुलगी सौभाग्यवती सकुबाई आणि मार्तंडराव. त्यांपैकीं मार्तंडराव हे आधींच गादीवरून उतरले असल्यामुळें त्यांचा प्रश्न उभाच राहत नाहीं. तरीपण त्यांच्याही पक्षाची कांहीं माणसे असणार. बखेडा उत्पन्न होण्याचा संभव बराच दिसतो. त्याचा आधीच बंदोबस्त करण्याकडे रेसिडेंसीचे लक्ष गेलें. राहिला प्रश्न सकुबाईचा. त्यांचा हक्क मान्य झाल्यास त्यांचे यजमान, बाईचे संरक्षण, या दृष्टीनें तेही राज्यकारभारांत येणें साहजिकच होते. ही वाटाघाट चालू असतां रेसिडेन्सींत कळलें कीं राणीसाहेब गरोदर आहेत. तेव्हां महिने पूर्ण होईपर्यंत हा प्रश्न गुलदस्तांत राहिला. दिवस भरल्यावर राणीसाहेब प्रसूत होऊन कन्यारत्न जन्मास आले. तेव्हां गव्हर्नर जनरलसाहेबांनीं सर क्लाडसाहेबांस दत्तकाचा प्रश्न निकालांत काढण्यासाठी पूर्ण आखत्यार दिला. पण त्याबरोबर सूचनाही आली की गादीवर, चालीरीतीस अनुसरून, स्त्री येऊं शकत नाही. पुढें इ. स. १८४१ त प्रकृती थोडी बरी दिसतांच नारायणराव पळसीकर यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं त्याबद्दल सनद वर आलीच आहे. सारांश, राज्यकारभाराच्या यंत्रातल्या महत्त्वाच्या जागा आतां भरून निघाल्या होत्या. रेसिडेंटसाहेबांच्या दोन सूचनांपैकीं एक सूचना अंमलात आली.

राहतां राहिली दुसरी सूचना दत्तकाची आणि हा प्रश्न वाटाघाटींत उतरतांच पक्षोपपक्ष उभें राहून जो तो आपले घोडे पुढें दामटूं लागला. राजाभाऊ फणसे यांची इच्छा सर्व सत्ता आपले मुठीत यावीं. त्याप्रमाणें आजूबाजूस नजर टाकतां, कृष्णाबाई, मासाहेब व गौतमाबाईसाहेब आपल्या रस्त्यांत त्यांस काट्याप्रमाणें दिसूं लागल्या. मासाहेब मार्तंडरावांच्या पक्षपाती आहेत असें फणसे बोलूं लागले. हरीरावांच्या मनावर त्याचा परिणाम झाला. कोठच्याही प्रकारे चौकशी वगैरे न करितां हरीरावांनीं हुकम केला कीं मासाहेब व गौतमाबाईसाहेब या उभयतांनीं श्रीक्षेत्र महेश्वरीं जाऊन रहावें. आतां जामातसाहेब यांस सर्व कुरण मोकळे झाले.

ता. २७ जून इ. स. १८४१ रोजीं रेसिडेंटसाहेबांचे मदतनीस श्रीमंतांकडेस आले. हेतू हा कीं दत्तकाचा प्रश्न लौकर विल्हेस लागावा. श्रीमंतांची स्वारी बरीच अस्वस्थ असल्यामुळें त्यांच्यापुढें प्रश्न ठेवण्यापलीकडे कांहींएक निष्पन्न झालें नाहीं. दुसरें दिवशीं फणसे आणि दुसरें एक अधिकारी रेसिडेंटसाहेबांस जाऊन भेटले आणि त्यांस कळविलें कीं बापूजी होळकर यांचे चिरंजीव खंडेराव होळकर यांस मांडीवर घेण्याचा विचार श्रीमंतांचा आहे. त्यावर रेसिडेंटसाहेबांनीं कांहीं हरकत घेतली नाहीं.

आषाढ शुद्ध १४ शुक्रवारीं, (ता. २ जुलाई इ. स. १८४१) पंधरा घटकेस मूळ

नक्षत्रावर सिंव्हलग्नीं दत्तविधान झालें. मुलाचे नांव खंडेराव होळकर होतें, तेच कायम केलें. नंतर नाचतमाशा होऊन सव्वाशें तोफांचे सलामीचे बार झाले. त्याजवर बडेसाहेबांकडे साखर द्यावयाकरितां पळसीकर व बाळाजी नाईक यांजला पाठविले. महाराजांचे मांडीवर दत्तविधान झाले. नंतर मैनाबाईसाहेब (श्रीमंत महाराजांचे कुटुंब) यांचे मांडीवर दिले. मासाहेब व ताईसाहेब इंदुरातच हवेलीवर होत्या. दत्तविधानाचा कार बाणगंगेवरच जाहला. रेसिडेंटसाहेबांस आणून दत्तविधान झाले. खंडेराव होळकर मासाहेबांकडे आले. मासाहेबांनीं जवळ घेऊन मंदील व दुपट्टा व कंठी मोत्याची दिली. नंतर ताईसाहेबांकडे जाऊन पुनः माघारें बाणगंगेवर गेलें. त्याजवर वाड्यांत येण्याचा आमदरफ्त राहत गेला.

पुढें त्याच सालीं सप्टेंबर-आक्टोंबरांत नारायणराव पळसीकर दिवाण यांजला देवआज्ञा जाहली. त्यांचे उत्तरकार्यास पांचशें रुपये दिले. कांहीं दिवस गेल्यावर सरकारवाड्यांत रेसीडेंटसाहेबास जाफत (मेजवानी) झाली. समारंभ उत्तम प्रकारचा झाला. प्रसंगास खंडेराव होळकर व फणसे होते. बडेसाहेबांस सामोरे खालील दालनांत गेले होते. गादीपाशीं आल्यावर बडेसाहेबांनीं खंडेराव होळकर यांचा हात धरून गादीवर बसविले. एक घटकाभर बसून नंतर खाना खाण्यास दसरा कचेरीत गेले. खाना खाल्यावर आतशबाजीची मजा दोन घटका पाहून नंतर आम खास दरबार झाला. साहेबलोक दहा पंधरा जण होते. पानदान, अत्तरदान होऊन छावणीस गेले. श्रीमंत खंडेराव यांचे वय या सुमारास तेरा वर्षांचे होते. त्यांच्या संबंधाचा सर क्लाडसाहेबांनीं वरिष्ठ सरकाराकडे जो अहवाल पाठविला तो येणेंप्रमाणें. स्वतः हरीराव महाराजांस आपल्या गोताची फारशी माहिती नसल्यामुळें वयोवृद्ध अशा आपल्या ज्ञातीची बाई गोपिकाबाईकडे चौकशी केली. त्या बाईनें सांगितलें की बापूजी आणि संताजी हे अगदी जवळचे नातलग आहेत. तेव्हां त्या दोघांचे पुत्रांसह महाराजांनीं बोलावून घेतले. आलेल्या मुलांपैकीं खंडेराव हा देखणा व चलाख दिसल्यावरून निवडला गेला. हा मुलगा सुस्वभावी, आनंदी आणि गोड वृत्तीचा दिसतो. ज्यांनी ज्यांनी (युरोपियन अगर एतद्देशीय) या मुलास पाहिलें आहे त्यांस ही निवड योग्यच दिसते. हा मुलगा महाराजांचे सन्निध नेहमी असतो. त्याचेसाठीं एक पंतोजी ठेविला आहे. आतापर्यंत तरी हा मुलगा स्थिरचित्ताचा आहे; पण त्याचें भवितव्य कोणी सांगायचे ? जशी संगती लागेल तसा तो निघेल. साहेबानें व्यापक शिक्षणाची कल्पना श्रीमंतापुढें मांडली असता श्रीमंतांचे उद्‌गार निघाले की ''अशा दर्जाचीं माणसे आम्हांस कशीं लाभणार ?''

पळसीकर दिवाण निवर्तले. श्रीमंतांची तब्येत गैरआरामी. अशा स्थितींत फणसे हे सर्वाधिकारी बनले. व्यसनाधिनता पराकाष्ठेची. रेसिडेंटीचे सूत्र मात्र खूप सांभाळल्यामुळें स्थानावर स्थिर राहिले. नारायणराव पळसीकराचे निधनानंतर त्यांचे चिरंजीव रामराव मूळ जागेवर स्थिर झाले. त्यांनीं इंदूर मुक्कामीं इ. स. १८४२ त आल्यावर फणसे कारभारी यांची भेट घेतली. बाणगंगेस महाराजांची भेट होऊन मोहर एक नजर गुजरून फणसेसह छावणीस रेसिडेंटसाहेबांस भेटावयास गेले. दुसरें दिवशीं हुजूरहून शालजोडी पागोटे देऊन दिवाणगिरीचीं वस्त्रें दिली.''तारीख'' करावयाची सुरुवात झाली.

भवानीदीन कैदेत शहरांत होता. बडेसाहेब घोडदौडीहून छावणीस आले. नंतर फणसे छावणींत जाऊन मुलाखत होऊन बेचाळीस हजार रुपये ठरलेच होते. दुसरें दिवशीं बाळा नाईक कचेरीस अस्तमानी येऊन पहारे उठविलें आणि महूचे छावणींत दाखल होऊन पावती जाहली. त्याजवर जमनादास याजपासून बेचाळीस हजार रुपये सरकारांत दाखल झाले आणि फारकती लिहून दिली. अव्वल अखेर भवानीदिनाकडून रोज रोजिन्यासुद्धां सरकारांत भरणा एक लक्ष अठरा हजार दाखल झाले. त्या उपरांतिक आबा किबे आपले घरीं कैदेतच होते. नंतर त्यांचाही जाब राजाभाऊ फणसे यांजकडेस लागून त्यांजपासून दहा हजार रुपये घेऊन तेही मुक्त केलें.

या सुमारास श्रीमंत सौभाग्यवती मैनाबाईसाहेब महेश्वरीहून आल्यातागाईत बेआरामीतच होत्या, दरम्यान क्षयाची भावना होऊन आषाढ वद्य ३० ता.६-८-१८४२ रोजीं देवआज्ञा झाली. त्या समयास जामात जवळ होते त्यांनीं गोप्रदान व वायने वगैरे करविले. भगवंतराव होळकरांचे हातून त्रयोदशांत क्रिया करविली. दरम्यान रेसिडेंटसाहेब एकदोन वेळा मातंगपोशीस आले होते. घोडदौड महूचे छावणीत जाहली. तेथें श्रीमंत खंडेराव होळकर, फणसे वगैरे दरखदारासुद्धां गेले होते. दोन साहेब छावणीपासून अर्धकोसांवर सामोरे येऊन सत्काराने घेऊन गेले. दहा बारा मुक्काम होते. दरम्यान उभयपक्षीं येणेंजाणें होऊन, घोडदौड, कवायत दाखवून साहेब लोकांनीं श्रीमंत खंडेराव यांस बिदा केलें. पूर्व ओघाप्रमाणें फणसेच कारभार पाहत होते. ता. ६ जून १८४३ रोजीं दशहाराचे पर्वणीकरितां फणसे महेश्वरास गेले. तेथें जाऊन श्रीमंत मातोश्री मासाहेब व ताईसाहेब यांजला आपण जातीने मोहरा नजर गुजरून व दरखदार मंडळी व महालोमहालचे वकिलांकडून नजरा करविल्या. उभयतांनीं इंदुरास चलावें याभावीं बहुत विनंती केली. परंतु भीतरपेटा अंतःकरणीं महाराजांचा हेतु की ताईसाहेबांस मात्र आणावे आणि उभयतांत फूट पडावी. हे लक्षांत वागून उभयतां सासू-सुना एकदिल होऊन फणसे यांसी जाब बोलल्या कीं ''तुम्ही आम्हास इंदुरातून वाड्याबाहेर काढिले. याचा दोषमुद्दा साबित करून अंगी लाऊन द्यावा, नंतर आम्ही येऊं. नाही तरी कैलासवासी मोतोश्री तीर्थरूप अहिल्याबाईसाहेबांचे चरणापाशीं बरेच आहोत.'' याप्रमाणें जाबदरजाब होऊन जातीचे उभयतां तेथेंच राहून, फणसे मंडळीसुद्धां निघून इंदुरीं येऊन पोंहचले. तसेच बाणगंगेस महाराजांकडेस भेटीस जाऊन महेश्वरचे वृत्त निवेदन करून नंतर घरास आले. फणसे यांस महेश्वरीं जाण्याविषयीं वीस विश्वे रेसिडेंटसाहेब यांचेही मानस होतें की उभयतां बायांस घेऊन यावे, परंतु योग घडण्यांत न आला.

तदोत्तर श्रीमंत हरीराव महाराज हे बाणगंगेहून निघून सरकारवाड्यांत येऊन श्रीमार्तंडाचे दर्शन घेऊन वर कचेरींत येऊन गादीची पूजा होऊन सव्य प्रदक्षिणा घालून गादीस नजर करून गादीवर बसले. अर्ध घटका आम, खास दरबार झाला. समस्त दरखदार मंडळी वगैरे यांच्या नजरा मामूलप्रमाणें होऊन नंतर स्वारी श्री खेडापतीस जाऊन तेथून श्रीलाबऱ्याभेरूस जाऊन पुनः बाणगंगेवर माघारीं आले. पुढें कांहीं कारणामुळें जामाताविषयीं खिलाप मनांत वागून काम करण्याचे कांहीं गैरशिस्तपणा व आपस्वार्थी ही दिसण्यांत

आल्यामुळें महिना दोन महिने किंतु पोटांत वागत होता. पुढें रेसिडेंटसाहेब येऊन फणसे यांजविषयीं सक्त बोलणें बोलून, त्यांतील भाव कीं फणसे यांनी कारभार करावा. परंतु सरकारांनीं जाब न देता उगेच राहिले. नंतर साहेब छावणीत गेले. पुढें कांहीं दिवसांनीं महाराजांचा हुकूम नसतां फणसे मजकूर छावणींत गेले. त्याजवरून सरकारांची मर्जी जाऊन हुकूम झाला कीं तुमचे कामांत वागूं नये. रेसिडेंटसाहेबांनीं बहुत रदबदली केली परंतु सरकारांनीं साफ सांगितलें कीं आमचे कामात वागूं नये. नंतर साहेब छावणीस गेले. गणपतराव फणसे आलमपुरास राहत त्यांजकडेस महालपैकीं पंचवीस हजार रुपये तसलमातींत निघत होते. तो ऐवज रोख बाणगंगेस तोडे नेऊन दाखल केलें. पावती सरकारांतून घेऊन फारक झाले.

सन १८४३ च्या अखेर महाराजांचे प्रकृतीस बेआराम झालें, दिवसेंदिवस शरीरास विकृती जास्ती होऊं लागली. सबब वेदशास्त्रसंपन्न सूर्यनारायण शास्त्री व रामराव नारायण पळसीकर या उभयतांस महेश्वरीं मातोश्री मासाहेब व ताईसाहेब यांजला आणावयाकरितां रवानगी केली. स्वाऱ्या इंदूर मुक्कामीं वाड्यांत येऊन दाखल झाल्या. श्रीमार्तंडाचे दर्शनानंतर बाणगंगेस महाराजांस भेटावयास गेल्या. नित्यक्रम बाणगंगेस जाण्याचा ठेविला. दिवसेंदिवस शरीरप्रकृती बिघडूं लागली. यामुळें विजयादशमीस सरकार बाहेर निघाले नाहीत. श्रीमंत राजश्री खंडेराव महाराज मात्र बमयफौज तोफा पलटणें आदि करून सालाबादप्रमाणें समारंभानें शमीपूजन करून माघारें वाड्यांत येऊन श्रीमंत मातोश्री मासाहेबांचे दर्शन घेऊन बाणगंगेस गेले.

कांहीं दिवसांनीं श्रीमंत हरीरावांची प्रकृति निखालस बेफामी जाहली. तेव्हां बंगल्यावरून सरकारांस खालीं आणलें. रेसिडेंटसाहेब आणखी तीन साहेब बाणगंगेस येऊन दाखल झाले. साहेबलोक छावणीस गेले. उपरांत सरकार कांहीं शुद्धीत येऊन वाड्यांत चलावे असा हुकूम झाला. स्वारी येऊन पिछवाडीचे मासाहेबांचे चौकांत राहिले. दिवसेंदिवस क्षीणता होत चालली. औषधी उपचार व दानधर्म अनुष्ठानें वगैरे गोप्रदानें आदि करून बहुत केली. नंतर मोक्षधेनू इत्यादि दानें देवविलीं. कार्तिक शुद्ध द्वितीया शके १७६५ तारीख २५ आक्टोबर इ. स. १८४३ रोजीं श्रीमंत निधन पावले. नंतर रेसिडेंटसाहेब वगैरे आले. त्यांनी मातोश्री मासाहेब व ताईसाहेबांस दिलासा देऊन खात्री करून लाटसाहेबांचा खलिता दिला आणि खंडेराव होळकर यांचा हात धरून मासाहेबांचे व ताईसाहेबांचे हातांत हात घालून दिला. नंतर सरकार स्वारी छत्रीवर दाखल झाली. नंतर दहन होऊन, महाराजांस निधनास दोनतीन दिवस झालेवर रेसिडेंटसाहेबांनीं राजोजीराव फणसे यांजला आणावे याविषयीं मासाहेबांसीं रदबदली करून कागद रवाना करून फणसे यांस बोलविलें. फणसे आल्यावर सरकारवाड्यांत येऊन मासाहेबाकडे व ताईसाहेबांकडे व खंडेरावसाहेब व हरकुबाई यांसह सर्वांचे शांतवनाच्या गोष्टी बोलून घरास गेले. वाड्यांत येण्याचा क्रम सुरू झाला. गोपाळराव बाबा गानू खासगीच्या कामावर रुजू झाले. अकरावें दिवसापासून दानप्रसंग सुरू होऊन ब्राह्मणास दानें यथाविधी झाली. कमकसर पंचवीस हजार रुपयापर्यंत

धर्म झाला. सरकारवाड्यांत दहा हजार पात्र झालें. उपरांतिक देकार छत्रीवर झाला.

कार्तिक वद्य ६ ता. १३ नोव्हेंबर इ. स. १८४३ सोमवार पुष्य नक्षत्रावर वृश्चिक लग्नांत श्रीमंत महाराज खंडेराव होळकर गादीवर बसले. तमाम आमीर, उमराव, सरदार व साहेब रेसिडेंट ब्यागसाहेब आणखीही महूचे जनरल आदिकरून वीस-बावीस साहेब होते. त्यांजला आणावयाकरितां पळसीकर दिवाण व खासगी दिवाण उभयतां जाऊन घेऊन आले. नंतर पेशवाईस राजश्री फणसे कमानी दरवाजापावेतों सामोरे जाऊन साहेबलोकांस सदर कचेरीस घेऊन आले. त्यावर सरकार श्रीमार्तंडाची पूजा व कुलाचार विधी करून नंतर गादीपाशी येऊन गादीची पूजा करून गादीवर बसले. त्यावेळेस महुचे जनरल आले होते. त्यांच्या सलामीच्या तोफा झाल्या. नंतर लाटसाहेबांची एकवीस वस्त्रें व कंठी शिरपेंच व तुरा मोत्याचा व दोन पोच्या व तरवार महाराजांस दिली आणि हत्ती इंग्रेजी हौदा चांदीचा सोनेरी मुलामा व घोडा नजर केला. त्यावर साहेब लोक रेसिडेंटांनीं फणसे द्वयांस सात-सात वस्त्रें दिली. मोत्याच्या कंठ्या व पोच्या दिल्या. सरकारचे दरखदार मंडळीस सर्वत्रांस साडेतीन तीन वस्त्रें दिली. रामराव नारायण दिवाण व गोपाळरावबाबा गानू या उभयतांस मोत्याच्या कंठ्या दिल्या. चिमाजी अप्पा बुळे यांजला साहेबांनीं सात वस्त्रें व मोत्याची कंठी व पोच्या दिल्या. हा समारंभ झाल्यावर गोषमहमद जावरेवाले याजलाही सात वस्त्रें, कंठी व पोची दिली.

साहेबांकडील सलामी होऊन त्या उपरांतिक सरकारांनीं लाटसाहेबांस एकवीस वस्त्रें व कंठी शिरपेंच, जीगा व पोच्या जोड दिला. रेसिडेंटसाहेबांस नऊ वस्त्रें, कंठी, शिरपेंच तुरा मोत्याचा व पोच्या जोड याप्रमाणें दिल्हे. जनरलसाहेबांस वस्त्रें पांच देऊन कंठी, पोच्या जोड एक, तरवार, याप्रमाणें दिले. आणखी साहेब होते त्यांजलाही योग्यतेनुसार वस्त्रें व तरवारी दिल्या. त्याउपर नबाब गोषमहमद यांनी सरकारांस वस्त्रें, कंठी, शिरपेंच, घोडा, हत्ती, नजर केलें. नंतर सरकारचे तोफेची सलामी चार घटका सतत चालली. राजोजीराव फणसे व बुळे यांनीही सरकारास वस्त्रें, कंठ्या, शिरपेंच दिले. धारकर, देवासकर पवार यांजकडील भले लोक व दिवाण आले होते. त्यांनीं सरकारांस वस्त्रें, कंठ्या, शिरपेंच दिले व सरकार पदरची माणसे कर्नल खुदाबक्ष व हाफीज भाईबक्षी व बाळाजी नाईक यांसही साहेबांनी साडेतीन-तीन वस्त्रें दिली व तरवारी, ढाला, कंठ्या, दिल्या. राजोजीराव फणसे व बडेसाहेब मासाहेबांकडे एक घटकाभर जाऊन खलबत झालें. त्यावर साहेबलोक छावणींत गेले. सरकार देवदर्शनास जाऊन माघारें आले. मासाहेबांचे मुजऱ्यास गेले ते समयीं मासाहेबांनी शंभर रुपये ओवाळून खिजमतगारास दिले. सरकारांस पोशाख व हिऱ्याची कंठी व भुजबंद दिला. नंतर सरकार तिसरें मजल्यावर गेले, रात्रीं तमाम मुत्सद्दी मंडळी व कर्नल बक्षी, आफिसर, रिसालदार यांच्या नजरा दरोबस्त गुजरल्या. दुसरें दिवशीं बडेसाहेबांस वगैरे साहेबांस जाफत होऊन दारूकाम पानदान अत्तरदान होऊन छावणींस बिदा केलें. ते वेळेस तोफेचे बारही सलामीचे एकवीस २१ झाले. त्याउपर सरकार गादीवर बसल्याची बहुमान वस्त्रें सर्वत्र मंडळींचे नांवाचीं ठेविलीं.

कांहीं दिवसांनीं उडनसाहेब दुयम, सरकारवाड्यांत येऊन जामदारखाना येथील मोजदाद केली. कलकत्याहून खलिता आला त्यात मजकुर कीं : कैलासवासी हरीराव होळकर यांची व सरकार इंग्रेजीची दोस्ती बहुत. सबब खंडेराव होळकर पंचवीस वर्षे वयात येईपावेतों आम्हांस दौलत राखणें भाग आहे. सबब चौथें मजल्यावरील रोकड व जवाहीर व सोने आदिकरून मोजदादीस आरंभ केला आहे. मोजदात होऊन खजिन्यास व जवाहीर व सोने वगरे दास्तानीं लावून ताळे देऊन वर मोहरा केल्या आणि किल्ल्या मासाहेबांचें सुप्रत केल्या.

राजोजीराव फणसे यांनीं हरकुबाईची गोताई करावी असा विचार करून रेसिडेंटसाहेब यांचीही अनुकूलता करून घेऊन मासाहेब व ताईसाहेबांस त्यांजकडून सांगून त्यांची उभयतांची अनुकूलता करून घेऊन धनगर वगैरे यांचीही सामलात करून सर्वानुमतें गोताई ता. १० जानेवारी इ. स. १८४४ रोजीं करून जातीस जेवण देऊन वस्त्रें दिली. कारभारी, अधिकारी व अवांतर धनगर मंडळी त्याचप्रमाणें दरखदार कारकून मंडळीसहित सारासार पाहून वस्त्रें दिली.

ता. २५ रोजीं रेसिडेंटसाहेबांनीं दिवाण व गोपाळराव बाबा खासगी दिवाण या उभयतांस बोलावून नेऊन सांगितले कीं कैलासवासी हरीराव महाराज बहादुरांची आमची दोस्ती चालली. त्यामागें खंडेराव महाराज हुशारीत येईपावेतों आम्हास दौलतीचें कामकाज पाहणें प्राप्त आहे. आमचे तर्फेनें ईडनसाहेब सरकारचे कामावर नेमले होतें. परंतु त्यांजला कामामुळें फुरसत नाही, सबब आमचे तर्फेनें राजोजीराव फणसे सरखेल हे कामकाज पाहतील. याप्रमाणें मासाहेब, खंडेरावसाहेब आदिकरून यांस निरोप गेला. त्यावरून राजोजीराव फणसे वाड्यांत येऊन कामकाजाविषयीं मासाहेबांची परवानगी घेऊन पूर्व ओघाप्रमाणें कारभारास आरंभ केला.

कंपनीचा बातमीदार लिहितो कीं, याच सुमारास श्रीमंतांस कुसंगतीनें घेरून टाकिलें होते. कामकाज नाहीं, विपुल पैसा हातीं आणि घरीदारी हलक्या मनोवृत्तीच्या लोकांचा घेरा. त्यांनी सर्वांनी आपली पोळी पिकवून घेतली आणि श्रीमंतास भर तारूण्यांतच दुर्धर व्याधी जडली. सहा-चार महिने जीर्णज्वराची भावना होती. दिवसेंदिवस ज्वराची प्रवृत्ती विशेष होत चालली तेव्हां डाक्टरसाहेबांनीं औषधोपचार बहुत केला तेणेंकरून गुणास न येतां माघ वद्य १४ ता. ८ फेब्रुवारी इ. स. १९४४ रोजीं देहावसान झालें. उत्तरकार्यांस दहा हजार रुपये लावून एकादशपर्यंत समाप्ती होऊन थोडाबहुत देकारही केला.

त्यावर, गादीचे जाग्यावर गादी घालून पूर्वक्रमानें कारभार महाल मुलखी वगैरे सुरूं होऊन श्रीमंत मासाहेब व बडेसाहेब रेसिडेंट ह्यांचे हुकमाप्रमाणें राजश्री राजोजीराव फणसे कारभार करूं लागले. गणपतराव फणसे यांजला सरनौबतीची वस्त्रें साडेतीन दिली. महिपतराव कोठेवाले यांजला इंग्रजांचे वकिलीची वस्त्रें दिली. कांहीं दिवसांनीं ब्यागसाहेब विलायतेस जाण्यापूर्वी मासाहेबांस पुसावयास वाड्यांत आले होते. शिष्टाईच्या गोष्टी सांगून अत्तरपान, हार-तुरे इतकाच बहुमान होऊन रवानगी केली.

ता. ४ एप्रिल इ. स. १८४४ रोजीं रेसिडेंटाचे जागीं नेमलेले हामिलटनसाहेब खजराण्यास आले. तेथें पेशवाईस राजोजीराव फणसे, खासगी दिवाण व नारायणराव दिवाण हे जाऊन छावणीस साहेबांसह पोचले. राजोजीराव फणसे कामकाज पाहत होते.

ता. २७ मे इ. स. १८४४ कैलासवासी हरीराव महाराज व सौभाग्यवती गेहनाबाई व पहिली स्त्री या उभयतां व चिरंजीव खंडेराव होळकर यांसह नवीन छत्री बांधून चारी मूर्तींची स्थापना केली. तोफेचे आवाज सव्वाशें व बारही पुष्कळ होऊन दानधर्म बराच केला.

चार महिने बारा दिवस अवकाश गादीवर कोणी नाहीं. पुण्यास मार्तंडराव होळकर होते, त्यांजला आणून गादीवर स्थापना व्हावी हे मानस मासाहेबांचे. परंतु याजला ताईसाहेबांचे मानस नाही व साहेब लोकांचेही नाही. सबब तो जाब रहित होऊन पुनः हरकुबाईसाहेब यांचे मांडीवर मुलगा दुसरा देऊन कारभार चालवावा हा बेत फणशांचा. परंतु आपसांत किस्सा वाढेल याबाद तोही रहित करून रेसिडेंटसाहेब यांचे अनुमतें लाटसाहेब कलकत्तेवाले यांचा हुकूम आणून नंतर आषाढ शुद्ध १२ द्वादशी गुरूवार शके १७६६ ता. २७ जून इ. स. १८४४ रोजीं पंधरा घटकेस श्रीमंत मातोश्री कृष्णा मासाहेब यांचे मांडीवर मुलगा बसविला. त्याचे नांव तुकोजीराव होळकर ठेविलें. लाटसाहेबांकडील वस्त्रें देऊन गादीवर स्थापना केली.

येथें ''विराम काळ भागाचा'' विराम झाला. इ.स.१८१८ ते १८४३-४४ पर्यंतची हकीगत या भागांत आली आहे. या पंचवीस सव्वीस वर्षात चार कारकीर्दी झाल्या. पैकीं श्रीमंत मार्तंडराव आणि श्रीमंत खंडेराव ह्यांच्या कारकीर्दी महिन्यामासांच्याच झाल्या. श्रीमंत मल्हारराव द्वितीय यांची सगळी आयुर्मर्यादाच पंचविशीची. त्यांच्या आयुष्याची पहिलीं दहा वर्षे सैन्यांचा बेदिलपणा व बखेड्यांत गेली. सरकारची एक बाजू बेबंद होऊन इंग्रजाशीं प्रसंग आला. प्रसंग मोठा बिकटच पण विठ्ठलपंत तात्यांच्या कर्तृत्वानें गंडांतर टळलें. तहानंतर आठ वर्षात तात्यांनीं दौलत कशीबशी पुन्हा उभारली. त्या नंतरच्या सात वर्षांत श्रीमंत मल्हारावांस दुसरा कोणीच कर्तृत्ववान् पुरुष लाभला नाही. श्रीमंत मार्तंडराव आले आणि गेले. नंतर श्रीमंत खंडेराव अल्पायुषी होऊन गेले. श्रीमंत हरीराव गादीवर आले तत्पूर्वी महतपूरच्या लढाईत त्यांनीं चमक दाखविली होती पण पुढें तुरूंगवास घडला. कोठच्याही तऱ्हेची वाढ अगर विकास होण्यास अवसर मिळाला नाही. गादीवर आले तेव्हां स्वपक्ष व परपक्ष यात कांहीं दिवस गेले. पुढें प्रकृती बिघडली. प्रकृती थोडीशी सावरल्यावर सर्वच कारभार स्वतः पाहण्याची उमेद धरलीः पण हे सर्व काम थकलेल्या शरीरास व कुंठित झालेल्या बुद्धीस आवाक्याबाहेर गेलें. आसपास कर्तृत्ववान् पुरुष उभा राहिला नाही. रेसिडेन्सी सांभाळली की घोडी गंगेत न्हाली ही कर्तव्याची सीमा होऊन बसली. सारांश, आंत आणि बाहेर सर्वत्र अंधार अशी स्थिती होऊन, विठ्ठलतात्यांनीं उभारलेली ही इमारत खचून जात होती, असा हा एकंदर पाव शतकाचा अहवाल आहे. मुलखगिरी तर नाहीच आणि अंतर्व्यवस्थेंतही पाऊल आंतच असा हा आखडता आखुड

कालखंड झाला. नशीब एवढेंच : ह्या राज्ययंत्रात जीव धुगधुगी धरून राहिला होता. यापलीकडे अनवस्था गेली नाही हेच मोठे भाग्य. या थंडावत जाणाऱ्या राज्ययंत्रांत उष्णता घालून त्यांस चालना देणारा थोर पुरुष पाहिजे होता. संस्थानच्या पुण्याईने तो पुढें लाभला. तो विक्रमासारखाच झाला म्हणून त्या कालास ''विक्रमकाल'' हे नांव देऊन पुढील म्हणजे या खंडाच्या तिसरे भागांत त्याचे विस्तृत विवेचन होईल. आज केवळ गादीवरच बसविले.

इ. स. १८१९ तागाइत इ. स. १८४३ ह्या काळात जहागिरी, इनाम, धर्मादाय, गांवें सरकारांतून दिलीं गेलीं त्यांचा तपशील ह्यापुढें देत आहोंत –

## श्रीम्हाळसाकांत

स्टेटमेंट ''विरामकाल'' यातील जहागीर, इनाम, धर्मादाय, देवस्थान, इस्तमुरारदार, वगैरेबद्दल इसवी इ. स. १८१९ तागाइत इ. स. १८४३ पावेतों. कारकीर्द श्रीमंत सरकार मल्हारराव होळकर द्वितीय, श्रीमंत सरकार हरीराव महाराज, श्रीमंत सरकार खंडेराव होळकर यांचे सनदांवरून.

| **अ. नं.** | **हल्लींचे वंशजाचें नाव** | **जिल्हा, परगणा** | **गांवें** | **उत्पन्न रुपये** | **देणगीचे साल व स्वरूप** |
|---|---|---|---|---|---|
| | (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | रामलखनगीर | नेमाड, बढवाय | चित्रमोड | १५५० | इ.स.१८१९ धर्मादाय |
| २ | गोविंद त्रिंबक द्रोणकर | नेमाड, भिकनगांव | मडलेन | ९८० | इ.स.१८१९ इ.जहागीर |
| ३ | ठाकुर दुलेसिंग | इंदूर देपालपूर | गढीबिलोदा | ७७८ | इ.स.१८१९ इस्तमुरार |
| ४ | विठ्ठल बलराम,संस्थान विठ्ठल मंदिर महेश्वर | नेमाड कसरावद | टिगरया | १६१८ | इ.स.१८२० इ.देवस्थान |
| ५ | छत्तरसिंग भूमिया | नेमाड, निसरपुर लवाणी | टेमरिया | ४२५ | इ.स.१८२० इस्तमुरार |
| ६ | जसवंतसिंगजी ठाकूर लालगडकर | महतपूर | कछाल्या नागगुराडा, खरडा | ४८४० | इ.स.१८२० इस्तमुरार जागीर |
| ७ | निरमेसिंग व जगजीवन चौधरी | महतपूर | छजूखेडी व बिसलखेडी | २८४८ | इ.स.१८२१ इनाम सर्व्हिस |
| ८ | कन्हैयालाल कानुगो | महतपूर | वणी, इसनखेडी | ३०२५ | इ.स.१८२१ इनाम सर्व्हिस |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९ | गंगासिंग भूमिया निमखेडा, हिंदोला | नेमाड निसरपूर लवाणी | चिराखान बोरलाय अंडयाव | १७०० | इ.स.१८२२ इस्तमुरार इनाम |
| १० | शांताराम गणेश रेघे | नेमावर कन्नोद | अजनास | ६८८६ | इ.स.१८२३ इनाम सर्व्हिस |
| ११ | हमीरसिंग दुर्जनसिंग | रामपुरा, | कुणा हणमंत्या | २४०० | इ.स.१८२३ इस्तमुरार |
| १२ | सूर्यनारायण शास्त्री द्रवीड | रामपुरा भानपुरा | सुजानपुरा | ३५०० | इ.स.१८२५ इनाम धर्मादाय |
| १३ | यशवंतसिंग जमीदार | इंदूर महू | गार्जींदा | १११ | इ.स.१८२६ |
| १४ | कृष्णंभट भिकंभट | नेमावर कनोद | कोथमीर | १७५५ | इ.स.१८२९ इ. धर्मादाय |
| १५ | मल्हार लक्ष्मण | रामपुरा, गरोठ | दाण्याखेडी | २१८५ | इ.स.१८२९ इ. इस्तमुरार |
| १६ | दिनकरराव सखाराम | रामपुरा, गरोठ | देवरिया | २९१० | इ.स.१८२९ इस्तमुरार |
| १७ | ठाकूर छत्रसाल बेरीसाल नंदवाई | रामपुरा नंदवाई | शिवपुरा किसनपुरा | ९९० | इ.स.१८३० जागीर इस्तमुरार |
| १८ | नाथुसिंग शिवसिंग | रामपुरा गरोठ | घट्या, पिछलाय. | १४१५ | इ.स.१८३१ इस्तमुरार |
| १९ | धर्माधिकारी, टिलू शास्त्री रामचन्द्र सखाराम | इंदूर | चव्हाणखेडी | २२२७ | इ.स.१८३२ इ. इनाम धर्मादाय |
| २० | गयाप्रसाद | महतपूर | खजुरिया मनसूर | १४१६ | इ.स.१८३२ इनाम धर्मादाय |
| २१ | श्रीगोवर्धननाथ मंदिर महदपूर | महतपूर | अमडी | ४४० | इ.स.१८३३ इनाम देवस्थान |
| २२ | श्रीहरी नरहरी जोशी | नेमाड महेश्वर | समराज | १३०० | इ.स.१८३३ इनाम धर्मादाय |
| २३ | तवक्कलशहा फकीर | ,, | ढाबला | ५७० | इ.स.१८३४ इनाम पीरस्थान |
| २४ | रामरावजी वाघ | महतपूर | सुकडी | १४८० | इ.स.१८३४ इनाम जहागीर |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २५ | प्यारेलाल झुन्नालाल सोनार | इंदूर | सिंधीबडोद्या | २९३७ | इ.स.१८३५ इनाम सर्व्हिस |
| २६ | मुगुटसिंग भुमिया भारूडपुरा | नेमाड महेश्वर | मोहिदा | ७२५ | इ.स.१८३५ इनाम जहागीर |
| २७ | हरीसिंग भारतसिंग | नेमावर काटाफोड | डेहरी | ६२५ | इ.स.१८४० इनाम जहागीर |
| २८ | संस्थान अंकपात उज्जैन | महतपूर सुंदरशी | तळेणी तिंगजपूर | | इ.स.१८४३ इनाम धर्मादाय देवस्थान |
| २९ | हामीरसिंग भुमिया जामण्या | इंदूर, महू | मौजे स्त्रेडीं | ४०४७ | इ.स.१८४३ इस्तमुरार जागीर |
| ३० | गणपतभट जोशी ब्राह्मण | '' | मोकलाय | १५०१ | इ.स.१८४३ इनाम धर्मादाय |

**कंपायलेशन जहागीरच्या स्टेटमेंटवरून**

या प्रकरणावर प्रकाश पाडणारी माहिती जी सरकारी दप्तरांतून प्राप्त झाली ती ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या ग्रंथांत पाहण्यास मिळेल. श्रीमंत हरीराव महाराज स्वतः काम पाहूं लागल्यावेळीं मुकररीचे हुकूम सोडले त्यापैकीं कांहीं नमुन्यादाखल दर्शविले आहेत.

आतां आपण पुढील भागाकडे म्हणजे विक्रम काळाकडे वळूं.





**श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकर**

शासन काळ : इ. स. १८४४ – १८८६

# होळकरशाहीचा इतिहास

## विक्रम काळ

## श्रीमंत द्वितीय तुकोजीराव होळकर

**इ. स. १८४४ ते १८८६ पर्यंत**



**''आध्यात्मिक आणि आधिभौतिक नूतन सृष्टीचा जो परिपाठ थोरल्या मल्हारजींनीं घालून दिला तोच परिपाठ तुकोजीराव महाराजांनीं चालू ठेवला. केवळ आपल्या संस्थानापुरती नजर न ठेवतां अखिल भरतखंडाची सेवा केली''**

प्रकरण १९ वें

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर यांची कारकीर्द

## इ. स. १८४४ पासून सुरू

गत ''विरामकाळाचे'' भागांत आपण पाहिले की श्रीमंत खंडेराव महाराज अकाली दिवंगत झाले. सर्वांस खेद झाला. त्याप्रमाणें ब्रिटिश अधिकारी यांसही झाला. ज्येष्ठ शु.१० शके १७६६ ता.२७ मे इ. स. १८४४ रोजीं श्रीमंत कैलासवासी हरीराव महाराज, स्त्रिया व खंडेराव यांसह वर्तमान मूर्तींची स्थापना केल्याबद्दल मागील भागांत आलेंच आहे. त्यानंतर रेसिडेंटसाहेबांच्या अनुमतें लाटसाहेब यांचा खलिता येऊन आषाढ शुद्ध १२ गुरुवार शके १७६६ रोजीं मातोश्री मासाहेबांचे मांडीवर होळकर घराण्यांतील मुलगा बसविला व नांव तुकोजीराव होळकर ठेविलें. समारंभ झाला त्याची हकीगत येणेंप्रमाणें :

समारंभास बडेसाहेब आणखी महूचे जनरल वगैरे बत्तीस साहेब होते. प्रसंगीं तोफा साहेबांकडील सरंजाम येऊन समारंभ उत्तम प्रकारचा झाला. लाटसाहेबाकडील वस्त्रें १८ व कंठी मोत्याची, तुरा, शिरपेंच, शहरातील भुजबंद, दोन घोडे व एक हत्ती व पालखी, बंदुक विलायती, पिस्तुल जोडी, याप्रमाणें देऊन नंतर राजोजीराव फणसे व सरदार, दरखदार मंडळीस वस्त्रें, कंठ्या, बहुमान झाला.

सरकारांतून लाटसाहेबांकरितां १८ वस्त्रें व कंठी, शिरपेंच, तुरा, पोच्या जोडी, बडेसाहेबांच्या स्वाधीन केली. रेसिडेंट साहेबांसही वस्त्रें ११ दिली व कंठी, शिरपेंच, पवच्या

जोड दिले. अवंतर साहेब लोकांस योग्यतेनरूप पोशाख व एक एक दागिना दिला. नंतर बडेसाहेब, महाराज व फणसे मासाहेबांकडे गेले. ताईसाहेब व हरकुबाईसाहेब यांसही पैठण्या व खण दिले. साहेब लोकांच्या मडमा तिघी आल्या होत्या त्यांस मासाहेबांनी पैठण्या व खण दिले. हा समारंभ झाल्यावर साहेब छावणीत गेले. इकडील तोफा, पलटणें, स्वार पागेचे व रिसाले हजरच होते. तोफेचे बार दोन अडीचशे झाले. त्या उपरांतिक दुसरें दिवशीं बडेसाहेबांस जाफत जाहली. दिल्ली दरवाजावरील दिवाणखाना तेथें बैठक होऊन खाना झाला त्यावर आतषबाजीचा समारंभ उत्तम प्रकारचा झाला. त्याजवर देवदर्शन, ग्रामस्थ देवांची दर्शने घेऊन वाड्यांत आलें. तिसरें दिवशीं श्रीमंत महाराज व मासाहेब व ताईसाहेब व हरकुबाईसाहेब बमयफौज दरखदार मंडळी आदिकरून बडेसाहेब यांचे बंगल्यावर गेले. तेथें पानसुपारी अत्तरगुलाब होऊन दोन घटका बैठक होऊन सरकार मंडळीसह वाड्यांत आले.

उपरांतिक दरखदार, आफिसर, फौज यांचा आम खास दरबार होऊन नजरा आपआपले कायद्याप्रमाणें गुजरून, सरकारांनीं आश्रित मंडळी, भिक्षुक, दरखदार सरदारांस वस्त्रें दिली. ''यशवंतरावसुत तुकोजीराव होळकर'' असा शिक्का सुरू केला.

देवासकर हैबतराव बापू पवार हे धारेस यशवंतराव पवारांचे लग्नाकरितां गेले होते. तेथें रेसिडेंट साहेबांकडून इडनसाहेब लग्नसमारंभास गेले होते. तेथें इडनसाहेबांनीं पवारास सांगितलें कीं देवाशास जाताना इंदूर मुक्कामीं बडेसाहेब यांस भेटून जावें. त्यावरून पवार ता.१३-८-१८४५ रोजीं इंदुरीं आले त्या वेळेस होळकर सरकार व इडनसाहेब श्रीलाबऱ्या भैरवाचे पलीकडे जाऊन घेऊन आले. नंतर छावणींत मुक्कामास गेले व तिसरें दिवशीं वाड्यांत भेटीस आले. अर्धा घटका आम दरबार होऊन नंतर मासाहेबांकडे गेले. तेथें अत्तरपान होऊन पवार छावणींत गेले. दुसरें दिवशीं मेजवानी सरकारवाड्यांत झाली. बंदोबस्त उत्तम होता. पवार साहेबांस वस्त्रें व मोत्यांची कंठी, शिरपेंच व घोडा दिला. दिवाण राजश्री गोविंदराव महिपत व फडणीस गंगाधर गणेश व दरखदार मानकरी यांस वस्त्रें दिली. नंतर दुसरें दिवशीं पवारसाहेबांकेडी दिवाण आले व मेजवानीस बोलाविलें. त्याजवरून श्रीमंत सरकार छावणीस पवारसाहेबांचे डेरियावर गेले. तेथें पवार सामोरें येऊन हात धरून उभयतां गाशावर बसले. नंतर अत्तरपान गुलाब होऊन वस्त्रें व कंठी, शिरपेंच व घोडा व दरखदार मंडळीस, निवडक मानकरी, बुळे व फणसे वगैरेस पन्नास साठ पोशाख दिल्हे. समारंभानंतर सहा घटका रात्रीचे सुमारें सरकारवाड्यांत दाखल झाले. एक दोन दिवस पवारांचा मुक्काम होऊन उपरांत देवाशास गेले.

सन १८४४ च्या जानेवारींत रेसिडेंट हामिलटनसाहेबांनीं कायद्याची कलमें लिहून खलिता वजारतमहा सवाई सरखेल राजोजीराव फणसे यांचे नांवें पाठवून दरबारचे कामाची शिस्त लावून दिली. यामुळें कामास वैयक्तिक स्वरूप न राहतां शिस्तीचें धोरण लागलें. ही गोष्ट मोठा गाजावाजा न करितां अंमलात आली आणि तीमुळें होळकर राजवटीला नवीन वळण लागले. हा खलिता (होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें) या पुस्तकांत

पहाण्यास मिळेल. यापुढें हामिलटनसाहेब हे रेसिडेंट या नात्याने गव्हर्नर जनरलाकडे बारीक बारीक गोष्टी देखील कळवूं लागले; आणि होळकर दरबारास तीच शिस्त पाळावयास लाविली. दसऱ्याचे उत्सवासंबंधात रेसिडेंटसाहेब कलकत्यांस लिहितातः ''उत्सवाच्या निमित्तानें प्रकट झालेली प्रजेची प्रीती, उत्साह आणि तरूण राजासंबंधीं त्यांचे प्रेम अपूर्व आहे.'' दरसाल प्रकार घडे तसा तो लिहून कळवीत. एके प्रसंगीं कौटुंबिक आपत्तीमुळें महाराजांची प्रकृती थोडी अस्वस्थ होती. स्वारी लवाजमा निघण्याचे तयारीत उभा राहिला लष्कर, लोक, रस्त्यावर जमून राजदर्शनास उत्सुक झाले. यावेळीं प्रकृती अस्वस्थ असूनही लोकांची निराशा होऊ नये म्हणोन महाराज बाहेर पडले. कांहीं अंतरावर गेल्यावर अस्वस्थता अधिक जाणवू लागली तेव्हां सर्व लवाजमा पुढें जाऊं देऊन विश्रांतीसाठी स्वारी जरा बाजूस वळली आणि रेसिडेंट साहेबांसह कांहीं वेळ विश्रांती घेतली आणि एकंदर समारंभात सामील झाले. चातुर्याने समारंभ बिघडू न देतां स्वारी शिलंगणाहून परत आली. साहेबांस कौतुक वाटले व आनंदही झाला.

आपल्या खलित्यानें रेसिडेंट साहेबांनीं दरबारास शिस्त बांधून दिली. फणसे पूर्वीच कामावर होते त्यांस दुखविले नाही पण त्यांच्या जोडीस दौलतीचे दिवाण व खासगीचे दिवाण यांसही बसविले आणि त्रिवर्गांनीं सर्व कारभार चालवावा अशी व्यवस्था केली. जो कारभार उकले त्याची वर्दी दुसरेंच दिवशीं रेसिडेंटसाहेबाकडे जावयाची. त्यांच्या हुकमतीनेंच लहान मोठ्या बाबी विशेषतः खजिन्याची देवघेव होत असत. या संबंधाची माहिती ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या पुस्तकांत दिसून येईल. तसेच महत्त्वाच्या बाबीतही श्रीमंत कृष्णाबाई मासाहेब यांचा सल्ला घेण्याची पद्धत हामिलटनसाहेबांनीं ठेविली होती. विशेषतः ज्या प्रकरणांत फणशांचा कांहीं संबंध आणि तोही घरगुती बाबतीत उद्‌भवे तेव्हां मासाहेबांचा सल्ला घेण्यास रेसिडेंटसाहेब विसरत नसत. हा सल्ला राज्यकारभाराचे धोरण ठरवितांना रेसिडेंटसाहेबांस अनेक वेळीं उपयोगी पडला. प्रथम प्रथम फणसे हे संगनमताने काम करीत, पण पुढें त्यांची स्वार्थबुद्धी बळाविली. रेसिडेंटसाहेबांचे विरूद्ध त्यांनीं कलकत्त्यास एक मोठा तक्रारीचा अर्ज गुजराविला. त्या अर्जाचे उत्तर गर्व्हनरसाहेबांनीं रेसिडेंट मार्फत मागितलें. हे उत्तर देतांना वेळोवेळीं मासाहेबांकडून मिळविलेली माहिती रेसिडेंटसाहेबांस उपयोगी पडली.

या रिजन्सीच्या कारकीर्दीत राज्याच्या अंतःसुधारणेकडे लक्ष पुरविले गेलें. न्यायदानाची पूर्वीची वैयक्तिक व अनिश्चित रीत सोडून अदालती नेमण्यांत आल्या. अनुभवी माणसांस निश्चित पगारावर न्यायाधिकारी नेमण्यांत आले. त्यांच्या निकालावर अपील करण्याची मुभा सर्वत्रांस जाहीर रीतीनें देणेंत आली. या न्यायदानानें लोकांत दिलदिलासा उत्पन्न झाला. पहिल्या वर्षी सहाशें येकुणपन्नास (६४९) अर्ज नमूद होऊन ४६५ निकालांत आले. ही गोष्ट आपल्या अहवालात रेसिडेंटांनीं कलकत्त्यास कळविली. त्याप्रमाणेंच इंदूर शहरात दवाखान्याची सोय पहिल्यांदाच करण्यात आली. संस्थानातील रस्ते सुरक्षित झाल्यानें व्यापाऱ्यांची सोय चांगली झाली. या एकंदर अंतर्व्यवस्थेनें तिजोरीलाही रंगरूप चांगला

चढला. इ. स. १८४५ साली रेसीडेंटसाहेब लिहितात कीं,''श्रीगंगाजळी पांच लाखाची असून वार्षिक उत्पन्न बावीस लाख चारा हजार सातशें सात आहे. याप्रमाणें अंतर्व्यवस्थेत न्यायदान, आरोग्यदायक व्यवस्था व रस्त्याची सुरक्षितता हीं प्रजेस सुखावह होत आहेत.''

जोपर्यंत होळकर राजवट मराठी साम्राज्याच्या पोटीं होती तोंपर्यंत त्या साम्राज्याची प्रतिछाया या राजवटीवर पडणें साहजिक होतें आणि केव्हांही झालें तरी थोडेबहुत प्रमाणांत हें असेंच चालायचें. इ. स. १८१८ नंतर ही राजवट ईस्ट इंडिया कंपनीच्या छायेखालीं आली आणि मालकमादि अधिकारीं यांच्या वळणानें तिचें वळण सुरू झालें. कांहीं व्यवस्थित स्वरूप प्राप्त झाल्यावर गव्हर्नर जनरल याचें विचाराचे वळण जोरावूं लागले. हे गव्हर्नर इंग्लंडहून ताजेतवाने येऊं लागले. त्यामुळें तिकडच्याच वातावरणाचीं त्यांच्यावर छाप असें. हाताखालील लोक येथें वावरलेले असत. त्यामुळें पूर्वीचे म्हणजे मालकम आदिंच्या वेळचे एकांगी किंवा मिळते घेण्याचे धोरण बाजूस पडून विलायती छाप प्रभावशाली होऊं लागला. याचे उदाहरण म्हणजे बेंटिंक आणि मेकाले ही दुक्कल व त्यांनी आणिलेले इंग्लंडचे वातावरण. इंग्लंडच्या पार्लमेंटमधून ही जोडी आलेली. त्यामुळें पहिल्याने सामाजिक सुधारणा तर दुसऱ्यानें शिक्षण सुधारणा हे प्रश्न हाती घेतले आणि ते प्रभावशाली झाले. सतीची पद्धत, मुलीची हत्या, गुलामगिरी आणि भूतचेटकी या संबंधीच्या सुधारणांस प्रथम प्रथम ब्रिटिश हिंदुस्थानांतच नव्हें तर एतद्देशीय स्वतंत्र संस्थानांतूनही विरोध होऊ लागला. त्यांसंबंधात जाहीरनामेही निघाले आणि प्रांतोप्रांतीच्या अधिकाऱ्यांस सक्त हुकुमही सुटले. शेवटीं या सामाजिक सुधारणांस सररहा प्रोत्साहन मिळाले आणि अनेक शतकांच्या मुरलेल्या चाली नामशेष झाल्या.''

मेकालेसाहेबांनीं शिक्षणाचा प्रश्न हाती घेतला; त्यांच्या कौन्सिलांत दोन पक्ष होते. एका पक्षाचें म्हणणे कीं हिंदुस्थानांतील पूर्वापार पद्धतीच चालू ठेवावी. तर मेकाले पक्षाचें म्हणणें कीं, आपली पाश्चात्य शिक्षण पद्धती, विशेषतः राजनीती आणि आधिभौतिक शास्त्रें सुरू करावी. अखेरीस मेकाले विजयी झाले. तरीपण दुसरा पक्षही अगदीं नामशेष करण्यांत आला नाही. ही नवी शिक्षणपद्धती ब्रिटिश इंडियांत प्रथम जन्मास आली आणि संस्थानांतूनही ती हळूहळू रांगूं लागली.

रेसिडेंटसाहेबांनीं राज्यकारभारांत जसा फेरफार केला तसा शिक्षणाचेही कार्यात त्यांनीं नवा उपक्रम शांतपणें सुरू केला. राजपुत्राचे शिक्षण केवळ आवडीनावडीवर अवलंबून न ठेवितां शिक्षणक्रम बांधून दिला. उमेदसिंग मुनशी या आपल्या विश्वासांतील मनुष्यावर हें काम सोपविलें. राजपुत्रांबरोबर इतरांच्याही शिक्षणांची सोय व्हावी म्हणून एक शाळा उघडली. या शाळेत प्रथमारंभी शिकणारे, इंग्रेजी १२, मराठी ११७, हिंदी ६४, पर्शियन ७५ आणि संस्कृत १२ असें विद्यार्थी होते. महाराजांस कोणचे विषय शिकविले जातात या विषयीं रेसिडेंट साहेबांनी जो अहवाल कलकत्त्यास पाठविला. त्यांत ''मालकमसाहेबांचा मध्य हिंदुस्थानचा इतिहास'' हा ग्रंथ पढविला जातो असें उल्लेखिले आहे; आणि शेतांची मोजमाप कशी करावी हेही विद्यार्थ्यांस शिकवितो असें कळविले आहे. सारांश, तरूण

महाराजांवर पुढें पडणारी जबाबदारी ध्यानांत घेऊन हामिलटनसाहेब तत्कालीन दृष्टीनें त्यांस व्यापक शिक्षण देण्यास जागृत होते असें दिसतें. श्रीमंत महाराजांनीं अधिकार प्राप्तीनंतर गुरुदक्षिणेसंबंधीं जो खलिता तयार करविला त्यात तालमीचाही उल्लेख केला आहे.

रिजन्सीचा कारभार चालू असतां तरूण महाराजांनीं तेथें हजर असावें, चालू असलेल्या कामाची माहिती मिळवावी, प्रश्न विचारावे अशीहीं योजना रेसिडेंट साहेबांनीं केलेली सरकारी कागदपत्रांवरून दिसते. सारांश, शरीर सुदृढ व्हावें, प्राचीन इतिहास अवगत असावा, मातृभाषेचें व इंग्लिश भाषेचें ज्ञान संपादावें आणि राज्यकारभाराचें व्यावहारिक ज्ञान अनुभवी माणसांच्या नजरेखालीं मिळावें अशी व्यवस्था रेसिडेंटसाहेबांनीं केली हे नजरेस येतें.

तरूण महाराज दरबारांत बसूं लागले आणि वेळोवेळीं प्रश्न सवाल करूं लागले ही गोष्ट फणशांस बोचूं लागली. त्यांनीं प्रथम रेसिडेंटाकडे तक्रार करून पाहिली. रेसिडेंटाकडून समर्पक उत्तर मिळाल्यावर कधी गैरहजर रहावे तर कधी आपल्याच वाड्यांत इन्साफ करावा अशी सुरुवात त्यांनीं केली. यासंबंधांत मासाहेबांनीं व रेसिडेंट साहेबांनीं आपली नापसंती दर्शविली. फणशांची व्यसनाधीनता वयोमानाबरोबर वाढूं लागली. शेवटीं वाड्यांत आंत लपून बसण्याची पाळी त्यांचेवर आली. इंदूर सोडून तराण्यास जाऊन राहिले आणि तेथून मासाहेब, रेसिडेंट यांजवर कुलगंडीं उभी करूं लागले. त्यांस वाटलें होतें कीं आपण इंदूर सोडल्यामुळें राज्यकारभार तटून राहील, पण तसा प्रकार कांहींएक झाला नाही. दोघा दिवाणानीं रेसिडेंट व मासाहेब यांच्या विचारें कारभाराचा गाडा रेटून नेला.

याप्रमाणें राज्यकारभार व राजपुत्राचे शिक्षण ही दोन्ही रेसिडेंटसाहेब व मासाहेब यांचे देखरेखीखाली सुरळीत चालली होती. महाराज तुकोजीरावांचा पहिला विवाह इ. स. १८४६ त गिरगुणे यांची कन्या रुख्माई यांजबरोबर झाला. त्यावेळीं धार देवास येथील राजेरजवाडे आले होते. गव्हर्नर जनरलांकडून वस्त्रें आली होतीं. इ. स. १८४८ त या बाईसाहेब निवर्तल्या. इ. स. १८४९ त महाराजांची दोन लग्नें झाली. इ. स. १८५१ त यशवंतराव खिल्लारी यांचे कन्येबरोबर लग्न झालें. लग्न होण्यापूर्वी म्हणजे इ. स. १८४९ त श्रीमंत कृष्णाबाई मासाहेब ता. ९ सप्टेंबर रोजीं कैलासवासी झाल्या. श्रीमंत महाराजांचा त्यांजवर लोभ होता. त्यामुळें कांहीं दिवसपर्यंत ते कष्टी होते. मासाहेब लोकप्रिय होत्या. लष्करांत काय किंवा लोकांत काय त्यांच्याबद्दलचा आदर मोठा होता. प्रजेबद्दल कनवाळूपणा अनुकरणीय होता. श्रावणमासची दक्षिणा वाटण्याचा प्रघात होळकर राजवटींत पुरातनाचा होता. एके श्रावणमासांत असा प्रसंग गुजरला कीं, वाड्यांत आतोनात गर्दी जमली. चेंगराचेंगरी झाली अनेकांस दुखापती झाल्या. यामुळें मासाहेबांस दोनचार दिवस अन्न गेलें नाहीं. आजारी लोकांचे सुश्रुशेस स्वतः लागल्या. अनाथ बायांस व पोरांस द्रव्यसहाय केलें. श्री देवी अहिल्याबाई साहेबांचा दानधर्म अव्याहत चालावा याबद्दल त्या फार दक्ष असत. इंदूर येथें राजवाड्यानजीकचे श्रीगोपाळ मंदिर व कृष्णपुऱ्यांतील श्रीपट्टाभिराम मंदिर ही त्यांची स्मारकेच होत.

मासाहेब यांजबद्दल जसा लोकांत आदर होता तसाच रेसिडेंट हामिलटनसाहेब यांचेहीं मनांत बसत होता. ही दोघांची उदारमनस्कता एकंदर राज्य व्यवस्थेस सुखाची, सोईची व प्रगमनशील झाली. एकदां असा प्रसंग झाला कीं, मासाहेबांच्या मनांत आलें कीं चिरंजीवासह वाफगांवास जावें व रस्त्यांत नाशिक, त्र्यंबक, जेजुरी व पंढरपूर करून यावें. हा आपला मानस त्यांनी रेसिडेंटसाहेबांस कळविला. कांहीं दिवसांनीं वार्षिक अंदाजपत्रकाचे दिवस आले. नेहमीप्रमाणें पत्रक मासाहेबांपुढें ही सादर झाले. अवलोकन केल्यावर आपण होऊनच त्यांनी यात्रेचा बेत तहकूब केला. रेसिडेंटसाहेबांस सानंद आश्चर्य तर वाटलेच पण चारचौघांत त्यांनीं या विवेकी कृत्याचे कौतुकही केलें. अशीं माणसें जर एकत्र झालीं तर राज्यास सुदिन कां बरें येणार नाहींत ?

मासाहेबांच्या निधनानें खासगीची गादी रिकामी झाली. त्याजागी कै.मल्हाररावांच्या-पत्नी श्रीमंत ताईसाहेबांची योजना झाली. ही योजना रेसिडेंटसाहेबांच्या ता.१-१०-१८४९ च्या पत्राने कळविण्यांत आली. ते पत्र येणेंप्रमाणें : (श्रीमंत ताईसाहेबांचे नांवें पत्र) कृष्णाबाईसाहेब ह्या कैलासवासी झाल्यानीं आम्हांस व सर्व संस्थानास दुःख होत आहे. आम्हांस उम्मेद आहे की त्यांचे लौकिकाप्रमाणें आपण खासगी संस्थानचे काम सांभाळतील. कारण खासगी संस्थानचीं सूत्रे आपल्या हातीं ठेवण्याचे ठरल्यानें आम्ही खुश झालों. तरी दिवाणी, फौजदारी, बंदोबस्त मुकदमे यांचा अंमल दौलत व खासगीचा एकसूत्री ठेवणें श्रेयस्कर आहे. आपण खासगीचा खजिना निराळा ठेवणें व उत्पन्न खर्चाची वर्दी गोपाळरावबाबा गानू यांजपाशी ठेवीत जाऊन वहिवाट करावी. दिवाण खासगी पूर्वीपासून खैरख्वाह आहेत. मासाहेबांचाही त्यांजवर पूर्ण विश्वास होता. गोपाळरावबाबा मार्फत काम केल्यानें आम्हासही खासगीचे कामाची माहिती मिळत जाईल. आपण खासगीचे अधिकार अंमलात आणावे. खासगीचा शिक्का आपले पूर्वजांचे नांवाचा उल्लेख करून नवीन गोपाळरावबाबा यांचे मसुद्याप्रमाणें तयार करविला तो पाहून आपणासही आनंद झाला असेल. कारण पूर्वजांचे नांवासह आपले नांव गुंफिले आहे. आम्ही इंदूर संस्थानचे सुरूपासून हितचिंतक आहोत व संस्थानची तरक्की होत जाईल हेंच नेहमीं चाहत जाऊ. तारीख १ आक्टोबर इ. स. १८४९ (सही इंग्रजीत हामिलटन रेसिडेंट).

श्री म्हाळसाकांत
चरणीं तत्पर अहिल्या स्वरूप
कृष्णाबाई स्नुषा गौतमाबाई होळकर

फणसे जे रागावून गेले ते वाहतच गेले. आपल्यावांचून अडून राहील असें जे त्यांस वाटले होते ते फोल ठरले. महाराजांच्या भोवतीं असलेले शिक्षक व समवयस्क सोबती यांच्यात कुचापती काढून पाहिल्या. त्यात कांहीं वळेना. शेवटीं व्हाइसरायांकडे लांबलचक तक्रारीचा अर्ज पाठविला. व्हाइसरायांनीं तो रेसिडेंटाकडे पाठविला. रेसिडेंटाकडून कलमवार

उत्तरें गेलीं. या उत्तरांवरून राज्यकारभारावर चांगलाच प्रकाश पडतो. फणशांची अच्छृंखलवृत्ती, उधळेपणा, बाहेर येतात. सर्व संस्थानभर हलक्या लोकांचेद्वारें जाळे कसे पसरले होते हें दृष्टोत्पत्तीस येतें. हामिलटनसाहेबांनीं पितृवात्सल्य भावनेनें संस्थानच्या अंतरर्बाह्य व्यवस्थेत किती लक्ष घातले होते हेही पाहण्यास मिळते. सारांश, तें उत्तर म्हणजे हामिलेटन साहेबांचे इंदूर संस्थानपुरतें तरी आत्मचरित्रच होय. या उत्तरास गव्हर्नर जनरल डलहौसी यांजकडून बरेच समाधानकारक प्रत्युत्तर आलें.

फणसे आतां फिक्के पडले. श्रीमंतांच्या विवाहसमयीं आमंत्रण असतांही ते हाजर झाले नाहींत. यामुळें तर त्यांच्यावर नाराजी सार्वत्रिक झाली. त्यांची पत्नी सौभाग्यवती सकुबाई ह्या सुशील होत्या. पतीस आवरून धरण्याचा त्यांचा आटोकाट प्रयत्न चालू होता. त्या इ. स. १८५२ त इहलोक सोडून गेल्या. कैलासवासी श्रीमंत हरीराव महाराजांच्या त्या कन्या होत. त्यांच्या पश्चात बंद कोणचाच राहिला नाहीं. फणसेही ता. १७ जुलाई इ. स. १८५३ त कालवश झाले. सारांश, उत्तम संधी मिळाली असूनही ती दवडिल्याचें हें एक उदाहरणच आहे. कै. विठ्ठलतात्या जोगांसारखी सुसंधी फणशांस मिळाली होती. तात्यांनी ती कमाविली, तर फणशांनी ती गमाविली.

हामिलटन साहेबांचे प्रयत्न केवळ इंदूर संस्थानापुरतेच नव्हते. सत्कृत्य करतां येईल तितके करावें हा त्यांचा स्वभावच होता. मध्य हिंदुस्थानांतील रहदारीचे रस्त्यांची त्यांनीं दुरस्ती करविली. पूर्वापार चालत आलेल्या सती वगैरे चालींचा त्यांनीं बंदोबस्त केला. श्रीनर्मदा नदीतून व्यापारी व्यवहाराची सोय वाढवितां येईल किंवा कसे याबद्दल तज्ज्ञांकडून तपासणी करविली. या तपासणीचा निष्कर्ष निघाला कीं, अशा सोई शक्य नाहीत. आतां कदाचित पाऊणशे वर्षांच्या स्थित्यंतरानें व शास्त्रीय शोधाच्या बाहुल्यानें मागील निष्कर्ष खोटाही ठरण्याचा संभव आहे. तरी पण हामिलटन साहेबांनीं घातलेला पाया अभिनंदनीय व अनुकरणीय आहे.

संस्थानच्या अंतर्बाह्य व्यवस्थेंत हामिलटन साहेबांनीं जसे तनमन घातले होतें तसेच श्रीमंत सरकारांच्या व्यापक शिक्षणांत घातले होते, हें वर आलेंच आहे. शिक्षणक्रमांत ''देशाटन'' हे अंतर्भूत होतें. हे तत्त्व पाश्चात्यांस मान्य आहे. त्याप्रमाणेंच आपणा पौर्वात्यांसही मान्य आहे. *''केल्याने देशाटन, पंडित मैत्री, सभेत संचार ।। शास्त्रग्रंथ-विलोकनें मनुजा चातुर्य येतसे फार ।।''* त्याप्रमाणें (सन १८५० चे डिसेंबरमध्ये श्रीमंत तुकोजीराव होळकर कांहीं निवडक मंडळीसह प्रवासास निघाले. भानपूर, पाटण, भरतपूर, आग्रा, मथुरा, मिरत, रुडकी, हरिद्वार, पानिपत, दिल्ली, जयपूर, किसनगड, अजमेर, पुष्कर, नसिराबाद, चितोड, जावद, महतपूर, जगोटी व बाणगंगा असा प्रवास करून तीन चार महिन्यांनी स्वारी मुक्कामास परत आली. महाराज वेषांतरानेच वावरत होते. मिळालेल्या अनुभवाचा त्यांनी केलेला उपयोग त्यांच्या राज्यकारभारात पुढें दिसून येणारच आहे. हा मिळालेला अनुभव आणि केलेला प्रवास टिप्पणाचे रूपानें त्या वेळीं लिहिला गेला त्यावरून माहिती आम्ही देत आहोंत.

इ. स. १८५२ ता. ८ मार्च रोजीं श्रीमंतांस पूर्ण अखत्यारी मिळाली. त्यावेळीं प्रजाजनांस तर आनंद झालाच. महाराजांनीं ज्या देणग्या त्यावेळीं जाहीर केल्या त्यावरून त्यांचे औदार्य व चातुर्य हीं जगजाहीर झाली. भविष्यकाळाबद्दल संस्थानचे बाहेरीलही लोकांस आशा व आनंद खचित वाटला असणार. सदर माहितीची दिनचर्या ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' ग्रंथांत आली असल्यानें सारांशरूपाने कांहीं सरदार, दरखदार मानकरी यांस दिलेल्या देणग्यांची माहिती खाली देत आहोत.

१ महतपूरच्या फौजेस इनामाबाबत रुपये ३०० छावणींत पाठवून दिले.

२ स्वरूप नारायण वकील छावणी यांस साडेतीन वस्त्रें दिली व कारकुनांस पोशाख.

३ दिवाण नहारसिंग चंद्रावत रामपुरा यांस एक गांव अनाखेडीची सनद व कंठी, शिरपाव, पांच वस्त्रें, त्याचप्रमाणें चिरंजीव तेजसिंगास वस्त्रें दिली.

४ उमेदसिंग मुनशी यांस दोन गांवाची सनद.(गिरोता, फुलाण) सात वस्त्रें, कंठी, शिरपेंच, पालखी, हत्ती अंबारीसहित, घोडा, चवरी, अबदागिरी वगैरे.

५ पळसीकर दिवाण. पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच, घरखर्चास एक गांव अकराशेंचा दिला.

६ रामचंद्रभाऊ रेशीमवाले : पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच, दोन गांव बेटमेपैकीं, घोडा, चोपदार, पालखी, अबदागिरी वगैरे.

७ काशीरावदादा होळकर : पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच, अबदागिरी, चौरी, घोडा व एक गांवाची सनद (शिवणी).

८ बक्षी खुमानसिंग : पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच, म्याना व एक गांव बेटमेपैकीं.

९ बाळकृष्णराव कर्नल : पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच व एक गांव बेटमे पैकींची सनद.

१० भीमगीरबाबा : पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच व एक गांव बेटमे पैकींची सनद.

११ रतनचंद कोठारी : कंठी, शिरपेंच, चौरी व एक गांव इस्तमुरार रामपुरपैकीं.

१२ शिवचंद कोठारी : पांच वस्त्रें, कंठी, शिरपेंच, दोन हजार जमेचा गांव गरोठपैकीं.

१३ कृष्णा नाईक, भवानीसिंग जमादार, गोविंदराव दफेदार, जिवाजी नाईक व नाऊजी हुजरे, विठुजी हुजरे, ओंकारसिंग जमीनदार हसलपूर, हेमराज वाणी, टीकाराम जमादार, रामगोपाल सावकार काठाफोड, गणु हुजऱ्या, रुस्तम भिस्ती व मेजर इमदादअली यांस पोशाख, कांहींस इनाम, जमिनी, दुपटा पागोटे, वगैरे. ह्या देणग्यांशिवाय नगदी बक्षिसें वगैरे आहेत.

अधिकार प्राप्तीनंतर वेषांतर न करितां श्रीमंतांची स्वारी महेश्वर अकबरपुर, धुळें, ठाणें येथपर्यंत बैलगाडीतून प्रवास करीत गेली. ठाण्याहून मुंबईपर्यंत झालेल्या रेल्वेनें प्रवास केला. मुंबईहून पुणें मेलतांग्यातून व पुणें अहमदनगर नाशिक हा प्रवास बैलगाडीनें झाला. धुळ्यांस आल्यावर घोड्याच्या बग्गींतून सेंधवा आणि महेश्वर असा प्रवास झाला. हा प्रवास

प्रसिद्धपणें झाल्यानें आणि साहेब हामिलटन यांनी लक्ष पुरविल्यामुळे सुखसोयीनें तर झालाच, पण ब्रिटिश अधिकाऱ्यांकडूनही ठिकठिकाणीं सत्कार सन्मानपूर्वक झाला. कवीनें म्हटल्याप्रमाणें *''केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेत संचार ।। शास्त्रग्रंथ विलोकनें मनुजा चातुर्य येतसे फार''* श्रीमंतांस या सर्व बाबी अनुकूल होऊन चातुर्ययुक्त होत्साते ते स्वतः यापुढें राज्यकारभार पाहूं लागले. तो प्रकार पुढील प्रकरणांतून बाहेर येईलच.

(श्रीमंत महाराजांच्या जागरुकीने तयार झालेली वंशावळ आपणास पाहणेस मिळते ती वंशावळ याखाली देत आहोत. **(''सरकारी रेकॉर्ड'')** ही माहिती श्रीमंत द्वितीय तुकोजीराव महाराज यांनीं एकत्रित करून तयार करविली. (इ. स. १८५२)

१ यादी वंशावळ सरकार श्रीमंत महाराज होळकर यांचे कुलदैवत व घराण्याबद्दल : कुलदेवता : १ जानोबाई २ यमाई ३ तुकाई ४ राणाई ५ अहाराणी, ६ महाराणी, ७ श्री मल्हारीमार्तंड कुळस्वामी ८ म्हाळसा बाणाबाई ९ श्री म्हाळोबा १० विरोबा ११ बहिरोबा १२ नाईकजी.

वंशावळी : मुख्यपुरुष गोपाळ (यापुढील कागद जळाला) गंगोजी, पुत्र हेगोजी व त्यांचे खंडोजी व काशीबा व कन्या राईबाई. खंडोजीबाबास पुत्र.

१ राज्य संस्थापक थोरले मल्हारजी सुभेदार पुत्र खंडेराव महाराज व त्यांचे पुत्र मालजी होळकर.

२ काशीबा (खंडोजीचे बंधू) त्यांचे पुत्र जिवाजी व त्यांचे बाबाजी व त्यांचे पुत्र नानाजी व त्यांचे पुत्र महादजी व कै.पहिले तुकोजीराव व संताजी तिसरें.

३ थोरले मल्हारजीस स्त्रिया : १ सौ. गौतमाबाई २ सौ. बनाबाई ३ सौ. द्वारकाबाई ४ सौ. हरकूबाई (खांडाराणी) अशा चार.

४ कै. खंडेराव महाराजांस स्त्रिया : १ देवी अहिल्याबाई २ पाराबाई ३ प्रिताबाई (अलीमोहनची राजकन्या) ४ सुरताबाई (खांडाराणी), रावळ यांची कन्या.

५ कै. मालेराव होळकरांस स्त्रिया : १ सौ. पाराबाई २ मैनाबाई.

६ कै. पहिले तुकोजीस स्त्रिया : १ सौ. रखमाबाई २ दुसऱ्या रखमाबाई ३ कृष्णाबाई ४ राधाबाई.

७ कै. तुकोजीस पुत्र : १ काशीराव २ मल्हारराव ३ विठूजी ४ यशवंतराव.

८ कै. यशवंतराव महाराजांस स्त्रिया : १ देऊबाई २ लाडाबाई ३ तुळसाबाई ४ केसराबाई (कृष्णाबाई).

९ कै. विठूजीस स्त्रिया : १ नर्मदाबाई २ रमाबाई ३ रेवाबाई.

१० कै. विठूजीस पुत्र हरीराव होळकर.

११ काशीराव, विठूजी, मल्हारराव हे तुकोजीचे पुत्र. पैकीं यशवंतरावांनीं आपल्या कर्तबगारीने राज्य कमाविले. हे तिघे आपसात झगडतच राहून शेवटी विठूजी व मल्हारराव पुण्यास मारले गेले.

१२ कै. मल्हाररावांचा पुत्र खंडेराव. (स्त्रीचे नांव उपलब्ध नाही) हेच खंडेराव लाहोरास यशवंतराव महाराजासमागमें गेले होते. ते परत येतांना मृत्यु पावले. ह्यांचे (खंडेरावाचे) नांवाचा शिक्का करून यशवंतराव महाराज राज्य ते कायम होते तवपावेतों करीत होते. पुढें स्वतंत्र करूं लागले.

१३ कै. यशवंतराव यांचे चिरंजीव मल्हारराव होळकर गादीवर आले. त्यांचे दत्तक बापू होळकर यांचा मुलगा मार्तंडराव यांस दिले होते. परंतु हरीराव यांनीं मार्तंडरावांस हांकून देऊन आपण गादीवर बसले. ते ''यशवंतराव सुत'' हरीराव झाले. त्यांचे मांडीवर खंडेराव यांस घेतले परंतु चार मास राहून तेही मृत झाले.

१४ नंतर तुकोजीराव (भाऊसाहेब होळकरांचे पुत्र) मातोश्री मासाहेबांच्या मांडीवर देऊन ''यशवंतराव सुत'' तुकोजी होळकर असें नांव धारण केलें. त्यांचा विस्तार द्वितीय तुकोजीरावांस स्त्रिया चार :

१ सौ. भागीरथीबाई (फणशांची कन्या) २ सौ. गुंडांची कन्या ३ सौ. राधाबाई (खिल्लारी यांची कन्या) ४ सौ. म्हाळसाबाई (गुंडांची कन्या) पुत्र दोघे.

१ श्रीमंत महाराज शिवाजीराव होळकर (भागीरथीबाई साहेबांचे) व कन्या, सीताबाई गोविंदराव बुळे यांस दिल्या.

२ श्रीमंत यशवंतराव बाळासाहेब (सौ. राधाबाईसाहेबांचे पुत्र)

**खालील माहिती आम्ही जोडीत आहोत**

३ श्रीमंत शिवाजीराव महाराजांचे पुत्र श्रीमंत महाराज राजराजेश्वर तुकोजीराव होळकर बहादूर तृतीय व त्यांस पुत्र श्रीमंत महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई यशवंतराव होळकर बहादूर.

४ श्रीमंत शिवाजीराव महाराजांस कन्या सीताबाई, सावित्रीबाई व ताराबाई व लीलाबाई व ठकूबाई.

विशेष : कै. खंडेराव महाराज (सुभेदारांचे चिरंजीव) यांस आणखीही उपस्त्रिया होत्या. त्यांची नांवें १ होनाकुंवरबाई २ भवानीबाई ३ कुंवरबाई ४ फरजनबाई ५ राजसबाई अशा ५ व लग्नाच्या वर दाखविल्याच आहेत. त्या चार एकूण स्त्रिया ९ देवी अहिल्याबाईसाहेबांशिवाय सर्वांनीं सहगमन केलें

श्रीमंत महाराज तुकोजीराव (द्वितीय) होळकर यांचे कारकीर्दीत शाळा खात्याचा जन्म झाला. त्याजबद्दलचा लेखांक खालीलप्रमाणें होय :

मुलकी नंबर १५८ अंदाजे इ. स. १८५० राजश्री सदाशिव रामचंद्र खजांची यांस शहर इंदूर येथील पाठशाळेत विद्या पढविणारे गुरुलोक वगैरे आहेत.

त्यांचा पगार माहे डिसेंबर इ. स. १८४९ इसवीचा एकमाही द्यावयाचा रुपये :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २५ | नरसिंह शास्त्री | | २५ | आनंदराव बाळाजी दक्षिणी पढविणारे |
| ५० | सेवाराम सिद्धांती | | २५ | हसनआली फारशी पढविणारे. |
| २९ | किरकोळ दप्तर खर्च. | रु. १० | १५ | श्रीधर शिवराम इंग्रेजी पढविणारे. |
| | भिवाभट पाणक्या | रु. ५ | २५ | एक जागा पंचवीसाची जादा |
| | रमजानखां भिस्ती | रु. ५ | .... | (हिंदी पढविणारे) |
| | रामा कामाठी | रु. ५ | ९० | |
| | जीवन भंगी | रु. ४ | | |
| | | येकुण | २९ | |
| ....... | | | ......... | |
| १०४ | | | १९४ | |

येकुण एकशें चवऱ्याण्णव रुपये हल्लीं शिक्का पोतापैकीं द्यावयाचें ठरून मेहरबान बडेसाहेब बहादुर यांजकडे तारीख ३१ डिसेंबरचे वर्दीबरोबर यादी जाऊन तिकडून मंजुरीशेरा आल्यावरून ही वरात तुम्हास लिहिली आहे. तरी तुम्ही सदरहू रुपये एकशें चवऱ्याण्णव हल्लीं शिक्का पाठशाळेकडे गुरुलोकांस देऊन पावती अन्वयें खजिन्याचे वर्दीस खर्ची लिहून देणें. हे विनंती.

ह्या प्रकरणांत श्रीमंतांस राज्याधिकार प्राप्त झाला हें आपण पाहिलेंच आहे आतां ह्या नंतरची कारकीर्द पुढील प्रकरणांत पाहूंया.



**प्रकरण २० वें**

# अधिकारग्रहणानंतर इ. स. १८६०–६१ पर्यंत

श्रीमंत सरकार महाराज तुकोजीराव होळकर बहादूर यांस संपूर्ण अधिकार मिळाल्याची हकीगत मागील प्रकरणांत दिलीच आहे. त्या वेळी जमलेल्या मंडळीपुढें सर राबर्ट हामिलटन साहेबांनीं रिजन्सीचे कारभाराचा आठ वर्षांचा आढावा वाचला. इंदूर शहर दुप्पट वाढलें. शेतीची आबादी संस्थानांतून सर्वदूर झाली. आठ वर्षांच्या अवधींत बंडबखेडा कोठेंहीं उद्भवला नाही. संस्थान मध्यें सध्या वातावरण किती शांततेचे आहे याचें एक उदाहरण म्हणजे चंद्रावताचें या दरबारांत उपस्थित होणें हें होय. सर्व ठाकूर, जहागिरदार व इनामदार यांस आतां आमचे सांगणें आहे कीं या उप्पर श्रीमंत सरकार हेच आपले मालक आहेत हें सर्वांनीं मानावें आणि त्याबरहुकूम वागावे. त्यांच्याशीं राजनिष्ठ राहून त्यांच्या आज्ञा शिरसामान्य कराव्या. रिजन्सीच्या कारभाऱ्यांच्या (म्हणजे दिवाण पळसीकर आणि दिवाण खासगीवाले) कारभाराबद्दल साहेबांनीं सादरपूर्वक उल्लेख केला आणि आतां सरकारची तिजोरी भरलेली, लष्कराचा सर्व दाम पै न पै चुकता केला, शेतकरी वर्ग संतुष्ट व समाधानी, असा संतोष सर्वत्र आहे. अशा स्थितींत मी आतां रिजन्सी उठलेली जाहीर करतों.

याप्रमाणें सर्वांचें समाधान करणारें भाषण करून लाटसाहेबांकडून आलेला खलिता श्रीमंतांस त्यांनीं नजर केला. श्रीमंतांनींही प्रसंग ओळखून ज्या देणग्या जाहीर केल्या त्या मागील प्रकरणांत आल्याच आहेत. त्या वैयक्तिक स्वरूपाच्या होत्या. महाराजांनीं जें विशेष केलें तें हें कीं या सुप्रसंगीं दोन संस्थांस कायमच्या देणग्या सनदानीं दिल्या. आरोग्यालयास (हास्पिटल) दरमहा रुपये ५०० आणि मदरशाला तितकीच रक्कम दिली. आज सुसंस्कृत

राष्ट्रांत राज्यकारभाराच्या दोन अंगांस विशेष महत्त्व दिलें जातें. ती अंगे म्हणजे आरोग्य आणि शिक्षण. या दोन खात्यांस ''नेशन बिल्डिंग डिपार्टमेंटस'' मानतात. अर्थ हाच कीं, राष्ट्राचें सौभाग्य या दोन खात्यांवरतीं अवलंबून असतें. त्या काळांत ही गोष्ट आपले महाराजांचे लक्षांत येऊन चुकली होती आणि ती त्यांनी कृतींत आणली होती, हें विशेष होय.

राज्यकारभार हातीं येतांच स्वतःच सरकारसाहेब कामें पाहू लागले. कामाची सुनावणी चालूं असतां गुरूजी उमेदसिंगजी आणि रेशीमवालेसाहेब संनिध असत. त्यांचाही सल्ला वेळोवेळीं घेतला जात असें. कांहीं दिवसांनीं प्रवासास निघण्याचें श्रीमंतांनीं ठरवून सर हामिलटनसाहेबांस तसें कळविलें. आतांचा प्रवास वेषांतरात नव्हता. हामिलटन साहेबांनीं ब्रिटीश अधिकारी यांस ठिकठिकाणीं व त्याचप्रमाणें संस्थानिकांसही आधी वरदी पोहचविली होती. त्याप्रमाणें मानसन्मानानें हा प्रवास झाला. खुमानसिंग बक्षी समागमें होते. त्यांच्याच रोजनिशीवरून पुढील हकीगत निवेदन करीत आहोत.

सरकार स्वारी प्रथम महेश्वरीं गेली आणि तेथून निघून अकबरपुरास जाऊन बैलसिग्रामाचे डांकेतून रवाना झाली. त्यावेळीं रेल्वे मुंबईहून ठाण्यापर्यंतच होती. धुळ्यापावेतों पंधरा-सोळा मनुष्यें बरोबर होती. त्यांत मुख्य राव रामचंद्रभाऊ, काशीराव दादा, बक्षी खुमानसिंग, भीमगीर बाबा, भवानीसिंग, मेजर इमदाद अली होते. सरकारचे दोन चार हुजरेही बरोबर होते. धुळ्याहून महाराज, रामचंद्रभाऊ व बक्षी खुमानसिंग असें तिघे घोड्याचे गाडीतून पुढें रवाना झाले. बाकीची मंडळी व्यापाराचे बैलगाडीचे डाकेतून रवाना झाली. सरकार, रामचंद्रभाऊ आणि बक्षी मुंबईस दाखल झाले. तत्पूर्वी गणेश शास्त्रीही तेथें तयारीसाठी गेले होते. मुंबईस पोहचल्यावर श्रीमंतांची स्वारी रेल्वेतून ठाण्यास गेली. यावेळेस गव्हर्नर साहेब मुंबईस नव्हते. सबब स्वारी थोडे दिवस राहून डाकगाडीतून पुण्यास गेली. पुण्यास कमांडर इन चीफ यांस आधीच वर्दी गेली होती. त्यावरून त्यांनीं सरकारांस कवायत दाखविली. सर्वांस बग्यांत बसवून बरोबर राहून बराकी वगैरे दाखविल्या आणि आपल्या घरी नेले. नंतर दुसरें दिवशीं महाराजांस भेटण्यास ते आले होते.

पुण्याहून अहमदनगरास दमण्यागाड्यांत बसून महाराज आणि मंडळी गेली. एक दिवस तेथें राहून पुनः दमण्यांतून नाशकास स्वारी गेली. तेथें एक दिवस घालवून पुनः घोड्यांचे गाडीतून महाराज, काशीरावदादा, रावरामचंद्रभाऊ आणि खुमानसिंग बक्षी असें चौघे रवाना झाले. बाकीची मंडळी बैलगाड्यांतून रवाना झाली. धुळ्यापासून बैलाचे रथांत जावें लागलें. संध्याकाळीं ताप्ती नदी गांठली. दिवसभर सर्व उपोशित राहिले. यास्तव नदीवर स्वयंपाक करवून जेवण केलें. सरकारांकरितां स्वयंपाक काशीरावदादांनीं केला आणि रामचंद्रभाऊंनीं स्वतःचा स्वयंपाक केला. रात्रीं दहा वाजतां स्वारी रवाना झाली, तर दुसरें दिवशीं तिसरें प्रहरीं सेंधव्यास पोहचली. बाजारांत कांहीं मिळालें नसल्यानें तसेच पुढें रवाना झाले. पुढें रात्रीचे आठ वाजतां ठणगांवचे पुढें स्वारी पोहचली आणि गाडीचा धुरा तुटला. ठणगांव मागें दोन कोस राहिला. तेथें स्वारांची चौकी होती. बक्षीजी व काशीरावदादा अंधेरे रात्रीस पायींच ठणगांवीं जाऊन घोडे आणिले आणि सरकार व मंडळी घोड्यावर

बसून रात्रीचे ११-१२ चे सुमारास अकबरपूर येथें पोहचली. त्यावेळीं खरगोण बक्षीजींकडे उजारियानें होते. सबब त्यांचा कारकून अकबरपुरास राहत होता. त्यांजकडून बेसन भाकरी करून मागवून व जेवून नर्मदा नदीवर नांवेंत घोडे उतरवून मध्यरात्रीं रवाना झाले आणि दुसरें रात्रीं महेश्वरीं पोंहचले. महाराजांनीं त्याचवेळीं सलामीच्या तोफा करविल्या त्याजवरून लोकांस माहित झालें कीं सरकार स्वारी परत आली. हा सर्व प्रवास इसवी इ. स. १८५३ त झाला.

राजाभाऊ फणसे यांच्या येकंदर कारभारासंबंधीं मागील भागांत सविस्तर वर्णन आलेच आहे. रिजन्सीच्या वेळेस श्रीमंत महाराज त्यांस प्रश्न करीत. ते न खपल्यामुळें ते तराण्यास जाऊन बसले. श्रीमंतांचे लग्नाचें आमंत्रण गेलें असतांही आले नाहींत. हामिलटन साहेबांविरुद्ध तक्रारीचा अर्ज लाटसाहेबांकडे पाठविला तो त्यांच्याच अंगाशी आला. सरकारी कलमदान व मोहर स्वतःच घेऊन बसले. पुढें इ. स. १८५२ त पत्नी सकुबाई निवर्तल्या. या सद्वर्तनी बाईनें पतीस पुष्कळ वेळां आवरून धरलें होतें. त्यांच्या निधनानंतर कोणताच धरबंद उरला नाही. व्यसनाधीनता पूर्वीचीच होती. अशा स्थितींत इ. स. १८५३ च्या जुलाईंत राजाभाऊ मृत्यु पावले. त्यांस तराणा जहागीर होता. परंतु त्यांस इंदुराहून काढिलें तेव्हांच तराणा महाल जप्त झाला. आतां त्यांचे पश्चात इंदुराहून भवानीसिंग सरनौबत व शिवचंद कोठारी यांस तराण्यास पाठवून फणशांचा वाडा जप्त करून वाड्यांत जो माल असबाब होता तो इंदुरीं आणला. बक्षीजी लिहितात कीं, ''श्रीमंत हरीराव महाराज देवलोक झाले, तेव्हां सत्तावीस लक्ष रुपया शिल्लक होता. श्रीमंत तुकोजीराव महाराज काम पाहूं लागले त्यावेळेस खजिन्यांत फक्त पंचवीस हजार रुपये शिल्लक होते. फणशांबद्दल श्रीमंत कैलासवासी कृष्णा मासाहेब व ताईसाहेब यांच्या वारंवार तक्रारी होत होत्या. हामिलटनसाहेबांसही फणशांची कानउघाडणी करणें अनेक वेळां भाग पडलें.

सन १८५४ सालीं गंगेचा नहर मोठ्या समारंभानें चालू करण्याचा मुहूर्त झाला. लेफ्टनेंट गव्हर्नर आणि पुष्कळ साहेब लोक व महाराज शिंदेही तेथें जमा झाले होते. महाराजांनीं राव रामचन्द्रभाऊ रेशीमवाले व खुमानसिंग बक्षी यांस या समारंभांत पाठविले होते. याच वेळेस सर राबर्ट हामिलटन माळव्याचे रेसिडेंट होते ते सेट्रल इंडियाचे ए.जी.जी. झाले. पूर्वी सेंट्रल इंडिया करिता ए.जी.जी. नव्हते. माळवा, बुंदेलखंड, भगेलखंड आणि ग्वालियर सामील करून सेंट्रल इंडिया नांव ठेविलें.

या सालीं श्रीमंत सरकारास भागीरथीबाईपासून पुत्र झाला पण तो निवर्तला. सर राबर्ट हामिलटन साहेबांचा दौरा प्रथम बुंदेलखंडात होणार तेव्हां होळकर दरबारांतून एक सरदार दौऱ्यात बडेसाहेबांबरोबर असावा म्हणून खुमानसिंग बक्षी यांस पाठविले. नोव्हेंबर इ. स. १८५४ पासून ता. ३० एप्रिल १८५५ पावेतों दौरा राहिला.

सरकारांनीं आबादीसंबंधी सरक्युलर काढिलें ते हामिलटनसाहेबांस दाखविणेसाठीं दौऱ्यांत बक्षीजींकडे पाठविलें. याच सुमारास श्रीमंतांची स्वारी खरगोण जिल्ह्यांत दौऱ्यावर गेली होती. तेथील आबादी कमी झालेली पाहिल्यावरूनच हें सरक्युलर काढलें होते.

आबादीकडे श्रीमंतांचे लक्ष पूर्वीपासूनच होते. अनुभवानंतर पुढेंही वेळोवेळां अनेक सरक्युलरे काढली असणार. स्वतः जमिनीवर जाऊन कास्तकाराशीं बोलणीं चालणीं करून ही सरक्युलरें निघाली असल्यामुळें त्यांचे महत्त्व विशेष आहे. ही सर्व सरक्युलरें एकत्रित करून त्यांचे कोड बनलें असल्यास ते फार उपयुक्त होईल हें सांगणें नको. इ. स. १८५६ साली खुमानसिंग बक्षी यांनीं मिलिटरी मदरशा हिंदी फारशी पढविण्यासाठीं मुकरर केला. या संस्थेस सरकारचा पाठिंबा चांगलाच होता.

सन १८५७ सालीं सुरजमल ठाकूर गांगरोनीकर याचे वेळीं त्यांचे बंधु मोतीसिंग यांनीं बंडाळी केली. तेव्हां मेजर बंदेअली याजबरोबर फौज देऊन त्यांस गांगरोनीस पाठविलें आणि हिदायत दिली कीं मोतीसिंगास इंदूरी घेऊन यावें आणि गांगरूणीस दखलगिरी करावी. त्याप्रमाणें व्यवस्था झाली.

सर राबर्ट हामिलटन यांनीं इंग्लंडांत जाण्यास सहामाही रजा घेतली. त्या वेळीं रीत अशी होती की ए.जी.जी. रजेवर किंवा बदलून जाऊं लागले तर त्यांनी मुख्य सरदारांचे येथें एक वेळा भेटीस जावें. त्याप्रमाणें हामिलटन बक्षी यांचे भेटीस गेले होते. मार्च अखेरीस ड्युरेंडसाहेब सर राबर्टचें बदली आले. हामिलटन इंग्लंडांत रवाना झाले. तेव्हां राव रामचन्द्र भाऊ व खुमानसिंग यांस महाराजांनी सेंधव्यापावेतों पोहचविण्यास पाठविलें होतें. सेंधवा हा महाल सरहद्दीवर आहे.

सन १८५७ हे साल बंडाचें म्हणून प्रसिद्ध आहे. यावेळीं बंगाल आर्मीमध्यें अस्वस्थता झाली त्यायोगें उत्तर हिंन्दुस्थानांत चहूकडे लोकांची मनें बदलली. महूचे छावणींत अर्धी रेजिमेंट स्वारांची आणि एक तोफखाना यात गोलंदाज गोरे आणि ड्रायव्हर्स काळे अशी फौज होती. त्यांचीही मने बदलली. या महूचे पलटणींत कमांडर कर्नल प्लास्टसाहेब व रेजिमेंटचे कमांडर मेजर हेरीस आणि तोफखान्याचे कमांडर कप्तान हंगरफोर्ड असें होते. जून महिन्यांत नीमच येथें फौजेनें कट केला. कर्नल ड्युरेंडचे हुकूमानें महतपूर कांटिजंटचे स्वारांची रेजिमेंट महतपुराहून नीमचेस रवाना झाली. बडेसाहेबाकडील दरबारांत लिहिले आल्यावरून पन्नास स्वार नीमचेस पाठविण्याचा बक्षी खुमानसिंगास हुकूम झाल्यावरून त्यांनीं तारीख ३ जून रोजीं पन्नास स्वार बापू रिसालदाराबरोबर नीमचेस रवाना केलें. कांटिन्जंटचे स्वार पूर्वीच रवाना झाले होते आणि त्यांजबरोबर दोन ब्रिटीश आफिसरही होते. कांटिन्जंटचे स्वार बोतलगंज मुक्कामीं कट करून दोन्ही साहेबांस मारून टाकून महतपुरास जात होते. जावरियाचे पलीकडे या स्वारांचा मुकाबला झाला आणि त्यांनीं त्यांस घेरून घेतलें आणि सांगितलें कीं तुम्ही आमचेबरोबर चलावे; परंतु या स्वारांबरोबर बापूजी रिसालदार होते. बापूजी हे महतपूरचे राहणारे. सबब बापूजींनीं यांची खुशामत करून त्यांच्यातून निघून इंदुरीं निघून आले. त्यात सामील झाले नाहीत. ता. ९ जून रोजीं महाराजसाहेबांनीं बडेसाहेबांस वाड्यांत बोलाविलें आणि त्यांच्याशीं महूचे फौजेविषयीं बोलणें झाले. महाराजसाहेबांनीं सल्ला दिली कीं आपण रेसिडेन्सीत खजाना ठेऊं नये. म्हणजे लोकांचीं मने बिघडणार नाहीत. बडेसाहेब बोलले कीं कांहीं भीती नाही. आम्ही बंदोबस्त चांगला

करूं. ड्युरेंडसाहेब समजत होते कीं फक्त बंगाल फौजेची मनें बिघडली आहेत. कांटिन्जंट वगेरेची मनें कांहीं बदलली नाहीत. तेव्हां अशी फौज रेसिडेंसीत आणून ठेविली तर महूचे फौजेवर दबदबा राहील. असें त्यांनी मनांत आणून सिहून कांटिन्जंटचे कांहीं स्वार, दोन कंपन्या पायदळाच्या आणि दोन तोफा जूनचे सुमारास बोलाविल्या. महतपूरची एक कंपनी व स्वार येथें होतेच. या शिवाय सरदारपूर येथून भिल्ल पलटण बोलाविली. अशी फौज बोलावून रेसिडेंसीचे समोर मैदानांत छावणी टाकली. आपल्या फौजेपैकीं तीन तोफा, दोन कंपू आणि तीनशें स्वार असें ड्युरेंडसाहेबांनीं बोलाविल्यावरून पाठविले. पायदळचा कमांड आफिसर बन्सी गोपाळ, तोफखाना, महमद अली, स्वार, शिपायांत सोभागसिंग व कलंदरबक्ष रिसालदार होते. अशी फौज जमली. परंतु मनें चांगलीं नव्हतीं.

आपल्या येथील रिसाल्याचे स्वार रेसिडेन्सीच्या नदी किनारीं (ज्या ठिकाणीं हल्लीं रतलामवाले शेट यांनीं जागा बांधली आहे त्या ठिकाणीं त्या वेळीं खुलें मैदान होतें) स्वारांचा पडाव होता. एके दिवशीं पाऊस भारी पडून नदीस पूर इतका आला कीं स्वार उतरले होते तेथपावेतों नदीचे पाणी येऊन पुष्कळ सामान वाहून गेले. अशी स्थिती स्वारांची झाल्यावर खुमानसिंग यांनीं गणेश शास्त्री वकिलामार्फत बडेसाहेबांस कळवून त्यांच्या परवानगीने स्वारांस लैनीत बोलावून घेतले. ता. १ जुलाई रोजीं प्रातःकाळीं आठाचे सुमारास सादतखां रिसालदार छावणींत गेला आणि आपल्या येथील पायदळाकडून दंगा करविला. रेसिडेंसीत धुमाकूळ झाली तर लागलीच ड्युरेंडसाहेब व रेसिडेन्सीतील इतर आफिसर सर्व इंदूर शहरांत आले; आणि हुशंगाबादेस जाऊन त्या बाजूनें जी फौज महूस येत होती तीत सामील झाले. फौजेबरोबर ड्युरेंड हे बडवाहा येथें ता. २६ जुलाईस आले बक्षी खुमानसिंग व गणेशशास्त्री वकील बडवाहा येथें जाऊन ड्युरेंड साहेबांस भेटून त्यांनीं जे जे प्रश्न केलें त्याचे मुनासिब उत्तर दिलें आणि साहेबांस सांगितले कीं, मुसलमान लोक मनांतून बदलून आहेत तरी दरबारांत फारशीत तहरीर न येतां इंग्रेजीत येत जावी. म्हणजे त्या लोकांस माहिती होणारी नाही. साहेबांनीं कबूल केलें. मग कूच होऊन ड्युरेंडसाहेब आणि फौज शेमरूड मार्गानें महूस गेले. बक्षी आणि वकील महूपर्यंत बरोबर होते. तेथून साहेबांची रुकसत घेऊन ता. ३ आगस्ट रोजीं इंदुरीं आले. कर्नल ड्युरेंडसाहेब आक्टोबर महिन्यापावेतों महूस होते व तेथेंच काम करीत राहिले. नंतर महूहून फौज घेऊन प्रथम धारेस गेले आणि धारेस कटांतील लोकांस शिकस्त देऊन किल्ला पाहून मंदसोरास गेले. तेथेंही कटांतील लोकांस शिकस्त देऊन महतपुरास जाऊन इंतजाम करून फौजेसह ता. १५ डिसेंबरास इंदुरीं आले त्या वेळेस त्यांनीं कांहीं तोफा आणि फौज सोळसिंद्यास महूहून परभारें मागविली आणि दुसरें दिवशीं साहेब मोसूफ इंदुरीं रेसिडेंसीत आले. बाणगंगेपावेतों दरबारची मंडळी हत्तीवर बसून पेशवाईस गेली होती. ड्युरेंडसाहेबही हत्तीवर बसले. मंडळीनीं साहेबांस रेसिडेन्सीपावेतों पोहचविले. साहेब खडखड्या घाटावरून छावणीत गेले. तिसरें प्रहरीं सरकारवाड्यांत सरकारचे भेटीस येणार म्हणून तयारी झाली आणि तिसऱ्या प्रहरीं ड्युरेंडसाहेब तीस पस्तीस फौजी आफिसरांसह (अर्दलीत गोरे व काळे लोक स्वारांची

टोळी समागमें होतीं). सरकारवाड्यांत आले. बडेसाहेबांची व महाराजांची मुलाखत मोतीमहालांत झाली. त्या वेळेस खुर्च्यांची बैठक नव्हती. फर्श गाद्यांची बैठक असून साहेब लोकांस एकएक उशी बसण्यास दिली. साधारण बोलणें चालणें होऊन पानसुपारी होऊन साहेब लोक रुकसत झाले. याच दिवशीं संध्याकाळी सर राबर्ट हामीलटन साहेब मुंबईहून बग्गीच्या डाकेंतून येणार होते व त्यांस घेण्यास सर काशीरावदादा मुंबईस गेले होते. त्यांजकरिता रेसिडेन्सीत बावट्याजवळ डेरे लाविले होते, हामिलटन साहेब रात्रीं आठ वाजतां आले व लागलीच एजन्सीचा चार्ज घेतला. कर्नल ड्युरेंड दुसरें दिवशींच पहाटेस महूस गेले. रामचंद्रभाऊ व खुमानसिंग हे महूपावेतों गेले होते.

मुंबईहून सर राबर्ट यांजबरोबर जनरल सर ह्युरोज साहेब आले होते. त्यांनी फौजेचा चार्ज घेतला. हामिलटन साहेबांनीं दरबार केला त्यांत महाराजसाहेबही होते. हेचीनसाहेब व मेमांस झाबव्याहून बक्षी खुमानसिंग यांनीं आणल्यावरून दरबारांत त्यांस खिल्लत दिले. अमझेराचे राजास व त्याचे दोन तीन कामवाल्यांस फाशी दिली. येथें बंडात दोन मनुष्ये अराडुट आणि भागीरथ असें प्रमुख होते. त्यांस सरकारहुकमानें फाशी दिली गेली.

ड्युरेंडसाहेबांनीं महतपुराहून येतांना महाराजसाहेबांस ता. ९ डिसेंबर रोजीं लिहिलें होते कीं आमचे येण्यापूर्वी आपल्या फौजेची हत्यारें सर्व काढून घ्यावी. इकडून ता. १४ रोजीं जाब लिहिला कीं, आपल्या लिहिल्याप्रमाणें करण्यांत येईल. त्याप्रमाणें रिसाल्याच्या स्वारांच्या बंदुकी, तलवारी काढून घेतल्या. सर ह्युरोजीं यांनीं चाहिले कीं कटांतील लोकांची तहकीकात करून सजा दिली जावी व ज्यांस मृत्यूची शिक्षा होईल त्यांस आमचे फौजेसमोर द्यावी. त्यावरून महाराजांनीं कोर्टमार्शल मुकरर करून चौकशी चालविली. त्या कोर्टांत बक्षी खुमानसिंग प्रेसिडेंट व भवानीसिंग सरनौबत, भीमगीर बाबा, कप्तान शेखशामी, छितरसिंग अडजुटंट असें मेंबर नेमिले. त्यांनीं चार पांच दिवस चौकशी करून जे लोक रेसिडेंटीवर हमला करण्यात सामील होते त्यांस मृत्यूची शिक्षा दिली. कित्येक तोफेचे तोंडीं उडविले. कित्येकांस बंदुकीनें मारिलें. असा क्रम चार पांच दिवस राहिला. एकंदर बत्तीस माणसांस अशी समज देऊन तिसरें प्रहरीं शिक्षा झालेले लोकांस छावणीत इंग्रजी फौजेसमोर नेऊन सजा अंमलात आणविली. ही चौकशी वाड्याचे उत्तर पूर्वेचे बुरजांत होत होती. परंतु सर ह्युरोज यांना पसंत न आल्यानें त्यांनीं ता. ३१ डिसेंबरचे पहाटेस शहराभोवतीं इंग्रजी फौजेचा घेरा घातला आणि दरबारांत लिहिले कीं, सर्व फौजेचे लोकांस, आमचेकडेस पाठवावे. त्यावेळीं सरकारस्वारी राळामंडळास होती. महाराजांस खबर लागतांच तेही राळामंडळहून वाड्यांत आले. बक्षी खुमानसिंग यांस हुकूम झाल्यावरून त्यांनीं सर्व रिसाल्यास म्हणजे सरासरी तीनशें स्वारांस जे लायनीत हजर होते त्यांस छावणीत नेऊन इंग्रेजी फौजेचे सुपूर्त केलें. सर राबर्ट हामिलटन खुद्द आपल्या येथील पलटणीच्या लायनीत जाऊन जो कोणी पलटणपैकीं हाती लागला त्यांस व त्याचे सरंजाम तोसदान पट्टे वगैरे मिळाले ते गाडींत भरून सर ह्युरोजकडे पाठविले. पलटणचे लोक रात्रीच लाइन सोडून पळून गेले होतें. ह्या कृत्यांस दिवसाचे बारा वाजून गेले तरी सर ह्युरोज वेढा उठवीनात

तेव्हां सावकार लोकांनी बडेसाहेबास लेखी अर्जी दिली आणि दरबारांतूनही लिहिलें गेलें तेव्हां संध्याकाळीं फौजेचा घेरा उठला.

मेजर मेकमिलनसाहेब चौकशीकरितां नेमिले होते. त्यांनीं चौकशी चालविली त्याप्रमाणें आठ दहा मनुष्यें दररोज कैदेतून सुटून येऊं लागलीं. सरासरी एक महिन्यांत सर्व लोक सुटून आले. एकही गुन्हेगार सापडला नाही. ह्याच महिन्यांत सर ह्युरोज झाशीकडे मयफौजेचे गेले. सर राबर्ट हामिलटन हे पोलिटिकल आफिसर म्हणून बरोबर गेले. आपले वकील गणेश शास्त्रीही त्यांजबरोबर गेले होते. ही मंडळी रवाना झाल्यावर आपलेकडील नऊ तोफा महूस मदतीस पाठविल्या.

सन १८५८ नोव्हेंबर महिन्याचे सुमारास तात्या टोपे आणि रावसाहेब फितूर लोकांसह खरगोणास आले. तेथें लूटमार करून बडवाणीकडेस गेले. इंदुराहून भीमगीरबाबास बंदोबस्तासाठीं कांहीं फौजेस्वार देऊन पाठविले होतें. ते नर्मदापार अकबरपूर, जुलवाण्याकडे जनरल मिचेलसाहेबांचे फौजेत सामील होऊन कांहीं दिवस राहून परत आले.

सन १८५९ फेब्रुवारी महिन्यांत गणपतराव फणसे (राजाभाऊचे बंधु) कैदेत होते त्यांस सोडून दिले. याच सुमारास बालकृष्ण करनेल यांस वजा केलें. कारण कीं, बंडाचे कामांत आणि काळांत यांजकडून कांहींच नोकरी बनून आली नाहीं.

सर राबर्ट हामिलटन साहेबांनीं याच वर्षी मार्चमध्ये सेवानिवृत्त होऊन इंग्लंडला जाण्याचा निश्चय केला. सरकारांनीं ता. १४ रोजीं वाड्यांत मेजवानी दिली. ता. २१ व २२ रोजीं सर राबर्ट हे दरबारांतील मोठे लोकांस भेटावयास गेले. श्रीमंत महाराजसाहेबांस लाटसाहेबांकडील खलिता येणें होता तो खलिता एप्रिल महिन्याचे सुरुवातीस आला. सर राबर्टसाहेबांनीं दरबारांत येऊन महाराजसाहेबांस दिला. नंतर इंदुराहून ते रवाना झाले. बक्षीजी व गणेश शास्त्री वकील हे मुंबईपावेतों सरकारांनीं पोहचविण्यास पाठविले. ता. ११ एप्रिल रोजीं आगबोटीत बसून सर राबर्ट इंग्लंडास रवाना झाले. राव रामचंद्रभाऊंनीं गुढीपाडव्यास कारभारीपणाचा राजीनामा दिला.

ता. ६ मे इ. स. १८५९ रोजीं सर रिचमंड शेक्सपियर हे सर राबर्टचे बदली आले. दुसरें दिवशीं दरबारची मंडळी त्यांस भेटावयास गेली होती. ता. ९ रोजीं शेक्सपियर साहेब सरकारचे भेटीस आले होते. ता. १३ मे रोजीं कैलासवासी मल्हारराव महाराजांचे कुटुंब ताईसाहेब निवर्तल्या व ता. १९ मे रोजीं भाऊ होळकर निवर्तले. दोन्ही प्रसंगीं बडेसाहेब मातंगपोशीस सरकारसाहेबांकडे आले होते. ताईसाहेब कैलासवासी झाल्यानें खासगीचा व्यवहार सौ. भागिरथीबाई यांजकडे आला. ता. ३० मे रोजीं सर रिचमंड शेक्सपियर सरकार स्वारीचे भेटीस आले. महतपूरचे कांटिन्जंटबद्दल सरकारांनीं बोलणें केलें कीं, आतां कांटिन्जंट राहिली नाहीं तरी आम्हांकडून रुपया घेऊं नये. साहेबांकडून निकालाचें उत्तर मिळालें नाहीं.

महाराजसाहेबांकडून ते गादीवर बसल्यावेळी लेख झाला होता कीं आम्हास औरस पुत्र होईल तोच गादीवर बसेल. दत्तक घेणार नाही. यासंबंधांत लाटसाहेबांकडे दत्तक घेत जाण्याची परवानगी असावी म्हणोन पैरवी चालली होतीच. महाराज यांनीं इ. स. १८५८

सालांत चांगली मदत दिली. सबब दत्तकाचे मंजुरीचा खलिता कित्येक दिवसांचा रेसिडेंसीत आला होता. दोनचार कामें महाराजसाहेबांकडून करून घ्यावयाची होती सबब खलिता दिला नव्हता. खलित्याची तारीख ५ जानेवारी आहे. आतां मे महिन्यांत तो खलिता श्रीमंत महाराजसाहेबांस देण्यांत आला.

सरकारस्वारी फेब्रुवारी महिन्यांत महेश्वरीं होती. मार्च महिन्यांत इंदुरीं आली. शिवाजीराव बाळासाहेबांस देवी निघाल्या होत्या म्हणून स्वारी महेश्वर येथें गेलीं होती.

सन १८६१ जानेवारी महिन्यांत जबलपुरास लार्ड क्यानिंगसाहेबांचा दरबार होणार आणि महाराजसाहेबांचीं स्वारी जाणार सबब आगस्ट महिन्यापासून तयारी करण्याचें काम सुरू झाले. बक्षी खुमानसिंग यांस राजश्री भाऊसाहेबांचे पत्र गेलें कीं, स्वारीबरोबर फौज जाईल त्या सर्व फौजेचा व लष्कराचा बंदोबस्त तुम्ही ठेवावा. त्यावरून प्रारंभ झाला. समागमें जाण्यास फौज मुकरर झाली. रिसाल्याचे स्वार १३० व सरकार स्वारी मागाहून येणार सबब डाकेचे स्वार १००, इनफंटरी कंपन्या ४, तोफा बैलाच्या २ व हुजराती स्वार १०० अशी फौज बरोबर जाण्यास मुकरर झाली. या शिवाय हत्ती, शागीर्दपेशा, वगैरे. सर्वत्रांचे ड्रेस नवीन करविले.

सरकारस्वारी समागमें सरदार, दरखदार, मानकरी जाणार त्यांचा तपशील. काशीरावदादा होळकर, राव रामचंद्ररावभाऊ रेशीमवाले, गोविंदराव खजानची, गौतमाबाई, (सर काशीरावांची लेक) व लष्कराबरोबर जाणारे. सरदार बुळेसाहेब, दिवाण पळसीकर, किबेसाहेब, खुमानसिंग बक्षी, महंत भीमगीरबुवा, कर्नल भवानीसिंग सरनौबत, आनंदराव होळकर, पाटीलबाबा जाधव, बळवंतराव मल्हार फडणीस, राव उमेदसिंग वाटेत सामील होणार. मेजर मेकमिलन साहेब पोलिटिकल एजंट ह्यांची मुकररी होळकरांचे लष्कराबरोबर जाण्याची एजन्सीतून झाली. एकंदर चार हजारांचा जमाव होता.

ता. ७ डिसेंबर इ. स. १८६० रोजीं लष्कराचा कूच होऊन खुडेलचा मुक्काम झाला. तेथून दरकूच दरमुक्काम इलाखे शिंदे सरकार व भोपाळ सरकार व इंग्रेजी इलाखे वगैरेतून होऊन ठिकठिकाणीं सरदार बुळे वगैरे सरदार मानकरी यांस मानपान होत गेला. मेकमिलन साहेब ह्यांचाही बंदोबस्त उत्तम राहिला व होळकर फौजेची शिस्त उत्तम असल्याबद्दल मेकमिलन साहेबांनीं लाटसाहेबांकडे तारीफ केली. ता. ३ जानेवारी इ. स. १८६१ नोटा येथें मुक्काम झाला. येथून बक्षी खुमानसिंग व मौलाबक्ष जमादार जबलपुरीं डेरे लावण्याचे बंदोबस्तासाठीं पुढें रवाना झाले.

वरील हकीगत कैलासवासी बक्षी खुमानसिंग ह्यांच्या रोजनिशीवरून जशीचे तशीच उतरली आहे. बक्षीसाहेब श्रीमंतांच्या सान्निध्यात अति निकटतेनें वागत होते. त्यामुळें या लिखाणाचें महत्त्व विशेष आहे हे सांगांवयास नकोच. तथापि सर्वच गोष्टी त्यांस कळत होत्या असें म्हणता येणार नाहीं. राजकारण बहुरूपी असते तेव्हां इतरत्रही जी माहिती मिळेल ती संग्रहीत करणें इष्ट आहे. याशिवाय सरकारी कागदपत्रांवरून जी माहिती मिळाली आहे ती ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' ह्या पुस्तकांत पहावयास मिळेल.

श्रीक्षेत्र हरिद्वारच्या देणगी संबंधांत लेखांक आहे. ही देणगी होळकरांच्या व्यापक दृष्टीच्या अनेक देणग्यांपैकीं एक होय. राज्यक्षेत्र आकुंचित झालें तरी हिंदू धर्माचे आपण संरक्षक व संवर्धक आहोंत ही भावना जागृत असल्याचे दर्शक आहे. कांहीं लेखांक राज्यकारभारातील दक्षता दर्शवितात. राज्यातील इस्तमुरारदारांचे टाक्याची यादी त्याचप्रमाणें इतर याद्या तयार करवून राज्यकारभारांत व्यवस्थित स्वरूप दिलें गेल्याचें दिसतें. संस्थानिकांच्या संबंधाबदल, काकडझगड्यासंबंधीं, थांदले, झाबवे संबंधांत राजकीय हक्काबद्दलचें प्रकरण, नगदी नेमणुकीबदल काढलेले नियम; त्याप्रमाणें ए.जी.जी.च्या कानावर ज्या गोष्टी घालणें इष्ट होतें त्या घातल्या जात; पण आपली बाजू स्पष्टपणें निदर्शनास आणण्यांत दक्षता ठेविली जाई. बंडाचे धामधुमीत श्रीमंतांनीं दाखविलेली दक्षता व धूर्तता अद्वितीय दिसतात. संस्थान बडोदा येथील सरकारसाहेबांच्या तब्येतीबद्दल विचारपुस तिन्ही राण्यांचे नांवानें केली आहे. कांहीं लेखांक खासगीसंबंधीं माहिती देणारे आहेत. श्रीमंत सरकार हे शाळांतून स्वतः परीक्षा घेत असत. टाकेदार लोकांचे दत्तविधानाचा प्रश्न व प्रांताची आदलाबदल म्हणजे पर्यायाने ''राज्यकारभारांची सुयंत्रता'' या प्रश्नांचा उगम करून ठेविला.

सारांश, इ. स. १८५२ पासून जे नानाविध प्रश्न राज्यकारभाराचे संबंधात उद्‌भवले त्यांना विल्हेस लावून वा त्यांची चांचणी करून राज्यकारभारांत जिवंतपणा श्रीमंतांनीं आणून ठेविला हें निश्चित होय.

श्रीमंत सरकारांचे कारकीर्दीतील एक जमाखर्ची गोषवारा खालीं देत आहोत. त्यावरून जमा व खर्चाचा अंदाज करिता येईल. गोषवारा सुभा श्रीमंत तुकोजीराव महाराज होळकर बहादूर. फसली सन १२६३, संमत १९१०, शके १७७५, जून इ. स. १८५४ अखेर.

बारमाही : **(हुजूर फडणीसी सरकारी रेकार्ड)**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६,६८,१९१-६-० | बाकी सालगुदस्त. | | | | |
| २६,७८,२३५-१४-५ | जमा सालमजकूर. | | | | |
| ...................... | | | | | |
| ३३,४६,४२७-४-५ | | | | | |
| २५,७२,३९१-७-२ | | | | | पैकीं खर्च. |
| १३,३३,०७९-८-३ | बदुलमुशाहिरे खर्च. | | | | |
| | | ९५,८५२-११-० | हुजरातपागा | ३,५४,०२३-१५-० | जिनसीपलटण |
| | | ५,२८,९४०-२-० | रिसाला, सिलेदार | ४१४६६-०-० | बेडाअलीगोल |
| | | ८६,७२४-२-० | शागीर्दपेशाः | १,१३,१६०-०-० | कांटिन्जंट महतपूर |
| | | ८०००-०-० | भीलपलटण | ३१,५९२-५-३ | दरखदार मंडळी |
| | | ५०५३-५-३ | नाजीमदिवाणी | ४४३६-१५-३ | फौजदारी शहर |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | इंदूर |
| ३३०१८-८-६ | कारकून मंडळी | १०३२-०-० | पर इलाख्यांतील अकबारनवीस, उज्जेनी, धार भोपाल, शाजापुर हैदराबाद व नागपुर, बडोदे व ग्वालियर वेतनाचे |

......................

१३,३३,०७९-८-३

११,९२,८६१-१४-११ खेरीजमुशाहिरा, हुजूर वगैरा खर्चासुद्धां.

| | | | |
|---|---|---|---|
| २७५१-६-७ | श्रीदेवस्थान | १००७५-७-३ | धर्मादाय |
| १११५-३-० | खैरात खर्च | २७११-१४-९ | मेजवानी खर्च |
| ४७९४९-१४-९ | पुत्रोत्सव खर्च | २७७४१-६-९ | बक्षीस खर्च |
| ३९०५-५-४ | दप्तर खर्च | १४०५-०-० | तैवज खर्च |
| १२४२९-८-० | दसरा खर्च | १४००९५-८-११ | शिलकीखाते |
| ७७३-०-० | मिठाई खर्च | ५९९-०-० | दिपवाळी |
| ४५-०-० | वसंत पंचमी | २७५९-८-० | फागखर्च |
| ६७७-०-० | शेरणी खर्च | ३५४२३-९-६ | इमारत खर्च |
| ३४४८-१५-६ | मरम्मत खर्च | ३७१०-५-३ | लागवड खर्च |
| १८५७-०-० | भत्ता खर्च | २९२३-०-० | रोशनाई खर्च |
| १५९८३९-११-६ | बट्टा खर्चखाते | ४९१४-७-९ | साहेब लोकांकडे |
| १५०००-०-० | राजोजीराव फणसे | ६०००-०-० | आगीन बोटखर्च |
| १२८५०९-७-९ | चंदी उचापत खाते | ३५००-०-० | पुलाकडे खर्च |
| ३३२२५-५-० | कापड जामदारखाना | १०२८-०-० | शरीफभाईचे बावडी खर्च |
| २१८५६-६-० | किल्ले जांब खर्च | ९६०-०-० | तलावदुरस्ती पडद, मनासा |
| १७४०३-२-३ | कैलासवासी मातोश्री | २९९-८-० | जळीत सूटः |
| | साहेबांचा छत्री कारखाना | ६८-१२-० | जिनसी पलटण |
| ३००-०-० | महेश्वर तलाव दुरस्ती | ८७-०-० | मर्दाना, नाव दुरस्ती |
| १२२५-०-० | तराणा, चौत्रा मरम्मत | ३००-०-० | लसुरड्यांत तलाव दुरूस्ती |
| ९६६४-२-३ | मुंबईहून, हंड्या, | १६४०-०-० | लाकडी पूल, |

| | | |
|---|---|---|
| | खगोल, भूगोल | पिविळे |
| | खरीदी | खाळास |
| | १३७६-१४-० | पिंपळ्याहून |
| | | नहर |
| | | आणणेबद्दल |

२५०००-०-० लालबाग बारद्वारी खर्च.

२०५०-०-० थोरले सुभेदार यांची कन्या संताबाई लांबाते यांची छत्री दिल्ली नजीक बुलंदशहरीं. तेथील बाग, खर्चाबद्दल हस्ते मुनशी उमेदसिंगजी.

........................

११९२८६१-१४-११

३३८७-०-० मुजाफत खातें मौजे सुपडा तो मल्हारगड गांवाबद्दल.

येकुण येकंदर खर्च रुपये २५,७२,३९१-७-२

बाकी शिल्लक रुपये ७७४०३५-१३-३

विशेष सूचना : या शिवाय खासगी संस्थानचा जमाखर्च निराळा असून त्यांत श्रीदेवस्थान, धर्मादायचा आकार पूर्वापार चालू आहे.

(एक लेखांक इ. स. १८५५ ता. १९ जुलाईचा देत आहोत.)

राजश्री आबासाहेब यांस तुकोजी होळकर रामराम. मुक्काम महेश्वर येथें यथास्थित असो. विशेष आपण सोमवारी बडेसाहेबांकडे जाल तेव्हां आमच्याकडून सलाम सांगून मिजाजीची खबर पुसावी व त्यांचा पाय आता कसा आहे हेही विचारून लिहिणें.

मेहरबान बडेसाहेबांकडे थांदेल प्रकरणाबद्दल कैफियत लिहिणें आहें. त्यांस त्यांजकडून मसोदा देण्याबद्दल स्मरण द्यावें, म्हणजे तो मसोदा इकडेस पाठवून देणें. सिवाय साहेबांस सांगांवे कीं आम्ही हा मुकदमा आपले स्वाधीन केला आहे तरी सरकारची नुकसानी न होईल ते करतील. सर्व संस्थानची इभ्रत ठेवणें आपले हातीं आहे. प्रतिवादीनें असें समजू नये कीं होळकरांस शिकस्त दिली म्हणोन.

राज्याधिकार इ. स. १८५२ त झाल्यापासून इ. स. १८६० अखेरपर्यंत श्रीमंत सरकारसाहेबांची राज्यपद्धत पाहिली. आतां या पुढील राजकारण व शिस्त व राज्याचे, उत्पन्न वाढविण्याची केलेंली शिकस्त व शिक्षणखातें, आरोग्य, वगैरे सुधारणा आपणास पुढें पहावयाच्या आहेत.



### प्रकरण २१ वें

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर यांचा राज्यकारभार

## इ. स. १८६१ ते १८६४ पर्यंत

तारीख ६ जानेवारी इ. स. १८६१ रोजीं लष्कर जबलपुरांत दाखल झालें आणि सरकारी डेरे, तंबू शामियाने लावून तयारी केली. येथें आल्यावर वकील बडेसाहेबांचे भेटीस गेले. महाराजांचे येण्यास उशीर लागल्यामुळें बडेसाहेबांस बरें वाटलें नाहीं. नानासाहेब पेशव्यांचे वकील आमचे लष्कराबरोबर होते. तेंही एक कारण नाराजीस झालें आणि ते म्हणाले कीं लाटसाहेब महाराजांची भेट घेणार नाहीत. नंतर वकिलांनीं जाब दिला कीं याजबद्दल महाराजसाहेबांकडे काय दोष आहे ? व असेंही सांगितले कीं मेजर मेकमिलन साहेबांस इतल्ला करून दिला होता. शिवाय, आमचे लष्करांत तो उतरत नव्हता. फक्त आमचे लष्कराचे सोबतीनें वाटेने चालत होता. कांहीं काळानें साहेब शांत झाले आणि त्यांनीं बक्षीजींची भेट घेतली. सरकार स्वारी आली नाही यास्तव बक्षीजींनीं रहिमबक्ष जमादार यास महाराजांकडे स्वारांचे डांकेत रवाना केलें. हेतू हा कीं रस्त्यांत ज्या ठिकाणीं सरकार स्वारी भेटेल तेथें कळवावें की स्वारी लवकर आली पाहिजे. रहिमबक्ष दमोहपर्यंत जाऊन तेथें सरकारास खबर दिली स्वारी ता. ११ स येणार होती म्हणून इंग्रज कंपनी डेऱ्यावर सलामीस आली होती. परंतु संध्याकालपावेतों स्वारी आली नाही. कंपनी परत गेली. रात्रीं ११ वाजतां स्वारी दाखल झाली.

तारीख १२ जानेवारीस प्रातःकाळीं भाऊसाहेब व वकील आणि बक्षी असें तिघे मेकमिलन साहेबांकडे गेले तेथून लागलीच बडेसाहेबांकडे गेले. सरकारस्वारीचें विलंबाबद्दल प्रश्न निघतां भाऊसाहेबांनीं पाऊस, गाडीची नादुरस्ती ही कारणें तर सांगितलींच त्या बरोबर सरकारांस गेलेल्या तारांमध्ये झालेली गलतीही सांगितली. झालेल्या प्रकाराबद्दल श्रीमंत सरकारांच्या वतीनें खेद प्रदर्शित करण्यांत आला. असें सुचविण्यांत आलें कीं लाटसाहेबांस व लेडी क्यानिंग यांस महाराजसाहेबांकडील सलाम सांगांवा. भाऊसाहेब, बक्षीजी आणि वकील बडेसाहेबांबरोबर यंग साहेबांकडे गेले. यंगसाहेब फारेन सेक्रेटरी होते. तेथेंही वर नमूद केलेंली हकीगत सांगितली. त्यानंतर साहेबांनीं सांगितलें कीं ता. १४ रोजीं दरबार होईल. नंतर मंडळींनीं रुकसत घेतली व डेऱ्यावर आले. दोन प्रहरीं दीड वाजतां बडेसाहेब व लाटसाहेबांकडील डेप्युटेशन आलें. महाराजसाहेबांनीं लंबेफरशपावेतों पेशवाई केली. डेप्युटेशनमध्ये मिस्टर यंग फारेन सेक्रेटरी, मि. वेरिंग प्रायव्हेट सेक्रेटरी, मेजर एरस्कीन साहेब नर्मदा टेरिटरीचे कमिशनर आणि दोन एडीकांग असें होते. मामूलप्रमाणें सलामी झाली. डेप्युटेशनचे पेशवाईस भवानीसिंग सरनौबत व बक्षीजी गेले होते. बडेसाहेबांचे पेशवाईस दिवाणसाहेब व भीमगीर बाबा गेले होते. मामुली गोष्टी होऊन पानसुपारी झाली. सरकार लंबेफरशपावेतों पोहचविण्यास गेले होते. मागें बडेसाहेब व मेजर एस्क्वीन साहेब राहिले. सर्व दरबार बरखास्त होऊन बडेसाहेबांनीं सरकारांस सांगितले कीं आपल्यास इंग्रज सरकारकडून ४७,००० सत्तेचाळीस हजारांची खिल्लत मिळेल. महाराजसाहेबांनीं सांगितलें की आम्ही सर्व्हिस केली त्याजबद्दल कांहीं मुलूख रिवार्डात मिळावा व चांदवड वाफगांवच्या मुबादल्याबद्दल जिकर झाला. मुबादला करणें असल्यास संधी चांगली आहे. मेजर एरस्क्वीन साहेब यांनीं अद्याप नेमावर वगैरेंची मोजणी केली नाही. तरी तत्पूर्वी मुबादल्याची तजवीज आपण करावी असें बडेसाहेब बोलले. सरकारांनीं गोष्ट मंजूर केली. दोहींकडील जमेवर मुबादला करण्याचें ठरले. भाऊसाहेबांनीं बडेसाहेबांस सांगितलें कीं आम्ही लाटसाहेबांकडे पेशकस लाविला आहे तें आपण पाहून घ्यावे. इतके बोलणें झाल्यावर उभयतां साहेबांनीं रुकसत घेतली. बाहेर गेल्यावर बडेसाहेबांनीं भाऊसाहेबांस कळविले कीं वाफगांव, चांदवडचे कागद जमा करण्यास उशीर लावूं नये. सायंकाळीं भाऊसाहेब, गणपतराव वकील बडेसाहेबांकडे गेले आणि कोणकोण मंडळी दरबारांत येणें याजबद्दल ठराव झाला. पुढें बडेसाहेब बोलले कीं महाराजसाहेबांनीं लंबेफरशपासून जोडा उतरला पाहिजे व भाऊसाहेब (रेशीमवाले) यांस सांगितले कीं, महाराजसाहेबांचे डेरे लाटसाहेबांचे डेऱ्यापासून लांब आहेत तर परतभेटीकरितां कोठें जवळ डेरे लाविले पाहिजे. भाऊसाहेबांनीं श्रीमंत सरकारांस श्रुत केलें. सरकारांनीं मंजूर केलें.

ता. १३ जानेवारीस बक्षीजी आणि वकील डेरे लावण्याची जागा पाहणेस बडेसाहेबांबरोबर गेले. लाटसाहेबांचे लष्कराजवळ जागा मुकरर करण्यांत आली. लाटसाहेबांस नजर करण्यासंबंधात वकील बडेसाहेबांस विचारण्यास गेले. बडेसाहेबांनीं सांगितलें कीं महाराजसाहेबांनीं नजर करण्याची जरूर नाही. सरदार लोकांकडून एक एक

मोहर नजर दाखवावी. लाटसाहेब फक्त हात लावतील. बडेसाहेबांकडून संदेश आला कीं शिंदे सरकारचे कामवाल्यांस व भोपाळवाल्यांचे कामवाल्यांस इनामे मिळणार आहेत तरी आपणही आपल्या कामवाल्यांस मंजुरी द्यावी. महाराजसाहेबांनीं मंजूर केलें.

ता. १४ जानेवारी प्रायव्हेट व पब्लिक दरबार झाले. साडेदहा वाजतां सरकारस्वारी जेथें डेरा लाविला होता तेथें गेली. अकरा वाजतां सरकारस्वारी हत्तीवर बसून लाटसाहेबांचे डेऱ्यावर गेली. पांचशें कदमपावेतों तीन आफिसर्स पेशवाईस आले. किटिंगसाहेब महाराजांबरोबर होते. लाटसाहेबांचे डेरियावर पोहचल्यानंतर फक्त महाराजसाहेब, बुळे सरदार, काशीरावदादा, दिवाणसाहेब पळसीकर, राय उमेदसिंगजी व भाऊसाहेब रेशीमवाले हत्तीवर थोडे पुढें गेले. तेथें बडेसाहेब व फारेन सेक्रेटरी हत्तीवरच पेशवाईस आले आणि सरकारांस व सरदारांस मुलाखतीकरितां घेऊन गेले. सरकार हत्तीवरून उतरून डेऱ्यांत जाऊं लागले तेव्हां १९ तोफांची सलामी झाली. लाटसाहेब लंबेफरशपावेतों पुढें आले आणि महाराजांस घेऊन जाऊन आपले उजवीकडेस बसविलें. कांहीं वेळ भाषण होऊन मंडळींनीं नजर दाखविल्या. नंतर पानसुपारी झाली. हा प्रायव्हेट दरबार बरखास्त झाला. लाटसाहेबांनीं सरकारांस लबेफरशपावेतों पोचविले व फारेन सेक्रेटरीनीं महाराजांस आम दरबारांत बसविलें. त्या वेळी पुनः १९ तोफांची सलामी झाली. नंतर सरदार लोकांस बोलावून बसविलें. उजवे बाजूस रहीस लोक व सरदार लोक होते. डावे बाजूस साहेब लोक होते. दरबार भरल्यानंतर पाव घंट्याने लाटसाहेब दरबारांत आले. येतांच २१ एकवीस तोफांची सलामी झाली.

वहिवाटीप्रमाणें ओळखदेख झाल्यावर सरकारांसमक्ष शेहचाळीस हजाराचे खिल्लत एक्कावन पारचे आणून ठेविलें. काशीरावदादांस दहा हजार रुपयांचा, भाऊसाहेबांस पांच हजाराचा, बक्षी खुमानसिंगास पांच हजारांचा व गणेश शास्त्री वकील यांस दोन हजाराचा असें खिल्लत दिले. सर रिचमंड शेक्सपियर ए.जी.जी.यांनी आम्हा लोकांस (सरदारांस) गांवे देण्याबद्दल शिफारस केली होती. परंतु महाराजसाहेबांस रिवार्ड मिळत नाही याजकरितां तो बेत रहित केला व खिल्लत दिली. बाकीचे रईस लोकांस खिल्लती दिल्या. नंतर लाटसाहेब दरबारांतून उठले. २१ फायर सलामीचे झाले. फारेन सेक्रेटरी व बडेसाहेबांनीं महाराजांस लंबेफरशपर्यंत व हत्तीपावेतों पोहचविले. बडेसाहेब, मेजर मेकमिलन व मेजर किटिंग हे तिघे डेऱ्यापावेतों सरकारांबरोबर आले.

ता. १५ जानेवारी रोजीं बक्षी खुमानसिंग व गणपतराव वकील दरबाराकरितां लाटसाहेबांजवळ डेरे लाविले होते ते पाहण्यास गेले. तेथें बडेसाहेबांची गांठ पडली. संध्याकाळी बडेसाहेबांची चिठ्ठी आली कीं उद्यां चोवीस साहेबलोक लाटसाहेबांबरोबर येतील. दुसरें, भीमगीर बाबा व भवानीसिंग सरनौबत यांस खिल्लत मिळाले नसल्यानें ते मिळण्याबद्दल भाऊसाहेबांनीं बडेसाहेबांस लिहिले होते. अखेर इंदुरीं आल्यावर दोन-दोन हजाराचे खिल्लत उभयतांस मिळाले. ता. १५ चे रात्रीं श्रीमंत सरकार लाटसाहेबांकडे प्रायव्हेट भेटीस गेले होते.

ता. १६ रोजीं दरबाराकरितां डेरे लाविले. तेथें सरकारस्वारी गेली. रात्रीचे पावसानें

डेरे शामियाने बिछायत भिजली होती. बडेसाहेबांस लिहून ११ वाजतांचा दरबार रहित करून तीन वाजतांचा वेळ ठरविला. बैठकीची व्यवस्था सरकार व लाटसाहेबाचे बसण्यास मोठे मंडपाखाली लहान मंडप, मखमली चार सोन्याचे खांबांचा उभा केला. दोन वाजतां बुळेसाहेब, दिवाण पळसीकर, काशीरावदादा व भाऊसाहेब रेशीमवाले असें चार सरदार बग्गीत बसून लाटसाहेब यांचे पेशवाईस गेले. लाटसाहेबांची स्वारी बरोबर तीन वाजतां आली. मामूलप्रमाणें पलटण व रिसाल्यांकडून सलामी झाली. शामियान्याचे बाहेर महाराजसाहेब पेशवाईस गेले. २१ तोफा सलामीच्या झाल्या. लाटसाहेब महाराजांचे उजवीकडे बरोबरीनें बसले. त्यांजकडील पंधरा साहेब लोक व आपलेकडील पंधरा सरदार वगैरे मंडळी उजवीकडे साहेब लोक व डावीकडे आपले मंडळी बसली. लाटसाहेबांनीं होळकरी फौज व ब्यांडची फार तारीफ केली. कांहीं वेळ भाषण झाल्यावर एक्कावन्न पारचाचे पेशकस सादर करण्यांत आलें. पैकीं कंठा लाटसाहेबांचे गळ्यांत घातला. सरकारांनीं लाटसाहेब, बडेसाहेब, फारेन सेक्रेटरीस पानसुपारी दिली. वरकड मंडळीस दिवाणसाहेबांनीं व भाऊसाहेबांनीं पानसुपारी दिली. बग्गीपावेतों सरकार लाटसाहेबांस पोहचविण्यास गेले. २१ तोफा सलामीच्या झाल्या. परत पूर्वीचीच सरदार मंडळी लाटसाहेबांस पोहचविण्यास गेली होती. नंतर सरकार जलुसानें सरदारांसह हत्तीवर बसून शहरातून दोन घटका रात्रीस लष्करांत येऊन पोंहचले.

ता. १७ : रोजीं मिस्टर जार्ज लेडसीर नांवाचा एक तसबीर काढणारा लाटसाहेबांबरोबर गृहस्थ होता. त्याजकडून महाराजसाहेबांनीं आपली तसबीर काढविली. तिसरें प्रहरीं सरकारस्वारी नर्मदेवर गेली होती.

ता. १८ : मुक्काम जबलपूर तीन वाजतां बडेसाहेब आले आणि महाराज साहेबांशीं एकांत झाला. पुढें चार दिवस पाऊस पडत असल्यानें कूच झाले नाही, ह्या अवधींत महाराजसाहेबांनीं लाटसाहेबांस घोड्यावर बसून फेर दाखविला.

ता. २४ : लष्कराचा कूच होऊन हुशंगाबादेचे वाटेनें लष्कर रवाना झालें. सरकारस्वारी लष्कराबरोबरच राहिली आणि सिहोरचे डाक्टर टामसन पोलिटिकल आफिसर म्हणोन लष्कराबरोबर होते.

ता. २६ : नर्मदा उतरून चांदवडचा मुक्काम झाला.

ता. २८ : नरसिंगपुरास मुक्काम झाला. तेथें सरकारची पेशवाई झाली. दरकूच दरमुक्काम ता. ५ फेब्रुवारीस हुशंगाबादेस मुक्काम झाला. येथेंही पेशवाई झाली. पुढें ता.१० रोजीं आपले इलाख्यांत खातेगांवीं मुक्काम झाला. येथून स्वारी पुढें गेली व लष्कर इंदूरास ता. १५ फेब्रुवारीस दाखल झाले. याप्रमाणें जबलपूरचा प्रवास व दरबार पार पडला.

सर रिचमंडसाहेब आक्टोबरांत मयत झाले. त्यांचे अंत्यविधीस बक्षीजीस पाठविलें होते. कर्नल किटिंग हे आफिशियटिंग नेमले गेले. ता. १ नोव्हेंबर रोजीं किटिंगसाहेबांनीं दरबार केला. महाराजसाहेब महेश्वरहून त्याच दिवशीं आले आणि छावणीत दरबाराकरितां गेले. सरकारसाहेबांस स्टार मिळण्याचा दरबार होता. परत संध्याकाळीं स्वारी महेश्वरीं रवाना

झाली. यावेळीं सरकारचा पुत्र आजारी होता. दोन दिवसांनीं पुत्रवियोग झाला.

धरमनारायण मुनशी विद्याखात्याचे मुख्य अधिकारी इ. स. १८६१ पर्यंत होते. त्यांचा कारभार एकंदरीत यशस्वी होता. १८६१ त एज्युकेशन बोर्ड अस्तित्वांत आलें. बक्षीजी अध्यक्ष, वासुदेव महादाजी मुळे (नाजीम देशदान), रामचंद्र विठ्ठल व्यास वकील, मौलवी महमद हुसेन असें तिघे सभासद नेमले गेले. इ. स. १८६५ त विनायक जनार्दन कीर्तने यांस बोलाविले आणि बक्षीजी कार्यनिवृत्त झाले.

आफिमीचा सट्टा सदाशिव मार्तंड या सरकारी दुकानांत होत असें व अफूचे भाव कायम होत. यावर्षी चांदी टाकसाळ बक्षीजीचे मार्फतीनें कायम झाली व हल्लीं शिक्का रुपया पडूं लागला.

सन १८६२. महमदअली नांवाचा तोफखान्याचा एक ब्रिटिश पेन्शनर येथें आला होता. त्यांस इ. स. १८५७ पूर्वी तोफखान्यावर आफिसर ठेवून घेतला. जेव्हां गदर झाला त्यावेळीं आपल्या येथील तोफा रेसिडेन्सीत जापत्याकरितां मागविल्या होत्या त्या तोफांवर याची मुकररी झाली होती. त्यावेळीं हा अधिकारी दंग्यांत सामील झाला व बंडवाल्यांबरोबर दिल्लीस चालला गेला होता. तो या सालांत फकीराच्या वेषांत थांदल्यास जाऊन राहिला तेथें तो शेवटी पकडला गेला व ता. १९ मे रोजीं त्यांस फाशी दिले.

धारचे श्रीमंत बाळासाहेब यांचे लग्न मार्च महिन्यांत झालें. सरकारस्वारी धारेस गेली होती. याच सालीं सरकारांनीं एक नवीन बाब सात रुपये शेकडा सरदेशमुखी व पंचवीस बिघे जमीन इनामी असें खालसे गांवांतून घेणें ठरविलें व त्याजबद्दल कायदेही मुकरर केलें. ग्यारंटिड जहागिरदारांनीं सरदेशमुखीबद्दल तक्रार केली व दिली नाहीं.

बक्षीजीस बेटमा परगण्यांतील सांगवी गांव जहागीर होता. तो लहान असून बक्षीजींनीं बंडाचे काळात नोकरी चांगली केली. सबब तो गांव बदलून मौजे पवारडा (परगणे सावेर) या गांवची सनद इ. स. १८६३ त सरकारांनीं करून दिली. रेसिडेन्सी वकील गणेश शास्त्री होते. त्यांची बदली खरगोण जिल्ह्याचे सुभ्यावर करून वकिलीवर रामचंद्र विठ्ठल व्यास यांस नेमलें.

सन १८६४ आगस्ट महिन्यांत मेजर मीड ए.जी.जी.यानीं ता. ७ रोजीं देवासला जाऊन छोटे पातीचे श्रीमंत नारायणराव बाबा पवार यांस अखत्यार दिला. धारेस मेवाती लौकांनी दंगा केला. गादीवर बाळासाहेब अज्ञान होते. कर्नल ड्युरेंड साहेबांनीं धारेस जप्ती बसविली. हा मुकदमा राव रामचंद्रभाऊ रेशीमवाले यांनीं हातीं घेऊन मोठ्या मुश्किलीनें ता. १ आक्टोबर रोजीं जप्ती उठविली. या कामगिरीबद्दल आपले महाराजसाहेबांनीं पंचवीस हजाराचें बक्षीस दिले. धार महाराजांस अखत्यार झाल्यावर पांच हजाराची दोन गांवे धार सरकारांनीं भाऊसाहेबांस इनाम दिली. धारपैकीं बेछडा परगणा सरासरी साठ हजाराचा धारवाल्यांकडून घेऊन इंग्रज सरकारने बेगम भोपाळ इजला इनाम दिला.

आजपर्यंत ब्यांडमध्यें महाराजसाहेबांची सलामी नव्हती. यास्तव बक्षीसाहेब व

विष्णुपंत सरवटे यांनी एक पद तयार करून राष्ट्रगीत सुरू केलें ते असें : *प्रभो प्रार्थना परिसा आमुची द्या सुख पाळुनी राजालाः देवा आमुच्या महाराजांच्या राखी विजयी भाल्याला; आणि करोनि राज्य निरंतर देवो सुख तो देशाला ।।*

सन १८६५; सरकारस्वारीचा मुक्काम महेश्वरीं होता. ता.१ जानेवारी प्रिन्सेस सीताबाई साहेबांचे लग्नाबद्दल सरदार गोविंदराव बुळे यांसी निश्चय करण्याबद्दल मंडळींची सम्मती घेतली व ती सरकाराकडे पाठविली. या महिन्यांत मोठे बाळासाहेबांस श्रीगोपाळजींचे मंदिरातून महेश्वरवाड्यांत आणिलें आणि धाकटे बाळासाहेबांसही आणिलें. सीताबाई साहेबांची मागणी रीतसर बुळे सरदारांकडून आली, आम्ही सर्व सरदार मानकरी बुळे साहेबांचे वाड्यांत वस्त्रें घेऊन गेलो. लग्नाबद्दल व गडंगनेराबद्दलची याद तयार झाली. एकंदर एक लक्षाची याद झाली. ता.१४ फेब्रुवारीस सीताबाईचें लग्न बुळेसाहेबांशी झाले. सरकार लग्नांत गेले नाहींत. कप्तान केंडल दरबारांत आले होते. पानसुपारी झाली. ता.१५ रोजीं कप्तान केंडलसाहेब सरकार भेटीस येऊन नंतर दौऱ्यावर गेले. ता. ६ मार्च रोजीं मोठ्या राणीसाहेब म्हाळसाबाई महेश्वरीं स्वर्गवासी झाल्या.

ता. २४ मार्च रोजीं महाराजसाहेब उभयतां बाळासाहेबांसह व जनानखान्यासह कूच होऊन ता. २७ रोजीं इंदूरचे बाहेर गरबडीस येऊन पोंहचले.

ता. २८ मार्च रोजीं खासगीबद्दल भागीरथीबाई साहेबांचे नांवाने शिक्के तयार झाले व खासगी त्यांचे नांवाने सुरू झाली.

ता. २ एप्रिल रोजीं सर्व स्वाऱ्या मोठ्या थाटानें गडबडीहून सरकारवाड्यांत पहाट होतांच मुहूर्ताने आल्या. दरबार होऊन नजरा झाल्या.

ता. १० एप्रिल रोजीं कर्नल मीड साहेब ए.जी.जी. सरकारचे भेटीस आले. बक्षीजी व दिवाणसाहेब पेशवाईस गेलें होते. महाराजसाहेबांनीं बाळासाहेबांची भेट करविली. सरकारवाड्यांत रोशनाई झाली होती. या सुमारास इंदूर शहरीं वाख्याचा (= कॉलऱ्याचा) उपद्रव सुरू झाला.

ता. २० एप्रिल मुक्काम इंदूर. श्रीमंत उभयतां बाळासाहेबांचीं लग्नें होणार सबब लग्नचिठ्ठ्या लिहिण्याचा मुहूर्त झाला. वहिवाटीप्रमाणें श्रीदेवतेच्या नावानें चिठ्ठ्या देवापुढें ठेवायच्या, त्या बक्षी खुमानसिंग बालबच्चेवाले सबब त्यांच्या हातून चिठ्या लिहविल्या व ठेवविल्या. संध्याकाळीं दिवाणसाहेब बक्षीजी व वकील असें त्रिवर्ग बडेसाहेबांचे नांवानीं व लाटसाहेबांचे नांवानीं आमंत्रणखलिते घेऊन बडेसाहेबांकडे गेले. बडेसाहेब बोलले कीं अद्यापि बाळासाहेबांचें वय फार लहान आहे अशा वयांत लग्न करणे मुनासिब नाही. बक्षीजींनीं जाब दिला कीं आम्हां लोकांत लहानपणींच लग्न करण्याची चाल आहे.

ता. २७ एप्रिल. लग्नाबद्दल गोंधळ घातला. सुमारें सात हजार पात्र झाले. ता. ३० पासून गडंगनेर सुरू झालें. आजच महाराजांचे शालक आनंदराव फणसे वाख्यानें (कालऱ्यानें) मयत झाले परंतु गडंगनेर संपेपर्यंत कोणास कळूं दिलें नाहीं. दुसरी खबर

आली कीं नबाब गोषमहमदखा जावरेवाले वाख्यानें (= कालऱ्यानें) मयत झाले.

ता. ५ मे रोजीं सरकार स्वारी मरीमातेची पूजा करण्यास बाणगंगेवर गेली होती व शहरचे लोकासही पूजा करण्यास हुकूम झाला होता. त्याप्रमाणें सर्व लोक पूजा करण्यास गेले. ता. ९ मे पावेतों गडंगनेर होतच राहिलें.

ता. २० मे रोजीं मोठे बाळासाहेबांचे व ता. ३१ मे रोजीं धाकटे बाळासाहेबांचे अशीं लग्नें झालीं. लग्नास बडेसाहेब, धारवाले, देवासवाले महाराज आले होतें. लग्नांची मोठीच गर्दी होती परंतु कांहीं एक विघ्न झालें नाही. ता. १८ जुलाईपावेतों समारंभ होत राहिला.

जावरा नबाब मयत झाले. त्यांचे चिरंजीव गादीनशीन होणार सबब बक्षीजीस हुकूम झाला कीं, तुम्ही होळकर सरकारांतर्फे जाऊन गादीनशीनी करावी. परंतु जावरेवाले हें इच्छित नव्हते. कर्नल डेलीसाहेब आगऱ्याचे पोलिटिकल एजंट होते. त्यांस जावऱ्याचे दिवाण हजरत नूरखानने उलटेंपालटें समजावून होळकरांकडील मोतमीद येण्यापूर्वीच गादीनशीन करविली आणि इतल्ला ए.जी.जी.स दिला. ता. २१ रोजीं वकिलास चिठ्ठी लिहिली आणि आफसोस दाखविला कीं, हजरत नूरखांनीं जलदी करून गादीनशिनी करविली. आतां मोतमीदाचें जाणेचें कारण नाहीं.

ता. २९ सप्टेंबर रोजीं बक्षीजीस हुकूम नं. ७१ चा मिळाला की तुमची नोकरी पाहून तुम्हास खरगोणबद्दल दरमहा २०० मिळत आहे तो नेहमी मिळत जाईल.

ता. १० आक्टोबर रोजीं मोठे राणीसाहेबांस म्हणजे भागीरथीबाईसाहेबांस पुत्र झाला. ता. २९ रोजीं बाळंतविडा केला. उभयतां बाळासाहेबांचीं लग्नें झाल्यानें भानपुऱ्यास कैलासवासी यशवंतराव महाराजांचे छत्रीवर पाया पडण्याकरिता न्यावें याजकरितां नोव्हेंबर महिन्यांत तयारी झाली. ता. ३० नोव्हेंबर रोजीं लष्कराचा कूच होऊन स्वारीबरोबर हुजरातीचे स्वार ३५०, रिसाल्याचे स्वार ६५००, एक तोफखाना व आठ कंपन्या पलटणीच्या निघाल्या. ता. २ डिसेंबर रोजीं स्वाऱ्या उज्जेनीस दाखल झाल्या. रामराव सरसुभे त्रिवेणीपावेतों पेशवाईस आले होते. दुसरें दिवशीं सरसुभेसाहेबांकडे मेजवानी झाली व नजरा जाहल्या. सरकारांतूनही त्यांस वस्त्रें दिली गेली. नंतर कूच झाला. याप्रमाणें अशाप्रकारें स्वारी निघाल्यास इलाख्यांतून प्रत्येक गांवीं एक पाटलास वीस रुपये नजरेचे लागतात.

ता. ४ डिसेंबर रोजीं स्वारी महतपुरास दाखल झाली. येथें पूर्वी कांटिन्जंट राहत होती. कांटिन्जंट इ. स. १८५७ सालीं तुटली. परंतु त्याजबद्दल रुपया देणें बंद झाले नाही. इतकेंच झालें कीं, सरकारांनीं वीस लक्ष रुपया इंग्रज सरकारास दिला आणि त्याचे व्याज दरशेकडा पांच रुपयेप्रमाणें कांटिजन्टीकडेस दिले जाते. अशी रसीद दरवर्षी अदलबदल होत असते. दोन प्रहरां दरबार होऊन नजरा झाल्या. पन्नास मोहरा व सत्तर पुतळ्या नजरेच्या आल्या. सरकारांनीं अमीन, जमींदार लोकांस वस्त्रें दिली. ता. ६ डिसेंबर तालेस (इलाखा जावरा) मुक्काम झाला. हजरतनूरखा दिवाण जावरा पेशवाईस आले. सरकार डेरियावर आल्यावर २१ फेर सलामी तोफांची झाली. दरबार झाला. हुजरतनुरखां व कामगार लोकांनीं श्रीमंत सरकारांस नजरा केल्या. पानसुपारी अत्तर होऊन दरबार बरखास्त झाला. सरकारांतून

जावऱ्याचे दिवाण वगैरेस वस्त्रें व तालचे जमीदारास वस्त्रें दिली गेली. नऊ वाजतां २१ फेर तोफांचे सलामीचे जावऱ्यावाल्याकडून झाले. नंतर खाचरोद (इलाखा शिंदे सरकार) येथें मुक्काम झाला. मंदसोरचे सुभे पेशवाईस आले होते. सलामीस तोफा पलटण मंदसोरहून आणल्या होत्या. सलामीच्या तोफा २१ झाल्या. ता. ८ डिसेंबर रोजीं शिंदे सरकारचे पलटणीची कवायत पाहिली. नंतर दरबार झाला. लालगड ठाकूरांनीं दोन घोडे सरकारांस नजर केलें. सरकारांनी मंदसोरचे सुभे वगैरे लोकांस वस्त्रें दिली. नंतर मुक्काम करीत करीत स्वारी भानपुरा येथें ता. ११ रोजीं पोहचली. तेथें कैलासवासी यांचे छत्रीचे दर्शन करून दोनचार दिवस मुक्काम राहिला. रामपूर, भानपूर जिल्ह्यांतील अमीन, जमीदार वगैरेकरितां दरबार झाला. नजरा मामुलीप्रमाणें होऊन सर्वत्रांस वस्त्रें दिलीं गेलीं.

सन १८६५ अखेरपर्यंतची ही वरील हकीगत खुमानसिंग बक्षी यांच्या रोजनामच्यावरून घेतली आहे. याच कालातील म्हणजे इ. स. १८६५ अखेर घडलेल्या बाबीसंबंधी जे सरकारी कागदपत्र उपलब्ध झाले ते ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' म्हणून स्वतंत्र पुस्तकरूपानें पहावयास मिळतील. तत्रापि कांहीं उतारे खाली देत आहोत त्यांवरून कारकीर्दीचे स्वरूप ध्यानांत येणारे आहे.

**लेखांक सरकारी रेकार्ड**

जबलपूर येथें गव्हर्नर जनरल साहेब यांजकडील आम दरबार व खास दरबार झाला त्यावेळी हजर असलेल्या मंडळींची यादी. ता. १३ जानेवारी इसवी सन १८६१ मुक्काम जबलपूर.

५ खास दरबारांत जाणारी मंडळी.

| | |
|---|---|
| १ सरदार गोविंदराव बुळेसाहेब | १ सर काशीराव दादासाहेब होळकर |
| १ राव रामचंद्रराव रेशीमवाले साहेब | १ आबासाहेब दिवाण पळसीकर |
| १ राय उमेदसिंगजी साहेब | |

२४ आम दरबारांत जाणारी मंडळी.

| | | |
|---|---|---|
| १ सरदार बुळे साहेब | २ दिवाण साहेब | ३ सर काशीराव दादा होळकर |
| ४ राय उमेदसिंगजी | ५ दाजीसाहेब किबे | ६ राव रामचंद्र भाऊ रेशीमवाले |
| ७ पाराजीराव होळकर | ८ बक्षी खुमानसिंगजी | ९ आनंदराव होळकर |
| १० भवानीसिंग सरनौबत | ११ भीमगीरबाबा | १२ माधवसिंग ठाकूर |
| १३ बापुसाहेब बांडे सरदार | १४ भगवंतराव खेरकर | १५ कोठारी सावंतराम |
| १६ गणपतराव वकील | १७ बळवंतराव फडणीस | १८ मामा मानकर |
| १९ गिरीभाऊ चिटणीस. | २० अप्पासाहेब चांगण | २१ पाटीलबाबा जाधव |
| २२ हकीमजी,फारशी दप्तर | २३ एडवर्डसाहेब नाजीम | २४ निरभेसिंग ठाकूर |

**ता. १ आक्टोबर इ. स. १८६२ दसऱ्याचे स्वारीसंबंधात हुजूर हुकूम :**

१ आज मागील पांच घटका दिवस राहतां मेहरबान बइेसाहेब व छोटेसाहेब वगैरे उदईक दसऱ्याचे स्वारीकरितां येणार. सबब निमंत्रण देण्यास दिवाणसाहेब, बक्षी खुमानसिंग व वकील यांनी लवाजम्यानिशीं जाऊन निमंत्रण स्वारीत येण्याचें द्यावें.

२ साहेब छावणींतून लालबागपावेतों बग्गीत जातील. नंतर सरकारस्वारी लालबागे-पाशीं आल्यावर मग साहेब लोक लालबागेंतून हत्तीवर स्वार होऊन स्वारींत सामील होतील व सीमोल्लंघनाचे ठिकाणपावेतों बरोबर येऊन फौजेची कवाइत पाहून तेथून परत लालबागेत थांबतील. नंतर सरकारसाहेब पूजा करून परत लालबागेजवळ आल्यावर, साहेब हत्तीवरून सरकाराबरोबर वाड्यांत दरबाराकरितां स्वारीसमागमें येतील.

 १ वाड्यांत आल्यावर साहेबांकरिता खुर्च्याचा दरबार सदर कचेरीत होईल. पानसुपारी झाली म्हणजे दरबार बरखास्त होऊन साहेब बग्गीतून छावणीत जातील.

 २ साहेबांचे स्वारीकरितां हत्ती एकूण पांच सरकारांतून एक हौद्याचा व चार जमेचे कसून दरसाल पाठविले जातात त्याप्रमाणें त्यांजवर सामान व झुली असाव्या.

यादी ता.२४ जून इ. स. १८६३ इसवी रोजीं दरबारांत अहलकार हजर जाहल्यावर, सरकारसाहेबांचे आज्ञा झाली कीं, सरकार रियासतीत पार्लमेंट सभा मुकरर होऊन सभेचे मेंबर नेमिले जातील, त्यांचे सल्ल्याने काम चालावे. त्यावरून सर्वांची संमती हीच कीं, पार्लमेंट आजच होऊ शकणार नाही. करितां हल्लीं कौन्सिल मुकरर करून कौन्सिलचे सल्लेनें कामें व्हावी. त्यावरून सरकार आज्ञा जाहली कीं, कौन्सिलचा सल्ला मंजूर आहे.

**कौन्सिलातील सभासदांची नांवें**

१ रामराव नारायण पळसीकर दिवाणसाहेब
२ राव रामचंद्रराव भाऊ रेशीमवालेसाहेब
३ दाजीसाहेब किबे
४ सर काशीराव दादासाहेब होळकर
५ बक्षी खुमानसिंगजीसाहेब
६ विनायकराव गोपाळ
७ भवानीसिंग सरनौबत
८ कर्नल ठाकूरप्रसाद
९ भीमगीरबाबा
१० माधवसिंग ठाकूर
११ बेनेर्ड फिनविकसाहेब

१२ रामचंद्र विठ्ठल व्यास वकील, रेसिडेन्सी
१३ गणेश सीताराम सुभेसाहेब
१४ गोविंदरावजी हुजूर खजांची
१५ माधवराव विसाजी
हृयाप्रमाणें कौन्सिल कायम केलें.

---

ता.१ फेब्रुवारी इसवी इ. स. १८६५ नंबर सनद ३६६ (शिक्का)

| श्री म्हाळसाकांत चरणीं तत्पर<br>यशवंतराव सुत तुकोजी होळकर |
| --- |

हरिभक्तपरायण वेदमूर्ती राजश्री गोपाळजी बिन मनसाराम खेडावाल ब्राह्मण वास्तव्य कसबे महेश्वर यांसी सेवक तुकोजीराव होळकर दंडवत शके १७८६ धातानाम संवत्सरे रेवातीर. आपण फार सत्पात्र व श्रीगोपाळकृष्ण चरणीं दृढभाव, कुटुंबवत्सल अहांत. आपले घरीं चिरंजीव राजश्री शिवाजीराव बाबा यांचा जन्म होऊन पांच वर्षाचें वय होईपर्यंत राहिले. आपण त्यांचे पुत्रवत लालनपालन केलें व महोत्सव केला. याकरितां आपले कुटुंब निर्वाहास मौजे सोमाखेडी तालुके चोळी प्रगणे महेश्वर हे गांव इनाम जहागीर देण्याचा ठराव. गांवचा कुल रखबा बिघे १०४८,२ लायक, बागायत, पडीतसुद्धां. यापैकीं हक्कदार, इनामदार, सरदेशमुखी, गढी, बावडी, उभामार्ग खेरीज व दिवाणी फौजदारी अंमलखेरीज करून दरोबस्त जळ, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेपसुद्धां इनामीचा ठराव होऊन हें सनदपत्र लेखन केलें असें. तरी गांवचा उपयोग निर्वेधपणें पुत्रपौत्रादि वंशपरंपरा घेऊन सरकार दौलतीचे अभीष्टचिंतन करीत जाणें रवाना चंद्र ४ रमजान संमत १९२१ हे विनंती मोर्तबसुद.

श्रीमंत सरकारांच्या राज्यपद्धतीचे तंत्र यावरून लक्षांत येण्यासारखें आहे. आतां यापुढें सरकारांनीं काय काय सुधारणा वगैरे केल्या ते पहावयाचें आहे.



**प्रकरण २२ वें**

---

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर यांचा राज्यकारभार

## इ. स. १८६५ ते १८७२ पर्यंत

बक्षी खुमानसिंगजी म्हणजे श्रीमंतांचे बाळपणापासूनचे सहाध्यायी. पुढें श्रीमंतांस अधिकार प्राप्त झाल्यानंतर बक्षी पूर्ण विश्वासांतील व नेहमी सन्निध राहणारे अधिकारी झाले. म्हणून त्यांनीं जी दिनचर्या लिहून ठेविली तिच्या आधारें मागील प्रकरणें लिहिली गेली आहेत. आतां यापुढें म्हणजे इ. स. १८६५ सालापासून रेसिडेन्सीचे वार्षिक अहवाल बाहेर पडूं लागले. त्यांचाही अवलंब याचेपुढें केला जाईल. ध्यानांत धरावयाचे हेंच कीं, बक्षीजी विश्वासातील, तर रेसिडेंट हे अधिकारयुक्त तिऱ्हाईत अवलोकन करणारे. दोघांचे दृष्टिकोन निरनिराळे असणें स्वाभाविक आहे. त्यातील तथ्यांश घेऊन श्रीमंतांची कारकीर्द मांडावयाची आहे, हे धोरण ध्यानीं धरून पुढील हकीगत मांडीत आहोंत.

रेसिडेंट लिहितात कीं इ. स. १८६५-६६ ह्यावर्षीं राज्यकारभार चालला होता ''तो दरखी दिवाण, नायब दिवाण, पागनीस, रिसालदार, सरनौबत वगैरे अधिकारी राजवाड्यांत जमून आपआपल्या खात्यांची कामें करीत. परंतु पूर्ण अखत्यार एकट्या महाराजांसच आहे. महाराजांचे हुकूम तोंडी दिले जातातः आणि त्यांची अंमलबजावणी होते.'' हा कारभार विलायती दृष्टीला अरेरावीचा दिसणें साहजिक आहे. अहवालांत पुढें म्हटलें आहे कीं महाराजांच्या निकालांविरुद्ध अगर हुकूमाविरुद्ध असंतोष दिसावा तितका

दिसत नाही. वास्तविक पाहतां याचें कारण हेंच कीं लोकाचार, मागील शिरस्ते व सारासार विचार या त्रयीच्या संगमानें हुकूम बाहेर पडत. हे लक्षण लौकिकी वृत्तीस अनुलक्षून असेः आणि हे निकाल लोकांच्या प्रकृतीस मानण्यासारखे होते. साहेबांच्या दृष्टीनें-इंग्रेजी कायद्यांच्या पुस्तकाप्रमाणें पुस्तकें येथें नव्हतीं हे जरी खरें तरीं वरील कारणांमुळें एकन्दर राज्यव्यवस्था लोकांना पचेल व म्हणून पटेल त्याच मार्गांनें चालली होती. दुय्यम अधिकारीही लोकांपैकींच असल्यामुळें सारासार विचारानें हुकमांची अंमलबजावणी होई.

न्यायाच्या बाजूला दोन मुख्य अधिकारी असत. रामपुरा आणि खरगोण येथेंही सुभे नेमण्याची सुरुवात झाली होती. महाराजांचे संबंधांत अहवालांत म्हटलें आहे कीं, दुखण्याचे दिवस खेरीज करून ते उद्योगशील व तरतरीत आहेत. लोकांची गाऱ्हाणीं ऐकून शांतपणें घेतातः कोठे जुलमाचा रंग दिसला तर भारी शिक्षा देतात; त्यामुळें अधिकारी वर्ग दबून वागतो. वसुली खात्याकडे श्रीमंतांचा बराच वेळ जात असल्याने तें खाते उत्तम प्रकारें चाललें आहे. महाराजांचे एकंदर धोरण साहेबांस पसंत पडलेलें दिसत नाही. एकदम इंग्रेजी पद्धत त्यांनीं उचलावी ही साहेबांची मनशा. महाराजांस पूर्वापार संबंध राखून काम करावयाचें होतें. त्यामुळें दृष्टिकोनांत अंतर पडे. इंग्लिश इतिहासकार यांतील अंतर पाहू शकतात. मालकमसाहेब व त्यांच्या पिढीतले कारभारी यांस लोकप्रियता संपादण्यासाठीं व राखणेंसाठीं लोकांत मिळूनमिसळून राज्यकारभार करावा लागत असें. त्यांच्या या धोरणामुळें इंग्रेजी राज्याची घडी नीट व घट्ट बसल्यावर, पुढें येणाऱ्या कारभाऱ्यांची दृष्टी साहजिकच निराळी होऊं लागली. त्याचेच उदाहरण म्हणजे ए.जी.जी.साहेबांचा रिपोर्ट होय. असें असूनही रिपोर्टांत कबूल करावे लागत आहे कीं इंदूर संस्थानचा कारभार आजूबाजूपेक्षां अधिक चोख व तरतरीचा आहे.

महाराजसाहेबांनीं माळवा ऋग्णालय (हास्पिटल), इंदुरातील धर्मार्थ चालविलेलें ऋग्णालय, तसेंच रेसिडेन्सीतील ऋग्णालय या सर्व संस्थांस उदार देणग्या दिल्याचें रिपोर्टांत नमूद आहे. संस्थानांत नवीन महसूल पद्धत सुरू करण्याचे कामांत श्रीमंत व्यग्र आहेत व ही पद्धत एकवीस वर्षांची व्हावी असा श्रीमंतांचा मनसुबा दिसतो. या हेतूकरितां महाराजांनीं रामपुरा, भानपुरा जिल्ह्यांत दौरा काढला. प्रत्यक्ष परिस्थिती स्वतः पाहून घेणेची मनीशा आहे.

सन १८६१ पासून श्रीमंतांचे लक्ष प्रांतांची अदलाबदल करण्याकडे लागले होते. दूरवर विस्कळित पडलेले प्रांत चालविणें व्यवस्थेच्या दृष्टीनें जड जात होतेंः तोच प्रकार ब्रिटिश सरकारचाही असणार. तेव्हां एकमेकाच्या सल्ल्यानें व सोयीनें हा प्रश्न सुटावयाचा होता. महाराजांच्या दक्षिणेंत असलेल्या प्रांताबद्दल मुंबई सरकारशीं वाटाघाट सुरू झाली होती. पण किंमतीचा निश्चय ठरेना.

आतापर्यंत महतपूर कांटिजंट, माळवा भीलकोर व बखतगड या संबंधात दरसाल होळकर सरकारास भरणा करावा लागे. आतां ठराव झाला कीं रुपये २३८१५२० एकंदर द्यावेः आणि तेही वार्षिक दहा हप्त्यांनीं द्यावें असें इ. स. १८६५ ता.१ मे रोजीं ठरविण्यांत आले.

इ. स. १८६६-६७ ह्या साली ग्रेट इंडियन पेनिनसुला रेल्वे नेमाडमध्यें खांडव्यास येऊन पोंहचली. त्यामुळें अप्रत्यक्ष रीतीनें संस्थानातील व्यापारास उत्तेजन मिळाले हें सांगावयास नकोच. व्यापाराचे वृद्धीकरितां करही श्रीमंतांनीं कमी केला व अशीही इच्छा प्रदर्शित केली कीं, प्रांतांची अदलाबदल झाल्यास आपण या रस्त्यावरील करही अजिबात काढून टाकूं.

संस्थानांतील गांगरोनी येथील ग्यारंटिड ठाकूर निवर्तला. श्रीमंत सरकारनीं हिंदुस्थान सरकारच्या सल्ल्यानेंच तें संस्थान खालसा केलें. तेव्हां मोतीसिंगानें पुंडावा केला. त्या संबंधांत रेसिडेंटसाहेब लिहितात कीं, इंदूर दरबारच्या साह्यानें व सल्ल्यानें मोतीसिंगास शरण तरी आणूं किंवा अन्य प्रकारें बंदोबस्त करूं.

गेल्या वर्षाच्या अहवालात नमुद केलेली श्रीमंतांची नवीन धारापद्धती चालू साली दहा परगण्यांत लागू झाली. बाकी राहिले पस्तीस परगणे. या संबंधीं बराच गवगवा झाल्यावर रेसिडेंट यांनीं श्रीमंतांची भेट घेतली. भेटीत चार पांच गांवांचे कागद पुढें मांडण्यांत आले. त्या कागदांतील कारवाई शोधक बुद्धीनें व मुत्सद्देगिरीनें मांडलेली रेसिडेंटसाहेबांस दिसून आली. एक गोष्ट स्पष्ट झाली ती ही कीं जमिनीचा प्रत्येक तुकडा मोजला-मापला गेला व त्याप्रमाणें कर नोंदला गेल्यानें पूर्वीच्या पोकळ कारभारांत ज्यांचें हित साधत असें अशा पाटलांचें उत्पन्न बसलें व याचमुळें कोल्हेकुई सुरू झाली व दुसरें कारण कीं खेड्यांतील अधिकाऱ्यांस निरनिराळ्या बाबती पूर्वी मिळू शकत. आतां त्या सर्व बंद झाल्याचे कारण प्रत्येकास मासिक पगार ठरविण्यांत आला. खरगोण व रामपुरा येथून परागंदा झालेले कांहीं कास्तकार परत रुजु झाले.

या सालांत खून ११ व घोडेचोऱ्या २१ असें गुन्हे झाले. परंतु विशेष असें कांहीं झालें नाहीं. महाराजांनीं तीन नव्या शाळा सालमजकुरीं उघडल्या. विशेष कीं एक शाळा मुलींसाठीच होती आणि तींत ४३ मुली शिकत होत्या. संस्थानांत एकंदर शाळांमधून १०६० विद्यार्थी शिकत होते. खासगी पाठशाळाही चालू होत्या.

चालू वर्षांत इंदूर शहराचे पाणी पुरवठ्याचें काम संपूर्ण झाले. श्रीमंतांच्या विनंतीवरून मुंबई सरकारने टाकसाळीचा अधिकारी इंदुरास पाठविला होता त्यानें स्थानिक टाकसाळ तपासली. त्यांचे सूचनेप्रमाणें दुरस्त्या करण्याचें इंदूर दरबारनें ठरविलें.

श्रीमंत महाराज सरकारांनीं इंदूर मुक्कामीं कातण्याची व विणण्याची गिरणी उभारण्याच्या हेतूने पूर्वतयारी केली असून हे काम पाहण्यासाठी आणि यंत्रादिकांची स्थापना करण्यासाठी तीन युरोपियन गृहस्थांची योजना हिंदुस्थान सरकारच्या संमतीनें केली.

महतपूर आणि जावरा यामधील रस्त्यांची आखणी होऊन राहिली. या रस्त्यांतील कांहीं भाग इंदूर संस्थानाच्या हद्दीतील आहे. तो भाग ते उचलतील अशी रेसिडेंटसाहेबांनीं आशा प्रदर्शित केली.

रिपोर्टाचे सालीं लिहिलें आहे कीं इंदूर संस्थानचें उत्पन्न बत्तीस लाखांवर कांहीसें चढले. खर्च अठ्ठावीस लाख झाला. नव्या जमाबंदीने उत्पन्न एकेचाळीस लक्षावर चढेल आणि खर्च तीस लक्षावर जाईल असा अंदाज दिसतो. वरील जमाखर्चात खासगीकडील

जमा व खर्च आलेला नाहीं. साधारणपणें खासगीचे उत्पन्न खालशाच्या दशांशाजवळ असते; आणि खर्च त्यामानानें कमीच पडतो.

या वर्षाच्या रिपोर्टात कांहीं आकडे दिले आहेत. तौलनिकदृष्टया ते अभ्यसनीय आहेत. ते असें.

१ संस्थानातील रकबा ८०७५ स्क्वेअर माईल्स.

१ प्रगणे पंचेचाळीस ४५, खेडीं ३२४८, घरें १८०७३७ व लोकसंख्या ७४४८२२.

१ शेतकीची जनावरें १९२९०६, विहिरी २२३२८, बावड्या १४१२, ओढ्या ५११३ व तलाव ११७५.

ही नमूद केलेली लोकसंख्या सर जान मालकम साहेबांच्या काळच्या वेळेसीं तुलना केली तर शेकडा ४० चाळीसप्रमाणें वाढ झालेली दिसते.

इंदूर शहरांत आफिमीचा व्यवहार बऱ्याच जोरांत वाढता आहे. या व्यवहारानें शहरांत माणसांची दाटी उडाली आहे. लोक धनकनकसंपन्न झाले आहेत. त्यामानानें शहराच्या वाढत्या प्रमाणानुसार आरोग्याकडे अधिक खर्च व्हावा असें आम्हास वाटतें. श्रीमंतांनीं पाण्याचा पुरवठा केला आहे हे एक अंग अभिनंदनीय आहे. इतर अंगांकडेही श्रीमंत लक्ष पुरवितील अशी आम्ही उम्मेद धरतों.

१ संस्थानचे लष्करी सामर्थ्य तोफा ९४ परंतु बऱ्याच निरुपयोगी आहेत. तोफखान्याकडे माणसें ६८७, घोडदळ ३२२३, पायदळ ५००६.

थांदला आणि पेटलावद दरम्यान सायरचा महसूली हक्क भिल्ल एजंटाकडे होता. श्रीमंत महाराजसाहेबांच्या मागणीवरून तो हक्क इंदूर आणि झाबवा या संस्थानांकडे देण्यांत आला. पण ही व्यवस्था समाधानकारक झाली नाहीं.

**इ. स. १८६७–६८ सालचा अहवाल :**

१ **नवीन जमाबंदी :** मागल्या वर्षी दहा परगण्यांची तपासणी झाल्याचे अहवालांत निवेदन झालेच आहे. रिपोर्टाचे सालीं आणखीन १० परगण्यांची भर पडली, मिळून एकंदर २० परगण्यांची तपासणी झाली; दरबार फार सावधगिरीनें पाऊल टाकीत आहे. लाविलेले दर जड होण्याचा संभव आहे, अशा विवेकाने पट्टे अजून जारी झाले नाहीत.

२ **गुन्हे :** खून १६, घोडे चोऱ्या २४. गांगरोनीच्या मोतीसिंग ठाकुराबद्दल पूर्वी उल्लेख केलाच आहे. अहवालाच्या वर्षी महाराजांच्या प्रांतांत धुमाकूळ चालू होता. तेव्हां त्याच्या पाठीवर मध्य हिंदुस्थानांतील घोडेस्वारांची टोळी पाठविली गेली. अखेरीस गुण्याचे छावणींत अधिकाऱ्यास शरण गेला. आतां तपासणी चालू आहे.

३ **प्रांताची अदलाबदल :** होळकर महाराजांचे दक्षिणेतील प्रांत आणि ब्रिटिश सरकारचे नेमाडांतील प्रांत यांची अदलाबदल बहुतेक तडीस गेली आहे. कांहीं प्रश्न राहिला

आहे. तो लवकरच विल्हेस लागेल अशी उम्मेद आहे. या संबंधी महाराजांनीं जो शब्द मागील वर्षी टाकला होता तो त्यांनीं कृतीत आणला. इंदूर आणि खांडवा या लाइनीवर जो माल त्यांचे मुलखांतून येईल त्यावरील जकात उठविली गेली. स्टेट सेक्रेटरी साहेबांनीं अशी इच्छा कांहीं वर्षांमागें प्रदर्शित केली होती. ती आतां सिद्धीस गेली. वायव्य प्रांताकडून, तसेच इंदुराचे उत्तरेकडून येणाऱ्या मालाची मुंबईकडेस जाण्यास चांगलीच सवड झाली यांत संशय नाही.

४ **शिक्षण खातें** : जिल्हेनिहाय मातृभाषेतून शिक्षण देण्यास नवीन शाळा उघडण्यांत आल्या. कांहीं ठिकाणीं इंग्रजी वर्ग सुरू झाले. खात्याचा अधिकारी व त्यांचे हाताखालील तपासणीदार (इन्स्पेक्टर) नेमण्यांत येऊन खात्याचीही उभारणी झाली. नवीन तबादला होऊन ताब्यांत आलेल्या प्रांतांतही ही पद्धत सुरू झाली आहे. एकंदर विद्यार्थ्यांची संख्या १०६० वरून २२९४ वर गेली, म्हणजे दुप्पट झाली. या खात्याकडे दरसाल तीस ते चाळीस हजार रुपयांचा खर्च दरबारनें मंजूर केला आहे. दसऱ्यास श्रीमंतांनीं स्वतः इंदूर येथील शाळेची परीक्षा घेतली त्यावेळीं बडेसाहेब आणि रेसिडेंटीतील अधिकारी हजर होते. एकंदरीत विद्यार्थ्यांचा अभ्यास चांगला चालला आहे असें आढळून आलें.

५ **इंजिनियरिंग वगैरे** : महू ते नीमच रस्ता चालू व्हावयाचा आहे. त्या रस्त्यापैकीं अंदाजे १० मैल रस्ता महाराजांचे राज्यांतून जावयाचा आहे. २५००० रुपये या कामासाठीं द्यावयाचा महाराजांचा विचार आहे. प्रांतांच्या अदलाबदलीत बडवाहा येथील लोखंडाचा कारखाना श्रीमंत सरकारांस पन्नास हजार रुपयांस देण्यात आला. इंदूर येथील कापसाची गिरणी अजून चालू झाली नाहीं. विलायतेहून आलेली यंत्रसामुग्री मुंबईस आली आहे. ती इंदूरास येणें आहे.

६ **आरोग्य व सर्व साधारण** : या बाबीकडे महाराजांचे आणि व्यापारी वर्गाचेही लक्ष लागले आहे, विचार विनिमय झाला, पण शिरावर कार्य घेण्यास व्यापारी धजत नसल्यानें प्रश्न भिजत पडला आहे. नेमाडमधून जे परगणे श्रीमंतांकडे तबादल्यांत आले त्या प्रांतांतील पूर्वीच्या कामगारांची जोपासना श्रीमंतांनीं प्रेमपूर्वक केली. आपल्या प्रांताप्रमाणें शिक्षणाचीही सोय केली. हे प्रांत म्हणजे कसरावद, धरगांव आणि बडवाहा होत. या तबादल्यांत इंदूर दरबारचा फायदा झाला तो असा कीं या परगण्यांतून दरमहा दोन हजार रुपये कस्टमचे उत्पन्न इंदूर सरकारास मिळेल असें अहवालांत म्हटलें आहे.

**इ. स. १८६९–७० सेंट्रल इंडिया रिपोर्ट** : अहवालाच्या वर्षी मध्य हिंदुस्थानांत दुष्काळ बराच जोराचा होता. ग्वाल्हेरचे आजुबाजूस ९२,९८७ मृत्यु झाले असावे असें शिंदे सरकारचें म्हणणें पडतें. खुद्द माळव्यांत जरी दुष्काळ उद्भवला नव्हता तरी राजपुताना आणि ग्वाल्हेर येथून जो माणसांचा लोट या प्रांतांत उतरला त्यामुळें रोगराई व मृत्यूचा उद्भव झाला. हाडाचे पिंजरे झाले असें मारवाडी

थकत भागत या प्रांतांत लोटले. नाल्यांत, मैदानांत, झाडाखालीं आणि रस्त्यांवर दुतर्फा हाडें आणि प्रेतें पसरलेली दिसत होती. इ. स. १८७० च्या सुवृष्टीमुळें, गेले वर्षी जीं माणसें घरदार सोडून बाहेर पडली होती त्यांतील जे वांचले सावरले ते परत घराकडे वळूं लागले. आश्चर्याची गोष्ट कीं, (साहेबांचे मते) ज्या ठिकाणीं अडीअडचणीच्या वेळेस चार महिने या दुष्काळग्रस्तांस अन्नपाणी मिळालें तेथें कायमचे न राहतां, थोडा पाऊस पडतांच आपले मूळ भूमीकडे त्यांचीं पावलें वळलीं. दुष्काळाच्या काळांत इंदूर महाराज, जावरा, आणि रतलाम येथील राजांनीं अन्नदान सढळ हातानें केलें. ह्या वेळेस राज्यकर्त्यांचेही लक्षांत येऊन चुकलें कीं दुष्काळ सर्वसाधारण असूनही, राजपुतान्यास जितकी आंच पोहचली तितकी बुंदेलखंडास मुळीच पोहचली नाही. आगगाडीनेंही बूज राखिली.

१ **आफिम पेटी** : एकंदर पस्तीस हजार आठशें अठ्ठावीस पेटी काट्यावर चढली हिंदुस्थान सरकारास ड्युटीचे दोन कोटीवर रुपये मिळाले. या पेट्यांपैकीं इंदूर संस्थानच्याच २०२८८ पेट्या होत्या. बाहेरगांवीं जायचा तितकाच माल काट्यावर चढतो. ब्रिटिश सरकारचा संबंध माल बाहेर जाण्यापुरताच आहे. चीनमध्यें किंमत चढती आहे. आफिमीचे पैदाइशीचा फायदा सरकार व किसान यांस पडतो. चीन आणि इराण इकडेही आफिमीची लागवड सुरू झाली आहे. या साठी राजेरजवाड्यांकडून रस्तावाहतुकीची चांगली सोय झाली पाहिजे; म्हणजे रस्ते संख्येनें अधिक वाढविले पाहिजेत. माळव्यांत छपन्न राजे आहेत. आपसांत जूट आहे असें म्हणतां येत नाहीं. सार्वभौम सरकारांनीं हा प्रश्न स्वार्थासाठीं तरी हाती घेतल्यास परार्थही अनायासें साधेल.

२ **ग्यारंटी आणि सनदा** : मराठ्यांनीं माळव्यांत प्रवेश केला त्यावेळीं जोरावर न जातां, चालत आलेले हक्क चालू ठेविले. ''गर्दीका वख्त'' ढळला तेव्हां सर्वच अनवस्था झाली. ही लाट उसळून निवळल्यावर मालकम साहेबांनीं वहिवाट व सारासार विचार ध्यानांत घेऊन ग्यारंटिड नांवाचा एक वर्ग जहागिरदारांचा तयार केला. यांस कांहीं वर्षे लोटल्यावर फेर तपासणी श्रीमंत महाराजांनीं सुरू केली. त्यावेळीं बरेचसे ठाकूर बडेसाहेबांकडे गेले. इ. स. १८६५ त करोडियाचे ठाकुरांचा प्रश्न उद्भवला. दोनशें वर्षंपर्यंत करोडिया गांव ठाकूरांचे घराण्यांत चालू होता. दरसाल इंदूर दरबारास १२०० रुपये भरीत होते त्याची सनद ग्यारंटिड नव्हती; म्हणून तो गांव खालसा करण्यांत आला. त्याचें म्हणणें ऐकून घेऊन त्या गांवची रकम सालिना १८०० ठरविण्यांत आली. ठाकूरही तडजोडीस कबूल झाला. याप्रमाणें कांहीं ठाकूरांच्या तक्रारी बडेसाहेबांकडे गेल्या. त्या सर्वांचें म्हणणें ऐकून घेऊं असें साहेबांनीं आश्वासन दिलें.

३ **जमाबंदी** : नव्या जमाबंदीसंबंधीं गवगवा चालूच होता. या संबंधात महाराज यांनीं बडेसाहेबांकडे जे उद्गार काढले ते असें – ''वाढ झाली याबद्दल तक्रार

आहे ती अन्यायाची आहे असें मात्र कोणी म्हणू शकणार नाही. पाणी मुरत होतें तें आतां मुरणार नाहीं. आतां तें थेट जायचें तेथेंच जाईल. मधल्या खांचाखोचीतून ते झिरपत होते ते आता झिरपणार नाही आणि थोडी मेहनत व दक्षता राखण्याची जबाबदारी काश्तकारावर पडेल. हेही चांगलेच होईल, हल्लींचे दर (बाजारभाव) उतरतांच माझी ही मागणी उतरेल हे सांगणे नकोच. सारांश, काश्तकार आणि आम्ही यामध्यें आतां कोणी राहणार नाही. ते माझे आहेत आणि मी त्यांचा आहे''.

महाराजांची काम करण्याची पद्धत दक्षतेची आहे. गांवची तपासणी होते. जमिनीची तपशीलवार नोंदणी केली जाते आणि कोणी कंट्राक्ट घेतल्यास एकंदर पट्टीवर शेकडा बारा टक्केप्रमाणें जमीन दिली जाते.

४. **रेल्वे :** संस्थानांत रेल्वे काढून ती जी.आय.पीस मिळवावी याबद्दलची वाटाघाट होऊन श्रीमंतांची मान्यता मिळाली. अटी याप्रमाणें : श्रीमंत सरकारांनीं एक कोट रुपया हिंदुस्थान सरकारांस द्यावयाचा तो येणेंप्रमाणें इ. स. १८७० व १८७१ त पंचवीस लक्ष, १८७१-७२ त वीस लक्ष, १८७२ ते १८७७ पर्यंत एकंदर पंचावन्न लक्ष. हे कर्ज १०१ वर्षांचे मुदतीने महाराज आणि त्यांचे वारस यांच्या नांवचें रहावयाचे. यांस व्याज दरसाल दरशेकडा साडे चार टक्केप्रमाणें खर्च वजा जाऊन जो नफा राहील त्याजपैकीं निम्मे रकम होळकर सरकारांस मिळावयाची. रेल्वेची व्यवस्था हिंदुस्तान सरकारच्या अखत्यारींत राहील.

श्रीमंत होळकर सरकारांनीं या कामांत जो पुढाकार घेतला त्याबद्दल सर्वत्र त्यांची वाहवाच झाली. बाह्य जगताचा संबंध जोडला गेल्यामुळें तिकडील प्रकाश आपल्या राज्यांत येण्याचा रस्ता मोकळा केला. व्यापारास खुला मार्ग तर झालाच पण त्याबरोबर ज्ञानदानाचेंही कार्य पर्यायाने त्यांनीं साधलें.

५ **दक्षिण सरहद्द :** इंदूर संस्थान आणि खानदेश यांच्या सरहद्दीचा प्रश्न अजून सुटलेला नाही. त्याच प्रश्नाला अनुलक्षून दुसरा एक प्रश्न उद्‌भवला तो सरहद्दीवर असणाऱ्या भिल्लांचा होय. ज्यावेळीं मराठे माळव्यांत प्रवेशले त्यावेळीं रस्त्यावर असलेल्या भिल्लनायकांचे कित्येक हक्क मान्य करण्यांत आले होते. कालांतरानें या हक्कांचे रूपांतर नगदीच्या पद्धतींत झालें. अहवालाच्या वर्षी कित्येकांच्या या देणग्या रोखल्या गेल्या. अस्वस्थता दिसूं लागली कदाचित लूटमारीवर प्रसंग येईल असें जाणून बडेसाहेबांनीं ही गोष्ट श्रीमंत सरकारांचे कानावर घातली. शेवटीं खानदेशचे कलेक्टर याच्या निर्णयावर ही गोष्ट अवलंबून राहिली. दरमहा अजमासें पावणे दोनशें रुपयांचा हा प्रश्न असल्यानें महाराजांनीं त्यांस मान्यता दिली.

६	**शिक्षण खातें** : श्रीमंतांचे वय लहान असतांना एक शाळा उघडली गेली होती त्या शाळेतून इंग्लिश भाषा चांगली जाणणारे विद्यार्थी बाहेर पडले. तसेंच कांहीं माणसें व्यापारांत पडून तिकडेही त्यांनीं नांव कमाविलें. प्रथम आफिमिच्या उत्पन्नांतून शाळेचा खर्च चालविला जात असें. हामिलटन साहेबांनीं श्रीमंतांच्या राज्यारोहण प्रसंगीं त्यांजकडून या संस्थेस वार्षिक देणगी ६००० सहा हजाराची देवविली. प्रथमारंभीं शिक्षणखात्याची व्यवस्था बडेसाहेबांकडे होती. नंतर महाराजांकडे गेली. पूर्वीप्रमाणेच इंग्रजी वर्ग चालू आहे. म्याट्रियुक्युलेशन परीक्षेत येथील विद्यार्थी यश संपादितात. सर्वात दक्षिणी मुलांचा भरणा जास्त आहे. शाळेचे अधिकारी पुण्याचे कालेजपैकीं असून आपल्या कामांत तरबेज आहेत. प्रारंभापासून विद्येच्या वाढीकडे श्रीमंतांचे लक्ष वेधले आहे आणि दिवसानुदिवस या कार्याकडे तनमनधन अर्पित आहेत. हे सरकारास भूषणावह आहे.

७	**एक्स्ट्राडिशन** : राजेलोकांतही पूर्वीप्रमाणें ऐक्य राहिलें नाहीं. अशा स्थितींत गुन्हेगारास पळवाट मिळाली कीं एका राज्यांत गुन्हा करून दुसरें राज्यांत घुसतात. मध्य हिंदुस्थानातील शांततेचें संरक्षण करणे हे कार्य ब्रिटिश सरकारनें आपल्या माथ्यावर घेतले आहे. तेव्हां सध्याच्या परिस्थितींत इ. स. १८४९ चा कायदा नंबर १, इ. स. १८५४ चा कायदा नंबर ७ अपुरे पडूं लागले. याकरितां नवा कायदा करावा लागला. कर्नल मीड साहेबांनीं इ. स. १८६६ त तयार केलेंल्या कायद्याच्या मसुद्याकडे पुनश्च बोट दाखविलें.

८	**सरहद्द काकडझगडे** : राजगढ भुमिया सबंधांत प्रश्न उद्‌भवला. श्रीमंतांनीं राजगड आणि मौजे ढाल ही आपणास मिळावी म्हणून खटपट चालविली आहे आणि ती तर ब्रिटिश ग्यारंटिड आहेत. महाराजांनीं असेंही जाहीर केलें कीं मोबदल्यांत तितक्याच किमतीची जहागीर आपण सोडूं. भूमिया अभिमानास पडून मान्यता देत नाहीं.

**सन १८७०-७१ : एकंदर परगण्यांची हालहवाल :** कांहीं ठाकूर व रयत आगर मुक्कामीं पोलिटिकल एजंटाकडे गेले. सरदेशमुखी, पंचवीस बिघे जमीन या नवीन बाबींविरूद्ध ते दाद मागूं लागले. पण ही दाद आपले अधिकारांत नाही. श्रीमंतांकडेसच दाद मागा असें त्यांस सांगण्यांत आलें. रामपुरा येथील चंद्रावत दिवाण तेजसिंग मृत्यूचे दारांत पडले आहेत. त्यांच्या मातुश्रीची मनीषा आहे की तेजसिंगानीं दत्तक घेणें कालावधीवर टाकू नये. सर जान मालकमचे वेळचे कागदपत्रावरून दिसून येतें कीं, ब्रिटीश सरकारची कृपादृष्टी या घराण्यावर होती पण तेवढ्यावरून ही इस्टेट ग्यारंटिड आहे असें सरकार कबूल करणार नाहीं.

**गुन्हेगारी** : खून २७ व धाडे चोऱ्या ३२

**शिक्षण विद्याखातें** : विद्यार्थ्यांची संख्या २७३०

**पीकपाणी :** अतिवृष्टीनें खरीपास धक्का बसला. आफिमीनें कल्पनेबाहेर हात दिला. कापूसही मनाजोगता आला.

**आफिम : इ. स. १७६५ ते इ. स. १७९५ :** हा काल माळव्यांत विशेषतः इंदूर संस्थानांत सुवर्णयुगाचा मानला जातो. श्रीदेवी अहिल्याबाईची कारकीर्द. त्याकाळीं बिघ्यामागें कमालीची पट्टी पावणेदोन रुपये असे. इ. स. १८२०, २१ सालीं आफिमीच्या जमिनीस बिघ्यामागें दोन रुपये पडत, तर बागायती बिघ्यामागें पांच रुपये. इ. स. १८७१-७२ सालांत आफिमीच्या एका बिघ्यामागें दहा ते पन्नास पावेतों रुपये पडतात. या सालीं ३७६०८ पेटी चीनकडे रवाना झालीं आणि देशातले देशांत २०००० पेट्या उठल्या. हा काल भरभराटीचा असल्यामुळें एतद्देशीय संस्थानिक काय किंवा त्यांची रयत काय अफिमीच्या नादीं लागून उपजीविकेच्या कायमच्या उत्पन्नाकडे (धान्याकडे) दुर्लक्ष करण्याचा बराच संभव आहे. चीन, इराण इकडे आफिमीची लागवड सुरु होऊं लागली आहे तेव्हां आजचा चढता दर कायमच राहील असें म्हणता येत नाही. गेल्या दुष्काळाकडे लक्ष दिल्यास धान्याची कशी तूट पडली होती हें लक्षांत येईल. ब्रिटिश सरकारचा संबंध आफिमीचे ड्युटीपुरता असला तरी भावी परिणामाकडे दुर्लक्ष होऊं नये, अशी हिंदुस्थान सरकारास विनंती आहे.

**सरहद्द काकडझगडे :** राजगड भुमियास आणि त्याचे वारसास, चांगल्या वागणुकीच्या अटीवर, राजगड आणि ढाल ही गांवें ब्रिटिश सरकारकडून सनदेनी देण्यांत आलीं आहेत. राजगडचे भुमियास इंदूर आणि धार या संस्थानाकडून वार्षिक टाका पोहचत नसल्यामुळें अडचणी उत्पन्न होतात. धारने मागील बाकीचा फडशा केला. इंदूर दरबारही लवकर फेड करणार आहेत. राजगड भूमियाच्या सात खेड्यांवरील प्रश्न इस्तमुरारी हक्काबद्दल उद्‌भवला होता. धार आणि इंदूरनें हे गांव जप्त केलें होते. आतां निकाल देण्यात आला कीं मालकम साहेबांनीं दिलेल्या सनदाअन्वयें हे गांव त्यांचे त्यांस मिळावे. सारांश, बडवाणी, जामण्या आणि राजगढ या संबंधात, अहवाल केल्याप्रमाणें, इंदूर या संस्थानात असलेला प्रश्न - पन्नास मैलाचा झगडा - निकालांत येऊन त्यांच्या हद्दबंदी झाल्या.

**इ. स. १८७१-७२ :** इ. स. १८७१ च्या डिसेंबर ते इ. स. १८७२ च्या मार्चपर्यंत श्रीमंत सरकारांनीं उत्तर भागातून दौरा काढला. दौऱ्यामध्यें स्वतः शेती पाहिलीं आणि लोकांचेंही म्हणणें ऐकून घेतलें. प्रत्यक्ष गाठीभेटी झाल्यामुळें कामांचा निकाल लागण्यास दीर्घसूत्रीपणा आड येत नाहीं.

इंदूरमधून आगगाडीचा प्रवेश पुढें माळव्यांतून उज्जैन, रतलाम, मंदसोर व नीमच या बाजूनें जाण्याचा बराच संभव आहे आणि हा प्रश्न अखिल हिन्दुस्थानच्या हितसंबंधाचा

होणारा आहे. बाह्यजगाशीं आता संस्थानिकांचा संबंध येणार व जुन्या बाबींवर नवा प्रकाश पडणार. लोकांचे विचार, समाजकारण व राजकारण इत्यादि बदलत जाणार. सारांश, रेल्वेबरोबर माणसांची आणि मालाची ने-आण होणारच. त्याबरोबर, विचार-उच्चार आणि आचार यांचीही घडामोड होणार हे एतद्देशीय राज्यकर्त्यांस कळून चुकलें असणार.

अलीकडे आफिमीची किंमत उतरत आहे, तरीपण लागवड आणि निर्गत वाढलीच आहेत. बिघ्यामागें पांच ते पन्नासपर्यंत धारा आहे. शिंद्यांचे माळव्यांतील उत्पन्न चाळीस लक्ष, तर होळकरांचे तीस लक्ष आहे.

इंदूर येथील कापसाची गिरणी उभी राहिली. एकंदरीत २२५ माग चालतील असें दिसतें. आतांपर्यंत आठ लक्ष रुपये खर्ची पडले आहेत. देखरेखीचें काम ब्रूम साहेबांवर सोपविले आहे. गिरणीमुळें कापसाची वाढ व जात सुधरेल आणि इंदुरांत व्यापारपेठ वाढेल.

**शहराचें आरोग्य :** मुख्य मुख्य रस्त्यांत सडका झाल्या आहेत व आजूबाजुने गटारेही बांधलीं जात आहेत. मुख्य बाजाराचे रस्ते रूंदावत आहेत. सारांश, आतां शहराचें आरोग्य सुधारण्याच्या मार्गास लागेल, अशी आशा वाटते. या कामाप्रीत्यर्थ रयतेनेही पैसा दिला असून सरकारचीही मदत आहे.

**जमाबंदी आणि जंगल खातें :** विंध्याचे दक्षिण भागांत जमाबंदी ऐशीं हजार होती ती दीड लक्षावर गेली. जंगलें दोन वर्षाचे कराराने साठ हजाराचे ठरावावर दिली गेली. इंदूर येथें वजन होणाऱ्या आफिमीच्या पेटीमागें एक रूपया कर ठेवण्यांत आला होता. कर ठेवण्याचा हेतू कीं, व्यापाराचे सोईसाठी रस्त्याची दुरूस्ती, इमारती, वगैरे व्हाव्या. इ. स. १८७१ च्या आगस्टपासून हा कर हिंदुस्थान सरकारच्या संमतीने उज्जैनलाही लागू करण्यांत आला. इंदूरास एका वर्षांत १७०७६ रुपये, तर उज्जेनीस ७८७९ उभे झाले.

**काकडझगडे, सरहद्दी :** इंदूर आणि धार या संस्थानांत कुक्षी आणि चिखलदे या परगण्यांसंबंधी जे झगडे आहेत त्यांचेपैकीं पांचांचा निकाल या वर्षी लागला. ग्वाल्हेर आणि इंदूरमधील दोन झगडे, इंदूर आणि झालावाडा मधील एक झगडा त्याचप्रमाणें झाबवा आणि इंदूर यातील झगडे यावर्षी तुटले गेले. झाबवा आणि इंदूरपैकीं थांदला पेटलावद जिल्हा दोन्ही दरबाराच्या अंमलात होता. या जिल्ह्यांपैकीं दोन तृतियांश सायरेवर होळकरांचा हक्क होता. त्या संबंधांत निकाल येणेंप्रमाणें झाला. पेटलावद जिल्ह्यातील सर्व खेडी, इमारती आणि हक्क झाबव्यानें होळकर सरकारांस दिले. तोच प्रकार थांदल्यासंबंधात होळकरांनीं दुसऱ्या पक्षासंबंधी केला. सायरचा निकाल केला तो येणेंप्रमाणें. गेल्या दहा वर्षांत होळकरांस जी रक्कम पोहचली तिचे सरासरीने रक्कम दरसाल झाबवेवाल्यांनीं होळकर सरकारांस देत जावी.

**मंडलेश्वर तुरुंगातील प्रसंग :** इ. स. १८७२ ता.२१ फेब्रुवारी रोजीं अंदाजे शंभर कैदी बाहेर पडले. त्यांनी किल्ल्याचे राखणदारांवर हल्ला केला. एवढ्यांत मंडलेश्वरहून

सरकारी मदत पोहचली. बंडाचे टोळीस लागलीच गांठलें. या दंग्यांत चोवीसजण मृत्युमुखीं पडले व सातजण जखमी झाले.

**दवाखाने वगैरे** : रोग्यांची संख्या वाढत आहे यावरून संस्था लोकप्रिय होत आहेसी दिसते. ताप व पचनविकृती या संबंधात रोग्यांची संख्या विशेष दिसते. तापांचे प्रमाण शेंकडा तेरा पडतें. देवी टोंचणें अजून लोकप्रिय झाले नाहीं. शस्त्रक्रिया हळूहळू लोकांच्या पचनीं पडत आहे. आजाऱ्यांच्या तपासणीकरितां असें आढळून आलें कीं, खाण्यापिण्याची ददात, दारिद्र्य आणि अज्ञान हींच कारणें आहेत. शेंकडा १६ प्रमाण कोट्याचे आजाराचें आहे.

वरील माहिती बडेसाहेब (ए.जी.जी.) यांच्या सालवार अहवालांवरून दिलेली आहे. साहजिकच त्यांचा दृष्टिकोन जेथपर्यंत जसा पोहचला तेथपर्यंत तसे त्यांनीं अहवाल सादर केलेले असणार. जेथें शक्य होते तेथें प्रश्नाची दुसरीही बाजू आम्ही यथामती मांडली आहे. वरील काळांत खुमानसिंग बक्षीजी ही श्रीमंतांच्या अत्यंत सान्निध्यांत होते. त्यांच्याही दृष्टीपथात ज्या ज्या गोष्टी आल्या त्या त्या त्यांनीं रोजनामच्यांत दाखल केल्या आहेत. तेव्हां याच काळांतील कांहीं बाबी आम्ही त्यांच्या लिखाणांतून खालीं मांडीत आहोंत.

इंदूर शहराचे सडकेसंबंधांत सावकार लोकांस बोलावून समजाविलें. त्यांनीं बारा हजार रुपये सालिना देण्याचा ठेराव केला; व सरकारांतून महसुलाचे बारा हजार एकंदर चोवीस हजाराचा मेळ बसला. तेव्हां खुमानसिंगजी अध्यक्ष व रामचन्द्र विठ्ठल व्यास उपाध्यक्ष असें मुकरर झाले. सावकारांपैकीं कित्येकांस सभासद मुकरर केलें. शहराची सफाई, सडका बांधविणें व मोऱ्या बांधविणें ही कामें झाली. दिवेबत्तीचीही सोय झाली. इ. स. १८७३ साली सर टी. माधवराव आले. त्यांनीं मिस्टर केली यांस चीफ इंजिनियर मुकरर केलें. वरील चोवीस हजारांशिवाय पुष्कळच मंजुरी दिली. यायोगें शहरांत सडका झाल्या.

ड्युक आफ येडिंबरोची भेट. इ. स. १८७० साली महाराजसाहेबांची स्वारी सर हेनरी डेली साहेबांबरोबर ड्युक आफ येडिंबरो यांस भेटावयास जबलपुरास रेल्वेमार्गानें गेली. बक्षीजीही बरोबर होते. ज्यावेळीं लाईनीचे काम चालत होते तेव्हांच आमची स्पेशल ट्रेन तेथें जाऊन पोहोचली. दुसरें दिवशीं ड्युक आफ एडिंबरो सरकारभेटीस आले. पानसुपारी झाली. नंतर सरकारस्वारी लार्ड मेयोचे भेटीस गेली. बक्षी व भाऊसाहेब रेशीमवाल्यांस बरोबर नेलें. प्रायव्हेट दरबार होता. लाटसाहेबांचे व सरकारसाहेबांचे एकांत झालें. तिसरें दिवशीं प्रातःकालीं लार्ड मेयो सरकारचे भेटीस आले. भाऊसाहेब आणि बक्षी सामोरा पेशवाईस गेले होते. मामूलप्रमाणें दरबार झाला व पानसुपारी झाली. या वेळीं डेरे सामान पन्नाचे राजेसाहेबांकडून आलें होतें. पन्नाचे राजेही महाराजांचे भेटीस आले होते व सरकारही परत भेटीस त्यांचेकडे गेले होते. दोन दिवस आणखी राहून जबलपुराहून स्पेशल ट्रेनमधून कूच होऊन खांडव्यास ता. ११ मार्च रोजीं आले. खांडव्याहून बक्षी व गणेश शास्त्री यांनीं मुंबईस जाण्याची सुट्टी मागून घेतली.

**मिस्त्रीखाना (वर्कशाप)** : या वेळेस मिस्त्रीखान्याचा कारखाना चांगला चालू होता. तोफाही ढाळल्या जात होत्या व ब्रिचलोडिंग बंदुकांहीं तयार होत. सर डेलीसाहेबांनीं आगस्ट महिन्यांत हा कारखाना पाहिला व याबद्दलचा त्यांनी गव्हर्नमेंटास रिपोर्ट केला; व पुढें पार्लमेंटातही जिकर होऊन इ. स. १८७३ अखेरीस हा कारखाना बंद पडला.

बक्षीजीचे चिरंजीव फत्तेसिंग व बळवंतसिंग यांचे लग्नाकरितां श्रीमंत सरकारांनीं दहा हजार रुपये दिले व सरकारस्वारीही पानसुपारीस गेली होती. मार्च महिन्यांत हुजूर हुकूम झाला की बक्षी खुमानसिंग, गणेश शास्त्री आणि अली अकबर यांनी इंग्लंडला जावे. त्याप्रमाणें इ. स. १८७१ साली ता. २८ एप्रिल रोजीं ''हिंदुस्थान'' आगबोटीत बसून ही मंडळी इंग्लंडकडे रवाना झाली.

या प्रकरणांतील जो काळ व ज्या बाबती आतापर्यंत वरती आल्या त्या संबंधात जास्त प्रकाश पाडणारे लेखांक ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या पुस्तकांत स्वतंत्र प्रसिद्ध झाले आहेत. तत्रापि महाराजांची दिनचर्या कशी लिहिली जात असें त्याचा नमुना म्हणून खाली दोन दिनचर्या देत आहोत.

दिनचर्या लेखांक ता. ५ आक्टोबर इ. स. १८६७ कर्नल मीड साहेबांशीं सरकारचे बोलणें झालें त्याबद्दल सरकार म्हणाले कीं, आपले सरकार (इंग्रज सरकार) जसें मोठें म्हणविते तसें राहरसूम ठेवण्यांत निगा ठेवीत नाही. उदाहरण आमचे येथें चि. बाळासाहेबांची लग्ने झाली परंतु आपले येथून आहेरसुद्धां आला नाहीं. हामिलटन साहेब असते तर या प्रसंगी जरूर आमचा सत्कार करते. राजे धार यांजला पूर्वी मुलगा जाहला होता ते वेळेस त्यांनी स्वतः घरचा आहेर केला. त्यावर बडेसाहेब बोलले कीं, जरी ते असें करीत होते, तथापि लौकिकांत तर चांगले दिसत होते. लोक तर असें समजत होते कीं, सरकार इंग्रेज आहेर पाठविते. यावर साहेब बोलले कीं आपले म्हणणें रास्त आहे; आणि आम्ही शपथपूर्वक सांगतो कीं, आपल्या या गोष्टी सर्व लाटसाहेबांस कळवीत आहे व आपणही लाटसाहेबांस कळवाव्या. कारण त्यांनाही या गोष्टी पटतील व ते खुश होतील. त्यावर सरकार बोललें कीं, तुम्ही जेव्हां आपल्यांस सर्वांहून श्रेष्ठ समजता तेव्हां त्याप्रमाणें वर्तनही करणे उचित आहे; अगर आपण आमचे पेशवाईचे वेळचा रोजनामचा पहाल तर माहीत होईल कीं आमचे घराण्याविषयीं सरकार किती इज्जत करीत होते. तरी अशा स्थितींत आम्हास आपले करून घेणें हें आपले काम आहे. तुम्ही तर आम्हांस सवतीचे मुलाप्रमाणें समजतां तेव्हां हें कसे होऊं शकते ? आम्ही सरकार इंग्रेजीस इ. स. १८५७ चे सालीं इतकी मदत केली कीं त्याजबद्दल ही आम्हास कांहीं एक दिलें नाहीं. ह्यामुळें आम्हांस फार रंज आहे.

**दिनचर्या सरकारी रेकार्ड**

दिनचर्या लेखांक : स्वारीचे दौऱ्यांतील कांहीं मुक्कामांची हकीगत दिनचर्येवरून ता. ४ जानेवारी इ. स. १८७१.

१ मौजे सुगनी परगणे तालताबेजावरा या गांवचे सुमारास नाल्याकिनारीं जावेरवाल्याकडील महमद इमरखां व रेहमतखां रिसालदार मयत स्वार घेऊन पेशवाईस येत होते ती भेट होऊन हत्तीवर उभे राहून मुजरे सरकारांस केलें, नंतर सरकारांचे हत्तीजवळ आले. स्वारी येण्याची खबर तुम्हास नाही काय ? म्हणोन फरमावितां, महमद उमरखांनीं अर्ज केला कीं, स्वारीची खबर होती आणि आम्ही मागील रात्रीपासून पेशवाईचे तयारीत होतोः परंतु आम्हास असें कळले कीं अलोटेस देवास सरकार आले असोन दोघां सरकारच्या भेटी होणार आहेत व नंतर कूच होणार म्हणोन आम्ही वक्तशीर येऊ शकलो नाही. ही गलती झाली. सरकार मालिक आहेत. माफी केली पाहिजे. त्यावर सरकार बोललें कीं तुमचे कर्तव्य होते की इंतजाम खबर मिळण्याचा ठेवायला पाहिजे होता. तेच पहा शिंदे सरकारकडून मंदसोर कमाविसदार, सुभे यांनीं आमचा बंदोबस्त ठेवला कीं नाही. ते तर परइलाख्याचे असून बंदोबस्त ठेवितात, तसा तुमचें कर्तव्य म्हणोन ठेवला पाहिजे होता. त्यावर रिसालदारांनीं अर्ज केला कीं जावऱ्यास स्वार शिपाई किती हे हुजुरास माहीत आहेच. सरकार आमचे मालकाचे मालक. सबब गलती माफ करावी.

१ तालकर जमीदार ओंकारसिंग ठाकूर तालेपासून पाऊण कोसावर पेशवाईस आले होते. बरोबर डंकानिशाण व भाईबंदाचे स्वार ३०, हत्ती १ चोपदार, वगैरेसह येऊन मुजरे झाले. ठाकरास जावरेवाल्याचे हत्तीवर बसविले व ठाकुराचा लवाजमा स्वारीसमागमें चालत होता. वाटेत आबादी वगैरेच्या गोष्टी उमरखां व ठाकुराशी होत होत्या. तालगांवाहून स्वारी गांव पाहत आली. दरवाजाचे बाहेर जावरे येथील कांटिन्जंटीचे स्वार आफिसरसुद्धां सलामीस तयार होते. त्यांनी सलामी देऊन डेऱ्यापावेतों पोहचविलें. सलामीच्या तोफांचे बार २१ झाले. स्वारी डेऱ्यावर पांच घटका दिवस असतां दाखल झाली. डेऱ्यावर दाखल जाहल्यावर सरनोबत, रावजी गोरे, सखारामजी गोपाळ, हजर होते. जावरेकडील महमद उमरखान व रहीमतखां रिसालदार असें येऊन सरनौबत यांचेखाली बसले व ताल ठाकूर ओंकारसिंग बसले. श्रीमंत सौ. राणीसाहेब व उभयतां बाळासाहेब यांच्या स्वाऱ्या मागाहून येणार. त्यांजला पेशवाईस जाणें व तोफेचे फेर होणें म्हणोन उभयतां जावरेवाल्यांनी विचारून घेतले. तिसरा प्रहारां स्वारी शिकारीस जाणार म्हणोन हुकूम होऊन दरबार बरखास्त झाला. नंतर चोपदाराबरोबर जावरेवाल्याकडील डाल्या मेवा, मिठाई, फळ, वगैरे नजर झाल्या. श्रीमंत सौ. महाराणी साहेबांकरितांही डाल्या आल्या, त्या बाडांत पाठवून दाखवून आणाव्या म्हणोन हुकूम झाला. यानंतर मुखमार्जन, वस्त्रांतर, मानसपूजा करून थाळा केला. ते वेळेस सखाराम गोपाळ नायब चिटणीस हजर असोन इंग्रजींत मसोदे सायंकाळपावेतों पलंगापाशीं करीत राहिले. नंतर विनायक जनार्दन कीर्तने येऊन अखबार वाचून दाखवीत राहिले.

श्रीमंत सौ. महाराणीसाहेब व उभयतां बाळासाहेब ताल येथें डेऱ्यावर दाखल होतांच सौ. राणीसाहेबांस सलामीच्या तोफा ११ जाहल्या. ठरावाप्रमाणें २१ न जाहल्या. सबब

सरनौबत यांनी जावरेवाल्यांस जाब विचारला. त्यावर जाब आला कीं सरकार मालिक आहेत. आम्हाकडून हुकूम उचलण्यास अनमान नाहीं. सरकारसाहेबांच्या तोफा २१, श्रीमंत राणीसाहेबांस ११ याप्रमाणें आम्हांस हुकूम आहे. अगर सरकारसाहेबांकडून बारूद मिळेल तर आम्ही पुरते करूं. कारण दारू शिल्लकेत नाहीं. यावर हा प्रश्न येथेंच थांबला. नंतर सरकारसाहेबांचा विनायकराव मास्तर यांस उभयतां बाळासाहेबांस इंग्रेजी विद्याभ्यास चांगला करविणें व शिकवणी ठेवणेविषयीं खासगी हिदायत जाहली. नंतर थाळा करण्यास स्वारी आंत गेली. थाळा करून आराम केला.

---

हृया दोन लेखांकांवरून श्रीमंत सरकारांची स्पष्टोक्ती व स्वारींतील शिस्त वगैरे गोष्टीवर प्रकाश पडेल. आतां यापुढें आपण पुढील राज्यकारभाराचें विवरण करूं.



### प्रकरण २३ वें

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर यांचा राज्यकारभार

## इ. स. १८७२ ते १८७५

मागील प्रकरणांत नमूद केलें आहेच की बक्षी खुमानसिंग, गणेश शास्त्री व अलीअकबर हे सरकारचे कामासाठीं इ. स. १८७१ च्या एप्रिलमध्यें विलायतेकडे रवाना झाले. ही मंडळी ता. १२ नोव्हेंबर रोजीं मुंबईस जाऊन दाखल झाली आणि ता. १७ नोव्हेंबर रोजीं खांडव्यास येऊन पोंहचली. गणेश शास्त्री आणि भीमगीरबुवा मागें राहिले. खांडव्याहून बक्षीजी ता.२० रोजीं सिमरोलास येऊन पोंहचलें तेथें भवानीसिंग सरनौबत त्यांस येऊन भेटले. तेथेंच गणेश शास्त्रीही येऊन मिळाले. ता.२१ नोव्हेंबर रोजीं ही सर्व मंडळी इंदुरास दाखल झाली. श्रीमंतांची भेट होतांच श्रीमंत सरकार बक्षीजीस म्हणाले ''आज कै.यशवंतराव महाराजांचे श्राद्ध आहे. त्यांस तुम्ही प्रथम घरीं जाऊन स्नान करून येथेंच आमचे पंक्तीस भोजनास यावे.'' श्रीमंतांनीं बांडेसाहेबांस परस्पर आमचे (बक्षीजींचें) घरीं पाठविलें. थोडे बहुत प्रायश्चित्तही आम्हास देवविलें. बक्षीजी वाड्यांत येतांच त्यांस पंक्तीस घेऊन श्रीमंतांनीं भोजन केले. पण मोठा प्रश्न पडला गणेश शास्त्रींचा. श्रृंगेरी मठापर्यंत प्रश्न पोहचवून दहा हजार रुपये खर्च करून श्रीमंतांनीं शास्त्रीबुवांस (गोळवलकर) पावन करून घेतलें. यालाही कित्येक महिन्यांचा अवधी लागला. आतां हा विलायतेचा प्रश्न त्या काळाइतका बिकट राहिलाच नाहीं.

इ. स. १८७२ चे आक्टोबर महिन्यांत दादाभाई नवरोजीं इंदुरास आले होते. कांहीं दिवस त्यांचा मुक्काम होता. श्रीमंतांनीं बहुमानपुरस्सर त्यांची रवानगी केली.

बडेसाहेबांनीं भेटीस मुत्सद्यांस बोलाविल्यावरून बक्षीजी व वासुदेवपंत मुळे नाजीम यांस सरकारांनीं पाठविलें. भेटीस लाटसाहेब नोव्हेंबरात येणार व बडवाहास मुक्काम होणार त्याजबद्दल बोलणें झालें. सर टी माधवराव यांस येथें बोलविण्याची तजवीज चालूच होती; ते नोव्हेंबरात आले. लागलीच ते व बक्षीजी मुंबईस गेले; कारण लार्ड नार्थब्रुकसाहेब गव्हर्नर जनरल हे तेथें येणार आणि तेथील दरबार झाल्यावर बडवाहास येणार. रेल्वेवर नर्मदेस पूल बांधला जाणार त्याचा पाया त्यांचे हस्तें घालावयाचा आहे. सर माधवराव व बक्षीजी मुंबईस गेल्यावर डेलीसाहेबांनीं लाटसाहेबांची यांची भेट करविली. दरबारचे दिवशीं मोठाच समुदाय जमला होता. ता. २२ नोव्हेंबरास सर टी. माधवराव व बक्षीजी बडवाहास आले. सरकारस्वारी पूर्वीच आली होती. बडवाहा कसब्यापासून नर्मदेपावेतों माळव्यांतील संस्थानिकांचे डेरे लागले होते. नोव्हेंबरचे अखेरीस लाटसाहेब बडवाहास आले व नर्मदेच्या पुलाचा पाया त्यांनीं घातला.

**बडेसाहेबांचा अहवाल निघाला त्यातील माहिती खाली देत आहोत.**

१ आगगाडी रस्ता सुरू झाल्यामुळें इंदूर आणि खांडवा यामधील दळणवळण ऐशीं मैल रस्त्यावर वाढत आहे.

१ दवाखान्याकडे अधिक लक्ष पोहचत आहे. देवी टोचविण्याची क्रिया लोकांत हळुहळू मान्य होत आहे. चालू साली कालऱ्याची साथ सर्व माळवाभर पसरली होती. इंदूर शहरात २१५ ची लागवण होऊन त्यापैकीं २६ च बचावले.

१ सरहद्द काकडझगडे : होळकर सरकारचा चिखलदा परगणा धार सरकारच्या कुक्षी परगण्याशीं लागून आहे. याचा फायदा गुन्हेगार घेतात; दोन्ही दरबारचे अधिकारी सहकार्य करतील तर गुन्ह्यास आळा बसेल. आज ''पोलीस व बंदोबस्त'' या नांवाखालीं दोन्ही दरबारचा पैसा व्यर्थ जात आहे. म्हणजे पर्यायाने रयतेच्या माथीं हे ओझे पडत आहे. या संबंधात दोन्ही दरबारास विनंती केली गेली आहे; व त्यांजपुढें थांदले पेटलावदचा निकाल अनुकरणासाठीं ठेविला आहे.

इ. स. १८७३ : सर टी. माधवराव इ. स. १८७२ च्या अखेरीस आले ते १८७३ चे प्रारंभापासून काम पाहू लागले. इंग्रजी शिक्षण त्यांस मिळाले होते. येथें येण्याचे पूर्वी राज्यकारभाराचेही ज्ञान त्यांनीं संपादिले होते. इंग्रेजी राज्यपद्धतीचे ते चाहते होते. येथें येतांच त्यांनीं पूर्वीचें एकसूत्री राज्यकारभाराचे वळण हळुहळु इंग्रेजी पद्धतीवर नेलें. त्याचे वर्णन बक्षीजी येणेंप्रमाणें करितात.

सर टी. माधवरावांनीं दरबाराकरितां (सेक्रेटरिएट) पागेचा मोती बंगला पसंत केला. तेथें त्यांनी आपले दप्तर मांडले. कामाकरितां खातीं पाडलीं ती येणेंप्रमाणें :

(१) इंग्लिश कचेरी, मुखत्यार बक्षीजी (२) परराष्ट्र कचेरी फारेन, मुखत्यार रामचंद्र

विठ्ठल व्यास, वकील रेसिडेन्सी (३) न्याय खाते जुडीशियल, मुखत्यार विनायक जनार्दन कीर्तने (४) वसूली रेव्हेन्यु खाते मुलकी, मुखत्यार बळवंतराव विठ्ठल (५) लष्करी खाते, मुखत्यार भवानीसिंग सरनौबत (६) सर्व साधारण जनरल खाते, मुखत्यार दाजीसाहेब खासगीवाले व विनायकराव गोपाळ

१ न्यायखात्याची रचना पूर्वी अशी होती कीं फौजदारी कामाकरितां एक व दिवाणी कामाकरितां एक असें नाजीम होते. महालचे मुकदमे ही इंदुरास येत होते. आतां नवी रचना केली तीं : मुख्य न्यायाधीश व जिल्हेनिहाय जज्ज मुकरर झाले. होळकर सरकारचे ग्याझेट दर आठवाड्यास सुरू केलें. मे महिन्याचे सुमारास श्रीमंत उभयतां बाळासाहेबांस शिकविणेसाठीं सर टी माधवरावांचे चिरंजीव आनंदराव मुकरर झाले. गणेश शास्त्री गोळवलकर ज्ञातीत आल्यानंतर त्यांस रामपुऱ्याचे सुभे नेमिले. मध्यंतरीं सरकारांची तब्येत फार बिघडली होती. तब्येत सुधारलेवर बक्षीजींनीं श्रीगोपाळकृष्णाचे मंदिरांत मोठा उत्सव करून श्रीमंतांस मेजवानी दिली.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं नवस फेडण्यास व जेजुरीस श्रीमार्तंडाचे दर्शनास जाण्याचें सरकारचे मनांत आल्यावरून तयारीचा हुकूम झाला. असें ठरलें कीं, येथून खांडव्यापावेतों थोडे लष्कर घेऊन मजल दरमजल जावें व तेथून स्पेशल ट्रेनेतून मनमाडास जावे आणि मनमानाडाहून मजल दरमजल साकूर, भांडूरचे वाटेनें पुणें व जेजुरीस जावें. याप्रमाणें हुकूम झाला. त्याप्रमाणें व्यवस्था केली. ता. २६ नोव्हेंबर रोजीं सरकारचा कूच होऊन प्रथम मुक्काम शेमरूदचा झाला. श्रीमंत सौ. तिघी महाराणीसाहेबांनीं बक्षीजींच्या मातुश्रीसही बरोबर घेतलें. ता. २८ रोजीं स्वारी बडवाहास दाखल झाली. ता. ३१ पावेतों मुक्काम राहिला. दिवाणसाहेब पळसीकर व अण्णासाहेब गरूड याच ठिकाणीं स्वारींत सामील झाले. कप्तान ब्लाबर्ड साहेब पोलिटिकल आफिसर स्वारीबरोबर राहण्याकरितां दाखल झाले. ता. १ डिसेंबर रोजीं बडवाहाहून कूच होऊन सनावदचा मुक्काम व ता. २ ला कूच होऊन सरकारांनीं दोडव्यास मुक्काम केला. सरकार स्वारी ता.४ रोजीं खांडव्यास आली त्यावेळीं कप्तान ब्लाबर्ड साहेबासमागमें कप्तान हंफ्रेसाहेब पोलिटिकल आफिसर मुंबईहून येऊन सरकारची मुलाखत घेतली.

खांडवा स्टेशनवर ता. ६ रोजीं स्वारी आल्यावर प्रातःकाळीं साडेनऊ वाजतां गार्ड आफ आनर पोलिसचा होता. खांडव्याचे आफिसर ब्रिटिश वगैरे सरकारांस भेटावयास आले होते. वामन रामचंद्र यांनीं स्टेशनवर बंदोबस्त उत्तम ठेविला. मनमाड येथें विंचुरकर पेशवाईस आले. सरकार स्वारी लष्करांत उतरली. विंचुरकर समागमें होते. तेथें डेऱ्यावर दरबार झाला. अत्तर पानसुपारी होऊन दरबार बरखास्त झाला. ता. ७ मुक्काम राहिला. विंचुरकर भेटीस आले. उजवे बाजूस मखमल गादी आंथरली त्याचवर बसविले. कांहीं गोष्टी होऊन पानसुपारी झाली. परत भेटीसही सरकार स्वारी गेली होती. ता. ८ रोजीं येवल्यास राजेबहादुर मालेगांवकर सरकारचे भेटीस आले होते. येवल्यास असिस्टंट कलेक्टर व कप्तान हंफ्रे एक मैलावर पेशवाईस आले होते. डेऱ्यापावेतों दोन्ही आफिसर होते. नंतर पानसुपारी

देऊन रूकसत झाले. येवल्याहून ता. ९ रोजीं कूच होऊन ता. १३ स साकूर येथें स्वारी दाखल झाली. श्रीमंत सौ. राधाबाईसाहेब याच गांवच्या असून येथें त्यांस कांहीं नवस फेडणें होते सबब ता. १५ पावेतों मुक्काम राहिले. ता. १६ स कूच होऊन ता. २१ रोजीं चिंचवड येथें स्वारी दाखल झाली.

सरकारी स्वारीबरोबर आम्हीही वाफगांव पाहण्यास गेलो होतो. तेथें एक सरकारी जुना वाडा जुन्या चालीचा आहे. सरकारस्वारी येथें दाखल होण्यापूर्वी सर टी. माधवराव साहेब इंदुराहून पोंहचले होते. या ठिकाणीं कवायतीकरितां बाम्बे आर्मीची फौज जमली होती; लार्ड नेपियर बंगालचे कंमाडर-इन-चीफ येथें आले होते. महाराजांस गार्ड आफ आनर दिला. सरकारांनीं दोन वेळां कवायत पाहिली. लार्ड नेपियर हे सरकारचे भेटीस आले व सरकारनेही परत भेट दिली.

ता. २४ डिसेंबर रोजीं कूच होऊन दुसरें दिवशीं स्वारी सासवडास जाऊन जेजुरीस दाखल झाली. तेथें पांच सात मुक्काम झाले.

सन १८७४ तारीख २ जानेवारीस जेजुरीहून कूच होऊन स्वारी पुण्यास दाखल झाली. सर्व सरदार, एजंट वगैरेंनीं पेशवाई केली. लष्करांत आल्यावर साहेब लोकांकडून पानसुपारी झाली. श्रीमंत सौ. राणीसाहेबांच्या स्वाऱ्या पंढरपूर येथें गेल्या श्रीमंतांची स्वारी अक्कलकोटास दर्शनास जाऊन परत आली. ता. १५ जानेवारीचे सुमारास बक्षीजीस व धोंडो शामरावांस मुंबईस लष्कर पाहण्यास पाठविलें. ता. २४ जानेवारीस स्वारी मुंबईस आली आणि वाळकेश्वर येथें उतरली. गर्व्हनराचे भेटीस स्वारी गेली. गर्व्हनरांनींही सरकारांस परत भेट दिली. बक्षीजीस गर्व्हनरसाहेबांस पोहचविण्यास पाठविलें होतें.

मुंबईस सरकारस्वारी असताना नबाब बेलाकडे व सर जमशेटजी जिजीभाई यांचे गार्डन पार्टीसही स्वारी गेली होती. ता. १५ फेब्रुवारीचे सुमारास कूच होऊन स्पेशल ट्रेननें स्वारी मनमाडास गेली. बक्षीजी बरोबर असून सर टी. माधवराव हे इंदुरीं गेले. सरकारस्वारी विंचुरास नंतर निफाडास येऊन स्पेशल ट्रेननें खांडव्यास रवाना झाली आणि तेथून मजल दरमजल इंदुरास दाखल झाली.

ता. ३ एप्रिल रोजीं सर टी. माधवरावसाहेब दीडमाही रजा घेऊन मद्रासला मुलीचे लग्नाकरितां गेले. दरबारचे काम बक्षीजींकडे आलें.

श्रीमंत सौ. पार्वतीबाईसाहेब बाळंत होणार सबब जुलाई महिन्यांत बक्षीजींच्या घरीं येऊन राहिल्या. हेतू हा कीं त्यांचेच घरी बाळंतपण व्हावे. त्याप्रमाणें आगस्ट महिन्याचे प्रारंभीं मुलगा झाला.

सन १८५७ सालीं ज्या साततखांनें इंदूर छावणींत सरकशी केली, तो डोंगरपुरास या सालीं म्हणजे १८७४ मध्यें धरला गेला. बडेसाहेबांनीं इंदुरीं बोलाऊन कप्तान बारसाहेबांस इंदुरी जज्जाचा अधिकार आहे. त्यांनीं सप्टेंबरात सेशन केलें. बक्षीजींची साक्ष झाली. मुकदमा साबीत होऊन त्यांस फाशीची शिक्षा झाली.

यापुढें सरकारी अहवालांतील माहिती आम्ही सादर करीत आहोत. विशेष गोष्ट

ध्यानांत धरावयाची ती ही की, सर टी. माधवराव हे कारभारी झाल्यापासून ते स्वतः वार्षिक अहवाल प्रसिद्ध करूं लागले आणि तो अहवाल बडेसाहेबांकडे गेल्यावर त्यांच्या टीकात्मक टिपणासह बाहेर पडूं लागला. हा नवीन प्रघात सुरू झाला. काय आहे आणि काय हवें हें स्पष्ट होऊं लागलें. त्याचप्रमाणें आम्ही आतां कारभारी साहेबांचा अहवाल सादर करून त्यावर बडेसाहेबांची टीका शक्य तेथें आणि शक्य तितकीं, देऊं.

सर टी. माधवराव लिहितात कीं राज्यकारभाराचीं दहा खातीं पाडलीं आहेत. पैकीं सहा खात्यांचा खुलासा यापूर्वी केलाच आहे. बाकी चार खातीं १ पब्लिक वर्क, २ शिक्षण खाते, ३ कस्टम्स व आबकारी व ४ पोस्टखातें. मिळून दहा खातीं यांवर देखरेख कारभारी यांची रहायची. प्रत्येक खात्यावरील मुखत्यार जबाबदार रहावयाचा. परंतु कारभाऱ्याचे तंत्रानेंच चालायचें. महत्त्वाचें किंवा नवीन स्वरूपांचें काम असेल तेथें श्रीमंतांचे हुकुमानें चालायचे. श्रीमंतांनीं जमीन महसूल हें खातें स्वतःकडे ठेवून घेतलें होतें. ब्रिटिश सरकारशीं संबंध येईल तेव्हां श्रीमंतांच्या विचारें कारभारी साहेब एजन्सीशीं पत्रव्यवहार करीत. सारांश, पूर्वीच्या एकमुखी एकतंत्री पद्धतींत सल्लामसलतीची व कारभार विभागणीची भर पडली. हीं एक प्रकारें उत्क्रांतीच झालीं.

**न्याय खातें** : राजधानींत सदर कोर्ट स्थापित झाले. दोन न्यायाधीश मुकरर झाले ते इंग्रेजी भाषाभिज्ञ असून कायद्याचे शास्त्र व यात वाकबगार होते. त्यांचा पगार दरमहा रु. ५०० व ८०० असा होता. सदर कोर्टाखालीं तीन जिल्हा कोर्टे इंदूर, मंडलेश्वर आणि रामपुरा. या शिवाय एका हंगामी न्यायाधिशाची नेमणुक शिल्लक कामें काढण्यासाठीं झालीं. नेमावर जिल्ह्यासंबंधातही श्रीमंत सरकारचा हुकूम झाला आहे. लायक इसम पाहत आहोत. याचप्रमाणें तीन सुभे नेमले आहेत. इंदूर, रामपुरा आणि नेमाड. अमीन व वहिवाटदार यांची संख्या वाढविली आहे. प्रत्येकाच्या जबाबदाऱ्या व सीमा आखून दिल्या आहेत. अशामुळें पायापासून शिखरापर्यंत कार्यविभागणी होऊन सुव्यवस्थित घटना तयार झाली आहे.

**डाक, पोस्ट खातें** : हे नवे खातें संस्थानपुरतें उघडलें आहे. इंग्रेजी मुलखांत तयार झालेल्या अधिकाऱ्यांची योजना केली आहे.

**इंजिनिअरिंग, पब्लिक वर्क खातें** : मिस्टर क्यारे या वाकबगार माणसाचे हातीं हें खाते सोपविलें आहे. इंदूर शहरांतील मुख्य मुख्य रस्ते तयार झाले आहेत व दिवाबत्तीची सोय झाली असून पिण्याचे पाणी मुबलग झालें आहे. आजूबाजुच्या उत्पादक शहरांशीं व खेड्यांशी इंदूर शहर जोडलें जाईल अशा रस्त्याचीं योजना व मांडणी सुरू झाली आहे.

**पोलिस खातें** : जिल्ह्यानिहाय पोलिसांच्या नेमणुकी केल्या आहेत.

**दवाखाना** : लस टोचण्यासंबंधांत सरकारांनीं रक्कम मंजूर केली आहे; आणि मुंबईहून शिकलेली एक दाई बाळंतपणाचे कामात मदतनीस म्हणून आणली आहे. त्या बाईचा उपयोग चांगला होतो. तुरुंग खात्याची व्यवस्था चांगली रहावी म्हणून ते खाते आरोग्य खात्याच्या ताब्यांत दिलें आहे.

**सन १८७२–७३ चा जमाखर्च येणेंप्रमाणें**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | जमीन महसूल | ३३७७०० | १ | कस्टम्स | ६११००० |
| २ | अबकारी | ११९००० | १ | नजराणा | १५८००० |
| १ | स्टांप्स | ५०००० | १ | रिफंड | ११७००० |
| १ | दंड | ७६००० | १ | टाकसाळ | २६००० |
| १ | रेल्वेकडील व्याज | ३३००० | १ | सूतयंत्र | २२००० |
| १ | किरकोळ उत्पन्न | २०४००० | | | |

..................

४९,२२,०००

टीप : खासगीचें उत्पन्न यांत धरलें नाहीं. याचप्रमाणें सरदेशमुखीची बाब जमीन महसुलांत घेतली नाहीं. खाली येणारे खर्चाचे आकडे हल्लीं रुपयांचे आहेत. खर्चाचा तपशील.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | राजवाड्याकडील | ६७५००० | १ | नोकरांचा पगार | ९८९००० |
| १ | पोलीस | १३४००० | १ | कोर्टे | २०००० |
| १ | तुरुंग खातें | २८००० | १ | मिलिटरी | १२२८००० |
| १ | शिक्षण खातें | २७००० | १ | इंजिनिअरिंग | २३१००० |
| १ | दवाखानें | १२००० | १ | पोस्ट ऑफिस | ४००० |
| १ | पैमाश कारखाना | ३५००० | १ | पेन्शन | ८००० |
| १ | धर्मादाय | १०३३००० | १ | रेल्वे | ११०४००० |
| १ | कांटिजंटचा हप्ता | २३८००० | १ | सूतयंत्र | १४२००० |
| १ | किरकोळ | १३१००० | १ | तसलमात | २०३००० |

.....................

५३,१२,०००

**कस्टम्स खातें** : या संबंधात सर टी. माधवराव लिहितात कीं प्रत्येक परगणा म्हणजे स्वतंत्र राज्य या दृष्टीनें कस्टमची पद्धत बसलेली दिसते. या खात्यांत एकंदर संस्थानच्या दृष्टीनें आणि व्यापार वृद्धीच्या दृष्टीनें अवलोकन करून पुनर्घटना करण्यास अवसर आहे आणि तो विचार आमचा चालू आहे.

**लष्करी खातें** : उपयोगी पडतील अशा तोफांची संख्या १८ आहे. तोफखान्याकडे ५३० माणसें आहेत. घोडदळ व पायदळ प्रत्येकीं ३१०० आहे. या खात्यांतील बरेचसे इसम जिल्हेवारी पोलिस खात्यांत काम करतात.

**गुन्हे** : सरदार व जहागिरदारांचे जितके सहाय हवे तितके सरकारांस मिळत नाही. गुन्हेगार पकडून देण्यास, त्यांचा तपास लावण्यास अगर त्या दृष्टीनें वागणूक ठेवण्यांत ही मंडळी दक्ष नाही. त्यांतल्या त्यांत ज्या इसमास ब्रिटिश ग्यारंटी आहे ते तर हें काम आपल्या कक्षेंत नाही, असें स्पष्ट बोलून दाखवितात. नेमाड व इंदूर जिल्ह्यांच्या तुलनेनें

पाहतां गुन्हा नाहीच असें म्हटलें तरी चालेल. रामपूर जिल्ह्यांत गुन्ह्याचे स्वरूप विशेष आहे. यामुळें तेथें पोलिसाचा बंदोबस्त विशेष ठेविला आहे. गणेश शास्त्री यांची स्पेशल आफिसर म्हणून नेमणुक केली आहे. एकंदर संस्थानांत दोन तुरुंग आहेत. इंदूर आणि मंडलेश्वर. पहिल्यांतील संख्या ३३० आहे व दुसऱ्यांत संख्या १५० आहे. या संख्येत स्त्रिया ४० आहेत. त्यांच्या राहण्यासवरण्या संबंधात विशेष व्यवस्था केली आहे. ही गोष्ट घडवून आणण्यांत सर माधवरावांचे अंग विशेष होते.

**शिक्षण खातें** : न्यायालयांत ज्याप्रमाणें सर माधवरावांनीं सुधारणा घडवून आणिली तशी शिक्षण खात्यातही आणली. खात्यात सुप्रिटेंडेंट, इन्स्पेक्टर आणि हेडमास्तर अशी प्रथा पाडली. एकंदर सत्तर ७० संस्थांत ३००० तीन हजार विद्यार्थी शिकत होते. त्यांच्यावर केवळ शिक्षणाचा खर्च वीस हजार २०००० होता. विद्यार्थिनी ४० होत्या. म्याट्रिक्युलेशनपर्यंत इंग्रजी, संस्कृत, फारशी, मराठी आणि हिंदी या विषयांची शाळांमधून सोय झाली होती. पहिल्या प्रथमच इंदूरच्या मदरशामधून म्याट्रिक्युलेशन मध्यें ५ विद्यार्थ्यांनीं यश संपादिले.

संस्थानांत याप्रमाणें शिक्षणाची व्यवस्था लावून सर टी. माधवराव थांबले नाहीत. म्याट्रिक्युलेशन उत्तीर्ण झालेल्या गरीब पण होतकरू विद्यार्थ्यांची कालेजातील अभ्यासाची सोय स्कालरशिपांचे रूपानें त्यांनीं केली. इंदूर येथील मिलिटरी शाळांना तसेच स्थानिक वाचनालयाला वार्षिक वर्गणी सुरू करून शिक्षणाच्या विविध अंगांची स्थापना व जोपासना त्यांनी केली. ह्या बाह्य खर्चाची रकम वार्षिक सव्वा दोन हजाराची नोंद या अहवालांत केली आहे. त्याचप्रमाणें राजपुत्रांच्या शिक्षणार्थ नेमलेल्या संस्कृत शिक्षकांचा पगार यात नमूद आहे.

**श्रीमंत सरकारांचे औदार्य** : डाक्टर ब्युमट ह्यांच्या देखरेखीखालीं वैद्य व हकीम यांस मदत देऊन रोग्यांचे क्लेशनिवारणार्थ प्रयत्न चालू होते. इंदूर ते चंबल, धार आणि देपाळपूर बाजूनें सडका करण्याचे हुकूम सुटले असून खर्च ३००००० तीन लक्ष होईल. सर टी. माधवरावांच्या अहवालाचे सिंहावलोकन बडेसाहेबांच्या कचेरींत होऊन खालील शेरे त्यांनीं नमूद केलें आहेत.

१ सर टी. माधवरावसारख्या निष्णात कारभाऱ्यामुळें होळकर स्टेट रेल्वेचे काम पूर्वीपेक्षां बिनबोभाट व जलद चालू झालें.

२ ग्यारंटिड जहागिदारांसंबंधीं जे उद्‌गार सर माधवरावांनीं काढले आहेत ते कर्नल स्लीमन यांनीं घालून दिलेल्या कायद्याप्रमाणें ते चालवीत आहेत. त्यांनीं गुन्हेगारांचीं यादी सादर करणें हे त्यांचे कर्तव्य आहे. पण त्यांच्याच प्रांतांत होणाऱ्या चोऱ्यांबद्दलची आर्थिक जबाबदारी त्यांजवर लादण्याचा जो प्रयत्न होत आहे तो त्यांच्या शक्तीबाहेरचा आहे.

३ खासगीकडे अंदाजे १६० गांवें आहेत. त्याबाजूस कोर्टाची डिक्री किंवा न्यायाधिशांची आर्डर पोहचूं शकत नाही. कारण ते गांव महाराजांचे खासगीचे असून

ठिकठिकाणीं पसरले आहेत.

४ सूतयंत्रात जे यश श्रीमंतांनीं संपादिलें आहे तें त्यांस भूषणावह आहे. मिस्टर धूमच्या कामांत ते ढवळाढवळ करीत नाहींत हे अभिनंदनीय आहे. या उपक्रमाचा परिणाम कापूस पिकविण्याकडे आणि जतन करण्याकडेही होऊं लागला आहे.

५ सन १८६४ पासून चालू सालापर्यंत दहा वर्षांचा आफिमीचा आढावा काढल्यास दरसाल ३३००० पेट्या माल बाहेर जातो आणि दोन कोट रुपये उत्पन्न होते. गेल्या तीस वर्षांत निर्गत तिप्पट झाली. रस्ते सुधारले. आगबोटी नियमित वाहतुक करूं लागल्या. जी.आय.पी.ची वाढ झपाट्यानें झाली व तारखातेंही सुरू झालें. या सर्व कारण समुच्चयामुळें माळवा खरोखरच नांवाप्रमाणें ''मा आलय'' म्हणजे श्री महालक्ष्मीचे माहेरघर बनले आहे. मालकमसाहेबांनीं आपल्या वेळेस जमिनीचा कर पांच लक्ष वीस हजार धरला होता. आज तो तिप्पटीवर चढला आहे. याबरोबरच साहेबमजकुर एका विशेष गोष्टीकडे लक्ष वेधूं चाहतात. माळव्यांत सरकारचे व लोकांचे लक्ष आफिमीच्या वाढीकडे इतकें लागले आहे की धान्याच्या वाढीकडे दुर्लक्ष होत चालले आहे. त्यामुळें लोकांचे अन्न परावलंबी होत आहे. देखावा असा दिसतो कीं, शंभर मैलाचे अंतरावर एका बाजूस गाद्यागिरद्यावर लोळणारे लक्षाधीश दिसतात. तर दुसरें बाजूस हाडांचे सापळे होत चाललेले भिक्षाधीश दिसतात. गहू माळव्यांत सहा शेरापर्यंत जातो तर अगदी रेलचेल म्हणजे १० ते १५ शेर येतो. तेव्हां इकडे सरकाराचें लक्ष जावें.

६ रेल्वेच्या योगानें बाहेरचा ज्ञानप्रकाश माळव्यांत येऊं लागला आहे त्याप्रमाणें सर्वसाधारण रयतेस उद्योगधंद्याची महती आणि माहिती लागेल अशी आम्हास उमेद वाटते.

७ श्रीमंत होळकर सरकारांनीं जमीन सारा वाढविला याबद्दल रयतेने असंतोष प्रदर्शित केला. आम्हीही सालोसालच्या अहवालात या बाबीच्या दोन्ही बाजू वेळोवेळीं मांडून तटस्थ राहिलो होतो. आतां आम्ही असें स्पष्ट म्हणतो कीं नवीन धाऱ्याने शेतकरी वर्गास उद्योगाची आणि सावधानतेची जरूर पडली. त्यामुळें अधिक उत्पन्न येऊ लागलें. यात त्यांचा नैतिक लाभ होऊन सरकारचाही फायदा झाला.

८ श्रीमंत सरकारांच्या सूतयंत्रानें पुष्कळ फायदा केला आहे. रोज दोनशें सूत कापडाचे बाहेर पडतात. तेच सर्व यंत्र पूर्ण बसल्यापर रोज दुप्पट वाढेल. धोतरें व क्लाथ बाहेर पडत आहेत. मुंबईचे कापडासारखें हें कापड निघतें. आज माल तयार होत आहे त्यापेक्षां मागणी अधिक आहे. हें लोकप्रियतेचे चिन्ह होय. आरंभाला योग्य तितका कापूस माळव्यांत मिळाला नाहीं म्हणून खानदेशांतून कापूस आणावा लागला. माळव्यांतील जमीदार व शेतकरी जागे होत आहेत आणि आतां पुरवठा वाढत जाईल अशी आशा वाटते.

९ श्रीमंतांनीं इंदूरच्या आजुबाजूस दौरा काढला. गांवोगांवच्या कीर्द खतावण्या

तपासल्या. साराबाकीची चौकशी केली. कांहीं ठिकाणी सूट दिली. अशा तऱ्हेनें येकंदर शेतीला आणि निवाणाचे वाढीला प्रोत्साहन दिले. इ. स. १८७५ त बक्षीजी आपल्या रोजनामच्यात लिहितात कीं, ता. १५ जानेवारीस सर टी. माधवराव साहेबांनीं बक्षीजीस पत्र लिहिले कीं, ''सरकार आम्हांस पूर्ण आखत्यार देत नाहींत त्यामुळें काम बरोबर चालत नाहीं. यास्तव आमचे येथें राहणें निरर्थक आहे.''

सरकारस्वारी कलकत्यांस जाणार. सबब स्वारी ता. ३ फेब्रुवारीस बडवाहा येथें गेले व तेथें कांहीं मुक्काम राहिले. ता. १० फेब्रुवारीस भवानीसिंग सरनौबत व गोविंदराव खजांची बडवाहा येथें सरकारस्वारीत सामील झाले. त्यांचे कामाचा चार्ज तात्पुरता बक्षीजींनीं घेतला. ता. १२ फेब्रुवारी रोजीं सर टी. माधवराव कारभारी हेही बडवाहास गेले. त्यांचाही चार्ज बक्षीजींनीं घेतला.

ता. १५ फेब्रुवारीस सरकारस्वारी बडवाहाहून रवाना झाली. सतना मुक्कामीं रिव्याचे राजे ता. १९ रोजीं भेटावयास आले होते. पुढें सरकार स्वारी ता. २३ रोजीं कलकत्त्यास दाखल झाली. तेथून स्वारी श्रीक्षेत्र काशी येथें गेली. तेथें काशीचे राजे व नेपाळचे दिवाण सर जंगबहादूर यांच्या भेटी झाल्या. परत स्वारी ता. १६ मार्च रोजीं कलकत्त्याहून आली. दरबार झाला आणि नजरा झाल्या.

सर टी. माधवरावसाहेब बडोद्यास जाणार म्हणून ता. ६ एप्रिल रोजीं दरबारचे मंडळींचा फोटोग्राफ घेतला गेला. ता. २७ एप्रिल रोजीं डेलीसाहेब सरकारचे भेटीस आले आणि त्यांनी सांगितले कीं, सर टी. माधवराव ह्यांस लाटसाहेबांनी बडोद्यास मुकरर केलें आहे. त्याबद्दलचे लाटसाहेबांचे पत्र महाराजसाहेबांस दाखविलें. सर टी. माधवरावांचे जाण्याबद्दल सर्वांस वाईट वाटले. ता. २९ एप्रिल रोजीं आम्ही सर्वत्रांनीं मिळून सर टी. माधवरावजीस मानपत्र दिले. ता. ३० एप्रिल रोजीं सरसाहेब बडोद्यास रवाना झाले, सरकारांनीं त्यांस बहुमान पोशाख दिले.

ता. ६ मे रोजीं आर रघुनाथराव कारभारी मुकरर झाले आणि त्यांनीं दरबारचा चार्ज घेतला. बक्षीजीस सर टी. माधवरावांकडून पत्र आलें कीं, आमचे चुलत बंधु आर. रघुनाथराव यांस मदत देत असावी. येथें सर टी. माधवरावांची कारकीर्द संपली.

ज्यांनीं बाहुबलानें होळकर राजवटीचा पाया घातला, विस्तार केला आणि त्याचा बचावही केला त्यांची चरित्रे तर होळकर राजवटीचा इतिहास लिहिताना, आलीच पाहिजेत. तसेंच राज्य कमाविल्यावर त्याची अंतर्व्यवस्था ज्यांनीं सुसंघटीत करून दिली त्यांचीही चरित्रे समाविष्ट झाली पाहिजेत. या दुसरें वर्गास आम्ही मुत्सद्दी असें नांव देतो. ज्यांची माहिती मिळाली त्यांची चरित्रें तशीं मधून मधून गोवीत आलोच आहोत. देवी अहिल्याबाईच्या कारकीर्दीत हे मुत्सद्दी बरेच झळकले. त्यांच्याच पंक्तींत विठ्ठलतात्या जोग (किबे) हेही बसू शकले. तो काल कधीं पूर्ण मराठेशाहीचा, तर कधीं मराठे-इंग्रज असा संधीकाळ होता. चालू कारकीर्दीत इंग्रजी काल व कल चढत्या कमानीचा होता.

कालमानाप्रमाणें कर्त्या मुत्सद्यांनीं आपली कामाची दिशा चालविली. या वर्गांत सर टी. माधवराव हे बसूं शकतात. तेव्हां त्यांचेही चरित्र खालीं सादर करितो.

**सर टी. माधवरावांचे चरित्र :**

१ पूर्वपरंपरा : गोब्राह्मण प्रतिपालक छत्रपती श्रीशिवाजी महाराज यांचे वडील शहाजी राजे यांनी नगर व विजापुर या दोन्ही बादशाहीची सेवा करून आयुष्याच्या शेवटील भागांत बंगलुरकडे स्वराज्य संपादिले. राज्य जरी लहान होतें तरी राजे उदारधी होते. विद्वानांचा आणि कलावंतांचा योग्य परामर्श होई. त्यांचे दातृत्वाचा डंका दूरवर गेला होता. पुणें सातारा इकडून बरीच देशस्थांची घरे तिकडे जाऊन स्थिरस्थावर झाली. अशाच एका घराण्यांत माधवरावांचा जन्म इ. स. १८२८ इसवीत तंजावर येथें झाला. ''टी'' हे अक्षर तंजावरकर ह्यांचे दर्शक आहे. यांच्या वडिलांचे नाव रंगराव हे तंजावर येथें नोकर होऊन शेवटीं तेथील दिवाण झाले. त्यांचे पश्चात त्यांचे बंधू कृष्णराव हेही दिवाण होते.

२ बाळपण, अभ्यास व इत्यादि : माधवरावांचे इंग्रेजी शिक्षण सरकारी शाळेत झालें. तेथील मुख्याधिकारी पावेलसाहेब होते. या शाळेत रंगाचार्लु व शेशीयाशास्त्री आणि राम आयंगार हे माधवरावांचे सहाध्यायी होते. रंगाचार्लु हे म्हैसूरचे दिवाण झाले आणि दुसरें दोघे त्रावणकोरचे दिवाण झाले. माधवरावांचे कार्य मात्र अनेक संस्थानांतून झाले. माधवरावांची बुद्धी शीघ्रगामी. आणि भौतिक शास्त्रांतही त्यांची प्रगती होती. इंग्लिश भाषेवरील प्रभुत्व अप्रतिम होते. पावेल साहेबांचे ते आवडते विद्यार्थी असल्यामुळें गणिताचे अध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली. इ. स. १८४९ ते ५१ त मद्रास येथें अकौंटेंट जनरलचे कचेरीत काम त्यांनीं केलें. इ. स. १८५१ ते ५५ माधवरावजी त्रावणकोरच्या राजपुत्रांचे शिक्षक होते. या दोन राजपुत्रांपैकीं एकाचे शिक्षण व वळण इतकें चांगले झालें कीं त्याची कारकीर्द नामांकित झाली. याचे श्रेय माधवरावजींस दिले पाहिजे. पुढें त्यांच संस्थानात जमाबंदी खात्यावर माधवरावांची नेमणुक झाली व नंतर ते नायब दिवाण झाले.

३ माधवरावांचा कारभार : डलहौसीच्या कारकीर्दीचा काळ : त्रावणकोर येथील राज्यकारभारांत अंधेर आणि बखेडा माजलेला. डलहौसीकडून सूचना आली कीं राज्यांत सुधारणा न झाल्यास राज्य खालसा करण्यांत येईल. यावर सर्वांनुमतें माधवरावच या कामाचे योग्य आहेत असें ठरून इ. स. १८५७ त राज्यसूत्रें माधवरावांचे हातीं आली. इ. स. १८५७ पासून १८७१ पर्यंत म्हणजे चौदा वर्षेपर्यंत त्रावणकोरचा कारभार त्यांनीं हांकला. सर्व अंधेर दूर केला, न्याय अंमलबजावणीची व्यवस्था लावून दिली. राज्याची आमद वाढविली. दरवर्षी अहवाल प्रसिद्ध करण्याची शिस्त सुरू केली. यामुळे त्यांचे चौदा वर्षांचे अहवाल म्हणजे एतद्देशीय राजकारणावरील एक ग्रंथच होय. त्यांच्या एकंदर कामावर खूश होऊन हिंदुस्थान

सरकारने इ. स. १८६६ त के.सी.एस्.आय. म्हणजे नाईट कमांडर स्टार आफ इंडिया ही बहुमानाची पदवी त्यांस बहाल केली. इ. स. १८७१ त त्रावणकोरच्या महाराजांनीं माधवरावांच्या एकंदर कर्तृत्वावर खुश होऊन दरमहा एक हजाराची नेमणूक करून देऊन त्यांस बिदा केलें. यावर माधवराव मद्रास येथें विश्रांती घेत असतां श्रीमंत होळकर यांजकडून त्यांस आमंत्रण गेले. माधवरावांची कामगिरी श्रीमंतांस पूर्वीच कळली होती. याजकरितां त्यांचा मानमरातब चांगला रहावा म्हणोन व्यवस्था केली. रावसाहेब गोविंदराव गरूड यांस सर माधवरावांस आणण्याकरितां मद्रासेस पुढें पाठविले. बळवंतराव पुरंधरे हे कारकून म्हणून गेले. इ. स. १८७२ च्या आक्टोबर अखेरीस सर माधवरावांनीं मद्रास शहर सोडलें. त्यांजबरोबर त्यांचे जामात रामनाथराव हेही इंदुराकडे निघाले. खांडव्यापावेतों कर्नल भीमगीरबुवा यांस श्रीमंतांनीं सामोरे पाठविले होते. त्याजबरोबर मोतिया रंगाचे दक्षिणी पागोटे पाठविले होते. सर माधवराव त्रावणकोरच्या पद्धतीचे पागोटे वापरीत. महाराजांचे शब्दास मान देऊन दक्षिणी पागोटे चढवून शिग्रामगाडीने ते इंदुरास आले. दिवाणसाहेबांच्या बागेकडे आल्यावर कांहीं वेळ विश्रांती घेतली. तेथून लालबागेत जाण्यासाठीं माधवरावांकरिता एक हत्ती सज्ज ठेविला होता. भेटीचा वेळ मुहूर्त पाहून महाराजांनीं ठरविला होता. त्या मुहूर्तावर माधवरावांनीं महाराजांचे दर्शन घेतले.

लालबागेत एक प्रशस्त जुन्या चालीचे मोठे घर होते. त्यांत माधवरावांचे राहण्याची सोय केली. त्यांचा दरमहा पगार ३००० तीन हजार ठरला. तीन वर्षे कारभार करावा असें ठरलें. त्यांस एक प्रायव्हेट सेक्रेटरी देण्याचें ठरलें. प्रथम त्यांचे जामात रामनाथराव यांची नेमणुक झाली. मागाहून रघुनाथरावांची नेमणुक झाली. इंग्लिश जाणणारे दोन कारकून त्यांच्याबरोबर आल्यापैकींच माधवरावांच्या सान्निध्यांत होते. बळवंतराव पुरंधरे हे मराठी कारकून होते.

तैनात : दोन घोड्यांची बग्गी; पालखी भोयासह, एक शिग्राम, दहा स्वार व एक जमादार. नारायणराव वीरकर यांस जमादार ठेविले. ४ खासबरदार, एक दफेदार, एक चोपदार, दोन हलकारे, एक न्हावी, एक कामाठी, घराचे मागें पुढें दोन मिलिटरी गार्ड : याप्रमाणें लवाजमा, इंतजाम मुकरर झाला. सर माधवरावांनीं बडेसाहेब जनरल डेली साहेबांची भेट घेतली. बडेसाहेबांनीं त्यांच्या योग्यतेप्रमाणेच त्यांचा मान ठेविला. संभाषणांत साहेब म्हणालें कीं पुष्कळशी प्रकरणे तुंबून राहिली आहेत. ती आतां तुम्ही निकालांत आणालच. पण थोडे स्मित करून साहेब म्हणाले ''श्रीमंतांनीं तुम्हांस जे आणले आहेत ते अंतर्व्यवस्था सुधारण्यासाठी नाही; पण आमच्याशीं दोन हात करावे म्हणून आणले आहे.''

माधवरावांनीं दोन अडीच वर्षांच्या कारकीर्दीत केलेल्या कामाची यादी व पद्धत खालीलप्रमाणें :

१ काकडझगड्यापैकीं, जामण्या भुमिया आणि लवाणी मांडव या दोन प्रकरणाचे कागद तयार करून हिंदुस्थान सरकारकडे पाठवून दिले.

२ इंदूर संस्थानचा नकाशा लिथो पेपरवर देवनागरी भाषेंत तयार करविला.

३ दररोज रात्रौ आठ वाजता तोफ सोडण्याची पद्धत सुरू केली.

४ स्वतंत्र बनविलेल्या दरबार आफिससाठी जुन्या मोती बंगल्याचा उपयोग करूं लागले.

५ त्यांचा सकाळचा वेळ इंग्रजी पत्रव्यवहारांत जाई. दोन प्रहरीं निरनिराळ्या खात्यांची कामे जरूरी तितकी पाहत; महाराजांची भेट रोज त्यांस मिळे. त्यामुळें कामास दिरंगाई लागत नसे.

६ त्यांच्या कामाचा एकंदर निष्कर्ष : जो अहवाल त्यांनीं प्रसिद्ध केला व त्यावर जी टीका झाली ती आम्ही वर दिलीच आहे. त्यावरून दोन अडीच वर्षांच्या कारकीर्दीत त्यांनीं काम किती केलें व दिशा कशी लावली हें दिसून येईल. दिशा लावली व ते गेले.

---

या प्रकरणांत व्यापिलेल्या काळांत (म्हणजे इ. स. १८७२ ते १८७५ चा एप्रिल) घडलेल्या गोष्टीवर प्रकाश पाडणारी जी पत्रें वगैरे सरकारी दप्तरांत उपलब्ध झाली. ती ''होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें'' या पुस्तकांत पहावयास मिळतील. महाराजांच्या दिनचर्यांतील सारांश बहुतेक आलाच आहे.



**प्रकरण २४ वें**

# श्रीमंत महाराजांच्या कारकीर्दींतील तीन प्रमुख दरबार उत्सवांचे वर्णन खाली देत आहोत. महाराजांच्या अंगच्या अनेक असामान्य गुणांचे दिग्दर्शन त्यांत होईल

दिनचर्या तारीख २४ माहे मे इ. स. १८७२ मिती वैशाख शु.२ रोज शुक्रवार मुक्काम इंदूर सु. सन १२८१ फसली, संमत १९२८.

१ आज रोजीं व्हिक्टोरिया राणी सरकारचे जन्मगाठीबद्दलचे दरबाराकरितां सरकारची स्वारी छावणीत जाणार सबब सालाबादी ठरावाप्रमाणें स्वारीचा लवाजमा मागील दोन घटका रात्रीस वाड्याचे पुढें हजर झाला. तो येणेंप्रमाणें :

१ पागा मेंडका निशाणासुद्धां स्वार आसामी सुमारें १५०

१ रिसाल्याकडील स्वार मेंडका निशाण व मोठा बेंडबाज्यासुद्धा स्वार सुमारें २००

१ हत्ती सरकारसाहेबांचे स्वारीचा दिल्लीचे हौद्याचा, चांदीचे दागिन्यांसहित १ व अवांतर मंडळीचे बसावयाचे सुमारें ११

१ खासे घोडे : सोन्याचे १०; चांदीचे ५ दागिन्यासुद्धां सुमारें १५

१ कडाबिनीचे-पहारे बग्या सुमारें २

१ बाजेवाले लोक. खासबरदार मे अफसरासुद्धां.

१ हलकारे, जासूद, चपरासी, लगी बल्लमवाले.

१ चोपदार व ढलाईत व बाजे लोक भालेकरी वगैरे.

१ पालखी १ व पोशाखाचा १ म्याना.

--

येणेंप्रमाणें मामुली शिरस्ते हजर होऊन यादीबरहुकुम दरखदार व मानकरी वगैरे मंडळी हजर झाली.

१ धरम नारायण व रेव्हेन्यू-बारसाहेब दुय्यम असिस्टंट यांजकरितां - पेशवाईस येणेंस्तव एक बग्गी व हत्ती पाठविला गेला.

१ हुजुरांनीं प्रातःकाळींच उठोन मुखमार्जन करून आंतच पोशाख करून अलंकार तगम्यासहित घातले.

१ सलामीकरितां तोफा छावणीत नसल्याकारणानें आपलेकडून पाठविण्याबद्दल चिठ्ठी वकील रसीदंटी इन्दूर यांजकडून रोज गुदस्त रोजीं आल्याप्रमाणें दोन तोफा बमय गोलंदाज व ४२ कारतूससुद्धां प्रातःकाळीं छावणीत पाठविल्या गेल्या. त्याबरोबरचे काडतूस सुमारें बेचाळीस परत रेसिडेंसीतून आलेले मगनिनाकडेस वकिलांनीं पाठवून दिले.

१ प्रथम तीन घटका दिवस उजेडताना मुनसी धरम नारायण हे सरकारसाहेबांचे पेशवाईकरितां बग्गीत बसोन ते पांच स्वार वकील आफिसरांसहित हवेलीवर येऊन दाखल जाहले.

१ मुनसी आल्याची खबर रावसाहेब गोरे यांनीं आंत पोहचविल्यावर सरकार-साहेबांची स्वारी बाहेर येऊन मुंढ्यावर बसली.

१ १ किबेसाहेब, १ सरनौबतसाहेब व १ भीमगीरबावा साहेब, १ बर्क्लेणले वकील रेसिडेंट इन्दूर व नाजीम साहेब १ सखाराम मार्तंड, १ रावजी गोरे व १ सखाराम गोपाळ नायब चिटणीस वगैरे हजर होते. त्यांनीं व मुनसींनीं सरकारांस मुजरे करून ते खाली बसले. मुनसी धरम नारायण यांनीं बडेसाहेबांचा सलाम सांगोन दरबारास चलण्याविषयींची सूचना केल्यावरून स्वारी उठोन हवेलीचे खालीं येऊन दाखल झाली.

१ सरकारसाहेबांचे स्वारीकरितां हत्ती दिल्लीचे हौद्याचा हजर होता, त्याजवर सरकार स्वार जाहले. खवासीत दिवाणसाहेब बसावयाचे परंतु, ते समयास येथें नसोन पुण्यास आपले कामाकरितां गेलें, सबब खवासींत किबेसाहेब बसले. नंतर स्वारी तेथोन चार घटका दिवसाचे सुमारास रवाना झाली.

१ स्वारी मोठ्या वाड्याखालीं लायब्ररीनजीक आली तेव्हां तेथें रिसाल्याकडील स्वारांची सलामी होऊन बुळेसाहेबांकडील खबर आणविण्याकरितां स्वारी कांहीं वेळ थांबली.

१ बुळेसाहेबांची खबर आल्यावर स्वारी तेथोन पुढें जाऊन कप्तानाचे खुंटाजवळ येऊन दाखल होतांच बुळेसाहेबांची स्वारी हत्तीवर बसोन आली. बुळेसाहेबांनीं सरकारांस हत्तीवरून मुजरा करून स्वारीत सामील जाले. बुळेसाहेबांचा हत्ती सरकारचे उजवे बाजूस चालवून बाकी मंडळीचे हत्ती मागें चालले. नंतर स्वारी तेथोन रवाना झाली. तकी पुलावरून

मदरशावरून मुशाफरखान्यातून राणीपुऱ्याचे सडकेने चुनाभट्टीनजीक येऊन दाखल जाहली.

१ रेव्हेन्यूसाहेब दुय्यम असिस्टंट - बारसाहेब हे पेशवाईकरितां येऊन हजर असल्याची खबर आल्यावरून स्वारी धीरेधीरे जुने इंदुराकडून मार्ग छावणीचा येतो, त्या पुलाजवळ आमराईत बारसाहेब हे पांच स्वारानिशी हत्तीवर उभे होते तेथें येऊन पोचली. त्यांनी सरकारची पेशवाई करून, हत्तीवरून सलाम करून बडेसाहेबांचाही सलाम सांगितला. नंतर स्वारी तेथोन रवाना झाली.

१ सरकारसाहेबांची स्वारी बाहुट्याजवळ जाऊन दाखल जाहली. तेथें आपलेकडील पागेचे स्वार व तोफा हजर होत्या. पागेकडील सलामी होऊन स्वारी कोठीजवळ जाऊन दाखल होतांच, तेथें रेसिडेंटीकडील कंपनी व रिसाल्याचे स्वारीची लेन उभी होती. त्यांनीं सलामी करून, स्वारी कोठीवर दाखल होतांच सलामीबद्दल तोफांचे फेर २१ जाहले. स्वारी हत्तीवरून उतरून पालखींत बसली.

१ स्वारी कोठीवरील पांच-चार पायऱ्यांवर दाखल जाहली तो तेथें बरकलीसाहेब अव्वल असिस्टंट हे पेशवाईकरितां उभे होते. त्यांनीं टोपी काढून सरकारांस सलाम करून सरकार पालखीतून खालीं उतरून साहेबांचा हात धरून कोठीचे दरवाजाजवळ स्वारी येऊन दाखल जहाली. तो तेथें मेहरबान बडेसाहेब बहादुर हे लंबेफरशपावेतों उभे होते. त्यांनीं सरकारसाहेबांस सलाम करून सरकारचा हात धरून ज्या ठिकाणीं दरबारची बैठक खुर्च्यांची लागली होती त्या ठिकाणीं सरकारांस बसविलें.

१ सरकारसाहेबांकरितां खुर्ची चांदीची लागली असोन सरकारचे उजवे बाजूस कांहीं अंतरानें बुळेसाहेबांची खुर्ची लागोन त्याच लायनीत दरखदार मानकरी यांच्या खुर्च्या लागल्या होत्या आणि सरकारचे डावे बाजूस बडेसाहेब यांची खुर्ची लागोन बाकी अवांतर साहेब दरबाराकरिता आले ते:

१ मुख्य कर्नेल कडलसाहेब इंजिनिअर
१ कप्तान बरकलीसाहेब
१ कप्तान डाक्टर बालोटसाहेब
१ कर्नल गारडन
१ कप्तान फ्रेंच
१ कर्नेल कर
१४ अवंतरसाहेब लोक सुमारी
---
२०

एकूण वीस साहेब लोक दरबाराकरितां आले, त्यांनीं सरकारसाहेबांस सलाम करून टोप्या उतरून खुर्च्यांवर बसले.

सरकारसाहेबांच्या व मेहरबान बडेसाहेबांची संभाषणें शिष्टाचाराची झाली. मुख्यत्वेंकरून बिमारीसंबंधाचा जिकर जाहला कीं, सफाई शहरची असल्यानें बिमारी कमी

होती. ती केवळ मैलेपणापासूनच बिमारी कमी होते असें नाही. बिमारीस मदत मात्र होते. सरकारसाहेबांनी हेंहीं सांगितले कीं, साल मजकुरी प्रिन्स आफ वेल्स राणी सरकारचे चिरंजीव यांजला बिमारी होऊन नीट जाहले याची मोठी खुषी आहे व त्यायोगानें साल मजकुरचे जन्मगांठींत जास्ती मुबारक समजला पाहिजे.

आपण खुद्द व इतर साहेब लोक यांनीं आमचेकडील मुबारक वर्दी द्यावी. नंतर सरकारनीं मुंबई टाईम्स व दिल्ली-ग्राफची अखबार असें बरोबर नेले होते ते बडेसाहेबांचे हातांत दिल्हे. टाईम्स मध्ये लिहिलें होते कीं रईस लोकांस इंग्रज सरकारनीं चांगले रीतीनें मुदारत केली पाहिजे व त्यांचे हक्कांचे संरक्षण केलें पाहिजे व दिल्ली ग्राफांत लिहिले होते कीं, लार्ड नार्थबुक गव्हर्नर जनरल हे स्वतः काम पाहू चाहतात. सेक्रेटरी वगैरे कोणास बरोबर नेलें नाहीं. साहेबांनीं अखबार घेऊन बोलले कीं, बक्षीजी हे दुनिया, म्हणजे विलायत पाहून आले आहेत, तेव्हां ते अखबार वाचीत असतात किंवा नाही, ह्याप्रमाणें बोलणें झाले.

१ धरम नारायण व सरुप नारायण व रास्ते मामा वगैरेनीं उठोन पानसुपारीची तबके आणोन हजर केली. मेहरबान बडेसाहेब यांनीं उठोन प्रथम सरकारसाहेबांस विड्याचे तबक लाविले होते ते दिले व नंतर अत्तर, गुलाबपाणी दिल्यावर सरकारांस हार घालून हातात गजरे घातले. नंतर बुळेसाहेब व किबेसाहेब यांजला अत्तर, पान, हार-गजरे खुर्चीवर बसोनच दिले. उपरांत वकील, सरनौबत, भीमगीर, बक्षीजी व सुभे महतपूर, रावसाहेब गोरे, नाजीम साहेब, मास्तर, सखाराम गोपाळ खिलारी व शिवरामभाऊ व फणसे यांचे चिरंजीव संताजीराव यांजला बडेसाहेब यांनीं पानसुपारी, अत्तर, गुलाब व हार खुर्चीवर बसोनच दिले.

१ सरकारसाहेबांनीं सरनौबत यांजला हुकुम दिला कीं, पागा व रिसाल्याचे लोकांस रुकसत देऊन रवाना करावे. त्याजवरून सरनौबत यांनीं अर्ज केला कीं, स्वारी ज्या मार्गांनी जाईल, त्या रस्त्यांनीं ते लोक न जातां दुसरें रस्त्यांनीं जातील. स्वारी येथोन रवाना झाल्यावर त्यांची सलामी होवून नंतर रुकसत केलें जातील. म्हणोन अर्ज केल्यावरून ठीक आहे, बोलून कांहीं वेळपर्यंत बसले.

बडे साहेब यांची मेम विलायतेस रजा घेऊन गेली असोन तिची मुलगी तीन वर्षांची येथें ठेऊन गेली. त्या मुलीस बडे साहेबांनीं दाईणीकडोन आणवून आपले मांडीवर घेऊन सरकारास दाखविली. मुलगी अज्ञान सबब सरकारनीं तिचे तोंडावरून हात फिरवून आपले गळ्यातील हार पुष्पाचा काढून मुलीचे गळ्यांत घातला व गजरेही तिचे हातांत घातले. नंतर मुलीस दाईण घेऊन गेली.

१ सरकारसाहेबांची स्वारी खुर्चीवरून उठोन रवाना जाहली. बडे साहेबांनीं कोठीच्या दरवाजापर्यंत पोहचवून वरकलीसाहेब व अव्वल असिस्टंट हे पायऱ्यांपर्यंत पोहचविण्यास आले. सरकार कोठीचे खाली येवून दाखल होतांच, स्वारीकरितां बग्गी लागली होती, त्यांत स्वारी बसून बक्षीजी व किबेसाहेब यांजला घेवून रवाना जाहले. सलामीची कंपनी व स्वार उभे होते त्यांनी सलामी देऊन शिवाय तोफेचे फैर सुमारें एकवीस

२१ सलामीचे जाहाले. बाहुट्याजवळ आल्यावर आपलेकडील पागेचे स्वार व रिसाला उभा होता. त्याची सलामी येऊन स्वारी धार सरकारचे बंगल्यात श्रीमंत नारायणरावसाहेब पवार व रावसाहेब पवार देवासवाले उतरले होते, तेथें स्वारी येऊन दाखल जाहली. कारण नारायणराव साहेबांचा समाचार घ्यावा आणि दुसरा पोशाखही करावा या कारणांनी स्वारी तेथें बंगल्याजवळ दाखल जाहली.

१. सरकारसाहेब बग्गीतून खालीं उतरले तो बग्गीपर्यंत त्यांजकडील दिवाणाचे चिरंजीव केशवराव गणेश व कारभारी यांचे बंधू केशवराव रामचंद्र हे उभयतां येऊन सरकारसाहेबांस माडीवर घेऊन गेले. माडीवरती गाशा किनखापी लागला होता. स्वारी दिवाणखान्याचे दरवाजांत येऊन दाखल जाहली. तेथें नारायणराव बाबासाहेब व रावसाहेब हे उभयतां येऊन सरकारांस मुजरा करून, सरकारांनीं नारायणराव बाबा यांचा हात धरून गाशावर येऊन बसले. उजवेकडे नारायणराव बाबा बसोन डावे बाजूस रावसाहेब बसले.

१ बाबा यांची प्रकृती फारच अशक्त, यांजला चैन पडत नाही किंवा कसे म्हणोन विचारतां कारभारी यांचे बंधू व दिवाणाचे चिरंजीवांनीं कळविलें कीं, दरम्यान कांहीं दिवस ज्वर आल्यानीं प्रकृती अशक्त झाली असोन चांगले चैन पडत नाही, म्हणोन सांगितलें. नंतर विद्याभ्यासाचे विचारल्यावरून तेंही कळविल्यावर सरकारसाहेबांनीं कारभारी यांचे बंधूस सांगितलें कीं, यांचे प्रकृतीस तुम्ही लोकांनी बहुत जपत जावे. नंतर स्वारी उठोन खोलीत पोशाख उतरण्याकरितां गेली. समागमें उभयतां बंधूसही घेऊन गेले.

१ सरकारसाहेबांनीं दरबारचा पोशाख व अलंकार सर्व उतरून साधा पोशाख करून उभयतां बंधूंसह गाशावर येऊन बसले. नंतर नारायणराव बाबा यांनीं सरकारांस विड्याचे तबक दिले. अत्तर, गुलाब, दिल्यावर हार गळ्यांत घातले, नंतर स्वारी उठोन रवाना जाहली. उभयतां बंधूंनी दिवाणखान्याचे दरवाजापावेतों पोहचवून दिवाणाचे चिरंजीव व कारभारी यांचे बंधूंनी बग्गीपर्यंत पोहचवून दिले. नंतर स्वारी बग्गीत बसोन प्रहर दिवसाचे सुमारास हवेलीवर येऊन दाखल जाहली. समागमें मुनशी धरम नारायण हे पोहचविण्याकरितां आले होते.

स्वारी हवेलीवर येऊन मुंढ्यावर बसली. नंतर सखाराम गोपाल यांजला हुकूम दिला की, उदईक पागा व रिसाला यांची हाजरी होण्याचे ठरले होते, परंतु उदईक प्रातःकालीं दरबार तारीख २५ चा होणार करितां उदईक लोकांस हजर न ठेवितां तारीख २६ रोजीं हजर करणे, शिवाय कारखानेनिहाय चिठ्ठ्या जारी करणें. त्याजवरून कारखानेनिहाय चिठ्ठ्या जारी करून दिल्या.

१ उदईक दरबाराकरितां मेहरबान बडेसाहेब येणार त्यांजला निमंत्रण तुम्ही व वकिलांनीं जाऊन करून यावे म्हणोन बक्षीजींस हुकूम झाला. नंतर रावसाहेब गोरे व बापूजी माधव नायक शागीर्दपेशा यांजला हुकूम जाहला कीं, उदईक दरबार नजरबागेंत होईल, करितां, मोठे जबलपुरी मंडप लावून जाग्याची दुरुस्ती करावी. म्हणोन त्याजवरून रावजी यांनी इंजिनिअरास बोलावून जाग्याविषयीची ताकीद करून दिली. कांहीं वेळ थांबून नंतर

स्वारी आंत गेली. नंतर स्नान वगैरे आंतच होवून थाळा झाल्यावर आराम केला.

१ अस्तमानाचें सुमारास स्वारी बाहेर आली. बक्षीजी व वकीलसाहेब छावणींत जाऊन बडेसाहेब यांजला दरबारांत येणेंविषयीचे निमंत्रण करून आले. नंतर सरकारसाहेब व बक्षीजी व वकील यांचा एकांत नजरबागेत सहा घटका रात्रीपर्यंत होऊन नंतर थाळ्यावर जाऊन थाळा झाल्यावर आराम केला. **(पळसीकर दिवाणसाहेब यांचे दप्तर)**

रोजनामचा तारीख २५ माहे मे इ. स. १८७२ मिती वैशाख वद्य ३ रोज शनिवार मुक्काम इंदूर. संमत १९२८.

१ तारीख मजकुरीं व्हिक्टोरिया राणीसरकारचे जन्मगाठींबद्दल दरबार होणेकरितां सरकारसाहेबांची स्वारी प्रातःकाळीं उठोन मुखमार्जन करून पोशाख आंतच करून अलंकार व तगमा घालोन स्वारी दोन घटका दिवसाचे सुमारास बाहेर येऊन मुंढ्यावर बसली. बक्षीजी व किबेसाहेब, सरनौबत, सुभे महदपूर, वकील रेसिडेंन्सी इंदूर, नाजीमसाहेब व रावजी गोरे आदि करून मंडळीचे मुजरे जाहले. नंतर शिवराम गोपाळ हे इंग्रजी बुक वाचीत राहिले असोन इंग्रजी अखबाराची सुनवाई नाजीमसाहेब हे करीत राहिले.

१ मेहरबान डेलीसाहेब रेसिडेंट इंदूर व बरकलीसाहेब व बारसाहेब व जनरलसाहेब महुवाले वगैरे साहेब लोक दरबाराकरितां येणार. त्यांजला आणावयाकरितां सरकारांतून चार बग्या पाठविल्या असोन शिवाय खबरेकरितां डाक लाविली होती. साहेब तेथोन रवाना जाहल्याची खबर परशराम दफेदार याने दिल्यावर स्वारी मुंढ्यावरून उठोन खालील चौकांत आली. नंतर उभयतां बाळासाहेबांसह सरकार स्वारी हवेलीचे बाहेर आली. तेथें सलामीकरितां बिजे गणेश पागेची कंपनी दलबादल बंगल्यानजीक पूर्वेस तोंड करून उभी राहिली असून मोठा ब्यांड नजरबागेत होता. त्यांची सलामी सरकारांस जाहली व तोफांचे फैर २१ ची सलामी जाहली.

१ दरबाराकरितां मोठा जबलपुरी मंडप नजरबागेंत हवेलीचे समोर लावोन खुर्च्यांची बैठक करविली होती. तेथें सरकारस्वारी जाऊन बसली व डावेकडे उभयतां बाळासाहेबांकरितां चांदीच्या खुर्च्या लागोन वरती भरगच्चीचे गाशे टाकिले होते. वरकड दरबारचे अहलकार मंडळीच्या खुर्च्या डावे बाजूस लागल्या होत्या. त्या खुर्च्यांवर दरकदार व मानकरी मंडळी हे यादीबरहुकुम येऊन बसले. नंतर साहेबांची खबर बापूजी माधव नायब शागीर्दपेशा हे देत राहिले.

१ तीन साडेतीन घटका दिवसाचे सुमारास मेहरबान डेलीसाहेब व जनरल महुवाले व बरकलीसाहेब आणि बारसाहेब वगैरे साहेब लोक सुमारें १७ हे बग्गीत बसून आले. वाड्याखाली रिसाला उभा होता. त्याची सलामी होऊन हवेलीनजीक बिजे गणेश पागेजी व ब्यांडबाजाची सलामी होऊन साहेब मोसूफ हे हवेलीजवळ येऊन दाखल जाहले.

१ साहेब लोक बग्गीतून खालीं उतरले तेथपर्यंत रामचंद्र विठ्ठल वकील व बक्षी खुमानसिंग यांनीं पेशवाई करून बिछायतीचे जागी सरकारसाहेब व उभयतां बाळासाहेब

उभे होते. डेलीसाहेब वगैरे साहेब लोक यांनीं वर्द्या उतरून सरकारसाहेबांस सलाम केला. नंतर डेलीसाहेबांचा हात सरकारांनीं धरून सरकारांचे उजवे बाजूस त्यांची व जनरलसाहेबांची खुर्ची लागोन वरती भरगच्चीचे गासे टाकिले होते, त्या खुर्च्यांवर उभयतांस आणोन बसविले. अवंतर साहेब लोक सुमारें १५ च्या खुर्च्या सरकारचे उजवे बाजूस लागल्या होत्या. तेव्हां डेलीसाहेबांच्या सलामीचे फेर व जनरलसाहेबांचे फेर मिळून २४ फेर तोफेचे झाले आणि ब्यांडही सुरू जाहला.

१ डेलीसाहेब यांचे व सरकारसाहेबांचे दोन घटकापावेतों संभाषण शिष्टाचाराचे होत राहिले. नंतर साहेबांनीं उभयतां बाळासाहेबांस विद्याभ्यास किती जाहल्याबद्दल विचारून आपण आमचेकडे कधी आला नाहीं. नंतर कांहीं वेळपावेतों गोष्टी जाहल्यावर पानसुपारी आणविली.

१ सबनीसांनीं पानसुपारी अत्तर, गुलाबपाणी व हार-गजऱ्याचे थाळे आणोन हजर केलें. नंतर बक्षीजींनीं उठून डेलीसाहेबांकरितां जे तबक सोनेरी सामानाचे विड्याचे लागले ते सरकारसाहेबांचे हातात देऊन सरकारांनीं साहेबांस दिलें. नंतर काडीनें अत्तर रुमालास लावोन हार व गजरे घातले आणि गुलाबपाणी हजाऱ्यांनी उडविलें. याचप्रमाणें जनरलसाहेब यांजलाही दिले. बाकीचे साहेब यांजला पानसुपारी बक्षीजींनी देऊन वकिलांनीं हार सर्वत्रांचे गळ्यांत घातले. अत्तर, गुलाबपाणी हे सबनीसांनीं दिले. दरबाराचे समयीं ब्यांडबाजा सुरू असून रामजणीचा नाचही होत राहिला. कांहीं वेळ साहेब हे थांबून पाराजीराव होळकर यांजला काशीरावदादासाहेब यांचे तब्येतीची हालहवाल विचारल्यावर रावसाहेबांनीं सांगितले कीं प्रकृती चांगली झाली नाही. त्यावर आमचा बहुत बहुत सलाम सांगांवा म्हणून डेलीसाहेब हे खुर्चीवरून उठले. सरकारसाहेबांनीं बिछायतीपर्यंत पोहचवून सर्वत्र साहेबांचे हातासी हात सरकार व बाळासाहेबांनीं मिळवून साहेब रवाना झाले. बग्गीपर्यंत बक्षीजी व वकील हे उभयतां पोहचविणेस गेले. पांच घटका दिवसाचे सुमारास साहेब रवाना झाले.

१ सरकारसाहेबांची स्वारी उभयतां बाळासाहेबांसह परत येऊन खुर्चीवर बसली. नंतर बक्षीजींसी कांहीं जिकर मागील बुकातील तवारीख (ऐतिहासिक) करीत राहिले. नंतर सबनीसांनी सर्वत्र मंडळीस पानसुपारी दिल्यावर सरकारस्वारी उठोन हवेलीत जाऊन आंत गेली.

१ पोषाख व अलंकार हे आंतच उतरून दुसरा पोषाख करून स्वारी बाहेर आली. नाजीमसाहेब व रामजी वकील यांच्याशीं गोष्टी होऊन सुभे महतपूर यांस हुकूम दिला की इस्तमुरारी ठरावाची कलमबंदी तुम्ही व लालजी अंबाजी यांनी काशीरावदादांचे हवेलीवर घेऊन यावी.

१ आज रोजीं भाऊसाहेब होळकरांचे श्राद्धाकरितां दादासाहेबांचे येथेंच थाळे होणार सबब शिकारी गाडी आणविणेविषयीं हुकूम दिल्याप्रमाणें गाड्या २ हजर जाहल्या आणि सरकारस्वारी आत गेली व स्नान, पूजा होऊन पोषाख करून स्वारी उभयतां

बाळासाहेबांसह शिकारी गाडीत स्वार होऊन दादासाहेबांचे येथें गेले. तेथें गेल्यावर कांहीं वेळ आराम केला.

१ तिसऱ्या प्रहरचे सुमारास स्वारी बाहेर आली. रावजी गोरे आणि सुभे महतपूर यांनीं इस्तमुरारी ठरावाचीं कलमें वाचून दाखविली. मार्तण्ड गणेश निसबत खासगी यांनींही खासगीकडील रिपोर्टाची सुनवाई केली. नंतर मागील दोन घटका दिवस राहतांना सरकारसाहेबांनीं उभयतां बाळासाहेबांसह थाळा करून बाळासाहेबांस पुढें रवाना करून दिले. नंतर रावसाहेब गोरे यांनीं इस्तमुरार ठराव यादीपैकीं आणखीन एक दोन कलमें दाखविली. दादासाहेबांसह शिकारी गाडीत स्वार होऊन नजरबागेचे हवेलीवर दाखल जाहले व मंडळीस रुकसत दिली.

**(दिवाण साहेबांचे रेकार्ड)**

यादी तारीख १ माहे नोव्हेंबर इ. स. १८७२ रोजीं सायंकाळीं पांच वाजतां तगम्याचे (म्हणजे इंग्रज सरकारकडून बहुमानाचे कांहीं टायटल मिळाले त्याचे दर्शक). दरबाराकरितां मेहरबान बडेसाहेब जनरल डेलीसाहेब वगैरे साहेब येतील त्याबद्दल व्यवस्था खाली लिहिलेप्रमाणें सन १२८२ फसली.

१ उदईक प्रातःकाळीं आठ वाजतां बडेसाहेब वगैरे साहेबलोकांस निमंत्रण देण्याकरितां दिवाणसाहेब व बक्षीजीसाहेब व वकील असें आठ वाजतां जातील. करितां बग्गी व मामुलीप्रमाणें अरदली तयार रहावी.

१ दरबार पांच वाजतां सायंकाळीं होईल गणेशसभेत, अगर ज्या ठिकाणीं सरकारसाहेब हुकूम देतील तेथें दरबारची जागा केली जाऊन बैठक खुर्च्यांची केली जावी.

१ तीन प्रहरा बग्या ३ कोठीवर पाठविल्या जाव्या व अरदलीचे स्वार मामुलीप्रमाणें पाठविले जावे. साहेबलोक बरेच येण्याचा संभव आहे.

१ सलामीकरितां रिसाला एक, डंकानिशाणसुद्धां माणिक चौकाचे मारुतीजवळ दक्षिणेस तोंड करून उभा केला जावा आणि पलटणपैकीं एक कंपनी दलबादल बंगल्याजवळ पूर्वेस तोंड करून उभी केली जावी.

१ मोठा ब्यांडबाजा नजरबागेंत हाजर ठेवावा.

१ मामुलीप्रमाणें डाकेचा बंदोबस्त ठेविला जावा. चुनाभट्टीपासून कोठीपावेतों स्वारांची डाक व चुनाभट्टीपासून वाड्यापावेतों हलकाऱ्यांची डाक बसविली जावी.

१ बग्गीपावेतों पेशवाईस दिवाणसाहेब व बक्षीजी व वकील असें जातील.

१ सरकारसाहेबांनीं गणेशसभेचे दरवाजापावेतों अगर जेथें बैठक करणेचा हुकुम होईल तेथें लंबेफरशपावेतों पेशवाई करतील.

१ सरकारसाहेब खुर्चीवर येऊन बसतील ते वेळेस २१ तोफेचे फेराची सलामी

केली जाईल. बडेसाहेब वगैरे साहेबलोक खुर्चीवर येऊन बसतील तेवेळेस १३ तोफांची सलामी केली जाईल.

१ सरकारसाहेब तगमा घालतील. करितां तो तगमा पोशाखवाल्यांनीं पोशाखांत हजर ठेवावा.

१ पानसुपारी व हारगजरे वगैरेंचा इंतजाम ठेवला जावा.

थोडा वेळ संभाषण होऊन रुकसत होईल त्यावेळीं बग्या व मशालची तयार रहावे.

येणेंप्रमाणें बंदोबस्त राहणेविषयीं कारखानेनिहाय चिठ्ठ्या जारी केल्या जाऊन बंदोबस्त केला जावा. ता. ३१ आक्टोबर इ. स. १८७२.

**(दिवाणसाहेब पळसीकर ह्यांचें दप्तर)**



**प्रकरण २५ वें**

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर सरकार यांचा राज्यकारभार व प्रवास इ. स. १८७५ ते १८७६

सर टी. माधवराव इ. स. १८७५ च्या एप्रिल महिन्यांत बडोद्याचे कारभारी झाले. इंदुरास आर. रघुनाथराव कारभारी झाले. बक्षी खुमानसिंगजी यांचे रोजनामच्यावरून इ. स. १८७५-७६ ची हकीगत खालीं देत आहो.

एप्रिल महिन्यांत रशियाचे राजपुत्र इंदुरास आले होते. ते बडेसाहेबांकडे उतरले, शिवनीस शिकारीकरितां गेले. काशीरावदादाही त्यांजबरोबर गेले होते. सरकारस्वारी मागाहून गेली व ता. ४ मे रोजीं परत आली.

ता. १३ मे रोजीं सरकारांनीं बक्षीजींच्या क्याव्हलरी आणि हुजरातीची हजेरी घेतली. स्वारी प्रसन्न झाली. विनायक जनार्दन कीर्तने यांस सर टी. माधवराव साहेबांनीं बडोद्यास मोठी जागा देऊं केल्यानें ते तेथें जाणार म्हणोन त्यांस मदरशांत बक्षीजी व इतर अधिकाऱ्यांनीं पानसुपारी ता. १५ मे रोजीं देऊन मानपत्र दिलें. इंजिनिअर केरीसाहेबांस आणखीन पांच वर्षे ठेवण्याचे डेलीसाहेबांचे शिफारशीवरून सरकारांनीं मंजूर केलें.

ता. २४ मे रोजीं बादशहाजादीचे जन्मगाठींचा दरबार छावणीत होता. सरकारस्वारीं दरबारास बक्षीजींसह गेली होती. ता.२५ रोजीं लालबागेत दरबार झाला. बडेसाहेबांस आणण्यास दिवाणसाहेब व बक्षीजी पेशवाईस गेले होते. रात्रौ रशियन राजपुत्रास सरकारांनीं मेजवानी दिली.

ता. २५ जुलाईस श्रीमंत सरकारांची जन्मगांठ होती. तब्येत चांगली नसल्यामुळें सरकारस्वारी सूतयंत्राचे बंगल्यांत राहत असें. सबब जन्मगाठीचा दरबार तेथेंच झाला. सर हेनरी डेलीसाहेब दरबाराकरितां आले होते. दिवाणसाहेब, बक्षीजी व रामजी वकील पेशवाईस गेले होते.

ता. १२ आगस्ट रोजीं सर हेनरी डेलीसाहेब तिसऱ्या प्रहरीं सरकारांचे भेटीस स्टेट मिल्सवर आले. प्रिन्स आफ वेल्स पुढच्या हिवाळ्यांत हिंदुस्थान पाहण्यास येणार सबब इंदुरी त्यांचे आगमन होण्यासंबंधात बोलणें झालें. ता. ४ सप्टेंबर रोजीं प्रिन्स आफ वेल्स यांस आमंत्रणाचा खलिता लाटसाहेबांचे नांवें तयार झाला. तो बडेसाहेबांकडे सर काशीरावदादा, बक्षीजी व दिवाण साहेब यांचेबरोबर पाठविला. दुसरें एक पत्र खानदेशचे सरहद्दीबद्दल बडेसाहेबांकडे पाठविले.

ता. १३ सप्टेंबर रोजीं मिस्टर केरी इंजिनिअर आणि बक्षीजी, यांनीं जुने वाड्यांत प्रिन्स आफ वेल्स करितां एक मोठा दरबार हॉल बांधण्याचा विचार ठरल्यानें प्लान तयार केला.

ता. ११ नोव्हेंबर रोजीं लार्ड नार्थब्रुकसाहेब यावयाचे म्हणून लालबागेंत तयारी चालली. सर्व फौज बरोबर घेऊन रेसिडेंसी फाटकापासून तीन मैलपावेतों शेमरूडचे सडकेवर फौज जमविली आणि तिसरे मैलावर सरकारांकरितां शामियाना लाविला. सलामी करितां अर्धा तोफखाना तेथें ठेविला. लार्ड नार्थब्रुकसाहेब चोरलपावेतों रेल्वेतून आले आणि तेथून बग्गीतून साडेसहा वाजतां आले. तिसरें मैलावर सरकारांची भेट झाली व तोफेची सलामी झाली. सरकारांनीं लाटसाहेबांचे बग्गीत बसून बडेसाहेबांचे कोठीपर्यंत पोहचविले. ता. १२ रोजीं सरकारस्वारी लाटसाहेबांस भेटावयास बडेसाहेबांचे कोठीवर गेली. सरकारस्वारी समागमें सरदार मंडळीही गेली. धरम नारायण मुनशी हे पेशवाईस आले होते. वरकड साहेब केरीसाहेबांचे बंगल्यापावेतों पेशवाईस आले होते. सरकारची भेट झाल्यानंतर आपले सरदारांनी लाटसाहेबांस एक एक मोहर नजर म्हणून दाखविली. लाटसाहेबांनी हस्तस्पर्श करून परत केली. संध्याकाळीं लाटसाहेबांनीं सरकारांस परतभेट दिली. लाटसाहेब लालबागेत आले व दरबार झाला. सलामीच्या तोफा झाल्या. रात्रौ सरकारांकडून मेजवानी झाली. ता. १३ रोजीं लाटसाहेबांनीं सूतयंत्र पाहिले. ता. १४ रोजीं सरकारांनीं लाटसाहेबांची भेट घेतली. मिठाचे महसुलाबद्दल व टाकसाळीबद्दल बोलणें झालें.

ता. १५ नोव्हेंबर रोजीं लाटसाहेबांचा कूच दहा वाजतां होऊन महू छावणीस गेले. बिजलपुरपावेतों फौजेची लाईन जमवून सलामी दिली. जातांना सरकारस्वारी लाटसाहेबांच्या भेटीस गेली होती.

मिस्टर इस्टविकसाहेब पार्लमेंट मेंबर इंदुरास येणार सबब ता. २१ नोव्हेंबर रोजीं लालबागेत त्यांचे उतरण्याकरितां डेरे वगैरे लाविले. रात्रौ आठ वाजतां आले. ता. २२ रोजीं सरकारस्वारी त्यांचे भेटीस गेली. इस्टविकसाहेब बारद्वारींत येऊन बोलणें झालें व स्वारी वाड्यांत गेली. ता. २७ नोव्हेंबरास इस्टविकसाहेबांस वाड्यांत बोलावून सरकारांनीं पोशाख

देऊन रुकसत केलें. ते मुंबईस रवाना झाले.

डिसेंबरांत सरकारस्वारी जनानखान्यासुद्धां कलकत्त्यास गेली. स्टेशनवर सरकारचे सलामीकरितां गार्ड आफ आनर आला होता. इ. स. १८७६ च्या जानेवारीत संक्रांतीचे सुमारास सरकारस्वारी परत बडवाय मुक्कामीं दाखल झाली.

वरील मजकुर बक्षीजींच्या रोजनामच्यावरून घेतला आहे.कारभारी नेमले गेल्यानें सरकारी अहवाल बाहेर पडण्याचा उपक्रम सुरु झाला आणि त्यावर साधकबाधक टीका बडेसाहेबांकडून बाहेर पडूं लागली. सर टी. माधवरावांच्या पश्चात आर. रघुनाथराव कारभारी झाले. त्यांच्या पहिल्याच अहवालांत ते अधिक विस्तृत माहिती देऊ लागले. ती माहिती आतां आम्ही नमूद करतो.

**न्यायदान :** संस्थानांत एकंदर ६५ न्यायाधीश आणि ९८ म्याजिस्ट्रेट आहेत. न्यायदान व्यवस्थित चाललें आहे. यावर बडेसाहेबांकडून टीका आली कीं अधिकारी पूर्वीचेच पण त्यांची नामाभिधानें बदलली आहेत. पूर्वीचे अमीन आणि वहिवाटदार यांस न्यायाधीश व म्याजिस्ट्रेट बनविले आहेत. बाहेरून फरक केला आहे, अंतर्यामांत झालेला दिसत नाहीं.

**मुलकी जमाबंदी :** अठ्ठावीस अधिकारी इकडे गुंतले आहेत. ब्रिटिश मुलखांत असणाऱ्या तहसीलदारांच्या जोडीचे हे आहेत.

**डाक खातें :** संस्थानचे भाग कांहीं ठिकाणीं अलग व दूर पडल्यानें खात्याच्या सुयंत्रितपणास व्यत्यय येतो. नवीन घटना बनत आहे.

**इंजिनिअरिंग खातें :** हे खाते मि. केरीसाहेबांकडे आहे. धार देपाळपूर रस्ते बहुतेक तयार झाले आहेत. सावेर रस्त्यांस प्रारंभ झाला असून एक पूल संस्थानांत तयार झाला आहे. शहरांत पाणी आणण्यासाठीं नळाची योजना झाली आहे. साडेसहा मैलपर्यंत रस्त्याच्या दुतर्फा झाडे लाविली आहेत. चारशें कैदी राहतील असा एक नवा तुरुंग बांधला जात आहे. सव्वा लक्षपर्यंत खर्च जाईल. इंदूर आणि धार संस्थानच्या काकडझगड्यांत मिनोरे उभारण्यांत केरी साहेबांनीं हातभार लाविला होता.

श्रीमंत सरकारसाहेबांचे मनांत भलेमोठे निवाणखातें उपस्थित करण्याचे आहे आणि त्यांसंबंधात योजना तयार करण्याचे कार्य केरीसाहेबांकडे सोंपविले आहे.

**पोलीस खातें :** एकंदर काम समाधानकारक चालू आहे. ब्रिटिश मुलखांत घडलेले गुन्हे हुडकून काढण्यांत बरीच मदत झाली. त्याचप्रमाणें धाडे घालणाऱ्यांचा छडा लागला गेला.

**आरोग्य खातें :** रोग्यांची संख्या वाढत चालली ही गोष्ट श्रीमंतांच्या लक्षांत आल्यावर दहा हजारांची देणगी इमारतीकरितां देण्यांत आली. त्याचप्रमाणें आरोग्याचे अनेक मार्ग अवलंबिले जात आहेत. शहराच्या निरनिराळ्या भागांतून मोऱ्या तयार झाल्या आहेत. सडका चांगल्या बांधल्या जात आहेत. मैला वाहून नेण्यासाठी गाड्यांची व माणसांची सोय झाली आहे. केरोसिनचे दिवे रस्त्यांतून लावले गेले आहेत. रस्ते शिंपले जातात. तुरुंगातून आरोग्याची व्यवस्था फार बारकाईनें पाहिली जाते. तेथें मृत्यूची संख्या शेंकडा

तीहीं वर जात नाहीं.

फसली सन १२८३-८४ चा जमा खर्च (इसवी सन १८७४) खालीलप्रमाणें आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| जमीनसारा | ३३८६००० | कस्टम्स | ६३०००० |
| अबकारी | ११७००० | नजराणा, टाका | १५८००० |
| स्टांम्प्स | ४८००० | दंड | ५४००० |
| सूतयंत्र | ७१००० | व्याज | ३२०००० |
| किरकोळ | २०८००० | डाकखातें | ४००० |
| टाकसाळ | ४००० | .... | .... |

येकुण उत्पन्न पन्नास लक्ष ५००००००

**खर्चाचा तपशील**

| | | | |
|---|---|---|---|
| राजवाडा निसबत | १०२०००० | बद्दल मुशाहिरा खर्च | ७०९००० |
| धार्मिक खर्च | ३३००० | दानधर्म | ११३००० |
| लष्कर फौज | ८५४००० | पोलिस | ५०३००० |
| कोर्टे | ७९००० | तुरूंग खातें | २२००० |
| शिक्षण खातें | २८००० | डाकखातें | १४००० |
| पैमास खातें | २०००० | इंजिनिअरिंग खातें | १५०००० |
| दवाखाने | १२००० | पेन्शन | ९००० |
| रेल्वे | ११००००० | कांटिजंटी खर्च | २३८००० |
| सूट खातें | २६१००० | सूतयंत्र खातें | १८७००० |
| किरकोळ खर्च | १४३००० | | |

येकुण खर्च हल्लीं शिक्का रुपये ५४,९५,००० चौपन्न लक्ष पंच्याण्णव हजार

**कस्टम्स खातें** : नियमावली दुरुस्त झाली असून नवीन नियम लौकरच अंमलात येतील.

**लष्कर आणि पोलिस** : लष्करपैकीं १३२४ घोडे आणि १०६६ माणसें पोलिस काम करीत आहेत. यावर बडेसाहेबांकडून टीका झाली कीं होळकर सरकारचे लष्करांस जे शिक्षण मिळावयास पाहिजे ते अजून दिले जात नाहीं. त्यामुळें पोलिस आणि लष्करांतील माणसांत योग्य अंतर दिसून येत नाही म्हणून म्हणावे लागते कीं, सालोसाल या खात्यावर खर्च होणारे बारा लाख रुपये संस्थानच्या गरजेस आवश्यक नाहींत.

**शिक्षण खातें** : श्रीमंत सरकारांनीं शिक्षण खात्याची देणगी बारा हजारांनी वाढविली.

**अमीर उमराव** : ब्रिटिश ग्यारंटिड असलेल्या उमरावांची अशी समजूत होती कीं चोरचिकार यांची वर्दी देणें, त्यांस हुडकून काढणें इत्यादि कामात पोलिसास मदत देणें त्यांचे कर्तव्य नाही पण आतां ते उमगले आहेत कीं, टाळाटुळी करण्यांत ब्रिटिश सरकारांकडून त्यांस पाठिंबा मिळणार नाही.

**जंगल खातें (फारेस्ट) :** मिस्टर केरीसाहेब या खात्याकडे लक्ष पुरवित आहेत. नवीन लागवड सुरू आहे.

**पैमास खातें :** नेमावर जिल्ह्याची पैमास करण्यासाठीं हें खाते सव्वा लाख खर्च करून सुरू झालें आहे.

अहवाल लिहिण्याची प्रथा तर टी. माधवराव यांनीं काढिली. त्या प्रथेची वाढ आणि विस्तार पुढें आर. रघुनाथरावांनीं केला. इ. स. १८७४-७५ चे अहवालावर रेसिडेंसीतून एकदोन बाबींत टीका झाली ती तर आम्ही वर दिलीच आहे.

ती टीका मनीं बाळगून दुरुस्तीही झाल्या. त्या पुढील अहवालात येतीलच. सारांश, आर. रघुनाथरावांचे कर्तृत्व जसजसे विस्तृत झाले तसतसे ते अहवालांत प्रतिबिंबीतही होत गेले.

सन १८७५-७६ चा अहवाल : पहिली गोष्ट ही आहे कीं, हा अहवाल श्रीमंत सरकारांस त्यांनीं सादर केला. हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल या बाजूस प्रथमच वळले. प्रिन्स आफ वेल्स हे हिंदुस्थानांत येऊन कलकत्याचे मोठे दरबारांत सरकारस्वारीही सामील झाली. प्रिन्स आफ वेल्स यांनीं इंदुरास भेटी दिली. सरकारांकडून आदरातिथ्य घराण्याच्या नावलौकिकाप्रमाणेंच झाले.

**रेल्वे :** इंदूर आणि चोरल यामधील वीस मैलांचे अंतर अजून भरावयाचे आहे. नीमच रेल्वेसाठी ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं जमिनीसाठी उचल केली आहे. ते काम संपण्याचे बेतांत आहे.

**मीठ :** हिंदुस्थान सरकारनें इंदूर संस्थानांत चांगले मीठ योग्य किंमतीपर्यंत देण्याचें ठरविले आहे. हलके मीठ बाजारात मिळणारच नाही. त्यानिमित्त एक खातें उघडले आहे. वर्षभर याची प्रचिती घ्यायची आहे. याबद्दल दोन्ही सरकारांची तयारी आहे.

**टांकसाळ :** तुमच्याच तोडीच्या रुपयाप्रमाणें आमचा रुपया तुम्ही पाडून द्यावा अशा अर्थाची इकडून झालेली विनंती स्टेट सेक्रेटरींनीं मान्य केली आहे. सरकारांनीं कांहीं अटीही घातल्या आहेत. मुख्य हेतू हाच कीं, व्यापाराचे वाढीला कृत्रिम अडचणी राहू नयेत.

**डाक खातें :** ब्रिटिश सरकार आणि होळकर सरकार यांच्या मुलुखांतील डाकेची नेआण सहकार्ये व्हावी म्हणून नुकतीच व्यवस्था केली आहे.

**कर :** श्रीओंकारेश्वरास येणाऱ्या यात्रेकरूंवरील आजपर्यंत असलेला कर श्रीमंतांनीं कृपाळुपणें उठविला. त्याचप्रमाणें नर्मदेतून जाणारे-येणारे इमारती लाकडावरही कृपादृष्टी केली. यावरून श्रीमंतांची दृष्टी कशी चौफेर वावरत असें हे दिसून येईल. तसेंच अर्थशास्त्राचीही त्यांची माहिती बाहेर पडते.

**अबकारी :** विषारी दारू लोकांपासून दूर रहावी व दारूपान आटोक्यात रहावे इत्यादि दृष्टीनीं महू आणि इंदूर येथील अबकारी खातें एकाच अधिकाऱ्याचे हाती देण्यांत आलें आहे.

**कायदेकानून :** आतांपर्यंत कायदेकानून जाहीर प्रसिद्ध नव्हते. तेव्हां अनेक सुसंस्कृत देशातील कायदेकानू आणून व स्मृत्यादिकांचा परामर्ष घेऊन कायदेकानूची घटना होत आहे.

**न्यायदान** : अहवालाच्या वर्षी न्यायदानाचे खातें वरपासून खालपर्यंत एकमेकास सहायक असें रचविले आहे. सदरकोर्ट, त्याच्याखालीं सहा प्रतीच्या जिल्हा कोर्टांची रचना. एका बाजूस मुलकी तर दुसरें बाजूस फौजदारी अशी व्यवस्था केली आहे. अधिकार खालीलपासून वर वाढत वाढत गेले. अपिलाची सवलत सर्वांस मोकळी ठेविली आहे. ज्यूरीची पद्धत सुरू केली याबद्दल बडेसाहेबांकडून अभिनंदन झालें. वर्षांत जवळजवळ दहा हजार फौजदारी खटले सुनावले गेले व सात हजार एकुणसत्तर माणसांस शिक्षा झाली. सात हजार पांचशें चव्वेचाळीस निर्दोष झाले. मुलकी मुकदमे सहा हजार फाइल झाले. त्यापैकीं साडेतीन हजार निकालांत आले. कारभारीसाहेब अहवाल लिहूनच स्वस्थ बसले नाहीत. चालू न्यायपद्धती आणि तिच्या सर्वव्यापी अंगोपांगात फेरफार कोठें करतां येण्यासारखा आहे हेही दाखविले आहे. मुदतीच्या कायद्यांत फेरफार सुचविले आहेत. त्याचप्रमाणें जिल्हा जज्जांनी दौरे काढावे अशी सूचना करूनच ते राहिले नाहीत. अहवालांत लिहितात कीं अनुभवून व अजमावूनही पाहिले आहे.

बडवाहा आणि इंदूर येथील व्यापार रेल्वेमुळें वाढता आहे. तेव्हां येथील न्यायदान झटपट झाले पाहिजे म्हणून स्थानिक कायद्यांत त्यांनीं सवलती दिल्या. राजधानीच्या ठिकाणीं गरिबांकरिता वकील नेमले. सारांश, त्यांची ''सर्वांठायीं सावधानता'' वाखाणण्यासारखी आहे.

**खासगी** : श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, आम्ही खासगीकडेही लक्ष पुरवावे. त्या आज्ञेनुसार काम पाहिले. नायब दिवाणांचें काम नांवाजण्यासारखें आहे.

**तुरूंग खातें** : श्रीमंतांनीं जे कायदे आज्ञापिले तेच चालू केलें. मध्य प्रांतांत कायद्याचे स्वरूप आहे तेच आमचेकडे ठेवण्यांत आले आहे. डाक्टर ब्युमंट आपल्या अहवालांत कळवितात कीं, कैद्यांची सरासरी वर्षांत चारशें अकरा होती. यात सरासरी आजारी शेकडा सव्वादोन.

**आरोग्य खातें** : बक्षी खुमानसिंग यांचे श्रम वाखाणण्यासारखे आहेत. रस्ते स्वच्छ असून सुस्थितीत आहेत. मैला पाणी वाहून काढण्याचे काम गटारी बांधून चालू आहे. वाहून नेलेला मैला सोनखताप्रमाणें उपयोगिल्यास दुहेरी फायदा होईल.

**देवी टोचणें** : श्रीमंतांनीं हें खातें वाढविलें. लस टोचणारे नऊ अधिकारी आणि एक इन्स्पेक्टर नेमण्यांत आले. दोन हजार मुलांस देवी टोचल्या गेल्या.

**म्युनिसिपालिटी** : व्यापार, घरे इत्यादिकांवर कर बसवून म्युनिसिपालिटीनें २८००० रुपये जमा केलें; व सरकारचे १२००० मिळून वार्षिक उत्पन्न ४०००० झाले. यांपैकीं ३५००० खर्च झाले. आगी विझविणारा बंब, पाण्याच्या गाड्या इत्यादिकांचा खर्च ७००० जवळ येईल. दिवाबत्तीकडे २६००, गटारें व रस्ते बनविण्याकडे १७५०० लागले जमीनमालकास भरपाई ३५०० झाली आहे.

**व्यापार** : शहरातील व संस्थानांतील व्यापार मंदावले आहेत. चौकशीकरितां अनेक मते बाहेर येतात तरी पण आम्हास असें वाटतें कीं, सधन व निर्धन अशा दोन्ही वर्गांत

सट्टा बेसुमार वाढत आहे.

**सूतयंत्र** : धोतरजोडे आणि इतर कापड मिळून एक लक्षाची गणती झाली. त्याचें वजन चार लाख पौंड होईल. आमचा माल मुंबईच्या गिरण्यापेक्षांही सुबक निघतो असें गिऱ्हाइकांचे मत आहे. माल शिप्री, गुणा, ग्वाल्हेर, आगरा आणि दिल्लीपर्यंत जाऊन पोंहचतो. एकंदर मालाची विक्री वजनी पावणें पांच लाख पौंड झाली आहे.

**छापखाना** : या खात्यांत वाढ झाली आहे. इंग्रेजी व मराठी टाइप युक्त दोन मोठीं यंत्रे विकत घेतली आहेत. सरकारी ग्याझेट येथूनच निघते. तुरुंग व ज्यूरी संबंधाची नियमावली येथून बाहेर पडली आहे. शिक्षण खात्याला लागणारी पुस्तकें येथून छापवावीं असा विचार आहे.

**डाकखाना** : एकंदर चोवीस आफिसें आहेत. खर्च १३५०० रुपये झाला. उत्पन्न रु.६,२५० झाले.

**शिक्षण खातें** : मुंबई विश्वविद्यालयाचे एम.ए.उपाधी असलेले गृहस्थ या खात्यांत मुख्य आहेत. एकंदर संस्थानांत ७७ शाळा आहेत. शिक्षकांची संख्या ९९ आहे. विद्यार्थी ३२०० आहेत. केवळ शिक्षणाचा खर्च २३००० रुपये आहे. तपासणी व देखरेख खर्च अलाहिदा आहे. इंदुरात एक हायस्कूल आणि एक कायद्याची शाळा आहे. दुय्यम इंग्रेजी, मराठी शिकविणाऱ्या दोन शाळा जिल्हानिहाय आहेत. संस्कृत आणि पारशी शाळा प्रत्येकीं आठ आठ आहेत. मराठी शाळा सात आणि हिंदी शाळा पस्तीस आहेत. तेरा शाळा अशा आहेत कीं, तेथें मराठी आणि हिंदी दोन्ही भाषा शिकविल्या जातात. इंदुरांत मुलींसाठीं दोन शाळा आहेत. शिक्षणावर खर्च ३३००० झाला. हें कार्य पुढें वाढविण्याचे आहे. येथें एका गोष्टींचा उल्लेख केल्यावाचून राहवत नाही. ती ही कीं जें शिक्षण आम्हां हिंदवासीयांस आज तीस वर्षांत मिळत आहे त्यानें शरीरयष्टी खालावत चालली आहे. आळा घालण्याचा आम्ही विचार करून राहिलो आहोत. सरकारांस अशी विनंती आहे की, धावणें, घोड्यावर बसणें व कांहीं पटाईतपणा दाखविणें हे ज्ञानाबरोबरच अवश्य गणलें जावे. त्या व्यतिरिक्त केवळ कलेतील वा शास्त्रांतील प्राविण्यानें, सरकारी नोकरीत प्रवेश मिळणार नाही असा निर्बंध करावा.

**इंजिनिअरिंग** : हे खातें केरीसाहेबांच्या हाताखालीं आहे. एक लोखंडी दिवाणखाना शहराचे बाहेर दसरा रोडच्या पश्चिम बाजूस उभारलेला आहे. साडेतीन महिन्यांत उभारणी झाली. प्रिन्स आफ वेल्स यांचे स्वागतार्थ हा दिवाणखाना मुद्दाम बांधला गेला. गुदस्त सालीं प्रारंभिलेलें नवीन मार्केट यंदा पुरे झालें. छत्तीस स्टालची सोय झाली आहे. स्त्रियांचा तुरुंग पूर्ण झाला. दोन कस्टम चौक्या बांधल्या गेल्या. दरबार आफिसास तीन मोठ्या खोल्या जोडल्या गेल्या. त्यांत न्यायाधिशांची सोय झाली.

**जंगल खातें** : काटकूट आणि बडवाहा ही जंगलें केरीसाहेबांचें स्वाधीन केलीं. मध्य-प्रांतातून लाख जमा करून ती आपल्याकडे लागवड करण्याचे प्रयत्न सुरू आहेत.

संस्थानांतील जंगलें दोन विभागांत पडूं शकतात. एक दक्षिणेकडील व दुसरा उत्तरेकडील. दक्षिणेकडील म्हणजे सातपुडा बाजूचे, उत्तरेकडील म्हणजे विंध्याद्री लगतचा. सातपुड्याची बाजू रोगट आहे तर विंध्याद्रीची दमदार आहे. एकंदर काम केरीसाहेबांचे नजरेखाली चालू आहे. त्यांचे हाताखालीं दोन स्थानिक गृहस्थ दिले आहेत. हे इंदूर येथील मदरशांत शिकून पुण्याच्या सिव्हिल इंजिनिअरिंग कालेजात एफ.सी.इ. होऊन आले.

अहवालाचे सालीं संस्थानचे उत्पन्न (मागील खातेवारीप्रमाणें) रु. ५०,००,००० असून खर्च रुपये ४३,९५,००० झाला आहे.

**जमीन महसूलसंबंधी माहिती :** आमच्या जमीन महसुलासंबंधी साधक बाधक अशी टीका आंत बाहेर बरीच होत असते. तरी आमची पद्धत काय आहे ती येथें नमूद करितो. आमची जमाबंदी शेतवारी आहे. सर्व पिकण्याजोगी व गवती जमीन, यावर आम्ही कर ठेवितो. या पद्धतीनें गांवाची ठोकळ जमाबंदी ठरविली जाते. जो कोणी ही जमा नियमितपणें भरून देईल त्यांस शेंकडा साडेसत्याऐंशी प्रमाणें ती सोपविली जाते; म्हणजे शेंकडा साडेबारा त्यांस सूट मिळते. हा करार चालू असलेल्या मुदतीत, पडीत जमिनीचें उत्पन्न त्याने काढिलें तर त्यांस ते मिळते. तसेंच उन्हाळू जमिनीवर त्याने पावसाळी पीक काढले तरी त्याचेच होतें. ह्या सवलतीमुळें कांहीं श्रीमंत माणसांचा तसाच धडाडी माणसांचा हा धंदा होऊन बसला आहे. संस्थानांतील बरीच मोठी जमीन याच पद्धतीनें नांगरली जात आहे. दुसरीही गोष्ट रयतेसंबंधानें नमूद करावीशी वाटते. कोणालाही स्वतःचे इच्छेविरूद्ध जमीन नांगरावयास आम्ही लावीत नाही. जी जमीन नांगरायची त्याची इच्छा असेल तीच त्यांस मिळते. पट्टयाच्या अटी जोपर्यंत पाळल्या जात आहेत आणि ठरलेला धारा जोपर्यंत वक्तशीर भरला जात आहे तोपर्यंत कोणाचीही जमीन आडदांडपणानें हिसकाविली जात नाही.

जमाखर्च लिहिण्याचे पद्धतींत आम्ही कालमानानुसार फेरफार करीत आहोंत. ही नवीन पद्धत गळीं उतरण्यास व स्थिर होण्यास कांहीं कालावधी लागेल हे सांगणें नकोचः कायद्यासंबंधी लिखाण श्रीमंतांस अहवालाचे वर्षी सादर करण्यांत आलें तें :

अ : जमिनींत सापडलेल्या निधीबद्दल.
आ : मरामतीचें काम कान्ट्राक्टनें देण्याबद्दल.
इ : संस्थानांतील अरण्याच्या निगेसंबंधात.
ई : अनाथ बालकाश्रमाची स्थापना.
इ : म्युनिसिपालिटीचे कारभारासंबंधी.
ऊ : खजिन्याचे हिशेबासंबंधी.
ए : संस्थानचे अधिकारी यांच्या रजेसंबंधी.
ऐ : स्टांप विक्रीसंबंधी.
ओ : शस्त्रास्त्रें बाळगण्याबद्दल.
औ : सायर ड्युटी संबंधात.

अं : सरकारी नोकरांचे पेन्शनासंबंधात.

अः : खेडेगांवातील पोलिस सुधारणेबद्दल.

क : कान्स्टेबलाचे सुधारणेसंबंधी.

ख : रजिस्ट्रेशन खाते उघडण्यासंबंधानें.

ह्याप्रमाणें राज्याच्या अंग-उपांगांचा यथासांग अहवाल मांडला आहे. शेवटीं रघुनाथराव लिहितात कीं लोकांचे जीवित आणि वित्त ही सुरक्षित आहेत हेही सांगण्यास मला आनंद वाटतो.

याच सालांत घडलेल्या गोष्टीची नोद बक्षीजींनीं रोजनामच्यांत केली ती आम्ही खाली देत आहोत.

मार्च महिन्यांत प्रिन्स आफ वेल्स इंदुरीं आले (एडवर्ड सातवें) त्यावेळीं त्यांचे आर्डर्ली करितां एक स्काड्रन (घोडदळाची तुकडी) तयार करावें लागले. सर्व सबजे रंगाचे घोडे रिसाल्यांतून निवडून तयार केलें. त्यांची वर्दीही नवीन तयार केली. ता. ९ मार्च इ. स. १८७६ रोजीं प्रिन्स आफ वेल्सची स्वारी चोरल चौकीकडून दहा वाजतां आली. सरकारस्वारी पांच मैलपावेतों पेशवाईस गेली होती. फौजही रेसिडेन्सीचे फाटकापासून तीन मैलपावेतों जमली होती. मुलाखतीचें ठिकाणीं तोफखाना ठेविला होता. रायल स्याल्यूट झाला. प्रिन्स आफ वेल्स आणि महाराज पांचवें मैलाचे फत्तराचे ठिकाणीं एका गाडीत बसले आणि पाहुण्यास रेसिडेन्सीपावेतों पोहचविले. नंतर स्वारी वाड्यांत आली. तिसरें प्रहरीं प्रिन्स आफ वेल्स सरकारचे भेटीस लालबागेत आले. पेशवाईस महाराज रेसिडेन्सी बागेपर्यंत स्वतः गेले होते; व महाराज त्यांचे गाडीत बसून शहरांतून लोहबंगल्यावर घेऊन आले. येतांना व जातांना रायल स्याल्यूट झाला. दरबार झाला व सरकारांनी कांहीं जवाहीर व देशी हत्यारें नजर केलीं. परत जातांना महाराज व प्रिन्स एकाच गाडीतून रेसिडेन्सी पावेतों गेले. त्यांचा खाना होईपर्यंत सरकार तेथेंच होते. ता. १० रोजीं प्रिन्स आफ वेल्स तिसरें प्रहरीं मुंबईकडे रवाना झाले.

ता. १५ मार्च रोजीं भावनगरचे राजे इंदुरास आले होते. त्यांची व सरकारची भेट लालबागेत झाली.

सर जान के यांनीं एक ग्रंथ इ. स. १८५७ चे बंडाबद्दल लिहिला तो फेब्रुवारी महिन्यांत प्रसिद्ध झाला. त्या ग्रंथाबद्दल महाराजांसह सर्वांस आनंद झाला, कारण कीं, इंदूर येथील हकीगत फार वाजवी त्यांनीं लिहिली होती.

ता. १९ रोजीं सर हेन्री डेलीसाहेबांनीं बक्षीजीस बोलावून लाटसाहेबांकडील सरकारांचे नांवें आलेले पत्र श्रीमंतांस देण्याकरितां बक्षीजींकडे दिले. याशिवाय नीमनपूर मक्राणसंबंधी बक्षीजींशी बडेसाहेबांचें बोलणे झालें.

ता. १५ मे रोजीं कप्तान बारसाहेब महाराजांचे भेटीस आले. लार्ड नार्थब्रुक साहेबांकडील खलिता लिटनसाहेब व्हाईसराय झाल्याबद्दल घेऊन आले. दरबार होऊन गार्ड

आफ आनर्स उभा केला होता. खलिता वाचन झाल्यावर स्यालूट झाला. सर हेन्री डेलीच्या जागीं इन्चार्ज बारसाहेब होते.

ता. ३ जुलाई रोजीं सरकारचे जन्मगांठीबद्दल दरबार झाला. सरकारांनीं जाहीर केलें कीं आपली तब्येत नीट राहत नाही सबब पंधरा महिने आम्ही काम पाहणार नाहीं. मोठे बाळासाहेब शिवाजीराव हे काम पाहतील, परंतु तसें घडलें नाहीं.

ता. ८ आगस्ट रोजीं लार्ड एब्रिंगटन हे सर हेनरी डेलीसाहेबांबरोबर सरकारांचे भेटीस आले होते. खासगी दरबार झाला. ता. ८ सप्टेंबर रोजीं रिवाचे महाराज आले व रेसिडेन्सीत उतरले. सरकार व काशीरावदादा, भवानीसिंग सरनौबत असें भेटीस गेले होते. ता.१३ सप्टेंबर रोजीं सरकारांस वाटलें कीं रिवाचे राजे यांनीं रेसीडेन्सीत न राहतां लालबागेत येऊन रहावे. तसे त्यांस कळविल्यावर त्यांनीं मंजूर केलें परंतु आजारीपणामुळें नाईलाज आहे असें कळविलें.

पलटणच्या व तोफखान्याच्या आफिसर लोकांस सरकारच्या दरबारांत बैठकी नव्हत्या. ता. १९ सप्टेंबरपासून ही योजना सुरू झाली. रिवाचे राजे उज्जेनीस गेले होते ते ता.२० ला परत आले. तेव्हां सरकार, कारभारी साहेब आणि बक्षीजी स्टेशनवर गेले होते. पांच वाजतां सरकारची मुलाखत होऊन एका गाडीतून सरकार व रिवाचे राजे लालबागेत गेले. स्टेशनवर गार्ड आफ आनर हजर होता. तोफेचे २१ फेर झाले. लालबागेत रिवाचे राजेसाहेबांकडून पानसुपारी झाली. ता. २१ सप्टेंबर रोजीं सरकार लालबागेत जाऊन रिवाचे राजेसाहेबांस त्यांनीं आपले बग्गीतून वाड्यांत आणिलें. वाड्यांत दरबार होऊन राजेसाहेबांस खिल्लत देण्यांत आली. एक हत्ती, दोन घोडे दिले. रिवाचे राजे नंतर श्रीगोपाळ मंदिरात दर्शनास जाऊन वाड्यांत सरकाराकडे गेले आणि तेथून रेसिडेन्सीत बिऱ्हाडीं गेल्यावर सरकारांस गार्ड आफ आनर व तोफा फेर २१ रिवा राजेंकडून झाले.

तारीख ५-११-१८७६ रोजीं श्रीनर्मदेचा पूल उदघाटित होईल त्यादिवशीं महाराजसाहेब ब्रिटिश आफिसर लोकांस मेजवानी देतील तर चांगलें, म्हणोन बक्षीजींस बडेसाहेब बोलले. ही हकीगत बक्षीजींनीं श्रीमंतांस कळविली तेव्हा श्रीमंतांनीं डेलीसाहेबांस आपली खुशी कळविली.

ता. २६ सप्टेंबर रोजीं बक्षीजींस कारभारी साहेबांनीं सांगितलें कीं कांहीं लोक येथें खोटे शिक्के पाडतात. मुखबीर येईल तेव्हां त्याजबरोबर जाऊन त्या लोकांस धरावें. मुखबीर आल्यावर दोनचार शिपाई घेऊन बुळेसाहेबांचे शेजारी एका घरात शिक्के पाडीत असताना त्यांस धरलें व सिटी म्याजिस्ट्रेटचे स्वाधीन त्यांस केलें. त्या लोकांत जगरूपजतीचा एक शिष्य होता. शिक्षा झाली.

ता. ५ नोव्हेंबर रोजीं सरकार, जनरल डेली, कारभारी साहेब, बक्षीजी वगैरे मंडळी एकाच ट्रेनेंतून नर्मदेच्या पुलावर जाऊन पुलावरून ट्रेन जाण्याचा मुहूर्त केला. नर्मदेपार जाऊन खुटक्यावर साहेब लोकांचे जेवण्याची तयारी होतीच. खाना झाल्यावर सरकारस्वारी

बडवाहा येथें गेली.

ता. ७ नोव्हेंबर रोजीं स्टार आफ इंडियाबदल बाणगंगेस दरबार झाला. बडेसाहेब व कप्तान बारसाहेब दरबाराकरितां आले होते. वहिवाटीप्रमाणे पेशवाई व सलामी झाली.

ता. १४ नोव्हेंबर रोजीं सरकारस्वारी दिल्लीस जाण्याकरितां नेमावरास रवाना झाली. ता. ९ डिसेंबरला बाळासाहेबांच्या स्वाऱ्या निघाल्या. ता. १२ रोजीं सरकारची स्पेशल रवाना झाली. ता. १५ डिसेंबर रोजीं मुक्काम प्रयाग. स्वारीनें त्रिवेणीवर स्नान केलें. तिसरें प्रहरीं सरकार जनरल मीडसाहेबांचे भेटीस गेले. सर हेन्री डेलीसाहेबही तेथेंच होते. सरकारांनीं प्रयागाचा किल्ला पाहिला. बारसाहेब किल्ला दाखविण्यास बरोबर होते. किल्ल्यांत बारूद गोळे वगैरेची तयारी आहे. चाळीस हजार शिपाई एकदम तयार होतील इतके सामान तेथें होतें. ता. १७ मुक्काम कानपूर. येथें गार्ड आफ आनर व कांहीं आफिसर पेशवाईस आले होते ता. १९ मुक्काम अलिगड व ता. २० मुक्काम दिल्ली. स्टेशनवर गार्ड आफ आनर्स व कांहीं आफिसर पेशवाईस आले होते. तोफेचे फेर १९ झाले.

ता. २२ रोजीं सर्व फौजेची कवायत झाली. सरासरी पंधरा हजार फौज परेडीवर होती. संध्याकाळीं गायकवाड सरकार आमचे सरकारचे भेटीस आले होते.

ता. २३ लार्ड लिटनसाहेब दिल्लीस आले. सर्व संस्थाानिक स्टेशनवर गेले होते. सरकार व उभयतां बाळासाहेब, कारभारीसाहेब, काशीरावदादा असे स्टेशनावर गेले होते. लाटसाहेबांनीं रईस लोकांस स्टेशनावरूनच रूकसत केलें. लाटसाहेब व ब्रिटीश आफिसर्स हत्तीवर बसून शहरांतून क्यांपांत गेले.

ता. २४, २५ रोजीं गायकवाड सरकार, भावनगर महाराज व सर सालरजंग, यांच्या भेटी सरकारांनीं घेतल्या. निजामसाहेबांचें वय ९-१० वर्षांचे होते त्यांची मिजाजपुर्सी बक्षीजींस पाठवून केली.

ता. २६ डिसेंबर रोजीं शिंदे सरकारांनीं आमचे महाराजांस आमचे लष्करांत मेजवानी दिली. शिंदे सरकार यांनीं आमचे लष्करांत आपले स्वतःचे निगराणींत स्वयंपाक करविला. संध्याकाळीं दोन्ही सरकार शिंदे होळकर, उभयतां बाळासाहेब, शिंदे सरकारांकडील सरदार व आपलेकडील सरदार सर्वत्र एकाच मंडपांत भोजनास बसले.

ता. २७ रोजीं सेंट्रल इंडियाचे राजे लोकांची भेट व्हावयाची म्हणून ठरलें. आमचे सरकारची भेट दुपारी एक वाजतां होण्याचे ठरलें. भेटीस जाण्यापूर्वी सर हेनरीसाहेब सरकारकडे आले व त्यांनी कळविलें कीं स्टेट सेक्रेटरीकडून तार लाटसाहेबांस आली आहे कीं खानदेशची हद्द होळकर सरकारच्या दाव्याप्रमाणें देणें मंजूर आहे. बडेसाहेब म्हणाले कीं आपल्यावर इंग्रज सरकारची पूर्ण मेहरबानगी आहे. ही खबर ऐकून महाराजांस आनंद झाला.

या नंतर सरकार व बारसाहेब एका गाडींत बसले. स्वारीबरोबर उभयतां बाळासाहेब व सात सरदार होते. सर्व मंडळी दरबारास गेली. लाटसाहेब डायसवर बसले होते. त्यांचे

उजवे बाजूस डायस शेजारी महाराज खुर्चीवर बसले. महाराजांचे उजवे बाजूस दोन्ही बाळासाहेब बसले.

उभयतां बाळासाहेबांचे बाजूस कप्तान बारसाहेब बसले. त्यानंतर सातही सरदार बसले. सरदारांनीं लाटसाहेबांस नजरा दाखविल्या. त्यानंतर लाटसाहेबांनीं सरकारांस इंपिरियल कौन्सिलचा किताब देऊन ब्यानर्स दिले आणि सलामीच्या तोफा दोन वाढविल्या. म्हणजे पूर्वी इंग्रेजी इलाख्यांत १९ तोफा होत होत्या त्या आतां २१ तोफा सलामीच्या होऊं लागल्या. लाटसाहेब व महाराजांचें कांहीं बोलणें होऊन पानसुपारी झाली. जातां येतां सलामीच्या तोफा आणि युरोपियन गार्ड आफ आनर्सनें सलामी दिली.

ता. २८ डिसेंबर रोजीं सर हेन्री डेली, मीड व कर्नल किटिंग हे सरकारचे भेटीस आले. ते गेल्यानंतर भरतपूरचे राजे भेटीस आले. संध्याकाळीं लाटसाहेबांनीं परत भेट दिली.

ह्याप्रमाणें दरबारी हकीगत आणि राज्यकारभाराचे हकीगतीचें इ. स. १८७६ पूर्ण झाले. सरकारी कागदांतील एक लेखांक-प्रिन्स आफ वेल्स यांचे आगमनाप्रीत्यर्थ बहुमानाचे खर्चाची यादी - उपलब्ध झाली ती या खालीं देत आहोंत.

लेखांक - यादी हिशेब प्रिन्स आफ वेल्स यांची स्वारी इंदुरीं येणार सबब नवीन कापड संस्थान महेश्वर येथील मारू लोकांकडून नमुन्याचे करविलें. त्याजकडे खर्च ता. २५ फेब्रुवारी इ. स. १८७६ विद्यमान कृष्णराव गोपीनाथ अमीन संस्थान महेश्वर.

९९-७-६ धोतरपान, जरीकाठ कुश्यामारू कडून करविलें. हात सुमारी साडेदहा. कलाबूत ४२ अंकी दर अंकी अडीच रुपये. दर तोळ्यास दोन दहा आणे याशिवाय नफा दोन आणीचा. कलाबुतीचे तार दर किनारीस गिणती सुमारें २४० प्रमाणें दोन्हीकडील तार ४८०, ५१-१-६ कलाबूत वजन तोळे सतरा, साडेचार आणे भार दर दोन दहा आणेप्रमाणें आकार रुपये ४५-७-० व नफा दोन आणीचा ५.१० येकुण आकार रु. सदरी.

१४-१०-० रेशीम, काठाकडे चोवीस रुपये भार. बुनाईकडे १० येकुण ३४ भार दरशेरी ३५ प्रमाणें आकार.

३३-८-० मजुरी. बुनाई तीन घोटीची या कामीं झाली, याबद्दल पुनमचंद मारू यांस रुपये ३० किरकोळ सूत पांजणी अडवून सुमारी सात दर पांजणीस आठ आणेप्रमाणें आकार ३-८-० असें ९९-७-६. याशिवाय मारू मजकुरास नफा देणें आहे.

७६-८-० दंडिया जरीकाठी नग १ हातसुमारें १० रेशमी गुलाली कुशा मारू कडून करविला. कलाबुत तार ४६० कलाबूत रु. ४६-५-६ रेशीम

रु. ३०-२-६ मजुरीसुद्धां

याशिवाय मारूस नफा देणें.

८४-४-० इतर कापड. रेशीमकाठी धोतरपान नक्षीदार हात १० मंगल मारूकडून खरेदी. २२ लुगडें लाल चंद्रकला करवती बुटेदार कलाबतु. नंदराम मारू २ खणाले हर तरेचे नंदराम, कुशा, मंगलमोकाती मारूकडून खरेदी केलें रु. ३०-४-० आकार रुपये सदरी.

-----------

२६०-३-६

सदरहूप्रमाणें खर्च लागला आहे. याशिवाय नफा देणें आहे.

---------------------------------------------------

ह्याप्रमाणें हा खर्च म्हणजे महेश्वर येथील रेशीम, कलाबतुची कामें कशी होतात व यांचे निदर्शक म्हणून ही भेट प्रिन्स आफ वेल्स यांस सादर केली. इतर जडजवाहीर बहुमान शिरस्तेप्रमाणें झालाच. इ. स. १८७६ पर्यंतची हकीगत वर आली आहे.



प्रकरण २६ वें

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर सरकार यांचा राज्यकारभार व प्रवास

## इ. स. १८७७ ते १८७९ अखेर

ता. १ जानेवारी इ. स. १८७७ : आज रोजीं इंग्लंडचे राणीने बादशहाजादी हा किताब धारण केला. त्या दिवशीं मोठे मैदानांत मोठाच समुदाय जमला होता. त्या ठिकाणीं एका मोठ्या अर्ध्या वर्तुळांत रईस लोकांकरितां व त्यांचे सरदारांकरितां व समोर लाटसाहेबांकरितां जागा केली होती. लाटसाहेबांचे पाठीमागें अर्धवर्तुळ करून सभारंभास आलेल्या लोकांस जागा केली होती. सर्व फौज तेथें जमली. दहा वाजण्याचे सुमारास दरबार झाला. या दरबारांत बक्षीजींस सी. एस. आय ही पदवी मिळाली.

ता. ९ जानेवारीस सरकार बुंदीचे राजास भेटावयास गेले होते. यानंतर डेलीसाहेबांनीं खानदेश सरहद्दीचा जिकर बक्षीजी व रामजी वकील यांजपाशीं काढला. त्यांनीं दोन याददास्त लिहून व्हाईसराय साहेबांकडे सादर केल्या होत्या. प्रथम स्टेट सेक्रेटरींनीं खानदेश सरहद्द देणें नाकारले. परंतु दुसरी याददास्त सादर केल्यावरून स्टेट सेक्रेटरी लार्ड स्यालिसबरींनीं मंजूर करून रोमहून तार पाठविलां कीं सर हेनरी डेली यांची राय मंजूर आहे. आतां जर महाराज मालकम लाइनबद्दल झगडा करतील तर मुकदमा बिघडून जाईल. ही हद्द फक्त मेहरबानीनेंच दिली जात आहे असें डेलीसाहेबांनीं बक्षीजींस व रामजी वकिलास बजावून सांगितले. हा प्रकार बक्षीजींनीं हुजूरांस विदित केला.

ता. १० जानेवारी सरकारस्वारी स्टेशनावर आली. सर हेन्री डेलीसाहेबही महाराजांचे मुलाखतीस आले. सरकारस्वारी दहा वाजतां स्पेशल ट्रेननें प्रयागास रवाना झाली. बक्षीजींनीं मारवाडांत जाण्यासाठीं सरकारपासून रजा घेतली. त्यावेळीं ''तुम्ही जोधपुरास जाऊन तेथील महाराजांस आम्हाकडून तिळगुळ द्यावे.'' अशी आज्ञा केली.

ता. ७ मार्च रोजीं बक्षीजी इंदुरीं येऊन दिवाण साहेबाचे बागेंत सरकारांस भेटले. ता. ३ मे रोजीं दुष्काळासंबंधी सभा मदरशांत झाली. या सभेचे अध्यक्षस्थान मोठें बाळासाहेबांनीं मंडित केलें होतें. (महाराज शिवाजीराव होळकर) ता. १८ मे रोजीं मिस्टर इस्टविकसाहेब येऊन लालबागेत उतरले. सरकारांनीं भेट घेतली. ता. २८ मे रोजीं बक्षीजींनीं सूतयंत्राचे कामाचा ताबा घेतला. हे काम त्यांनी फार चांगले बजावले असें कारभारी साहेबांनीं अहवालांत उल्लेखिलें आहे.

ता. २१ जून रोजीं ताईसाहेबांचे छत्रीवर मूर्तीची स्थापना झाली. मोठी स्वारी निघाली. सर्व दरबारी, सरदार, मानकरी यांनी छत्रीवर जाऊन नजरा केल्या.

ता. २५ जून रोजीं सर सालरजंग यांस तार केली, संध्याकाळीं आलेले उत्तर सरकारांस कळविले. सरकार व बाळासाहेब देवास येथें गेले होते ते परत आले.

ता. २२ जुलाई आज सरकारची जन्मगांठ होती. आमदरबार झाला. महालवार आमीनांसही बोलाविलें होतें. आजपासून रुपयाचा नवीन शिक्का चालू केला. नजरा झाल्या व दरबार बरखास्त झाला.

ता. ८ आगस्ट रोजीं मोठा दरबार भरविला; कारण या सालीं काळ होता. सबब सरकारांनीं तजवीज केली कीं काळामुळें दक्षिणेतील लोकही पुष्कळच येतील तरी त्यांस खाण्याची मदत केली पाहिजे व याजकरितां गल्लानिकास बंद केला पाहिजे व दोन रुपये शेकडा रयत व नोकर लोकांकडून घेतले पाहिजेत. यावर दरबारांतील लोक अनुकूल झाले नाहीत. तजवीज तशीच राहिली. तरी श्रीमंतांनीं घराण्याचे कीर्तीनरूप अनेक बाजूंनीं दानधर्म केला. त्याचे वर्णन अहवालांत पुढें वाचकांस पहावयास मिळेल.

ता. १७ आगस्ट रोजीं सरकार हुकमानें दिवाणसाहेब, बक्षीजी व रामजी वकील सर हेन्री डेली साहेबांस भेटावयास गेले. साहेब मजकुर विलायतेहून आदलेच दिवशीं आले होते. साहेबांनीं सरकार, बाळासाहेब, काशीरावदादा व आर. रघुनाथराव या संबंधी वास्तपुस्त केली. नंतर मोसम हवा वगैरेबद्दल बोलणें झालें.

ता. १९ आगस्ट. सखारामजी नायब चिटणीस व अण्णासाहेब गरूड बक्षीजींस भेटले. रेसिडेन्सीतून खानदेश सरहद्दीबद्दल वाटाघाट होऊन असें ठरलें कीं सरकारांनीं डेलीसाहेबांस या मामल्याबद्दल शुक्रगुजारी द्यावी.

ता. १६ आक्टोबर आज दसऱ्याकरितां स्वारीत येण्याचे आमंत्रण देण्याकरितां दिवाण साहेब व बक्षीजी हे बार साहेबांकडे गेले होते. बरोबर चार वाजतां स्वारी वाड्यांतून रवाना झाली. आर. रघुनाथराव व बक्षीजी एका हत्तीवर होते. इंग्रज आफिसर्स लालबागेचे कोनाकडून स्वारीत सामील झाले. बत्तीस इंग्रज अधिकारी होते. स्वारी परत येतांना हें

ब्रिटीश मंडळ हत्तीवर स्वारीबरोबर वाड्यांत आले. दरबार होऊन साहेब लोकांस पानसुपारी देण्यांत येऊन रूकसत झाल्यावर नजरेचा दरबार झाला.

ता. ७ नोव्हेंबर रोजीं सर हेन्रीसाहेब नवीन जेलखाना बघण्यास आले. आर. रघुनाथराव व केरीसाहेब हजर होते. इमारत पाहून साहेब खुश झाले.

वरतीं जो कालावधी आला त्यालाच अनुलक्षून आर. रघुनाथराव कारभारी यांनीं जो अहवाल सादर केला त्यातून खालील माहिती देत आहोत.

१ **सर रिचर्ड टेम्पल यांची भेट** : ह्यांनीं या संस्थानास भेट दिली. एकंदरीत खुश होऊन जातेवेळीं उद्‌गार काढले कीं, ''श्रीमंत सरकार फार मेहनती दिसतात. रोजचे त्यांचे काम चार पांच प्रहरांचे दिसते. लहानसहान गोष्टींकडेही त्यांचे लक्ष असते. हाताखालील लोकांस करण्याचे काम थोडेच शिल्लक राहत असावे.''

२ **दुष्काळ व श्रीमंतांचे औदार्य** : या वर्षी दक्षिणेंत व मद्रास येथें मोठा दुष्काळ पडला. धान्य दिसेनासें झाले. झुंडीच्या झुंडी अहिल्याबाईंच्या राज्याकडे अन्नाकरितां धावत सुटल्या. कांहीं काळपर्यंत महाराजांनीं धान्यनिकास बंद केला. पुढें एकदम गल्ला खरीद करून रूपयास बारा शेरप्रमाणें धान्यविक्री सुरू केली. सात दुकानांतून ५४ हजार मण धान्य विकले गेले. सरकारांस सात हजारांचा तोटा आला. संस्थानांतही नोकर लोकांना याच भावानें धान्य दिले. शक्तिवान लोकांस कामास लाविले व अंध, लंगडे, लुळे, वृद्ध, दुबळे यांस अन्नवस्त्र देऊन त्याचे रक्षण केलें. परमुलखातून आलेल्यांस अन्न आच्छादनानें संतुष्ट ठेवून सुबत्तेचे दिवस येतांच त्यांचे त्यांचे गांवीं रवाना केलें. याकामीं ३२-३३ हजारांची मदत झाली. त्याचप्रमाणें ब्रिटीश हिंदुस्थानांतील दुष्काळ निवारणार्थ कमिट्यांसही तेहतीस हजारांची मदत केली. निकास मालावरील महसूल दुष्काळाचे काळांत माफ केल्यानें १२ हजारांचे नुकसान सोसले. दुसरें इलाख्यांत सरकारचे नोकर चाकर राहत होते त्यांस दुष्काळ मदत म्हणून ११ हजार रुपये दिलें.

३ **रेल्वे** : खांडव्यास सुरुवात होऊन चोरलपर्यंत येऊन ठेपल्याची हकीगत मागील अहवालांत आलीच आहे. अहवालाचे वर्षांत जानेवारींत रेल्वेनें इंदूर गाठले. व्यापार चांगला चालू आहे. यानंतर कारभारीसाहेब सुचवितात कीं, जी. आय. पी चा गेज आणि या रेल्वेचा गेज एकच असता तर व्यापारास याहूनही भरती चढती.

४ **डाकखाना** : ब्रिटिश डाक खातें आणि इंदूर संस्थानचे डाक खातें यांच्यात देवघेवीबद्दल केलेला पत्रव्यवहार मान्य झाला. जनतेची सोय होऊन सरकारवर ओझे बसले नाही.

५ **न्याय खातें** : मुलकी व फौजदारी अशा दोन्हीही बाजूंस पंचायत पद्धतीचा फायदा झाला; व ज्युरीपद्धतही प्रजाजनास हितावह होऊन पसंत पडली. स्माल काज कोर्ट सुरू होऊन वर्षांचे अवधींत चार साडेचारशें मुकदमे निकालांत आले. न्यायखात्यांत परीक्षा ठेवून यश मिळविणारासच प्रवेश मिळेल असें सरकारी ग्याझेटांत प्रसिद्ध करण्यांत आले. जिल्हा कोर्टाचे काम समाधानकारक झाले. वकील व लोकांचे वकील यांनीं आपापली कामें चांगली

केली.

**फौजदारी खटले** : सेशन केसीस सुरू झाल्या. हायकोर्टाने आठ केसी आपल्या हाती घेतल्या. त्यांतील चार मुकदम्यांत पुराव्याचे अभावी सर्व आरोपी मुक्त झाले. ह्यांत पोलीस आणि म्याजिस्ट्रेटांचा हलगर्जीपणा दिसून आला. पंचांचे मदतीने सदर कोर्टानें सत्तावीस मुकदम्यांचा निकाल दिला. एकंदरीत अकरा हजार मुकदमे कोर्टापुढें आले. पैकीं साडेनऊ हजार निकालांत आले. फाशीची शिक्षा सात जणांस, एकास जन्मठेप, तिघांस दहा वर्षाची शिक्षा, बाकीचे आरोपीस यापेक्षां निरनिराळ्या कमीअधिक शिक्षा मिळाल्या. फौजदारी काम चालविण्याचा कायदा श्रीमंतांनीं मान्य केला. तो येत्या वर्षी सुरू होईल.

६ **रजिस्ट्रार खातें :** इंदूर शहरासाठीं एक रजिस्ट्रार, रामपुरा, इंदूर आणि नेमावर व नेमाड ह्या जिल्ह्यांसाठीं तीन रजिस्ट्रार नेमण्यांत येऊन सब रजिस्ट्रारचीही ठिकठिकाणीं योजना झाली.

७ **खासगी डिपाटमेंट :** या खात्याकडून ५७५ मुलकी आणि १३२५ फौजदारी खटल्यांचा निकाल झाला. १९००० रुपये दुष्काळ पीडितास वाटले आणि १८००० दुष्काळी कामाकडे लागले. निवाण नवीं व दुरूस्तीत ४९००० लागले.

८ **सूतयंत्र :** एकंदर सहा लाख पौंड वजनाचे कापड निघालें. पांच लक्षाची विक्री झाली. वार्षिक प्राप्ती खासगीकडे जमा व्हावी अशी श्रीमंतांची आज्ञा झाल्यावरून उत्पन्न खासगीत जमा झाले. आवश्यक यंत्राची खरेदी होऊन ती यंत्रें येत आहेत.

९ **तुरूंगखाना :** आजपर्यंत प्रत्येक कैदी आपआपले जेवण तयार करीत असें व कित्येकांस रोख पैसे देण्यात येत. परंतु ती प्रथा बंद करून जातीभेद मर्यादेत पाळून, एकत्र जेवणाची पद्धत सुरू केली आहे. कैद्यांची संख्या ३५० होती.

१० **म्युनिसिपालिटी :** पुष्कळसे रस्ते उत्तम प्रकारे सुधारले गेले आहेत. जुने इंदूर येथीलही साफसफाई करण्यांत आली. योग्य इलाजामुळें हैजाचा रोग नाहीसा झाला.

११ **जन्ममृत्यूची नोंद** : ही नोंद व्यवस्थित असावी म्हणून यंदा उपक्रम करून पाहिला. मृत्युची नोंद तर घाटावर बरोबर मिळाली. परंतु जन्म नोंद खात्रीयुक्त मिळाली नाहीं. या विषयीं महत्त्व लोकांस अजून पटले नाही. तरी प्रयत्न चालू आहे.

१२ **गरीबखाना :** पिवळ्या खाळावर असलेल्या गरीबखान्यास कारभारीसाहेब भेट महिन्यांतून दोन तीन वेळां देत असतात. तेथें बागेची व्यवस्था करण्यांत येत आहे.

१३ **दवाखाना :** शहरातील दवाखान्यांत साडेसोळा हजार रोग्यांस उपचार झाले. पाश्चात्य औषधें आणि पद्धत लोकांस मानवूं लागली आहेत. डाक्टरांची संख्या येकुणतीस आहे. मिडवाईफचें काम लोकांस पसंत पडत चालले आहे.

१४ **डाकखाना :** उत्पन्न रुपये २१००० व खर्च १४५०० झाला. याशिवाय सरकारी पोस्टेज निराळें आहे.

१५ **शिक्षण खातें :** शाळांची संख्या एक्याण्णव झाली आहे. विद्यार्थ्यांची संख्या सुमारें चार हजार आहे. ला क्लासमध्यें सातच विद्यार्थी आहेत. मेकेसाहेब प्रिन्सिपाल

आहेत. शाळा मराठी, इंग्रजी, फारशी, इर्दू, हिंदी व संस्कृत अशा आहेत. श्रीमंत सरकारांनीं पाटील पटवारी तरबेज व्हावेत म्हणून इंजिनियरिंगचा क्लास तीन हजार रुपये खर्चून काढला. मुंबई आर्ट स्कूलमध्यें स्कालरशिप देऊन विद्यार्थी पाठविले. संस्कृत शाळेची तपासणी ग्वाल्हेर येथील पंडित गोपाळ चारियर यांनीं केली. काव्य, व्याकरण, तर्क आणि वेद यांत प्राविण्य दिसून आले.

१६ **इंजिनिअरिंग खातें :** पाण्याचा दुष्काळ या वर्षी असल्याने झिरे १४० नवीन खोदविले व विहिरी व बावड्या साफ करण्यांत आल्या.

१७ **जंगल खातें :** नवीन रोपटे लावणें व बी पेरणें, झाडांची लागवड जारीने करणें इत्यादि कामे होत आहेत.

पाण्याचा दुष्काळ लक्षांत घेऊन २५९००० रूपयांचे काम मंजूर झाले आहे. शिरपूर तलावाचें काम जारीनें चालू आहे.

१८ **उत्पन्न व खर्च :** तपशील खातेवार मागें आल्याप्रमाणें असून फक्त उत्पन्न व खर्चाचे आकडे दाखवीत आहोत. इ. स. १८७७-७८ चें उत्पन्न व खर्च. येकुण उत्पन्न ५१,२३,००० खर्च रु. ४१,६६,००० रुपये. आपदग्रस्तांस सहाय्य झालें; बैल खरीदी करून साडेपांच हजारांचे बैल शेतकऱ्यांस वाटले. साडेसोळा हजार तगाई, सात हजार किंमतीचे इमारती लाकूड-घरें बांधण्यास मोफत-बत्तीस हजार रुपये विहिरी व ओढे बांधण्यास खर्च झाले. साडेतीन हजार रुपये अग्नित्रस्तांस मदत म्हणून वाटले. याप्रमाणें आपदग्रस्तांस मदत झाली.

चालू सालीं गुन्हेगार योग्य दरबाराकडे रवाना करण्यांत एजन्सीने दाखविलेली तत्परता अभिनंदनीय आहे. अहवालाचे वर्षांत रावसाहेब नारो भिकाजी कैलासवासी झाले हें कळविण्यास खेद वाटतो. प्रामाणिकता, शांतता, दृढनिश्चय, नम्रता, दयाळूपणा हे गुण त्यांच्यांत असल्यानें ते श्रीमंतांचे आदरास पात्र झाले होते.

आर. रघुनाथरावांनीं इ. स. १८७७-७८ चा अहवाल सादर केला. हा त्यांचे कारकीर्दीतील शेवटलाच होय.

बक्षीजी इ. स. १८७८ च्या रोजनामच्यांत लिहितात : ता. १ जानेवारी १८७८ इंग्लंडच्या राणीने बादशहाजादीचा किताब घेतला म्हणून दरबार झाला. १०१ तोफांची सलामी झाली. दरबारांत सरकारचे येणें व जाण्याच्या तोफा २१-२१ झाल्या. वाड्यांत रात्रौ रोशनाई झाली. दरबारांत श्रीमंत सरकारांनीं उत्तम भाषण केलें. ''बादशहाजादी डेऱ्याचा खांब आहे आणि रईस (संस्थानिक) लोक डेऱ्याच्या मेखा आहेत. मेखा मजबूत नसल्या तर खांब रहाणार नाहीं.''

ता. ६ जानेवारीस मेटलंडसाहेबाचें पत्र आलें कीं ता. १४ जानेवारीस स्टारचा दरबार होईल. कर्नाटकचे नबाब इंदुरास सरकारचे भेटीस आले. त्यांस एक हजार रुपये बक्षीस दिले. ता. ७ जानेवारीस सरकार सूतयंत्राचे काम पाहून आल्यावर त्यांनीं विचारपूस केली. बक्षीजी म्हणालें कीं खर्च वजा जाता ऐशी हजार नक्की फायद्याचे जमा आहेत. ता. १८

रोजीं जनरल डेलीसाहेब व वाटसनसाहेब सरकारचे भेटीस आले. बक्षीजी व रामजी वकील बग्गीपावेतों पेशवाईस गेले. थोडे बोलणें होऊन पानसुपारी झाली. मिठाचे मुकादम्याबद्दल सरकारांनीं मेमो बडेसाहेबांस दिला व साहेब रवाना झाले. ता. १९ जानेवारी रोजीं डेकोरेशन दरबार होणार सबब सरकारस्वारी तेथें गेली. धारचे राजेही आले. कोठीसमोर शामियाना लावून दरबार केला. जनरल डेलीसाहेबांनीं बादशहाजादीची तसबीर सरकारांस नजर केली त्यावेळीं तोफांचे बार १०१ झाले. नंतर सर्वत्रांचा फोटो घेण्यांत आला. पानसुपारी होऊन दरबार बरखास्त झाला. ता. २५ जानेवारीस इंदूर रेल्वे स्टेशनावर कप्तान बारसाहेब, कारभारीसाहेब व बक्षीजी जमून स्टेशनास जमीन देण्याची वाटाघाट झाली. शेवटीं असें ठरले कीं रेल्वे स्टेशन व रेसीडेन्सी याचे दरम्यान होळकर सरकारची जमीन रहावी. ती तजवीज मंजूर झाली. ता. १४ फेब्रुवारीस मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल येणार. सलामीच्या तोफा व गार्ड आफ आनर, क्याव्हेलरी आणि इनफंटरीचा बंदोबस्त बक्षीजींकडे होता. सरकारस्वारी पांच वाजता स्टेशनवर दाखल झाली. मुंबईचे गव्हर्नरांची भेट झाली. वेटिंगरूममध्यें पानसुपारी झाली. सलामीचे १७ फेर झाले व साहेब रेसिडेन्सीत गेले. ता. १५ फेब्रुवारी रोजीं खानदेशचे नकाशास सरकारांनी खुणा करून सर काशीरावदादा व वकील यांजबरोबर पाठविला. बडेसाहेबांनीं सांगितले कीं स्टेशनवर जो नाका बसविला तो उठवा म्हणजे सरहद्दीचा विचार होईल. ता. १६ स गव्हर्नरसाहेब परत भेटीस लालबागेत येणार सबब गार्ड आफ आनर व सलामी तोफांची व्यवस्था झाली. गव्हर्नरसाहेबांस सरकारांतून रात्रौ मेजवानी झाली. भोजनोत्तर साहेब बहादुरांनीं महाराजांची फार तारीफ केली. ता. १८ फेब्रुवारीस गव्हर्नर जावयाचे म्हणोन सरकार व धारवाले व देवासवाले स्टेशनवर आले होते. जातांना सलामी तोफा १७ झाल्या. परत सरकारस्वारी श्रीमंत कृष्णराव बाबासाहेब पवार यांचेबरोबर त्यांचे बिऱ्हाडी गेली व थोडे थांबून नंतर वाड्यांत आली. सरकारांनीं नाराजीनेच स्टेशनजवळील नाका उठविण्याचा हुकूम दिला व खानदेश सरहद्दीचा नकाशा मंजूर झाला.

ता. १५ मार्च रोजीं अक्कलकोटचे राजे येणार सबब धाकटे बाळासाहेबांकडे सरकारस्वारी स्टेशनवर आली. सहा वाजतां अक्कलकोटचे राजेसाहेब व मोठे बाळासाहेब एकाच ट्रेनमधून उतरले. आपले बग्गीत घेऊन वाड्यांत आणले व तेथून हत्तीवर लालबागेत राजेसाहेबांस उतरण्यास पाठविले. ता. १६ रोजीं राजे अक्कलकोट वाड्यांत भेटीस आले. पानसुपारीनंतर परत गेले. ता. २३ मार्च रोजीं देवासचे (धाकटे पाती) राजेसाहेबांचे लग्न झाले. आमचे महाराज व धारचे महाराज लग्नास गेले होते.

ता. ८ रोजीं लालबागेत अक्कलकोटचे राजेसाहेबांस मेजवानी होऊन एक घोडा, एक हत्ती आणि पोशाख दिला आणि त्यांचे सरदार मंडळींसही वस्त्रें दिली.

ता. १३ मे रोजीं बक्षीजींस हुकुम झाला कीं त्यांनीं दरबारचा कारभार हातीं घ्यावा त्याप्रमाणें त्यांनीं घेतला व रात्रीं कारभारीसाहेबांस पोहचवावयास स्टेशनवर गेले.

ता. १७ मे रोजीं मोठे बाळासाहेबांकरितां एक कोठी बांधली जाणार म्हणून

बाळासाहेबांचे हस्ते पाया घालण्याचा मुहूर्त केला. त्या वेळीं सरकार व अधिकारी हजर होते.

ता. २५ मे बादशहाजादीचे जन्मगांठीचा दरबार रेसिडेन्सींत झाला. मामूलप्रमाणें पेशवाई, २१ सलामी तोफा, सरकारांस जातांना येतांना झाल्या.

ता. ७ जुलाई रोजीं जनरल डेलीसाहेब लालबागेत आले. सरकारची भेट झाली. खानदेश सरहद्दीचा नकाशा सादर झाला. बक्षीजींनीं सांगितले कीं ४०५ स्क्वेअर मैल जमीन इंग्रज सरकाराने दिली आहे. नंतर सरकार व बडेसाहेबांचे एकांत होऊन त्यानंतर बडेसाहेब गेले.

ता. ११ जुलाई रोजीं सरकारची जन्मगांठ सबब दिवाण साहेब, बक्षीजी आणि वकील हे बडेसाहेबांस निमंत्रण देण्यासाठीं गेले होते. तीन वाजतां दरबार झाला व नजरा होऊन पानसुपारी झाली. ता. १९ जुलाई रोजीं कारभारी साहेब मद्रासहून आले. गांवात हैजा बंद होईना. सबब दिवाणसाहेब ता. २५ रोजीं शहरचे सर्व लोकांसह मरीमातेचे यज्ञासाठीं बाहेर पडले. बिमारी कमी झाली नाही. ती आगस्टांत बंद झाली.

ता. १७ आगस्ट रोजीं जनरल स्टेबल कमांडर इन चीफ इंदुरास येणार म्हणून सर काशीरावदादा होळकर व बक्षीजी स्टेशनवर गेले. शिरस्तेप्रमाणें सलामीचे फेर झाले नंतर रेसिडेन्सीत गेले. ता. २२ आगस्ट रोजीं कमांडरसाहेब शहर पाहणेस आले होते. बक्षीजी व सर काशीरावदादा समागमें होते.

ता. ५ आक्टोबर रोजीं दसरा असल्यानें मामुली वहिवाटीप्रमाणें बडेसाहेब वगैरेस निमंत्रण देण्यांत आलें व शिरस्तेप्रमाणे स्वारी, सलामी, दरबार वगैरे समारंभ झाला. नजरेचा दरबार झाल्यावर सरकारांनीं सांगितले कीं, ''आम्ही युइयो (UEO) साहेबास पायदळ फौजेचे कर्नल केलें तर फौजवाल्यांनी असें समजू नये कीं, हे ईसाई आहेत. त्यांस हिंदुसारखेच समजले पाहिजे आणि त्यांची ताबेदारी बरोबर करावी'' ता. २८ रोजीं तब्येत सरकारची बिघडली होती. ती आतां बरी आहे.

ता. २८ आक्टोबर रोजीं श्रीमंतांस नातू म्हणजे मोठे बाळासाहेबांस मुलगा झाला. फौजेत सर्व ठिकाणीं खुशीचे फेर झाले. १०१ तोफा सुटल्या, सर्व आनंदीआनंद झाला. खुशीची साखर वाटण्यांत आली. ता. १ डिसेंबर रोजीं सरकारचे पायावर डाक्टरांनीं चिरा दिला. ता. २० डिसेंबर मोहरमबद्दल नजरेचा दरबार मोठे बाळासाहेबांनीं केला.

इ. स. १८७९, सरकारांस नातू झाला. त्यांस शहरात न ठेवितां रेसिडेन्सींत डगलस साहेबांचे बंगल्यावर ठेविले व सरकारस्वारींची तब्येत ठीक नसल्यानें तेही छावणीत जाऊन ता. १ जानेवारीस राहिले. ता. ९ जानेवारीस भवानीसिंग सरनौबत यांस देवाज्ञा झाली. सरकारांस नातू झाला परंतु काळगती विचित्र कीं पांचवें दिवशींच त्यास देवाज्ञा झाली.

ता. ३१ जानेवारीस सरकारांनीं सर्व कामवाल्यांस बाणगंगेवर बोलावून ठरविलें कीं काळ पडला असून धान्य महाग झाले आहे. तर सरकारांत धान्य खरीदी करून बाजारपेक्षां

एक रूपया नाणी कमी विकावे. धाकटे बाळासाहेबांची जन्मगांठ. सबब बाणगंगेसच दरबार झाला.

ता. २० फेब्रुवारी : नेपाळचे जनरल उज्जेनीहून इंदूर स्टेशनवर आले. त्यांचे स्वागतास सर काशीरावदादा व बक्षीजी गेले होते. ते इंदुरास थांबले नाहीत.

ता. २४ मे रोजीं बादशहाजादीची जन्मगाठ मामुली वहिवाटीप्रमाणें झाली. दरबार सलामी झाली.

ता. १ जुलाईस श्रीमंत सरकारची जन्मगांठ होती. शिरस्त्याप्रमाणें रेसिडेंसीत वगैरे आमंत्रण दिले जाऊन दरबार झाला. जनरल डेलीसाहेब व महूचे जनरल फार्बस दरबारास आले. दरबार पांच वाजता झाला. गार्ड आफ आनर व सलामीच्या तोफा झाल्या. साहेब लोक परत गेल्यावर नजरेचा दरबार झाला.

ता. १४, १५ जुलाई रोजीं बक्षीजींचे जहागीर गांव पवडर्यास श्रीमंतांची स्वारी सहकुटुंब व देवासचे श्रीमंत कृष्णराव बाबा पवार असें मंडळी आठ-नऊशें जमली होती. बक्षीजींनीं आदरातिथ्य उत्तम प्रकारें ठेविलें.

ता. ५ आगस्ट रोजीं जनरल डेलीसाहेब सरकारचे भेटीस आले व मिठाबद्दलचे बोलणें झाले. बडेसाहेबांनीं सांगितलें कीं मिठावरील हासिल घेणें सोडून द्यावें म्हणजे त्याबद्दलची नुकसानी इंग्रज सरकार सालोसाल देत जातील. सरकारांनीं ही गोष्ट मंजूर केली नाही.

ता. १२ रोजीं महाराज शिंदे सरकारची ट्रेन महू स्टेशनवर आली. इंदूरहून बाळासाहेब व सर काशीरावदादांचे चिरंजीव व डेलीसाहेब पेशवाईस होते. दोन वाजतां ट्रेन आली. महूचा गार्ड आफ आनर हजर होता. जनरल डेलीसाहेब व बाळासाहेब महाराज शिंदे यांचे डब्यांत बसल्यावर इंदूर येथें चार वाजतां स्पेशल आली. सरकारची भेट होऊन पानसुपारी झाली. २१ फेर तोफेचे झाले. महाराज शिंदे हे रेसिडेन्सीत उतरले, दुसरें दिवशीं सरकारांस न कळवितां एकदम राजवाड्यांत दाखल झाले. श्रीमंत मोठे बाळासाहेबांकडे बक्षीजींनीं नेले व सरकारांस कळतांच तेही आले. भेटी होऊन कांहीं गोष्टी होऊन नंतर छावणींत गेले.

ता. १४ आगस्ट रोजीं शिंदे सरकार व डेलीसाहेब यांनीं सूतयंत्रास भेट दिली. श्रीमंत मोठे बाळासाहेब रेल्वे फाटकापर्यंत पेशवाईस गेले होते. तेथून शिंदे सरकार हत्तीवर आरूढ झाले. २१ फेर तोफेचे झाले.

ता. १६ आगस्ट रोजीं मोठे बाळासाहेबांस सरकारांनीं सांगितले कीं कृष्णरावबाबा पवार यांजकडे निमंत्रणास जावे व छोटे बाळासाहेबांनीं शिंदे सरकारांकडे जावे. अकरा वाजतां धाकटे बाळासाहेब शिंदे सरकारांस वाड्यांत घेऊन आले. मोती महालांत भेट झाली. मेजवानीनंतर दरबार झाला. सरकारांनीं शिंदे सरकारांस कांहीं जवाहीरात व खिल्लत दिले. दोन घोडे, चांदी सोन्याचे सामानासुद्धां व एक हत्ती चांदीची सीरी असलेला याप्रमाणें दिले.

येते जातेवेळेस तोफेचे फेर २१ झाले. ता. १७ रोजीं शिंदे सरकारचा मुक्काम लालबागेत असल्यानें सरकारस्वारी भेटावयास गेली होती. मेजवानी होऊन रात्रौ आतषबाजी सोडण्यांत आली. ता. १८ रोजीं शिंदे सरकार जाणार म्हणोन स्टेशनवर गार्ड आफ आनरची व्यवस्था झाली. उभयतां सरकारांच्या भेटी होऊन तोफेचे बार होऊन व डेलीसाहेबांची भेट होऊन शिंदे सरकार उज्जेनीस गेले.

ता. १० सप्टेंबर रोजीं शिंदे सरकार परत येऊन रतलामवाल्यांचे कोठींत उतरले. दुसरें दिवशीं मेजवानी व्हावयाची. सबब धाकटे बाळासाहेब आमंत्रण देण्यास गेले. श्रीमंत कृष्णराव बाबासाहेब पवार यांसही आमंत्रण दिले. ता. ११ रोजीं खासगी खजिन्याजवळ महाराजसाहेबांनी शिंदे सरकारची भेट घेतली. सरकारची प्रकृती नीट नसल्यानें ताजीम देऊं शकले नाहीत. जातां येतां शिरस्तेप्रमाणें आनर व सलामी झाली. ता. १३ रोजीं शिंदे सरकार ग्वालियर येथें जाणार. सबब श्रीमंत मोठे बाळासाहेब स्टेशनवर गेले होते. जनरल डेलीसाहेबांकडून गार्ड आफ आनर व सलामी झाली.

ता. १९ नोव्हेंबर रोजीं म्हणजे दसऱ्याचे मौसमानंतर कारभारी साहेबांनीं राजीनामा पेश केला. बक्षीजींकडे कामाचा हुकूम झाला. ता. १० डिसेंबर रोजीं आर. रघुनाथरावांस वस्त्रें आणि चार हजार रुपये बक्षीस दिले व ते रवाना झाले. बक्षीजींनीं एक याद करून राजेश्री गरूडास देऊन सांगितलें कीं, यावर श्रीशंकर करून आणा म्हणजे दरबारचा चार्ज घेतो. सरकारांनीं श्रीशंकर केला व ता. ११ डिसेंबर रोजीं गोविंदराव पांडुरंग सरकारकडून बक्षीजींकडे आले व चार्ज घेण्याचा हुकूम त्यांस दिला.

इ. स. १८७९ चा अहवाल एजन्सीकडून प्रसिद्ध झाला त्यात लिहिलें आहे कीं, पर्जन्य यंदा ४६ इंच झाला; सरासरीनें ६ इंच जास्त झाला. त्यामुळें खरीप धान्याचे दर कडाडले. सरकारांनीं एक लक्ष सहा हजार रुपये खर्चून धान्याचा साठा केला व जनतेची सोय केली. आफिमीचेमुळें होळकर, शिंदे समृद्ध झाले आहेत; वर्तमानकाळीचा वसूल वाढत्या प्रमाणांत आहे. इ. स. १८६८ मध्यें जो दर होता त्यावर शेकडा ४० वाढ झाली आहे.

आर. रघुनाथराव इंदूर सोडून इ. स. १८७९ च्या नोव्हेंबरात गेले. त्यांच्या कर्तृत्वासंबंधात चार ओळी लिहिणें आवश्यक आहे. त्यांचा जन्म मद्रास इलाख्यांत इ. स. १८३१ त झाला. सर टी. माधवरावांच्या चरित्रलेखनांत जे लिहिलें तें यांसही लागू पडते. हे जन्मतः गर्भश्रीमंत होते. इ. स. १८५० त त्यांना कालेजचा अभ्यासक्रम सोडून घरीं यावें लागले. इ. स. १८५६ त त्यांनीं वकिलीची सनद मिळविली. इ. स. १८५९ सालीं डेप्युटी कलेक्टर झाले. इंदूर संस्थानांत त्यांनीं अनेक लोकोपयोगी कामें केलीं. सर्व नोकरीपेशा आटोपल्यावर कुंभकोणास जाऊन राहिले. तेथील त्यांचे राहणीसंबंधानें कै. न्यायमूर्ती रानडे यांनीं एका परिषदेचे बैठकीत उद्‌गार काढले कीं, ''एकोणीसाव्या शतकांतील कर्मयोगी पहावयाचा असेल तर कुंभकोणास जाऊन रघुनाथरावांचे दर्शन घ्यावे.'' न्यायमूर्तींच्या या उद्‌गारांत सर्व कांहीं आले.

ह्या सोबत जोडलेल्या लेखांकांवरून सरकारांची दिनचर्या आणि मनोवृत्ती व आपल्या स्थानांच्या व्यापक जबाबदारीची जाणीव त्यांच्यात किती वसत होती हे लक्षांत येईल.

ता. २२ डिसेंबर इ. स. १८७६

रोजनामचा माहे डिसेंबर ता. २२ इ. स. १८७६

## ''गायकवाड सरकार संबंधी''

''गायकवाड सरकार यांचे सरदार मंडळीस (सर माधवराव) समक्ष सयाजीराव यांजला हेंच सांगणे आहे कीं, तुम्ही लहान कुलांत जन्म घेऊन राजकीय वंशात आला, याचप्रमाणें मीही लहान कुलात जन्म घेऊन राजकीय वंशांत आलों व आपले पूर्वज जे होते त्यांचा राजकीय कुलांतच काल संपला. तेव्हां त्यांजकडून कशीही कृत्ये जाहली तर त्यांजला कोणी दोष देणार नाही. आपले हातून एखादी गैरशिस्त वर्तणूक जाहल्यास ह्या लोकांस हेंच कारण म्हणण्यास होणार आहे कीं, ते आपल्या कुलावर गेले. यास्तव आपल्यास मुख्यत्वेकरून लक्ष दिले पाहिजे कीं, गरीबांवर गरिबांसारखी दृष्टी ठेवली पाहिजे व सरदारांस सरदारांप्रमाणें तजवीज ठेविली पाहिजे. मोठेपणा उगीच मानला जात नाही. याची अशी एक म्हण आहे कीं, ''बडे बापसे होत है बडे बापके पूत'' ह्याप्रमाणें बोलणें होत राहून ताराबाई गायकवाड व सरकार यांजला आत मातोश्रीसाहेबांचे भेटीस घेऊन जाऊन न्याहारी जाहल्यावर ताराबाई यांजला पुतळ्या २५ व गायकवाड सरकार यांजला मोहरा १०१ एकशें एक व बरोबरीचे विद्यार्थी मंडळी यांजला एक एक मोहर मातोश्रीसाहेबांनीं दिली. नंतर पानसुपारी होऊन बाहेर आल्यावर कचेरीचे मंडपात बसले असतां गायकवाड सरकारकडील सरदार मंडळीस पानसुपारी जाहल्यावर सर माधवराव यांनीं कळविलें कीं, आज उभय सरकारांचे भेटीचा योग ईश्वर कृपेनें जाहला ही मोठी आनंदाची खुशी समजली पाहिजे. आतां होळकर व गायकवाड यांचे घराण्यांत दुसरा विचार राहिला नाही. ही सर्व सरकार कृपेची गोष्ट घडून आली. त्यावरून सरकारसाहेब बोलले ज्या गोष्टीस तुमची अनुकुलता असल्यामुळें हा योग जाहला. त्याप्रमाणें हा निरंतर राहावा. आम्ही जो उपदेश केला याशिवाय आमची कांहीं देणगी नाही. तुम्ही हा आमचा उपदेश जमनाबाईसाहेब यांजला कळवितील.

---

**सरकारी रेकॉर्ड**

ता. ३० डिसेंबर इ. स. १८७६ मुक्काम दिल्ली.

प्रातःकाळीं सरकारसाहेब जागृत होऊन डेऱ्यांत बसले असता रामभाऊ देवासकर यांनीं विष्णुसहस्त्रनामाचा पाठ केला.

पन्नेवाले महाराजांचे भेटीस गेले.

विश्वनाथ नारायण मंडलीक यांची भेट.

महाराज किसनगडची भेट.

---

ता. २६ डिसेंबर इ. स. १८७६

## श्रीमंत महाराज तुकोजीराव होळकर सरकार यांची दिनचर्या

प्रातःकाळचा तीन घटका दिवस आल्यावर सरकारसाहेब मंडपांत येऊन बसले असतां रामभाऊ देवासकर यांनी विष्णुनामावळीचा पाठ केला. १ प्रहर दिवसाचे सुमारास जयाजीराव शिंदे सरकार हे आपले डेऱ्यावरून पैदल मार्ग सरकारी डेऱ्यावरी येऊन मंडपातील बाहेर दरवाजापावेतों सरकारसाहेब सामोरे जावून उभयतां सरकार बरोबरीने खुर्चीवर येऊन बसले असतां शिंदे सरकार यांजबरोबरील मानकरी मंडळी असलेल्या खुर्चींवर बसली असून आपलेकडील सरदारही होते. सरकारसाहेब बोलले, ''आपण अशा थंडीमध्यें प्रातःकाळीं स्नान करितां.'' त्यावरून शिंदे बोलले, ''माझा बारमाही नेम आहे.'' सरकारसाहेब बोलले, ''मजला याबद्दल बाबासाहेब आपटे यांनींही सांगितलें होतें कीं दररोज प्रातःकाळीं स्नान होऊन पार्थिव पूजा जाहल्यावर कवाईत पाहण्यास जात असत.'' शिंदे सरकार यांनी कळविलें कीं, ''आम्ही आतां पाकशाळेंत जातों. आपण आतां दरबारचे काम सांभाळावे. आम्ही आपले थाळ्याची वाट पाहणार नाही. रात्रौ मेजवानीचे थाळे समुच्च होतील,'' म्हणोन बोलून शिंदे पाकशाळेंत जाते झाले. सरकारसाहेब दरबार कचेरींत बसले होते.

चार घटका रात्रीचे सुमारास शिंदे सरकार होळकर सरकार व उभयतां बाळासाहेब आपलेकडील सरदार यांसह थाळ्यावर बसले. शिंदे सरकारकडील मानकरी राणूजीराव शिंदे, विठोजीराव बाबा शिंदे, काशीराव सुर्वे, तात्यांसाहेब खानवलकर, बाबासाहेब गरूड, समशेर भैया आदि करून मंडळी सरकारचे उजवे बाजूचे लाइनीत बसले असून आपलेकडील मानकरी सरदार दादासाहेब, बापुसाहेब, बांडे, बक्षी खुमानसिंग, आप्पासाहेब होळकर, आदि करून मंडळी बसली होती. थाळ्याचे वेळेस शिंदे सरकार व होळकर सरकार यांचें संभाषण झाले तें :

शिंदे सरकार म्हणाले, ''आपलें व आमचे हल्लीं या दिवसांत असें एकत्र ठिकाणीं बसून भोजन व्हावे असा दिवस परमेश्वरानें आणला. असाच उभयपक्षीं चालावा अशी ईश्वरापाशीं आमचीं प्रार्थना आहे. पुढची गोष्ट (शिवाजीराव बाळासाहेबांकडे पाहून) यांच्या कारकीर्दीत कसे चालेल हे आमचेनीं सांगवत नाही. कारण आपले व आमच्या अंतःकरणातील धर्म साफ झाल्यानीं चालतील. पुढें आपल्यास समजेल मी बोलतों ही गोष्ट मनांत ठेवावी.'' सरकार बोलले, ''यांनी नीट चालावे याजविशीं विचार करणे आपलेकडेसच आहे.'' शिंदे सरकार बोलले, ''ही गोष्ट व्यर्थ आहे, कारण आम्ही बोलावे व आपल्यास संतोष वाटावा हे काम आमचें नाहीं. ही सुधारणा आपल्याच सूत्रानें होणार आहे. आतां आम्ही उठतो. आम्हांस आपले मंडळीची प्रार्थना

करणें असल्यानीं आपण स्वस्थ होऊं द्यावें.'' असें बोलून उठले आणि डावे बाजूचे लाइनीत आपलेकडील मानकरी बसले असतां पात्रासमोर उभे राहून स्वस्थ भोजन होण्याविषयीं प्रत्येकास पात्रासमोर प्रार्थना केली. बक्षी खुमानसिंग यांचे पात्रासमोर आल्यावर बक्षीजींनीं कळविलें कीं, ''हे आपण काय करितां. आपण भोजनास बसून विचारितां तर आमचें भोजन स्वस्थ होते. येथें कोणत्या गोष्टीची न्यूनता नाहीं.'' त्यावर शिंदे सरकार बोलले, ''आम्ही करतो तें विहित आहे व तुम्ही अंतःकरणपूर्वक मालकांची चाकरी करितां. तुमचे लोकांचा आदरसत्कार व मानसन्मान ठेवणें हे काम आमचें आहे व तुम्ही अंतःकरणपूर्वक चाकरी मालकांची करून दाखविणें हे तुमचें काम आहे.'' नंतर उजवे बाजूचे सदरेत शिंदे सरकार यांजकडील सरदार भोजनास बसले होते त्यांजला स्वस्थ भोजन होण्याबद्दल प्रार्थना करून तुम्ही दररोजचे मंडळी आहांत. तुमचे समाचार जास्ती घेणें नको. सरकारसाहेब बोलले, ''आपण उभें राहून बोलतां आणि खाली सर्दी आहे. याजकरितां पाट वगैरे बसण्यास द्यावा.'' शिंदे सरकार बोलले, ''पाटाचें कारण नाहीं. ह्या वेळेस किनखापी पायघड्या आपण व मी घातल्या तरी कमती नाहीं. परंतु आपले प्रेम माझ्या ठिकाणीं आहे तसेच माझे आहे. त्यांस ह्या समारंभात पाटाची आवश्यकता नाही.'' होळकर सरकार बोलले, ''बाबासाहेब आज आपण जें बोलून राहिले आहात हे पूर्वापार वडिलोपार्जित जो शिंदे आणि होळकर यांचे घराण्यांत खरोखर स्नेह होता, हें मनात येऊन उद्‌गार निघतात. आतां माझें उभयतांकडील मानकरी मंडळीस हेंच सांगणें आहे कीं, शिंदे आणि होळकर यांच्यात दुसरा विचार न समजतां सर्वांनीं याचप्रमाणें पुढें निभवावी. आपण बडवाहा मुक्कामीं आला त्या वेळी लोकवार्ता डेली साहेबांची मेम निवर्तली, सबब समाचारास आले. परंतु आपले मनातील खास हेतू भेटीचा होता हे मी खूब समजतो.'' त्यावर शिंदे सरकार बोलले, ''डेली साहेबांची मेम निवर्तली म्हणोन समाचारास आलो हे आपण समजूं नये. हा विचार कोणीच मनांत आणू नये फक्त मी आपला हेतू कसा काय आहे हें पाहण्यास आलों होतों. मुख्य निभावणें शिवाजीराव बाळासाहेब यांजकडे आहे.'' त्यावर सरकार बोलले, ''आपलें ही निभावणार आतां लहानसे झालेच आहेत.'' त्यावर शिंदे सरकार बोलले, ''मी कोणाची खात्री देत नाही. आपले व आमचे जिवांत जीव आहे तोपावेतों मजकडून जे प्रेम जडले आहे त्याजला कधीही पाठ देणार नाहीं.'' त्यावर सरकार बोलले, ''आपले अंतःकरण मजविशीं इतके साफ आहे तर मीही आपलेकडेस कधी वाकडा डोळा करून पाहणार नाहीं.'' वगैरे उभयतां सरकारांचे बोलणें होऊन थाळा झाल्यावर सर्व मंडळी उठून मंडपांत पानसुपारीकरितां खुर्च्यांवर बसली.

**सरकारी रोजनामचा**

श्री

ता. २९ डिसेंबर इ. स. १८७६

## रोजनामचा माहे डिसेंबर, इ. स. १८७६ मुक्काम दिल्ली

प्रातःकाळीं सरकारस्वारी बाहेर येऊन बसली. रामभाऊ देवासकर यांनीं विष्णुसहस्त्रनामावळीचा पाठ केला. नंतर स्वारी आपले डेऱ्यांत दाखल झालेवर आंत जातांना कारभारीसाहेबांची भेट होऊल हैदराबादवाले व सर दिनकरराव यांजकडे आपलेकडील सरदार पाठविणेचा हुकुम झाला.

दहा वाजतां रात्रीस थाळा होऊन मंडपांचे मागें स्वारी डेऱ्यांत असतां महमद सदीक मुनशी निसबत सर सालरजंग हे येऊन एक घटकाभर एकांत बोलणें होऊन रूकसत झाले.

१ साडेपांच वाजताचे सुमारास महेंद्ररूद्र प्रतापसिंग महाराज पन्ना हे आले. उभयतांच्या बगलगिरी भेटी झाल्या. सरकारसाहेबांनीं विचारलें, ''कामकाज कोण पाहतो.'' महाराज पन्ना यांनी कळविलें कीं, ''मीच पाहतो. माझी तब्येत अलीकडे ठीक राहत नाही म्हणोन बोलल्यावरून सरकारसाहेब बोललें आपले वडील सर्व मदार आम्हास सोपून गेले आहेत तेव्हां आम्हास आपल्यास सांगण्याचा अधिकार आहे व आपणही ऐकिलें पाहिजे. आपण खाणें परिमित खात जावें व हवा वगैरेचा बंदोबस्त ठेवावा. आपले वडिलांनीं जसा आमचेशी घरोपा व स्नेह संपादन केला त्याचप्रमाणें त्यांच्या सांगण्यावर आपण लक्ष ठेऊन स्नेहव्यवहार वगैरेची सदोदीत वहिवाट ठेवावी.'' म्हणोन सरकारचें बोलणें झाल्यावर ''मीही वडिलांचे सांगण्याप्रमाणेंच आपल्यास वडिलांचे जागीं मानतों.'' म्हणोन बोलणें होऊन रूकसत झाले.

**सरकारी रेकॉर्ड**

## रोजनामचा ता. ४ माहे जानेवारी इ. स. १८७७, दिल्ली

प्रातःकाळीं श्रीमंत सरकारसाहेब आतच असोन नजीक रामभाऊ देवासकर यांनीं विष्णुनामावळीचा पाठ केला. तीन घटका दिवसाचे सुमारास सरकारसाहेब पोशाख करून गळ्यांत तगमा घालून बाहेर आले. सरनोबत साहेब, बक्षी खुमानसिंग, वामनराव अण्णा नायब दिवाण वगैरे मंडळीचे मुजरे होऊन स्वारी नऊ वाजण्याचे सुमारास गव्हर्नर जनरल साहेब यांचे खासगी मुलाखतीस जावयाचे. सबब बग्गी तयार ठेवण्याचा हुकूम झाला.

बरोबर तीन वाजतां उदेपूरचे महाराज सज्जनसिंगजी हे सरकारसाहेबांचे भेटीस आल्यावर सरकारसाहेब आतील डेऱ्यांत असोन उदेपुरचे महाराज बग्गीचे खालीं उतरून बग्गीपावेतों सर काशीरावदादा साहेब, बक्षी खुमानसिंगजी यांनीं पेशवाईस येऊन घेऊन आले, ते सरकारसाहेबांची मुलाखत होऊन बगलगिरी भेटी झाल्या. मिजाजाची खेरआफियत

विचारली जाऊन सरकारचे उजवे बाजूस उदेपूरचे महाराज सज्जनसिंगजी बसले असोन, उजवे बाजुचे लाइनींत त्यांजकडील सरदारांपैकीं, थोडे अंतराचे खुर्चीवर बरोबरीने पारसरायजी ठाकूर, मनोहरसिंगजी, ताजेरात सांवळदासजी, पन्नालालजी कामदार, मुकुंद लालजी पदमनाथ वगैरे मंडळी बसले असोन, डावे बाजूस सर काशीरावदादा साहेब, बक्षी खुमानसिंगजी, कारभारीसाहेब वगैरे मंडळी बसली होती. आजचे दरबारांत लाटसाहेब यांजकडून किताबी दोन व कीरच एक व फोटोग्राफ मिळालेला उदेपूरचे महाराज यांनीं सरकारसाहेब यांस दाखविला. नंतर सरकारसाहेब यांनीं स्वतःस मिळालेल्या रकमा उदेपूरवाले महाराज यांजला दाखविल्या. थोडा वेळ शिष्टाचाराच्या गोष्टी होऊन निछरावळ मोहोर थानवीस सरकारसाहेबांनीं करून पानसुपारी हार अत्तरपान राणाजी साहेबांस सरकारांनीं देऊन, बाकीचे सरदार मंडळीस बक्षी खुमानसिंग यांनीं पानसुपारी दिली. नंतर रूकसत होतेवेळेस बग्गीपावेतों सरकारसाहेब पोचविण्यास आले होते.



**प्रकरण २७ वें**

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर यांची कारकीर्द व यात्रा

## इ. स. १८८० व १८८१

ता. १२ जानेवारी इ. स. १८८० बक्षीजी, वकील व धोंडो शामराव असें बडे साहेबांकडे गेले. बक्षीजींस कारभारी नेमल्याबद्दल जिकर निघाला त्यावेळीं तनख्याचाही प्रश्न निघाला. बक्षीजी म्हणाले ''खरगोणबद्दल नेमणुक दरमहा रु. २०० व सरनौबतीचे तनख्याबद्दल ५०० आणि कारभाऱ्याचे कामाबद्दल २५० मिळून ९५० रु. मिळतात. याशिवाय हुजरातीचे काम करावें लागतच होतें.'' यानंतर सर रिचर्ड मीडसाहेब येणार त्यांस मेजवानीबद्दल बोलणें झाले. संध्याकाळीं श्रीमंत सरकारीस्वारी बडवाहाहून इंदुरीं आली. जनरल मीड हैदराबादचे रेसिडेंट व डेलीसाहेब महाराजांस भेटावयास दुसरें दिवशीं येणार म्हणोन बक्षीजींस चोरल चौकीपावेतों पेशवाईस जाण्याचा हुकूम झाला. ता. १३ जानेवारीस ५ वाजतां इंदूर स्टेशनावर गाडी आली. स्टेशनवर दिवाणसाहेब पळसीकर, सर काशीरावदादा आणि वकील हजर होते. गार्ड आफ आनर्सनीं सलामी दिली. १३ फेर तोफेचे झाले. आपल्याकडील पानसुपारी झाल्यावर डेलीसाहेबांसह रेसिडेन्सीत गेले. ता. १५ रोजीं मीडसाहेब खासगीं तोरने सरकारांस भेटावयास आले होते. कांहीं गोष्टी होऊन पानसुपारी झाल्यावर रूकसत झाले. ता. १६ रोजीं जनरल मीडसाहेबांस खाना सरकारांतून होता. ३०-४० साहेब लोक खान्यास होते. रात्रौ भोजनोत्तर केलेल्या भाषणांत महाराजसाहेबांची तारीफ होती. महाराजसाहेबांतर्फे धोंडो शामरावांनीं भाषण

केले. हे साहेब पूर्वी येथें रेसिडेंट होते. यांचे वेळचे बरेच मामले अद्यापी चालू होते. त्याजबद्दल बोलणें वगैरे झालें. ता. २१ ला जनरल मीडसाहेब रवाना झाले. आपले येथून पोहचविण्यास दिवाणसाहेब, धोंडो शामराव, सर काशीरावदादा, बक्षीजी असें गेले होते. रवाना होण्याचे वेळीं तोफेचे फेर १३ झाले.

ता. ३० जानेवारी महंत भीमगीरबुवा यांनीं बक्षीजीपासून बक्षीगिरीचा चार्ज घेतला. हे काम बक्षीजींकडे इ. स. १८४८ पासून १८८० पर्यंत चालू होतें.

ता. १४ मे रोजीं बक्षीजी, रामचंद्र विठ्ठल वकील, नाजीमदेशदान व दाजीसाहेब जनरल डिपार्टमेंटचे मुखत्यार असें महूस अबकारी लिलाव करण्यास गेले. लिलाव सत्तर हजार आठशेंत झाला. फेरोजशहा पारशी पुणेवाला यांनीं ठेका घेतला.

ता. १८ मे रोजीं इंदूर छावणींत कप्तान बार व बक्षीजी यांनीं इंदूर सर्कल अबकारीचा लिलाव त्रेसष्ट हजार शंभरांत केला. इंदूर संस्थानची खानेसुमारी करण्याबद्दल बडेसाहेबांनीं बक्षीजींस सांगितले व त्यांनींही कबूल केलें.

या सालांत बादशहाजादीचे जन्मगांठीचा दरबार ता. २९ मे रोजीं झाला. शिरस्तेप्रमाणें दरबार, तोफेचे फेर, सलामी वगैरे होऊन समारंभ झाला.

ता. ४ जून रोजीं सरकारस्वारी खांडव्यास स्पेशल ट्रेननें रवाना झाली, कारण लार्ड रिपनसाहेब येणार होते.

लार्ड रिपन आल्यावर डेलीसाहेबांनीं महाराजसाहेबांची भेट करविली. लार्डसाहेब व महाराज एकाच बग्गीतून कमिशनरचे बंगल्यावर गेले. नंतर खासगी भेटीस दोन प्रहरीं उभयतां बाळासाहेब, सर काशीरावदादा, यासह सरकार गेले होते. लार्डसाहेब साडेआठ वाजतां सिमल्यास रवाना झाले. नंतर सरकारस्वारी स्पेशलने बडवाईस आली. ता. १४ जून रोजीं जनरल डेली साहेबांनीं पत्र पाठविलें कीं, ४५००० मण मीठ गव्हर्नमेंटकडून दोन रुपये मणाचे भावानें सालदरसाल मिळत जाईल. ता. १६ जून रोजीं धाकटे बाळासाहेबांस मुलगा झाला. नांव मल्हारराव ठेवले. कांहीं मंडळींस वस्त्रें दिली.

ता. २० आक्टोबर ते ३० आक्टोबर बक्षीजी रामपूर जिल्ह्यांत दौऱ्यावर गेले होते. ता. १ नोव्हेंबर रोजीं स्टारचा दरबार वाड्यांत होणार म्हणून बडेसाहेब यांस निमंत्रण देण्यास पळसीकर, बक्षीजी, वकील असें सकाळीं गेले होते. चार वाजतां मामूल दरबार झाला. बडेसाहेबांनीं महाराजांस दोन खलिते दिले. त्यातील एक तर महाराजांनीं पेट्रीआटिक फंडास १०००० रुपये दिले होते त्याबद्दल शुक्रगुजारीचा होता. ता. १० नोव्हेंबर रोजीं संतोबा टेंबकर सरसुभे उज्जेनी यांनीं शिंदे सरकारकडून बाळंतविडा आणिला. सबब बक्षीजी हे जाऊन त्यांस वाड्यांत घेऊन आले. सरकारची भेट झाल्यावर बाळंतविडा नजर केला. पानसुपारी झाल्यावर ता. १५ रोजीं संतोबास वाड्यांत मेजवानी झाली आणि वस्त्रें देऊन बिदागी केली. श्रीमंत सरकारची तब्येत अस्वस्थ सबब ता. २७ नोव्हेंबरपासून मोठे बाळासाहेबांस रियासतीचे काम पाहण्यास सांगितले.

सन १८८१ इसवीचा दरबारचा अहवाल खुमानसिंग बक्षीजींचे सहीनें प्रसिद्ध झाला.

त्यातील मुख्य बाबी जमीन महसूल, कस्टम, आबकारी, टाका, वगैरे मिळून जमा उत्पन्न रुपये ५८५३५०० असून खर्च रियासत व राजकुटुंबाचें सुद्धां रु. ५३०३३०० होते.

१ **विद्या खातें** : यावर्षी श्रीमंतांनीं स्वतः परीक्षा न घेतां कमेटी नेमिली. कमेटीनें समाधानकारक शेरा दिला आहे. शाळांमधून इंग्रेजी, संस्कृत, पर्शियन, हिंदी आणि मराठी शिकविले जाते. एकंदर शाळांची संख्या ९७ आहे. विद्यार्थ्यांची संख्या साडेचार हजारावर गेली. मुलींच्या शाळा तीन झाल्या. कायद्याच्या शाळेतून पंधरा विद्यार्थी उत्तीर्ण झाले. वैद्यकीच्या शाळेतून डाक्टर बुमंट यांनीं चार विद्यार्थ्यांस प्रमाणपत्रें दिली. शिक्षण खात्यांतील इन्स्पेक्टर रा. वासुदेवराव मुळे यांनीं हिंदी भूगोल, हिंदुस्थानचा इतिहास आणि हिंदी अंकगणित शाळांसाठीं तयार केल्यावरून सरकारांतून त्यांस बक्षीस मिळाले. संस्थानचे दोन विद्यार्थी मुंबईतील ग्रँट मेडिकल कॉलेजांत आणि एक आर्टस कॉलेजमध्ये शिकत आहे. पुण्यातील डेक्कन कालेजांत एक आणि सायन्स कालेजांत १ असे शिकत आहेत. मद्रास शेतकी कालेजांत दोन विद्यार्थी गेले; पैकीं एक विद्यार्थी विद्याभ्यास संपवून माघारी आला. संस्कृत कॉलेजचा अभ्यास चांगला चालू आहे. अबकारी खात्याचे उत्पन्न समाधानकारक आहे. तुरूंगखाना : कैद्यांची संख्या ३२१ होती. मंडलेश्वर येथील एक कैदी फाशी गेला.

२. **म्युनिसिपालिटी** : उत्पन्न वार्षिक त्रेचाळीस हजारांचें झालें असून खर्च साडेछत्तीस हजार आहे. लोधीपुऱ्याचे रस्त्यावर पाण्याची सोय झाली. रेल्वेमुळें रहदारी वाढली. यासाठीं राणीपुरा रस्ता वाढविला गेला. मुशाफिरखान्याची वाढ करण्यांत आली. रेल्वे लेव्हलजवळ दरवाजे दिवसातून अनेक वेळां बंद ठेवल्यानें लोकांची गैरसोय होते. बडेसाहेबांकडे इंदूर दरबारानें तक्रार नेली. बडेसाहेबांनीं निकाल दिला कीं, रेल्वेचे वेळीं दरवाजे बंद ठेवून बाकीच्या वेळांत खुले ठेवावे.

३. **पैमाष खातें** : कायथा व तराणा महालाची पैमाष पूर्ण झाली. रामपुरा, गरोठ, मवासा, चंदवासा, नंदवाय, महदपूर आणि खरगोण इकडील काम चालू आहे.

४. **पीकपाणी** : पर्जन्य ४३ इंच झाला. पीक चांगले आहे व त्यामुळें धान्याच्या किंमती उतरल्या आहेत. बैलतगाई, निवाणतगाई, असें शहात्तर हजार रुपये वाटले गेले. एक हजार नवीन कुणबी दुसरेंकडून संस्थानांत १७०० बैल घेऊन आले.

५. **आरोग्य खातें** : तीन हजार मुलांस देवी टोचविल्या. शेकडा ९३ यशस्वी झाले. प्रांताचे आरोग्य चांगले आहे.

६. **इंजिनियरिंग** : धार रस्ता पूर्ण करण्यासाठीं श्रीमंतांनीं मंजुरी दिली. काम चालू झाले. शिरपूर येथील नवा वाडा बांधण्यासाठीं तीन लक्ष चव्वेचाळीस हजारांची मंजुरी झाली होती. त्यावर दोन लाख अधिक लागले. नवीन तलावाकरितां दोन लक्ष चार हजार मंजूर झाले.

७. **न्याय खातें** : सदर कोर्टांत १३१ फौजदारी मुकदमे होते. पैकीं ९५ निकालांत आले. जिल्ह्यानिहाय कोर्टांतून ७७२४ फौजदारी मुकदमे होते. त्यापैकीं ७००९ निकालांत काढले. दिवाणी मुकदमे ६०९० होते; पैकीं निकाल ५६३५ चा दिला. एकंदरीत काम समाधानकारक आहे.

**इ. स. १८८१**

ता. १ जानेवारीस श्रीमंत सरकारांनीं दक्षिणेत जाण्याचा निश्चय केला. ता. ३ रोजीं मोठ्या राणीसाहेब खांडव्यास मेल ट्रेननें दक्षिणेस रवाना झाल्या. ता. ५ रोजीं सरकार स्वारी स्पेशल ट्रेननें दक्षिणेस जाण्यास रवाना झाली. ता. ९ रोजीं मोठे बाळासाहेब शिवाजीराव बाबा हे राजपुताना पाहण्यास रवाना झाले.

ता. १२ फेब्रुवारीस सर लेपल ग्रीफनसाहेब एजंट टु धी गव्हर्नर जनरल यावयाचे, सबब स्टेशनवर गार्ड आफ आनर व तोफेचे फेर करण्याबद्दल बंदोबस्त झाला. बक्षीजी, रामजी वकील व कर्नल फेनवीकसाहेब स्टेशनवर हजर होते. त्याच दिवशीं सुरतेचे मुल्लाजी आले. बक्षीजी भेटावयास गेले होते.

ता. २ मार्च सरकारस्वारी संध्याकाळीं साडेसात वाजतां इंदुरी दाखल झाली. स्टेशनवर कारभारी वगैरे अधिकारी पेशवाईस हजर होते. वाड्यांत आल्यावर सरकारांनीं अण्णासाहेब, मल्हार विठ्ठल व सखाराम मार्तंड रेशीमवाले यांसीं एकांत केला. ता. ५ मार्च रोजीं सरकारांतून डेप्युटेशन सर लेपल ग्रीफन साहेबांकडे गेले या मंडळीत १ बक्षी खुमानसिंगजी, २ किबेसाहेब, ३ सखाराम मार्तंड रेशीमवाले, ४ भीमगीर बाबा, ५ अप्पासाहेब होळकर, ६ धोंडो शामराव, ७ गोविंदराव खजांची, ८ खासगीवाले व ९ रामजी वकील अशी मंडळी होती.

ता. ३० मार्च रोजीं गुडीपाडवा म्हणून दरबार झाला. सर काशीरावदादा यांनीं नोकरी चांगली केली. सबब चार गांवांची सनद करून दिली. ता. ३१ मार्च रोजीं क्याप्टन बारसाहेब इंग्लडास रवाना झाले. ता. ७ एप्रिल रोजीं सर लेपल ग्रीफनसाहेब खासगी भेटीकरितां वाड्यांत आले. क्याप्टन राबर्टनसाहेब बरोबर होते. सरासरी १० मिनिटें महाराजसाहेबांशीं एकांत झाला. पानसुपारी घेऊन गेले.

ता. २० रोजीं क्याप्टन राबर्टसाहेबांकडून लिहून आलें कीं, रेसिडेन्सीत कोणी वकील नाही तरी वकील मुकरर करून पाठविणें. ता. ३० एप्रिल रोजीं बक्षीजी व दाजीसाहेब खासगीवाले आणि मुन्तजीम सायर हे रेसिडेन्सीत अबकारी लिलाव करण्यास गेले होते. कप्तान बार्नसाहेब व सरूपनारायण तेथें हजर होते. रुपये ७०,५०० त इंदूर सर्कलची बोली मोहनलाल कलालाचे नांवें खतम झाली. ता. ५ मे रोजीं बक्षीजी कर्नल किंकेडसाहेबाकडे गेले होते. लाकसाहेब सेंट्रल प्राव्हिन्सचे इन्स्पेक्टर जनरलही होते. त्यांनीं बक्षीजींस कळविले की, तंट्या भिल्लाचे कामात मदत झाली पाहिजे. बक्षीजींनीं मदत देण्याचे कबूल केलें.

ता.१९ मे रोजीं मोठे बाळासाहेबांस कन्या झाली. सबब नजरेचा दरबार झाला.

ता.२४ मे रोजीं रेसिडेन्सींत बादशहाजादीचे जन्मगांठीबद्दल दरबार झाला.

श्रीमंत सरकार व उभयतां बाळासाहेब व सरदार लोक प्रातःकाळीं साडेपांच वाजतां दरबारास गेले. मामुल शिरस्ते पेशवाई सलामी झाली. पानसुपारी होऊन स्वारी वाड्यांत दाखल झाली. ता. २५ रोजीं सरकारचे नातवाची जन्मगांठ होती. नजरेचा दरबार झाला. महाराजसाहेबांनीं दरबारांत भाषण केलें कीं, रयत व नोकर लोकांनीं तन मन धनें करून हीं सरकार नोकरीवर अर्पण केलीं पाहिजेत.

ता. ४ जून रोजीं बक्षीजी कप्टन राबर्टन साहेबांकडे गेले होते. लाटसाहेबांकडील सरकारचे नांवचे खलिते बक्षीजींस देऊं लागले तेव्हा बक्षीजींनीं सांगितलें कीं येथें अशी वहिवाट आहे की बडेसाहेबच खुद्द खलिते महाराजांस देतात. तेव्हां त्यांनीं खलिता ठेवून घेतला. ता. ६ जून रोजीं सर्व मेंबर लोकांनीं नानाजी सीताराम यांजबद्दलच्या मिसला वाचून पाहिल्या आणि त्यांस बनावटी सही केल्याबद्दल सात वर्षांची कैद देण्याचे मत दिले. ता. ७ रोजीं बक्षीजी व बापूसाहेब हे बडेसाहेबांस भेटले. त्यांनी लाटसाहेबांकडील खलिता दिला आणि सांगितलें कीं, हा खलिता मुबादल्या संबंधाचा आहे. नंतर जावऱ्याचे नबाबाकडील नजराण्याबद्दल सांगितलें कीं, ते सालमसाही चलणचे हिशोबानें नजराणा देतात. तरी थोडक्याकरितां तक्रार करूं नयें. ता. १६ रोजीं बडेसाहेबांस मेजवानी संध्याकाळीं झाली. साहेब लोक लालबागेत जमूं लागले. नऊ वाजतां खाना सुरू झाला. खाना झाल्यावर आतशबाजी चालली. बडेसाहेब रात्रीं ११ वाजतां परत गेले. ता. ८ जुलाई रोजीं श्रीमंत सरकारची जन्मगांठ म्हणोन दरबार झाला. बडेसाहेबही दरबारास हजर होते. बडेसाहेब गेल्यावर नजरेचा दरबार झाला. ता. ६ आगस्ट रोजीं सखाराम मार्तंड रेशीमवाले यांस मिलटरी सेक्रेटरी नेमण्याबद्दल टिप्पण झाले. दर हकीगतींत ते जनरलच मुकरर झाले. दरबारांत सरकारांनीं त्यांस सांगितले कीं बक्षीजींकडून चार्ज घ्यावा. ता. २९ सप्टेंबर रोजीं महाराजसाहेब मदरशांत गेले. बडेसाहेबांचे हस्तें बक्षीसे वाटण्यांत आली. ता. २ आक्टोबर रोजीं दसरा झाला. मामूल दरबार व स्वारी निघून नंतर दरबार होऊन समारंभ आटपला. ता. २९ आक्टोबर रोजीं जावऱ्याचे नजराण्याचा फैसला होऊन आल्यांत हल्लीं शिक्का नजराणा घ्यावा. बडेसाहेबांनीं सांगितलें कीं नबाब जावरा जहागिरदार आहेत. वस्तुतः तो स्वतंत्र आहे. ता. ७ नोव्हेंबर रोजीं सरकार स्वारी जनानखान्यासह रामपुरा भानपुरकडे स्पेशल ट्रेननें रवाना झाली. ता. १५ डिसेंबर रोजीं बक्षीजी, धोंडो शामराव हे बडेसाहेबांकडे गेलें जावरा व ठाकुर कडोद्या आणि गुलजी जगन्नाथबद्दल बोलणें झालें. बडेसाहेबांनीं रामराव भगवंत मोतमीनानें खोटी सही केली आहे त्यांस महकूब करून दुसरा मोतमीम नेमावा असें सांगितलें. श्रीमंतांस धोंडो शामराव यांनीं श्रुत केलें.

इसवी सन १८८१-८२ एजन्सीचा अहवाल प्रसिद्ध झाला. त्यात संस्थानचें उत्पन्न व खर्च दाखविला तो येणेंप्रमाणें: उत्पन्न खातेवार मिळून रुपये ७०७४४०० असून खर्चाचा तपशील दाखवून दाखविलेले रुपये ५२७१७०० असे दर्ज केलें आहेत.

ह्यानंतर १ न्यायदान खातें, २ विद्या खातें, ३ तुरूंग खातें, ४ पोलिस खातें, ५ म्युनिसिपालिटी, ६ छापखाना, ७ पोस्ट खातें, ८ खासगी खातें, ९ सूतयंत्र, १० रेल्वे वगैरे खात्यांचे काम संतोषकारक झाले आहे म्हणोन उल्लेख केलेला आहे. रेल्वे संबंधांत विशेष उल्लेखनीय म्हणजे, इंडिया ग्याझेटमध्यें असें प्रसिद्ध करण्यांत आले कीं, राजपुताना स्टेट रेल्वे, होळकर स्टेट रेल्वे, सिंधिया नीमच स्टेट रेल्वे आणि नीमच नसीराबाद रेल्वे, या सर्व एक केल्या जाऊन त्या सर्वांस राजपुताना मालवा रेल्वे असें नांव दिले जाईल. यावर होळकर सरकारांकडून तक्रार पेश झाली की, हिंदुस्थान सरकारशीं

ठरल्याप्रमाणें आमच्या लाईनीला होळकर स्टेट रेल्वेच नांव राहिले पाहिजे व जमाखर्चही निराळा राहिला पाहिजे. बडेसाहेबांस हे म्हणणे मान्य झाले व त्याप्रमाणें रेल्वे अधिकाऱ्यांस त्यांनीं कळविले. पिंपळ्याचे स्टेशन करण्याची सरकारची मनिषाही पूर्ण झाली. रेल्वे अधिकाऱ्यांनीं स्वतःचे खर्चाने महाराजांकरितां सलून तयार करून देण्याचेही अभिवचन दिले.

**आरोग्य खातें** : सरकारी देणगी दहा हजारांनी वाढली आहे. त्यामुळे रामपुरा व महेश्वर येथें इस्पितळे स्थापन झाली. मल्हारगंज, भानपुरा, खरगोण येथेंही डिस्पेन्सऱ्या सुरू झाल्या.

**इंजिनियरिंग खातें** : नव्या राजवाड्यांस आतापर्यंत सात लक्ष ब्याऐशीं हजार खर्च झाला. धार वगैरे रस्ते दुरूस्त झाले. निवाणाकडे ४४००० हजार खर्च झाले.

**पैमास खातें** : आता फक्त पैमास जिरापूर, भानपुरा, महदपूर आणि खरगोण येथील काम चालु आहे. बाकी पीकपाणी, वगैरेची स्थिति चांगली आहे. आफु मात्र सरासरीवर चढली आहे.

सत १८८२ इ. बक्षीजी श्रीमंत सरकारांची दिनचर्या लिहितात :

ता. १ जानेवारीस सरकारस्वारी स्पेशल ट्रेनेतून रामपुरा जिल्ह्यांतून आली. कप्तान राबर्टनसाहेब बडेसाहेबांकडून आले होते आणि सरकारास कळविलें कीं आज रविवार असल्याने गार्ड आफ आनर आणू शकलो नाही. ता. १७ जानेवारी रोजीं गुलजी जगन्नाथास कैदेतून खुले केलें. सायंकाळीं बडेसाहेब सरकारचे भेटीस आले. स्वारी थोडी नाराजींत होती. तारीख मजकुरीं सरकारांचे बोलविण्यावरून रावसाहेब व विश्वनाथ नारायण मंडलिक हे सरकारचे भेटीस आले. ता. ११ फेब्रुवारी रोजीं त्रावणकोरचे महाराज खांडव्यास आले असल्यानें आपलेकडील आमंत्रण देण्यास बक्षीजीस खांडव्यास पाठविले होते. खांडव्यास व्यवस्था सर्व आपलेकडील होती.

त्या महाराजांस इंदूर येथें येण्याची विनंती सरकारच्या आज्ञेवरून केल्यावर त्रावणकोरचे महाराज यांनीं कळविलें कीं, हिंदुस्थानचे सफरीहून परत येताना इंदुरीं येऊं व सरकारचे नांवचें एक पत्र महाराजांनीं दिलें. ता. ९ मार्च प्रातःकाळीं महाराज व उभयतां बाळासाहेब सहा वाजतां स्टेशनवर गेले. साडेसहा वाजतां त्रावणकोरचे महाराजांची स्पेशल ट्रेन आली. उभयतां महाराजांच्या भेटी झाल्या. २१ फेर तोफेचे झाले. महाराज व त्रावणकोरचे महाराज एका बग्गीत बसून लालबागेत गेले. फौजेने सलामी दिली. सायंकाळीं पांच वाजता त्रावणकोरचे महाराजांस वाड्यांत आणावयाकरितां पळसीकर व अप्पासाहेब होळकर बोलविण्यास गेले होते. स्वारी आली. महाराजसाहेब आर्धी बिछायतपावेतों सामोरे गेले. गार्ड आफ आनर हजर होते. २१ फेर तोफेचे झाले. आपले सरकारांनीं एक हिऱ्याची आंगठी महाराजांस व एक त्यांचे पुत्रास दिली. पानसुपारी झाल्यावर रीतिप्रमाणें पोहचविलें. रात्रौ लालबागेत रोशनाई, आतषबाजी व मेजवानी झाली. बडेसाहेबही आले होते व दुसरें दिवशीं त्रावणकोरचे महाराज रवाना झाले. मोठे बाळासाहेब स्टेशनवर पोंहचविण्यास गेले होते. ता. ३१ मार्च रोजीं सर लेपेल ग्रीफन

साहेब व कप्तान राबर्टनसाहेब किल्ला पाहण्यास बापूसाहेब रेशीमवाले यांजबरोबर गेले होते. बडेसाहेबांनीं सर्व तोफा पाहिल्या व मिस्त्रीखान्यांत जाऊन कारखाना पाहिला. खातरजमाही झाली कीं, तोफा आतां ढाळल्या जात नाहीत.

ता. ५ एप्रिल इ. स. १८८२ रोजीं महाराजसाहेबांची कित्येक दिवसांपासून इच्छा होती कीं, रामपूर बरेलीकडे जावे, म्हणोन विचार करण्यांत आला व जाण्याचे ठरले. ता. ११ एप्रिल रोजीं सर लैपेल ग्रीफन व सर राबर्ट इगर्टन असें दोघे बारा वाजतां मदरशांत सरकारचे भेटीस आले. सलामी दिली गेली. कांहीं वेळ बोलणें होऊन रूकसत झाले. पावणे चार वाजतां सरकारस्वारी रायपूर, बरेलीकडे जाण्यास स्पेशल ट्रेननें रवाना झाली. ता. २५ एप्रिल रोजीं धाकटे बाळासाहेबांस मुलगा झाला. ता. ८ मे रोजीं सारंगपुराहून महाराजसाहेबांची तार आली कीं, आम्ही बद्रीनारायण यात्रेस जात आहो. दोन्ही राणीसाहेबांनीं हरिद्वारेस येऊन सामील व्हावें.

श्री क्षेत्र बद्रीनारायणास स्वारी परत आली त्यांसंबंधाची जितकी माहिती सरकारी कागदातून मिळाली तितकी सोबत जोडली आहे. तीवरून श्रीमंतांचा ठिकठिकाणीं झालेला सन्मान, त्यांनीं केलेले धर्मादाय, लक्षांत येतील. ह्यांत जशी त्यांची दक्षता दिसून येईल तितकीच राज्यांत दौऱ्यावर निघताना किती दक्षता पाळली जाई ते सोबत जोडलेल्या लेखांकावरून लक्षात येईल.

## श्री

ता. ९ नोव्हेंबर इ. स. १८८१

यादी श्रीमंत सरकारसाहेबांची स्वारी माहली येणार त्याचे दोनरोज पूर्वी उमराव टाकेदार यांनी पेटलावदेस येऊन दाखल होण्यापूर्वी तमाम लोकांस तालुकेनिहाय ठाकूर यांजला पत्रें लिहिणें. त्याजबद्दल महाल परगणे पेटलावद विद्यमान बळवंतराव वामन अमीन सुरू सन १२९१ फसली मिती कार्तिक वद्य ३ बुधवार संमत १९३८ तारीख ९ नोव्हेंबर इ. स. १८८१.

| | |
|---|---|
| १ तालुके झकणावदा ठाकूर जवानसिंग | १ तालुके रायपुरा ठाकूर बळवंतसिंग |
| १ तालुके करबड ठाकूर प्रतापसिंग | १ तालुके सारंगी ठाकूर खुमानसिंग |
| १ तालुके जामली ठाकूर आमरसिंग | १ तालुके पाराबोरी ठाकूर कुबेरसिंग |
| १ तालुके बडबेट ठाकूर दौलतसिंग | १ तालुके बोडायता ठाकूर मोपतसिंग |
| १ तालुके खवासा महाराज रघुनाथसिंग | १ तालुके घुगरी ठाकूर गंभीरसिंग |
| १ मौजे बावडी ठाकूर ओंकारसिंग | १ मौजे कोदली ठाकूर माधोसिंग |
| १ मौजे नोगांवा ठाकूर गोविंदसिंग | १ मौजे अंतरवेल ठाकूर भेरूसिंग |
| १ मौजे हणमंत्या गोसावी रतीगीर | १ तालुके x x x x x (पान फाटलें) |
| १ मौजे गेहेंडी ठाकूर नाथसिंग | |

येकुण सत्रा जागेचे टाकेदार उमराव लोक यांजला पत्रें लिहिली गेलीं असें ता. ९ नोव्हेंबर इ. स. १८८१ के रोज परवाने दफातेबारनीशीमे नंबर १५ के लिखे गये. दस्तूर गोपाळ हिरालाल जमीदार रूजू शिवराम धोंडदेव विभूतेदरखी अमीन परगणें पेटलावद.

येथें इ. स. १८८२ मेपर्यंतची हकीगत पुरी होत आहे. श्रीमंतांची श्रीबद्रीनारायणाची यात्रा एकत्र पाहण्यास मिळावी म्हणोन, ती जरी पुढील काळातील आहे तरी, सोईसाठी सोबत जोडली आहे.

**श्रीगजानन प्रसन्न**

## श्रीबद्रीनाथाची यात्रा

### रोजनामचा तारीख ११ एप्रिल ते तारीख २ आगस्ट इ. स. १८८२
### (ही हकीगत इंदुरास दिवाणसाहेबांकडे प्रवासातून येत असे)

स्वामींचे सेवेसी सीताराम सदाशिव (अभ्यंकर) कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागाईत तारीख १८ माहे एप्रिल इ. स. १८८२ पावेतों मुक्काम संस्थान जयपुर येथें श्रीकृपेकरून क्षेम असो विशेष. श्रीमंत सरकारसाहेबांची स्वारी श्रीमंत-सौभाग्यवती छोटे मासाहेबांसह इंदूर येथील मदरशांतून तारीख ११ मीनहूस निघाली ती इंदूर स्टेशनावर स्पेशल गाडीत तिसरें प्रहरीं फर्स्ट क्लासांत स्वार झाली. साडेतीन वाजतां स्पेशल रवाना जाहली ती दुसरें दिवशीं म्हणजे तारीख १२ रोजीं चितोडास दीड प्रहर दिवसा दाखिल झाली. मार्गात बडनगरचे स्टेशनावर श्रीमंत शिंदे सरकारकडून पेशवाईचा बंदोबस्त उत्तम राहून रात्रीचे थाळे तेथेंच झाले. पुढें मंदसोरचे स्टेशनावर तेथील सुभे पेशवाईस येऊन पानसुपारी सलामी वगैरे झाली. थडोदचे स्टेशनवर आपलेकडील रामपुरा सुभे व नायबसुभे व वकील हजर होतेच. मध्यंतरीं रतलामचे स्टेशनावर तेथील राजेसाहेब व दिवाण लक्ष्मण चिंतामण आले होते. यानंतर निमचेस इनायतुल्ला सुभे पेशवाईस येऊन सलामी वगैरे जाली. तेथून चितोड स्टेशनवर स्पेशल दाखल जाहली. संस्थान उदेपूर येथील महाराणासाहेब यांजकडील सरदार सावळदासजी, जगन्नाथजी व गोपालजी वगैरे पेशवाईस येऊन फौजी लोकांकडून सलामी होऊन तोफेचे फेर २१ जाहले. नंतर स्वारी चितोडीस मुकामास आली. रसद सामानाची व्यवस्था दरोबस्त उत्तम प्रकारे राहिली. अस्तमानीं किल्ला पाहण्यास गेले होते, बाद रात्रौ १० वाजतां स्टेशन चितोडवर स्वारी आली. साडेअकराचे सुमारास स्पेशल चितोड स्टेशनवरून रवाना झाली. ते वेळेस तोफेचे फेर २१ झाले.

तारीख १३ रोजीं प्रातःकाळीं स्पेशल अजमेर स्टेशनवर दाखल जाहली. मे. स्टांडर्स कमिशनरसाहेब व डेप्युटी कमिशनर व इतर फौजी आफिसर हे फौजेसह पेशवाईस आले होते व अजमेर येथील पांच सहा मोठे सावकार लोक पेशवाईस आले होते. अजमेर येथें फतेमलजी शेट फडकतिया यांचे कोठीत स्वारी उतरली होती. तीन प्रहरानंतर श्रीमंतांची

स्वारी पुष्करजीचे यात्रेस सौभाग्यवती छोटे मासाहेबांसह रवाना झाली. रात्रौ मुक्काम करून तारीख १४ रोजीं श्रीपुष्कर क्षेत्री स्नान, दान, तीर्थश्राद्ध वगैरे होऊन दोन प्रहरानंतर रवाना होऊन अजमेरीस तिसरें प्रहरीं स्वारी दाखल जाहली. श्रीपुष्करजीस सवादोन हजार दानधर्म केला. अस्तमानाचे सुमारास मुसलमानांचे प्रसिद्ध दैवत ख्याजासाहेब पीराचे दर्शनास स्वारी गेली होती व तेथें कोठीवर दरबार जाहला. पांच सहा सावकार लोकांच्या नजरा झाल्या. संस्थान सहारचे राजे भेटीस आले होते. रात्रीचे थाळे होऊन अजमेरहून रात्रौ १ वाजतां स्पेशल रवाना झाली. ती जयपूरच्या स्टेशनवर तारीख १५ प्रातःकाळीं आठचे सुमारास दाखल झाली. संस्थान जयपूरचे राजेसाहेब माधोसिंगजी व मेहरबान ले. कर्नल पेअर्ड साहेब रेसिडेंट राजपुताना हे फौजेसह पेशवाईस आले होते. राजेसाहेबांची भेट होऊन साहेबांशीं शेकहँड होऊन उभयतांस बग्गीत घेऊन रामबागेत स्वारी रवाना झाली. तोफेचे फेर २१ झाले. राजे साहेबांबरोबर सरदार मंडळी पांच सात होते. रेसिडेंटसाहेब मध्यंतरीच रूकसत झाले. रसद सामानाचा बंदोबस्त व बग्ग्या, म्याने, शिपाई वगैरे उत्तम प्रकारें ठेविला होता. अस्तमानी स्वारी बडेसाहेब राजपुताना यांचे भेटीकरितां कोठीवर जाऊन साहेबास भेटून नंतर रामनिवास बागेंत गेली. तेथें कारंजाचे चक्त्यांत कांहीं वेळ बसून बागेतील जनावरें, पक्षी, पाखरें व इतर वस्तूंचे निरीक्षण करून बागांत फिरले. ह्या बागांस लाखो रूपया खर्च झालेला आहे. नंतर स्वारी शहरांत फिरून दोन घटका रात्रीं रामबागेतील मुक्कामावर दाखल झाली. तारीख १६ मीनहु रोजीं प्रहर दिवसास थाळे होऊन स्वारी शहरांत गेली. प्रथम इस्पितळ पाहिले, नंतर मदरशांत जाऊन तेथील मुलांची परीक्षा घेतली व तेथून श्रीरामचंद्राचे मंदिरांत जाऊन दर्शन घेतले व स्वारी बरोबर एक वाजतां राजवाड्यांत येऊन चंद्रमहालात आराम केला. तिसरें प्रहरा सरकार असताना राजेसाहेब आले व कांहीं वेळ बसून गोष्टी होऊन रूकसत झाले. नंतर मागील चार घटका दिवसास हत्तीची लढाई पाहिली. त्यावेळीं राजेसाहेबही येऊन सरकारांजवळ बसले होते नंतर स्वारी रथात बसोन वाड्याचे आसपास फिरली. तलाव पाहिला. देवीचे दर्शन घेतले व घोडे फिरविण्याचे जागी स्वारी आली. राजेसाहेब हे घोडे फिरवून राहिले होते, राजेसाहेबांनीं आपले पागेतील खासे घोडे दाखविले. रात्रीं शहरातील प्रसिद्ध रामजण्याचे तायफे व भांडलोक यांचे गायनवादन होऊन अर्धरात्रीनंतर आराम केला.

तारीख मीनहुस प्रातःकाळीं स्वारी रामबागेतून छोटे मासाहेबांसुद्धां सोमवती असल्यानें गलतातीर्थांचे ठिकाणीं जाऊन स्नानदान करून तीन प्रहरांनंतर निघोन घाट येथें आली. घाट येथील मकाने, बागबगीचे व राजदरबारची जागा अतिउत्तम असून वस्तूही उत्तम उत्तम आहेत. त्या पाहून अस्तमानीं हवा खात चार घटका रात्रीस रामबागेंत स्वारी दाखल झाली. राजेसाहेब माधोसिंगजींची स्वारी सामोरे आली होती. तारीख १८ रोजीं जयपूरचे राजेसाहेब यांजकडे दरबार असून प्रहर दिवसास स्वारी मोठेच समारंभानें निघाली. त्यावेळेस तोफेचे फेर २१ जाहले, फौजी लोकांनीं सलामी दिली. रिसाला, पागा पलटण, खासबरदार,

हलकारे, चोपदार, खासे घोडे वगैरे पेशवाईत होते. शहराजवळ गेल्यानंतर श्रीमंत हत्तीवर स्वार झाले. किबेसाहेब सरकारचें मागें खवासीत बसले होते. नंतर स्वारी राजवाड्यांत जाऊन हत्तीवरून उतरून तामझामांत बसून जाण्याचे जागीं दुसरें चौकापर्यंत दोघे सरदार पेशवाईस आले, दरबारची तयारी होऊन खुर्च्यांची बैठक लागली होती. मध्यभागीं रत्नजडीत सिंहासनावर बैठकीच्या दोन जागा होत्या. राजेसाहेब दरबारचे पायरीपावेतों पेशवाईस येऊन सरकारसुद्धां उभयतां सिंहासनारूढ झाले. ते वेळीं तोफेचे २१ फेर झाले. इकडील सरदारमंडळी व त्यांजकडील सरदार मंडळी. दरबारास एकंदर एक हजार मंडळी असेल. मोठा मजा आला. जयपुरचे राजेसाहेब यांनीं महाराजांस वस्त्रें, पांर्चे २३, शिरपेंच १, कंठा १ व हत्ती १ व घोडे चार याप्रमाणें देणगी दिली. नंतर हार, तुरे, अत्तरपान होऊन स्वारी रूकसत झाली. त्यावेळेस तोफेचे फेर २१ जाले. राजेसाहेब लंबेफरशपर्यंत पोहचविण्यास आले होते. नंतर स्वारी बारा वाजण्याचे सुमारास रामबागेंत दाखल जाहली. त्यावेळीं परत तोफेचे फेर २१ जाहले. एकंदर फेर तोफा ८४ जाहल्या.

ता. १८ मीनहुस अस्तमानीं जयपुरास सवाई माधवसिंग राजेसाहेबांस पानसुपारीस बोलावून दरबार केला. राजेसाहेबांची स्वारी आली ते वेळेस २१ फेर तोफेचे होऊन जातेवेळेसही २१ फेर झाले. दरबारांतून वस्त्रें, पांर्चे २७ किंमत रुपये १३९७-३-६, कंठी, शिरपेंच, अंगठी, भिगबाळी, मिळून पार्चे ४, येकुण पार्चे ३१ दिले. नंतर दरबार बरखास्त जाहला. रात्रौ प्रहररात्रीचे सुमारास जयपुराहून कूच करून स्वारी स्टेशनवर गेली. राजेसाहेब सरकारचे बरोबर स्टेशनवर पोहचविण्यास आले व जयपुरचे रेसिडेंटसाहेब हेही आले होते. अकरा वाजतां स्पेशल रवाना जाहली. त्यावेळीं सलामीचे तोफेचे फेर २१ झाले.

तारीख १९ मीनहुस भरतपुरचे स्टेशनवर सूर्योदय झाला. तेथें भरतपुरचे राजे जसवंतसिंगजी भेटीस मयलवाजमा (लवाजम्यासहित) आले होते. त्या लोकांनीं सलामी दिली व तोफेचे फेर २१ जाहले. सरकारांस बैठकीकरितां एका खोलीत जागा केली होती. उभयतां बसून गोष्टी केल्या. सरकारांनीं राजेसाहेबांचे चिरंजीव रामसिंग यांस ५१ मोहरा खाऊ म्हणोन दिल्या. नंतर सरकार गाडीत सवार होऊन स्पेशल रवाना होतेवेळीं सलामी होऊन तोफेचे फेर २१ जाहले. आग्रा स्टेशनवर आठ वाजतां गाडी दाखल झाली. रावराजे दिनकरराव दिवाण, मुनशी राजलाल तहसीलदार आग्रा व अण्णासाहेब शिक्केनवीस निसबत शिंदे सरकार व रार्बटनसाहेब कमिशनर भेटीस आले होते; व इंग्रेजी फौज व शिंदे सरकारांकडील लोकांनीं सलामी दिली. नंतर चार घोड्यांचे बग्गीत स्वार झाले. बग्गीत रावसाहेब किबे व कमिशनरसाहेब यांजला घेऊन रवाना होऊन आग्रा येथील शिंदे सरकारचे कोठीत उतरले. तेथें साहेबांस पानसुपारी देऊन रुकसत केलें. अस्तमानीं दिनकररावजींसह स्वारी हवा खाण्यास गेली. ते दोन घटका रात्रीं परत आली. दिनकररावजींनीं १०० रुपये निछावर केली. तारीख २० मुकाम आग्रा. प्रातःकाळीं छोटे मासाहेबांसुद्धां स्वारी श्रीयमुनेवर अक्षयतृतीयेनिमित्त स्नानास गेली होती. तेथें दानधर्म बराच केला. अस्तमानीं स्वारी शिकंदरा

पाहण्यास जाऊन जलइस्ताबादा कबर जलालुदिन अकबर बादशाहची पाहिली. चार पांच घटका रात्रीं कोठींत येऊन दाखल जाहले. तारीख २१ मीनहुस मुक्कम आग्रा. प्रातःकाळीं स्वारी रावराजे दिनकरराव दिवाणांचे येथें भेटीस गेली होती. तेथून किल्ला पाहण्यास जाऊन प्रहर दिवसास कोठींत येऊन दाखल जाहली. तिसरें प्रहरीं कमिशनर साहेब, कलेक्टरसाहेब यांच्या भेटी जाहल्या. रात्रीं शिंदे सरकारकडील कामवाले, शिपाई, हुजरे बंदोबस्तासाठी आगऱ्यांस होते. त्यांजला वस्त्रें व नगदी रुपये इनामाचे दिले. बाराचे सुमारास स्पेशल गाडी आग्रा स्टेशनवरून रवाना झाली.

तारीख २१ रोजीं सूर्योदय झाल्यानें स्पेशलमध्यें मुखमार्जन करून पोशाख केला व प्रहर दिवसास मुरादाबाद स्टेशनवर स्वारी दाखल जाहली. व्हीसीसाहेब कलेक्टर भेटीस आले व नबाबसाहेब रामपूर बरेली यांजकडून मेहमुद्दीनअली रिसालदार व ब्रिजभूषण सरनदास खजांची वगैरे पांच इसम पेशवाईस आले होते. इंग्रेजी कंपनी व नबाबसाहेबांकडील सलामी झाली व स्वारी पडावाचे जागीं दीड मैल अंतरावर बग्गीत कलेक्टरसाहेब व रावसाहेब किबे यांसह पडावाचे जागीं प्रथक प्रथक डेरे लावले होते, तेथें मुक्कामास दाखल जाहले. नबाबसाहेबांकडून रसद सामानाचा बंदोबस्त चांगला राहिला. अस्तमानीं स्वारी हवा खाण्यास गेली होती. रु. ३०० कलदार मुरादाबाद येथील गरीब लोकांस वाटण्यास कलेक्टर साहेबांकडे महाराजांनीं पाठविले. प्रहर रात्रीस तेथोन निघोन रामपुर बरेलीनजीक रोशन बागेतील कोठींत येऊन आराम केला.

ता. २३ मीनहु रोजीं प्रातःकाळीं रोशनबागेतील कोठींत नित्यनेम होऊन पोशाख केला. बागेपुढील मैदानांत मोठा डेरा दिल्लीचे बनातीचा लागला होता. त्या डेऱ्यांत नबाबसाहेबांचे चिरंजीव वलियतखां बहादुर हे पेशवाईस आले होते. सरकार तामझाममध्यें बसून डेऱ्यांत आले. फौजी लोकानीं सलामी दिली. नबाबसाहेबांचे चिरंजीवाचे भेटींवेळीं तोफांचे फेर २१ झाले. नबाबाचे चिरंजीवास सरकारांनीं खाऊकरितां मोहरा ५१ दिल्या. नंतर पानसुपारी होऊन रूकसत झाले. रसदसामानाचा बंदोबस्त नबाबसाहेबांकडील उत्तम राहिला. तारीख २४ प्रातःकाळीं नबाबसाहेब बहादुर हे तामझामांत बसोन फौजेसह पेशवाईकरितां डेऱ्यांत येऊन बसले. आज सरकारांचा जन्मदिवस. अठ्ठेचाळिसावें वर्ष लागले. सबब सुमांगल्य स्नान करून मानसपूजा केली, दानधर्म केला. १००० रुपये गोरगरिबांस वाटण्याचा संकल्प केला. बाद पोशाख करून तामझामांत बसून स्वारी नबाबसाहेबांचे भेटीस आली. सलामीस रिसाला, पागा, पलटण, खासबरदार, लग्गीवाले, चोपदार, बरछीदार, वगैरे लोक हजर होते. त्यांनीं सलामी दिली. नबाबसाहेबांची तब्येत दिक्क असल्यानें त्यांचे वस्तू उभे राहवलें नाही. यास्तव ते पलंगांवर बसून राहिले. नबाबसाहेबांचे चिरंजीव हे सरकारचे पेशवाईंत हजर होते. नबाबसाहेब उठूं लागले तेव्हां सरकार म्हणाले, ''तब्येत ठीक नाही त्यांस ताजीम देण्याचे कारण नाही. माझी शपथ आहे.'' असें म्हणोन सरकारही त्यांजपासीं पलंगांवर बसले. नबाबसाहेबांवरून सरकारांनीं १००० एक हजार निछावर केली

व सरकारांवरून निछावर नबाबसाहेबांनीं रु. २००० केली व नबाबसाहेबांसीं फार प्रेमानें संभाषणें जाहली. ती बहुत आहेत. समक्ष कच्ची तारीख वाचून दाखवीन त्यावेळीं कळेल.

सारांश, सख्ख्या बंधुचेही प्रेम इतके राहत नाहीं इतका उभयतांचा प्रेमसंबंध आहे. नंतर पानसुपारी हार गजरे नबाबसाहेबांनीं सरकारांस दिले व सरकारांनीं नबाबसाहेबांचे गळ्यांत हार घातला. नंतर चार घोड्यांच्या चांदीचे बग्गीत स्वार झाले, त्यावेळीं तोफेचे फेर सलामीचे २१ जाहले. दरखदार मानकरी मंडळी सर्व चांदीचे हौद्यांत हत्तीवर बसली. स्वारी मोठ्या जलशाने निघाली. शहाबाद दरवाजापाशीं सोन्याचे हौद्याचा हत्ती उभा होता. त्यांत सरकार स्वार झाले. खवासीत किबेसाहेब बसले होते. स्वारी मोठ्या समारंभानें नबाबसाहेबांचे महालकोठीजवळ आली. शहराचे तमाम लोक स्वारी पाहण्यास उभे होते. सरकारांनीं लोकांचा मुजरा दोन दोन हातांनीं घेतला. स्वारी कोठीवर येतांच २१ तोफा सलामीच्या झाल्या. कोठीवर पानसुपारी होऊन नबाबसाहेबांचे चिरंजीव रवाना जाहले. कांहीं वेळ नाच झाला. सारांश, मजा उत्तम राहिला. नबाबसाहेबांकडून बंदोबस्तही उत्तम ठेवला गेला असून असा थाट इतर रियासतीत होत नाही असें दिसून आले. तारीख २५ रोजीं प्रातःकाळीं स्वारी नबाबसाहेबांचे भेटीस त्यांचे वाड्यांत गेली. नबाबसाहेबांनीं आजही महाराजांवरून निछावर रू २००० केलें. नबाबसाहेबांनीं किसान लोकांस ऋणमुक्त केल्याचे कागद दाखविले. प्रहरदिवसास स्वारी परत आली. श्रीमंत सौभाग्यवती मासाहेबांसही २१ फेर तोफेची सलामी देण्यांत आली. संध्याकाळीं नैनीतालेस जाऊन बद्रीनारायणास जाणें याजबद्दल विचार ठरवूं.

तारीख २६ एप्रिल इ. स. १८८२ रोजीं मुक्काम रामपूर येथें वैशाख शुद्ध १५ पावेतों राहीलसे दिसते. आज इंदुराहून तार आल्यात श्रीमंत यशवंतराव बाळासाहेब महाराज यांजला रोज गुदस्ता पांच वाजून पन्नास मिनिटांवर पुत्ररत्न झाल्याबद्दलच आल्याची सुनावणी सखाराम गोपाळ नायब चिटणीस यांनीं केली. ऐकून बहुत खुशी होऊन नायब चिटणीस व शंकर भिकाजी या उभयतांस पोशाख दिले. नबाब महमद अलबेअलीखां बहादुर यांजकडेस खबर देण्याकरितां सरकार स्वारी खुद्द सोनेरी तामझामांस असून मच्छीभुवन कोठीत गेली. नबाबसाहेबांस मजकुर श्रृत करून साखर आपले हातानें नबाबसाहेबांचे मुखांत घालून संभाषण केलें कीं, आपले भेटीचे आनंदात नातूरत्न झाल्याचा आनंद जाहला. ५१ थाळे साखर भरून नबाबसाहेबांकडे दिले व रु. ५००० पांच हजाराचे तोडे नबाबसाहेबांपुढें ठेविले. पैकीं एक हजार रामजन्यास इनाम वाटून बाकी चार हजार खैरात वाटण्यास सांगितलें. प्रहर दिवसास स्वारी कोठीवर आली. नबाबसाहेबांकडून पुत्रोत्सवाबद्दल समारंभ होऊन सर्व फौज तयार होऊन सलामीकरितां कोठीवर आली होती व कडाबीनचे आवाजाचा भडिमार झाला. अस्तमानीं नबाबसाहेबांचे चिरंजीव वलियतखां बहादुर हे सरकारचे भेटीकरितां आले. खडी ताजीम होऊन भेटले. पानसुपारी, अत्तर देऊन रूकसत जाले.

तारीख २७ मीनहुस प्रातःकाळीं नबाबसाहेबांचे भेटीस स्वारी गेली. चार पांच घटका

बसून बहुत गोष्टी जाहल्या व प्रहर दिवसास स्वारी कोठीवर आली. रात्री नबाबसाहेबांकरितां मेजवानी असोन उभयतांकडील मानकरी मंडळीसह नजरबागेचे कुंड येथें दोन्हीकडील सरदार व नबाबसाहेबांचे चिरंजीव बसोन थाळे जाहले. नंतर पानसुपारी होऊन रोषणाई, आतशबाजी सुटली. चांगला मजा जाहला.

तारीख २८ मीनहुस प्रातःकाळीं रावसाहेब किबे यांजला मेजवानीचे निमंत्रण देणेंस नबाबसाहेबांकडे पाठवून मागाहून सरकार भेटीस गेले. प्रहर दिवसास स्वारी कोठीवर आली. रात्रौ नबाबसाहेबांस मेजवानी सरकारकडील जाहली. नबाबसाहेबांची तब्येत दिक्क असल्यानें ते आले नव्हते. त्यांचे चिरंजीव, मानकरीसह येऊन थाळे झाले. बाद पानसुपारी होऊन तमाशे, गाणे जाहले. नबाबसाहेबांकडून भैयासाहेबांस (यादवराव भैया) खाऊकरितां १०१ मोहरा दिल्या.

तारीख २९ मीनहुस प्रातःकाळीं स्वारी कौसल्या नदीवर स्नानास गेली होती. १५० रुपये खैरात वाटली. सहा घटका दिवसास परत आली. अस्तमानीं स्वारी रामपुर शहर पाहण्यास गेली. सर्व शहर पाहून हत्तीखान्यांत जाऊन हत्ती पाहिले. चार घटका रात्रीं परत कोठीवर दाखल जाहले. रु. ५००० सरकारचे नातू साहेबांकरितां खाऊ म्हणोन नबाबसाहेबांकडून आले. थाळा जाहल्यावर कलावंतांचें गाणें वगैरे ऐकिलें.

ता. ३० मीनहु प्रातःकाळीं स्वारी नबाबसाहेबांचे भेटीस जाऊन तेथून कौसल्या नदीवर स्नानास सौभाग्यवती मातुश्री छोटे मासाहेबांसह स्नानास जाऊन प्रहरदिवसास परत आले. नंतर निरशनाचा थाळा जाहला. येणेंप्रमाणें मजकुर आज तारीख दोन प्रहर पावेतोंचा आहे. कच्च्या तारखा ऐकिल्यावाचून एकंदर संभाषणें माहीत पडणार नाहीत. इंदुरास आल्यावर माहीत पडेल. सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना. ताजा कलम : मजला फुरसत बिलकुल मिळत नाही. सर्व दिवसभर हजर राहून रात्रौ तारीख लिहावी लागते. साहेबांचे सेवेसी सीताराम सदाशिव अभ्यंकर कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना तारीख ११ माहे मे इ. स. १८८२ पावेतों मुक्काम श्रीक्षेत्र हरिद्वार येथें श्रीकृपे क्षेम असो विशेष. तारीख ३० एप्रिल पावेतोंचा रोजनामचा पूर्वी पाठविलाच आहे. आतां तारीख १ मे तो तारीख ११ पावेतोंचा श्रृत करितों.

ता. १ मे इ. स. १८८२ रोज मजकुरीं श्रीमंत सरकारसाहेबांस मेजवानी नबाबसाहेबांकडे जाहली. मच्छीभुवन कोठींत नबाबसाहेब व सरकारांचे थाळे अमोरसमोर झाले.

तारीख १० मुक्काम रूरकी, प्रातःकाळीं साहेब लोक भेटीस आले होते, नंतर गोदाम, इंजिनियर कारखाना पाहण्यास स्वारी गेली होती. श्रीगंगेचे स्नान जाहले, तीन प्रहरानंतर रूरकीहून नावेंत बसून तीन कोसपावेतों नावेंत प्रवास करून नंतर हत्तीवर स्वार झाले. रात्रौ फतरी नदीवर साहेबांचे बंगल्यात मुक्काम केला. श्रीमंत सौभाग्यवती छोटे मासाहेब अस्पर्श असोन तिसरा दिवस, सबब त्यांचा मुक्काम राहून उदईक हरिद्वारेस येणार.

तारीख ११ मीनहु प्रहर दिवसास स्वारी श्रीक्षेत्र हरिद्वार येथें येऊन दाखल झाली. श्रीगंगेचे स्नान जाहले, दानधर्म जाहला. क्षौर उदईक होणार. तिसरें प्रहरीं स्वारी नीळगंगेवर गेली होती. अस्तमानीं श्रीमंत सौभाग्यवती मासाहेबांची स्वारी येऊन दाखल जाहली. सखाराम मार्तंड रेशीमवाले दुयम जनरल हे रामपुर बरेलीचे दरबारपासून स्वारीबरोबर आहेत. उद्या अगर परवा इंदुरास जातील. दीडप्रहर रात्रीस आराम. श्रीमंत सरकारसाहेब व सौभाग्यवती मासाहेब व भैयासाहेबांची तब्येत श्रीकृपे सुरक्षित आहे व हवाही बरी आहे.

येणेंप्रमाणें मजकूर श्रुत होईल. पुढील मजकुर जसा घडेल तसे कळवीन. श्रुत होय, हे विज्ञापना.

तारीख १७ माहे मे रोजीं सूर्यग्रहण असोन प्रातःकाळीं ब्रम्हघाटीं श्रीगंगेचे स्नानास स्वारी श्रीमंत मासाहेबांसह स्नान करून दानधर्म जाहला. कन्यादानें १५१ व मुंजी १५० प्रत्येक कन्यादान २५ ते १२५ व मुंजी प्रत्येक २५ ते ५० व गोप्रदानें १२५ बद्दल संकल्प सोडला. श्रीगंगेचे स्नान कुशावर्त घाटीं जाहले. सरकार व मासाहेब यांची चांदीची तुला जाहली. ११००० अकरा हजार रुपये लागले. नंतर स्वारी तेथून श्रीनारायणशीला येथें जाऊन पिंडदान श्राद्ध केलें.

तारीख १८ मीनहुपासून दशहरा सुरू. प्रातःकाळीं श्रीगंगेचे स्नान करून दानधर्म जाहला. अस्तमानीं श्रीनीलगंगेवर कोणी साधु राहतो त्याचे दर्शनास गेले होते. प्रहर रात्रीं परत येऊन आराम.

तारीख १९ रोजीं श्रीगंगास्नान, दानधर्म जाहला, आज हवा खाण्यास न जातां कामकाज करून आराम.

तारीख २० प्रातःकाळीं श्रीगंगेचे स्नान होऊन दानधर्म जाहला. मागील दोन घटका दिवस राहताना हवा खाण्यास स्वारी गेली होती. पंजाबचे दिवाण मयादासजी हे येथें आले असून भेटीस येत असतात.

तारीख २१ मीनहु रोजीं प्रातःकाळीं हुजूर हुकुम जाहला तो येणेंप्रमाणें. स्वारीबरोबर दरखदार मानकरी आहेत व नोकर मंडळी आहेत त्यांजला यात्रेकरितां नगदी देण्याचा हुकूम जाहला. दरमहा रु.१२ ते २४ दरमहा पावेतोंचे लोकांस प्रत्येकास रु.३६ व चाळीस दरमहा पावेतोंचे लोकांस दीड माही, चाळीसावर ज्यांची तनखा आहे त्यांस एकमाही आणि जे शिपाई वगैरे कमी पगाराचे आहेत त्यांस प्रत्येकी रु.२१ प्रमाणें देण्याचा हुकूम होऊन पत्रकावर शेरा जाहला. बाद श्रीगंगेचे स्नान जाहले. अस्तमानीं स्वारी तामझामांत बसून श्रीदेवदर्शनास गेली होती. संस्थान बितीया येथील राजेसाहेब येथें आले असून सरकारांची व त्यांची भेट जाहली. नांव राजे चंद्रकिशोर सिंगजी असून वयाने ६५ वर्षांचे आहेत. कान्यकुब्ज ब्राह्मण आहेत. यांचे संस्थान पंधरा लाखांचे असून ते फार विद्वान आहेत.

तारीख २२ रोजीं प्रातःकाळीं श्रीगंगेवर स्नान केलें. नंतर रामपूर बरेली येथील मेजवानीकरितां रु.४००० व खैरातकरितां १००० परमेश्वरदास सावकाराचे मंदिराचे

दुरुस्तीसाठीं २०० व एक मस्जिद बांधण्यासाठीं २५०० येकुण रु. ७७०० च्या नोटा ठेवल्या गेल्या.

तारीख २३ मीनहुस कामकाज पाहिल्यावर श्रीगंगेवर जाऊन स्नान झाले. दानधर्म जाहला. श्रीमंत सौभाग्यवती मातोश्री मोठ्या मासाहेब व मधल्या मासाहेब यांच्या स्वाऱ्या स्पेशलनें इंदुराहून चार वाजतां रवाना होत आहेत म्हणोन तार आली, आज रात्रौचे थाळे दशावतारी मंदिरांत जाहले, प्रहररात्रीस येऊन आराम.

तारीख २४ रोजीं नियमाप्रमाणें श्रीगंगेचे स्नान झाले व दानधर्म केला. तीन घटका रात्रौ बितीवाले गजेन्दकिशोरसिंगजी हे सरकारांचे भेटीस आले. दोन घटका संभाषण होऊन अत्तरपान जाहल्यावर रुकसत जाहले. नंतर सरकार आराम करण्यास आतं गेले.

तारीख २५ रोजीं मौलवी सदरूदीनखा वकील सीहूर याचा भाऊ बिमार सबब ते रामपूर येथें जाणार, करितां त्याजला रु.२५० बक्षीस देऊन २५० तसलमात दिले व गंगेचे स्नान केलें. आज तिसऱ्या प्रहरीं स्वारीचा बेत ठरला कीं, श्रीमंत सौभाग्यवती मोठे व मधले मासाहेब यांची स्वारी उदईक प्रातःकाळीं दिल्लीस येऊन अस्तमानीं सहारणपुरास येईल अशी तार आली. परंतु स्टेशनावर बंदोबस्त पूर्वीच ठेवला गेला. स्वारी नहराचे जागी नांवेंत स्वार होऊन तीन घटका रात्रीं रुरकीस येऊन तेथें डाकेचे बग्गीत स्वार होऊन मागील चार घटका रात्रीं स्वारी सहारणपुरास येऊन प्रथम स्टेशनवर जाऊन दिल्लीस तार केली. नंतर बंगल्यात येऊन आराम केला.

तारीख २६ रोजीं मुक्काम सहारणपुर. प्रातःकाळीं मुखमार्जन होऊन स्नान करून श्रीशंकराचे पूजनास बसले. सीताराम सदाशिव अभ्यंकर रोजनामचेनवीस यांजला बोलावून श्री शिवलीलामृताचा अध्याय ११ वा वाचविला व अभिषेक करविला. पूजा जाहल्यावर पूर्वी सखाराम नारायण यांनीं मल्हारपंत व नारायण विठ्ठल यांचेशीं सामल होऊन रोजनामच्यांत खोटा मजकूर लिहिला व सखारामपंतांनीं ब्याहडा कातरला, याजबद्दलची हकीगत सीताराम सदाशिव यांस विचारली म्हणजे मला; परंतु मी उत्तरलों कीं सरकारसाहेबांस सर्व श्रृत आहेच. त्यावरून मर्जी प्रसन्न होऊन ४०० रुपये बक्षीस दिले. हे चारशें मी चार लाखांचे ठिकाणीं समजतो, ईश्वराने महाराजांस शंभर वर्षाचे आयुष्य द्यावे व त्यांचे वंशास मार्कंडेयाचे आयुष्य द्यावे. सर्व कृपेचा प्रताप श्रीमंत मोठे बाळासाहेब महाराजांचा आहे. त्यांनीं मज गरीबाचा अंगिकार केला या कारणानें हा दिवस प्राप्त आहे.

रात्रौ मेजवानी व्हावयाची सबब थाळ्याची तयारी होऊन चार वाजतां स्वतः महाराज बग्गीत बसून स्टेशनवर गेले. साडेचार वाजतां स्पेशल ट्रेन येऊन दाखल झाली. श्रीमंत सौभाग्यवती मातोश्री मोठेमासाहेब, मधलेसाहेब यांची भेट झाल्यावर त्रिवर्गमासाहेबांस प्रत्येकी १५१ मोहरांप्रमाणे ४५३ दिल्या. साहेबांकडील लोक सलामीस उभे होते. पायघडया रेल्वेपासून बंगल्याचे बाहेरपर्यंत घातल्या होत्या. नंतर सरकारस्वारी त्रिवर्गमासाहेबांसह बग्गीत स्वार होऊन मुक्कामावर आली. मेजवानीचे थाळे तयारच होते. थाळे करून घटका रात्रींस

डाकेचे बग्गीतून अर्धरात्रीं रूरकीस दाखल जाहले.

तारीख २७ मे रोजीं प्रातःकाळीं रूरकीहून स्वारी निघोन प्रहरावर एक वाजतां श्रीहरिद्वारास आली. सरकारांनीं त्रिवर्गमासाहेबांसह श्रीगंगेत स्नान केलें. पोशाख केला. गंगापूजन करून दानधर्म इत्यादि जाहल्यावर थाळे जाहले, अस्तमानीं स्वारी हवा खाण्यास गेली.

तारीख २ माहे जुलाई इ. स. १८८२ रोजीं श्रीबद्रीनारायणाहून स्वारी बारा वाजतां निघून अस्तमानीं श्रीपंडुकेश्वरी आली. तारीख ३ पंडुकेश्वर येथून जोशीमठ, तारीख ४ जोशीमठ ते कुंभारचट्टी, तारीख ५ कुंभारचट्टीहून पिपलकोट, तारीख ६ पिपलकोटहून लालसांगा, तारीख ७ लालसांगाहून श्रीकर्णप्रयाग. तारीख ८ कर्णप्रयाग येथें मुक्काम झाला. डाक्टरसाहेबांची भेट जाहली. तारीख ९ कर्णप्रयागहून श्रीआदीबद्री, तारीख १० रोजीं आदीबद्रीहून गडसेन. तारीख ११ गडसेनीहून मलेचवरी, तारीख १२, १३ मलेचवरीहून चहुखुंट्या ऊर्फ गुणाई. तारीख १४ गुणाइहून द्वारहट.

तारीख १५ द्वारहटीहून राणीखेत येथें साहेबलोकांच्या भेटी होऊन लहानसा दरबार झाला. तारीख १६ मुक्काम जाहला. तारीख १७ राणीखेत ते खेराणा, तारीख १८ खेराणाहून नैनीताल. नैनीताल येथें मुक्काम तारीख १९ ते २२ पावेतों राहिला. नैनीताल येथें लेप्टेनंट गव्हर्नर साहेब व इतर साहेबांच्या भेटी होऊन दरबार जाहला. साहेबानेही आपले स्वतःचे बंगल्यांत सरकारसाहेबांस मैफिलीस बोलावले होते व सलामी वगैरे होऊन काशीपूरचे राजेसाहेबांनीं सरकारसाहेबांवरून ५ मोहरा निछावर केल्या. श्रीकेदारेश्वर व श्रीनारायणाचे मार्गांत धर्मशाळा, सदावर्ते व लक्ष्मण झुला ही कामें होण्याकरितां रु. ५१५५७ ची परवानगी जाहली. तारीख २३ रोजीं नैनीताल येथून काळाढोग येथें तारीख २४ रोज सोमवार श्रावण शुद्ध ९ रोजीं अस्तमानीं साडेचार वाजतां संस्थान रामपूर येथें स्वारी आली.

ज्याप्रमाणें अंतःकरणापासोन श्रीनारायणाचे दर्शन घ्यावयाचें अशी इच्छा सरकारांची होती त्याप्रमाणें श्रीनारायणानें पूर्ण करून पांच रोज त्रिकाळ दर्शनाचा लाभ जाहला. स्वारीबरोबर अंदाजे कुली लोकांसुद्धा अडीच हजार मनुष्यांचा भीडभडाका होता. परंतु सरकारांचे पुण्यप्रतापें करून सर्वत्र मंडळीसह सरकारांस फार आनंदात ठेविले. वृद्ध लोक सांगतात कीं, अशा जमावानिशीं कोणीही राजा कधी आला नाही. हजारो लोकांचे पितरांचे उद्धार जाहले. हे महत्पुण्य सरकारांचे जाहले. ही यात्रा फार मोठी, भेटीअंतीं विस्तारपूर्वक समजेल.

सरकारांनीं पैशांकडे कांहीं पाहिले नाही. जसजसा खर्च लागत गेला तसा मोकळ्या मनानें हजारो रुपये खर्च केला. स्वारी ज्यावेळीं श्रीजींचे मार्गात पहाडांतून जात होती त्यावेळेस यात्रेस जाणारे व यात्रा करून परत येणारे लोकांस खैरात वाटली जात होती. सर्वांस समक्ष विचारून खर्चास द्यावे. कोणीही विन्मुख गेला नाही. श्रीजींकडेही द्रव्याचा व्यय उत्तम जाहला; तीस हजार रुपये किंमतीच्या रकमा दिल्या. याशिवाय १११ तोळे

सुवर्णाचे छत्र देणेंचा संकल्प केला. पांच सहा हजार धर्मार्थ वाटला. शिवाय किरकोळ खर्चाचा तर कांहींच प्रश्न नाही. सर्व ठिकाणीं चांगली व्यवस्था राहिली.

जनाब लालबेअली खानसाहेब बहादुर यांजकडून बंदोबस्ताचे कामीं सरकार मानकरी पाठवून म्याने वगैरेचा बंदोबस्त चौखणापावेतों ठेविला होता. काळाढोगीपासून रामपूर तीस कोस लांब आहे. परंतु भारबदारीसाठीं चौबैली गाड्या व बसण्यास रथ व हत्ती वगैरे विपुल असोन सरकारसाहेबांकरितां व श्रीमंत सौभाग्यवती मातोश्री त्रिवर्ग मासाहेबांकरितां बग्गयांची डाक लागली असोन, सरकारस्वारी काळाढोगी येथून बारा वाजतां निघाली ती रामपूर येथें साडेचार वाजतां आली. तीन कोसांवर वलियत बहादुर (नबाबसाहेबांचे चिरंजीव) हे पेशवाईस आले होते. तेथें सरकारची भेट होऊन उभयतां समारंभानिशीं शहरांत आले. सलामीकरितां रिजमेंट, पागा, पलटण, वगैरे दुतर्फा उभे होते. सलामी दिली. तोफेचे फेर ४२ झाले त्यांत सरकारचे २१ व सौभाग्यवती मासाहेबांचे २१ याप्रमाणें जाहले. मच्छीभुवन कोठींत नबाबसाहेबांची स्वारी होती तेथें सरकार भेटीस गेले. उभयतांच्या भेटी जाहल्या तो प्रेमरस सहोदर भावांतसुद्धा कमी म्हटल्यास शोभेल. नबाबसाहेबांनीं सरकारांवरून दोन हजार २००० ची निछावर केली. बुढणसाहेब (नबाबसाहेबांचे नातू) यांनीं ५१ मोहरा नजर केल्या व भैयासाहेब यांजला २०० दोनशें मोहरा दिल्या. उतरण्याकरितां खूरसतमजल कोठी तयार केली होती. तेथें स्वारी उतरली. नबाबसाहेबांकडील बंदोबस्त अती उत्तम असोन लहानमोठे नोकरचाकर लोक हजर असतात. असा बंदोबस्त आणखी कोठेंही इतर रियासतीत राहणें दुरापास्त. येथील आब, आदरसत्कार कसा करावयाचा या गोष्टींचा तर कित्ताच घेतला पाहिजे.

तारीख २५, २६, २७ मीनहु साबक दस्तूर. दर रोज नबाबसाहेबांची भेट होत असते. श्रीमंत उभयतां बाळासाहेबांच्या स्वाऱ्या आजपावेतों आल्या नाहीत. तारीख २९ रोजीं मुरादाबादेस येऊन येथें येणार. मुरादाबादपावेतों बग्गयांची डाक लागली आहे. मुरादाबादेस सरदार मानकरी गेले असोन थाळ्यांची व्यवस्थाही केली आहे. श्रीमंत सौभाग्यवती त्रिवर्ग मासाहेब व भैयासाहेब व सरकारसाहेब श्रीकृपें आनंदात आहेत.

तारीख ३० जुलाई रोजीं श्रीमंत शिवाजीराव बाळासाहेब व यशवंतराव बाळासाहेब महाराज या उभयतांच्या स्वाऱ्या प्रातःकाळीं सहा घटका दिवसाचे सुमारास रामपूर येथें दाखल जाहल्या. सरकारसाहेब व वलियत बहादुर एक मैलपावेतों घेण्याकरितां गेले होते. सरकारसाहेबांची व बाळासाहेबांची भेट होऊन उभयतां बाळासाहेबांस व वलियत बहादुर यांस घेतले. त्रिवर्गास खाऊकरितां प्रत्येकास नोटा रु. २१०० व मोहरा ५ प्रमाणें नोटा रुपये ६३०० व मोहरा १५ दिल्या. नंतर समारंभानें शहरात येऊन श्रीमंत सौभाग्यवती त्रिवर्ग मातोश्रीसाहेबांचे भेटीस गेले. तेथें साहेबांनीं प्रत्येकावरून चारचारशें रुपये निछावर केली. सव्वासव्वाशें मोहरा खाऊकरितां दिल्या. सलामीबद्दल तोफेचे फेर जाहले. तिसरें प्रहरीं कांहीं कचेरीचे काम पाहून मागील चार घटका दिवस राहतां सरकारसाहेब व उभयतां

बाळासाहेब सोनेरी रथ व तामझामांत बसून स्वारी मोठ्या समारंभाने जनाब नबाबसाहेब बहादुर यांचे भेटीस मच्छीभुवन कोठींत आली. नबाबसाहेब आतील दक्षिण बाजूचे खोलीत चांदीचे पलंगांवर बसले असोन सरकारांकरितां व उभयतां बाळासाहेबांकरितां अलग अलग दोन पलंग चांदीचे लागले होते. या ठिकाणीं सर्वत्रांच्या भेटी जाहल्या. नबाबसाहेब उभयतां बाळासाहेबांस म्हणाले कीं,''भाईसाहेबांनीं (सरकारांनीं) आम्हाकरितां ताजीमतवजाची माफी ठेविली आहे. त्याप्रमाणें आपणही ठेवावी. सरकार म्हणाले कीं आपले तब्येतीमुळें बेकाबू आपला आहे. आपले प्रेमापेक्षां ताजीमतवज्जा कुछ नाही. त्यानंतर नबाबसाहेब म्हणाले कीं, मी आज तिघे भतीजास (पुतण्यास) पाहून कृतार्थ झालो व अती आनंद झाला व व्याधींचे विस्मरण झाले. उभयतां बाळासाहेबांवरून पांचशें मोहरा निछावर करून सव्वासवाशें मोहरा उभयतां खाऊकरितां दिल्या. नंतर अत्तरपान, हारगजरे होऊन सरकार उभयतां बाळासाहेबांसह हवा खाण्यास बग्गीत बसून रवाना झाले.

तारीख ३१ रोजीं त्रिवर्ग मासाहेब व नबाबसाहेबांची सून व नबाबसाहेबांची बेगम यांच्या भेटीगाठी होऊन परस्परांत समारंभ झाला. मोठ्या मासाहेब व मधल्या मासाहेब यांस दागिने पांच पांच हजाराचे दिले व देणगीही परस्परें आपसांत दिली गेली.

तारीख १ माहे आगस्ट इ. स. १८८२ प्रातःकाळीं स्वारी नबाबसाहेबांचे भेटीस गेली होती. तेथें बहुत वेळ थांबली. गायन वगैरे जाहले, कांहीं वेळ एकांतही जाहला. प्रहर वाजतां स्वारी परत आली. तिसरें प्रहरीं खुरसीस कोठीतील बाहेरचे दालनांत बसले असोन मेहरबान लाटसाहेब बहादुर यांजकडील पत्र आल्यांत म्हैसूर संस्थानचे संबंधांत जो ठराव केला आहे तो त्याच संस्थानास लागू आहे. इतर संस्थानांस लागू नाही. पूर्ववत् ठरावाप्रमाणें सर्व राज्य, संस्थानचे नियम कायम समजावे. असें पत्र आलेले धोंडो शामराव यांनी वाचून दाखविलें. त्यावर मोठी खुशी जाहली. या आनंदानें खुशीबद्दल नबाबसाहेबांसही पत्र लिहिलें व धोंडो शामराज यांजला तीन हजार रुपयांच्या नोटा व पांच वस्त्रें बक्षीस देण्याचा विचार ठरला आहे. सदरचें पत्र पाहून सरकारांस फार खुशी जाहली.

सिमल्यास जाण्याचा विचार श्रीमंत सौभाग्यवती त्रिवर्ग मातुश्रीसाहेब व उभयतां बाळासाहेब यांचेसह जाण्याचा ठरून स्टेशनचे बंदोबस्ताचे कामीं कारकूनही रवाना जाले. स्वारी ३ आगस्ट रोजीं प्रहर दिवसास थाळे करून रामपुऱ्याहून निघणार असा नेम ठरला आहे. दळसिंगार हत्ती पावणेसात हात इंचीचा देखणा व फार सुंदर असोन सोंड सफेत व मस्तकही सफेत. किंमत अंदाजे सातआठ हजारातही मिळूं शकणार नाही. असा हत्ती नबाबसाहेबांनीं सरकारांस दिला आहे. नबाबसाहेबांकडून बंदोबस्त फार सुंदर राहिला. दररोज थाळे दोन वेळां ब्राह्मणांकडून पक्वान्नें वगैरे तयार करवून सरकारांकडे व उभयतां बाळासाहेबांकडे येत असत.

तारीख २ मीनहु प्रातःकाळीं तीन चार घटका दिवसाचे सुमारास सरकारस्वारी नबाबसाहेबांचे भेटीस गेली होती. धोंडो शामराव, सखाराम गोपाळ वगैरे मंडळी हजर

असोन लाटसाहेबांकडील पत्र म्हैसून संस्थानचे संबंधात आलेले वाचून दाखविले व त्या बाबत बराच वेळ जिकर चालला होता. नबाबसाहेबही फार खुशी जाहले व कांहीं वेळ नबाबसाहेबांसीं सरकारांचा एकांत जाहला. तिसरें प्रहरानंतर श्रीमंत शिवाजीराव बाळासाहेब महाराज यांचा विचार एक मुक्काम पूर्वी सिमल्यास जाण्याचा ठरून तयारी जाहली. नबाबसाहेबांनीं बाळासाहेब महाराज यांस कंठा १ व शिरपेंच किंमती दिले व बाळासाहेबांचे तैनाती लोकांस दोन हजारांचे बक्षीस पोशाखाबद्दल दिले. तेथून येऊन सरकारसाहेबांस भेटून मागील चार घटका दिवस राहतांना बाळासाहेब महाराजांची स्वारी रवाना झाली. वलियत बहादूरखासाहेब पोहचविणेस कोसभर गेले होते. सरकारसाहेबांची स्वारी उदईक प्रहर दिवसा श्रीमंत सौभाग्यवती त्रिवर्ग मासाहेब व छोटे बाळासाहेबांसह सिमल्यास जाण्याकरितां येथून रवाना होणार. नबाबसाहेबांचे खास तैनातीपैकीं माणसांस आपलेकडून वस्त्रें दिलीं जाणार आहेत.

मल्हार विठ्ठल नायब दिवाण खासगी व बळवंतराव अनंत शिंत्रे नायब फडणीस हे उभयतां आज रोजीं आले. शिंत्रे यांनीं रामपूर जिल्ह्याचे वसूलबाकीचे कागद व कर्जदार चुकोतीचे कागद दाखविले. गोविंदराव पांडुरंग यांचे कुटुंबाची तब्येत ठीक नसलेमुळें ते रजा घेऊन नगरास रवाना झाले. रामभाऊ देवासकर यांजला एक हजार रुपये बक्षीस सरकारांनीं दिल्हे.

**दिवाणसाहेब पळसीकर यांजकडील रेकॉर्ड**



## प्रकरण २८ वें

# श्रीमंत महाराज द्वितीय तुकोजीराव होळकर सरकार यांची कारकीर्द

## इ. स. १८८२ ते १८८६ जूनअखेर समाप्त

ता. २० मे इ. स. १८८२ इ. बक्षीजी कपतान राबर्टनसाहेबांस भेटले. बादशहाजादीचे जन्मगांठीचे दरबारास धाकटे बाळासाहेबांचे बैठकीचा प्रश्न उद्‌भवला होता. त्यावर बडे साहेबांनीं ठरविलें कीं, मोठे बाळासाहेबांकरितां वेगळा दरबार होईल. बडेसाहेब म्हणाले कीं राणीसाहेब हरिद्वारेस जाणार आहेत त्यांनी नीमचेस वाखा असल्याने तेथें न थांबतां चितोडेस थांबावे. ता. २३ रोजीं राणीसाहेबांची स्पेशल ट्रेन रवाना झाली.

ता. २४ रोजीं बादशहाजादीचे जन्मगांठीचा दरबार प्रातःकाळीं छावणीत झाला. याप्रमाणें महाराजसाहेबांस सलामी होते त्याचप्रमाणें उभयतां बाळासाहेबांस सलामीच्या तोफा २१ झाल्या. बडेसाहेबांचे उजवे बाजूस मोठे बाळासाहेब व डावे बाजूस धाकटे बाळासाहेब बसले होते. सोळा सरदार बरोबर गेले होते. ता. ७ जून रोजीं खबर आली कीं, महाराजसाहेब हरिद्वाराहून श्रीबद्रीनारायण येथें रवाना झाले.

ता. १९ जून रोजीं आपलेकडे दरबार झाला. (बादशहाजादीबद्दल) ३१ तोफेचे फेर झाले. आठ वाजतां मोठे बाळासाहेब दरबारांत आले. २१ फेर झाले. सव्वाआठ वाजतां सर लैपल ग्रीफन व दहा आफिसर आले. मामूल पेशवाई, सलामी झाली. ता. २६ जून रोजीं बडेसाहेब आणि पांच आफिसर तुरूंग पाहण्यास आले. बक्षीजी व बापूसाहेब रेशीमवाले

यांनी सर्व दाखविले. सफाई पाहून साहेब खुश झाले. श्रीमंत सरकार स्वारीचे श्रीनगर मुक्कामहून खुशालीचें पत्र आले. ता. १ जुलाई रोजीं श्रीमंत शिंदे सरकार येथें येणार सबब भीमगीरबाबा यांस खांडव्यास पाठविले. धाकटे बाळासाहेब महूपावेतों गेले होते. स्टेशनवर गार्ड आफ आनरची तयारी ठेविली होती. मोठें बाळासाहेब व बडेसाहेब स्टेशनवर आले. महाराज शिंद्यांची स्पेशल ट्रेन साडेसहा वाजतां आली. आपल्याकडून २१ फेर सलामीचे झाले. शिंदे सरकार मोठें बाळासाहेबांस व बडेसाहेबांस भेटले. शिंदे सरकार व बडेसाहेब छावणीत गेले. तारीख २ जुलाई रोजीं मोठें बाळासाहेबांनीं वाड्यांत थाळे शिंदे सरकारांसह होण्याचे ठरवून बक्षीजींस आमंत्रणासाठी पाठविले होते. रात्रीं ९ वाजतां शिंदे सरकार वाड्यांत आले. सामोरे सर काशीरावदादा पेशवाईस गेले होते. तोफेची सलामी जातां येतां झाली. जेवणानंतर मोठे बाळासाहेबांचे दालनांत पानसुपारी झाली. ता. ३ जुलाईस शिंदे सरकार उज्जेनीस गेले. ता. १७ जुलाई; खबर आली कीं, सरकारस्वारी श्रीबद्रीनारायणहून परत फिरून राणीखेत येथें आली.

ता. ५ आगस्ट रोजीं शिंदे महाराजांची स्पेशल ट्रेन आली. रेसिडेंसीतून सर्व व्यवस्था होती. शिंदे सरकार रतलामवाल्यांचे कोठींत जाऊन उतरले व ता. ७ आगस्ट रोजीं महाराज शिंदे सरकार स्पेशलनें ग्वाल्हेरीस रवाना झाले. जाताना तोफेचे फेर २१ झाले.

ता. १२ आगस्ट रोजीं खबर आली कीं आपले सरकार ता. ९ रोजीं सिमल्यास दाखल झाले.

ता. १९ आगस्ट रोजीं अण्णासाहेब गरूडांस वाखा होऊन ते स्वर्गवासी झाले.

ता. २१ आगस्ट महाराणीसाहेब स्पेशल ट्रेननें पावणेदहा वाजतां आल्या. गार्ड आफ आनरने सलामी दिली. महाराणीसाहेब बाणगंगेवर उतरल्या. तारीख ३० आगस्ट रोजीं सरकारस्वारी बाणगंगेचे पलीकडे नंबर ४३ चे रेल्वे फाटकाजवळ उतरून हत्तीवर स्वार होऊन बाणगंगेस आले. हुजरातीचे, रिसाल्याचे, इनफंट्रीचे गार्ड आफ आनरची सलामी झाली. २१ फेर तोफेचे झाले. बाणगंगेस दरबार झाला. सरदार लोकांनीं नजरा केल्या. पानसुपारी होऊन दरबार बरखास्त झाला.

ता. १ सप्टेंबर रोजीं सरकारस्वारी मोठे समारंभाने वाड्यांत आली. ता. ५ सप्टेंबर रोजीं गंगापूजन होणार म्हणून दरबार केला. दिवाणसाहेब पळसीकर व बक्षीजी यांनीं तीन तीनशें रूपयांचे आहेर केलें. बक्षीजींस व दिवाणसाहेबांस प्रत्येकी ७५ रूपयांची वस्त्रें मिळाली. सर्व सरदार दरखदारांनीं आहेर केलें व त्यांस वस्त्रें मिळाली.

ता. १६ सप्टेंबर इ. स. १८८२ रोजीं इंग्रेज सरकारनी इजिप्तवर स्वारी केली. लढाई झाली. अरबी बादशहा धरला गेला. ही खबर सर लेपल ग्रीफन साहेबांनीं सरकारांस पाठविली त्याबद्दल १०१ तोफा चालविण्याबद्दल हुकूम दिला.

ता. २८ सप्टेंबर : चारशें आस्ट्रेलियन घोडे सरकारांत तोफखान्याकरितां खरीदण्याचा बापूसाहेबांस हुकूम झाला. तारीख ११ आक्टोबर रोजीं रावसाहेब मंडलिक आले. ते ता. २० आक्टोबरपावेतों राहिले. नंतर मुंबईस रवाना झाले. ता. २१ आक्टोबर रोजीं दसरा

झाला. मामूलप्रमाणें पूजन, स्वारी, दरबार झाला ह्या दसऱ्याचे स्वारीत साहेब लोक आले नाहीत. आनंदराव वामन यांस एक गांव खरगोण जिल्ह्यातील जहागीर दिला. कारण कीं, यांचे वडील वामनराव अण्णा यांनीं खानदेश सरहद्दीचे कामात फार मेहनत केली होती व महाराजांनीं गांव देणेंबद्दल आश्वासनही दिलें होतें.

ता. १ नोव्हेंबर रोजीं स्टारचा दरबार झाला. त्यानंतर कर्नाटकचे नबाब सरकारांस येऊन भेटले. ता. ४ नोव्हेंबर रोजीं सरकारांनीं नबाबसाहेबांस ८०० रुपये नगदी व सव्वाशें रूपयांचे कपडे दिले. ता. १५ डिसेंबर रोजीं कमांडर इन चीफ रात्रीं रेसिडेन्सीत आले. ते महूस जाताना सरकारांची भेट स्टेशनवर झाली. आपलेकडून इनफंट्री गार्ड आफ आनर होता. सलामीचे ११ फेर झाले.

इसवी इ. स. १८८२-८३ सालचा रेसिडेन्सीत गेलेल्या अहवालातील उतारा खालील प्रमाणें आहे. येकंदर खातेवार उत्पन्न रुपये ७३,८८,४०० असून खर्चाचा तपशील राजघराणें व संस्थानच्या इतर बाबी मिळून रुपये ५८,८२,००० आहे. सावंतवाडीचे सरदेसाई हिंदुस्थानांत पर्यटन करण्याचे उद्देशानें निघाले असतां ता. १ जानेवारीस इंदूर येथें आले. त्यावेळीं सरकारस्वारी बडवाईस होती. सरदेसाई हे संस्थानचे पाहुणे होते. ता. ३ रोजीं जयपुरास जाणेसाठीं निघाले. स्टेशनवर त्यांचा योग्य तो मानमरातब राहिला.

ता. ३ एप्रिल रोजीं सर लेपल ग्रीफन साहेब एक वर्षाचे रजेवर गेले. त्यांचे ऐवजीं ग्वाल्हेरचे रेसिडेंट कर्नल ब्यानरमन येथें बडेसाहेब झाले.

१ **न्यायदान खातें** : दिवाणी खटले ७५६० त्यापैकीं ५९५२ निकालांत आले. फौजदारी मुकदम्यांची संख्या १०२९२ होती. पैकीं ९०५५ निकालांत निघाले. तिघांस फाशीची शिक्षा मिळाली व जन्मठेप सात जणांस मिळाली.

२. **विद्या खातें** : या खात्यांत चांगली लायक माणसें मिळाली. वासुदेव बल्लाळमुळें हे नार्मल स्कूलचे मुख्य झाले. त्रिंबक रामचंद्र शिदोरे आणि विठ्ठलराव गणेश कीर्तने यांनीं शाळा तपासणीचें काम चांगलें केलें. काशीनाथ कृष्ण लेले यांस धारेहून बोलाऊन घेतले. त्यामुळे म्याटिक्युकिलेशन परीक्षेचा निकाल चांगला लागला. तालीमखान्याचे संबंधात केलेंले चांगले नियम पाळले जात आहेत. विद्यार्थ्यांच्या प्रकृतीवर परिणाम चांगलाच दिसतो. उत्तम शिक्षकांची निपज व्हावी म्हणून सरकारांनीं नार्मल स्कूल उघडलें आहे. पगाराव्यतिरिक्त या संस्थेस सरकारांनीं मासिक देणगी ३० रूपयांची दिली आहे. रसिक बिहारीलाल यांच्या नेतृत्वाखाली हिंदीचा अभ्यास उत्कर्ष पावत आहे. शाळांची संख्या ९५ आहे. विद्यार्थ्यांची संख्या ४८९६ आहे. संस्थानांत दरमहा स्कालरशिपा दिल्या जातात. संस्थानांतील विद्याभ्यास पूर्ण होऊन अलाहाबाद, मुंबई आणि पुणें येथें विद्या संपादण्यास गेलेल्या विद्यार्थ्यांस दरमहा रुपये सत्यायशीची मदत होते. इंदूरच्या महाराजांनीं यंदा स्वतःच परीक्षा घेऊन बक्षीसेंही स्वतःच वाटलीं. सरकारांचा विचार असा झाला आहे कीं, वर्षांतून २ वेळां परीक्षा व्हावी. चैत्रांत व दसऱ्यावर. परीक्षेसंबंधी नवीन योजना केली आहे. संस्कृत शाळेची परीक्षा घेण्यासाठीं विद्वान शास्त्री यांचे मंडल मुकरर केलें आहे. इतर शाळांची

योजना खालील पांच गृहस्थांचे हाती ठेविली आहे. १ सदर कोर्टाचे मुख्य न्यायाधीश राजश्री धोंडो शामराव गरूड बी. ए. २ इंदूर जिल्हा जज्ज ए. श्रीनिवासराव बी. ए. ३ स्माल काज जज विष्णु केशव कुंटे बी. ए. ४ दरबार इंग्लिश आफिसचे व्यवस्थापक लक्ष्मण गणेश गंधे बी. ए आणि ५ वे राजपुत्र शिवाजीराव बाळासाहेब महाराज यांचे सेक्रेटरी कृष्णराव वासुदेव मुळे बी. ए. अशी योजना झाली आहे. अखिल शाळांतून होणाऱ्या चढाओढीत गुदस्त सालप्रमाणें यंदाही महाराजांनीं आपल्या नावानें १२० रुपयांची स्कालरशिप ठेविली. मेडीकल स्कूल डाक्टर कीगनचे नजरेखालीं चालले होते इंजिनिअर स्कूलची व्यवस्था बळवंतराव गोविंद जांभेकर यांजकडे सोपविली होती. सदरहु जांभेकर शिरपूर येथील नवीन वाड्याचे काम पाहत होते त्याचा फायदा त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांस व्यावहारिक शिक्षण देण्यांत करून घेतला. हे त्यांचे दाक्षिण्य अनुकरणीय आहे.

ह्या दोन्ही शाळांतून जरूर तितके व्यावहारिक ज्ञान संपादन करून विद्यार्थी बाहेर पडत आणि त्यांची सोय सरकार संस्थानांतील कामांत करून देत. मेडिकल कालेजचे विद्यार्थी मार्तंड गणेश, रावजी लक्ष्मण आणि गणपतसिंग यांनी चांगलेच नांव कमाविले. मेडिकल स्कूलसाठी लागणारे ग्रंथ घेण्यासाठीं सरकारांनीं सालमजकुरीं ३०० रुपये मंजूर केलें.

३ **पोलिस खातें** : एकंदर संख्या ५९६६ होती. विशेष गोष्ट कीं, मध्य प्रांतांतील तंट्या भिल्लाच्या कामांत आमचेकडून सहकारिता मिळाली. नेमाड जिल्ह्यांतील सुप्रिडेंट महमुदखान यांची मुकररी त्या कामावर झाली होती आणि त्यांस यशही आले.

४ **आरोग्य खातें** : चालू सालीं लस ४३२३ मुलांस टोंचली गेली. सरकारांनीं मुंबईहून आणविलेल्या मिडवाईफ सुंदराबाई यांच्या हातास चांगलेंच यश येत आहे. त्या लोकप्रियही झाल्या आहेत. इंदूरचे हवामान एकंदरीत चांगले आहे. तत्रापि दोन महिने वाखा होता. त्यामुळें १०० माणसें बळी पडली.

५ शहर वाढत आहे त्यामानानें स्वच्छता व आरोग्य यांचेही क्षेत्र वाढत आहे. नवे गटार तीन हजार फूट बांधले गेले; आणि जुन्यांची दुरस्ती झाली. चालू सालीं नव्या वृक्षांची लागवड तीनशेनें वाढली.

६ **रेल्वे** : इंदूरपासून महूपर्यंत रेल्वेच्या दोन्ही बाजूस कुंपण तयार झाले. हे काम फत्तेबादपावेतों होणे आहे. महाराजांचा सलून (डबा) अजमेरास तयार होत आहे. पुढील साली इंदुरास येईलसे वाटते.

७ **सूत यंत्र** : हिंदुस्थानांतील कोणत्याही गिरणीइतके तोलाचे उत्कृष्ट कापड आपल्याकडे निघूं लागलें आहे एकंदर कापड वजन ६८५८७७ पौंडाचें निघाले. पैकीं पौंड ७५८९० शिल्लक आहेत.

८ **इंजिनिअरिंग खातें** : मिस्टर विजयसिंग इंजिनिअर यांचे देखरेखीखालीं काम चांगले चालले आहे. रस्त्याचे दुरस्तींत १०००० पर्यंत इमारती नवीन व मरमत मिळून ९५००० व निवाणाकडे खर्च २५००० रुपये लागले. चालू सालीं श्रीमंत सरकारांनीं राजश्री

माधवराव व्यंकटेश लेले बी. ए. एल. सी. ई. यांची मुकररी करून संस्थानांतील निवाणाचे कार्य त्यांजवर सोपविले आहे. त्यांनीं मसुदे करून श्रीमंत सरकारांस पेश केलें आहेत.

९ **अबकारी** : इंदूर सर्कलचे ८८००१ व महू सर्कलचे ८७४०० रुपये लिलावांत उत्पन्न आले.

१० **पर्जन्य पीकपाणी** : यंदा पाऊस इंच ४१ पडला. तो अवेळीं पडल्याने धान्यें सरासरीचे खालीच उतरली. आफिम चांगली आली, पण भाव मंदावला. कास्तकारांनीं बैल खरीदीसाठी मागणी केल्यानें २६५०० रुपये वाटण्यांत आले.

यापुढें बक्षीजी आपल्या रोजनामच्यांत लिहितात; इ. स. १८८३.

ता. ३ जानेवारी इ. स. १८८३ महाराजसाहेबांचे कलकत्त्यास जाण्याचा दुसरा प्रोग्राम बार्न साहेबांकडे पाठविला. ता. ८ फेब्रुवारीस सर सालारजंग निवर्तले. सबब आपल्या येथें एक दिवस हरताळ ठेवला. ता. ३ एप्रिल रोजीं सर लेपल ग्रीफन हे इंग्लंडास रवाना झाले. सर काशीरावदादा व बक्षीजी स्टेशनवर हजर होते. आपल्याकडील व ब्रिटीश इनफंट्रीचा गार्ड आफ आनर आला होता. १३ फेर आपल्याकडील झाले. धार, देवास, रतलाम, जावरा येथील संस्थानिक हजर होते. ट्रेन रवाना झाल्यावर कर्नल ब्यानरमनसाठीं १३ फेर सलामीचे झाले. धोंडो शामराव कलकत्याहून आज आले. ता. ६ एप्रिल रोजीं कर्नल बापूसाहेब, बक्षीजी व धोंडो शामराव असें तिघे जण आफिशियेटिंग कर्नल ब्यानरमन यांजकडे गेले. मामुली गोष्टी झाल्या. ता. ९ एप्रिल रोजीं कर्नल ब्यानरमन दोघे असिस्टंट-सहित सरकारांचे भेटीस आले. मामुलप्रमाणें मानपान झाला.

ता. ९ मे रोजीं जनरल सखाराम मार्तंड आणि बक्षीजी यांनीं हुजरातीचे लायनीत जाऊन शिपायांस हुजूराचा हुकूम सुनाविला कीं, २० रूपया तनखा घोडयांचे खुराकीसुद्धां मिळेल. लोकांस आश्चर्य वाटले.

ता. २४ मे रोजीं बादशहाजादीचे जन्मगांठीबद्दलचा दरबार छावणीत व आपलेकडे दर सालप्रमाणें झाले. आपले येथील दरबारांत जावरे नबाबांनीं यावे अशी सरकारांची इच्छा परंतु कर्नल ब्यानरमनसाहेबांनीं ही गोष्ट मंजूर केली नाही.

ता. २७ मे रोजीं कृष्णराव बाबासाहेब पवार देवासवाले लालबागेत सरकारचे भेटीस आले होते. भेटीनंतर बरेच वेळानें रवाना झाले.

ता. ११ रोजीं आक्टोबर. आज दसरा. सबब स्वारीचे निमंत्रण देणेंकरिता बडेसाहेबांकडे जनरल बापूसाहेब व बक्षीजी गेले होते. स्वारी, शमीपूजन वगैरे समारंभ मामूलशिरस्ते झाला. साहेब लोक वहिवाटीप्रमाणें लालबागेपासून स्वारींत सामील झाले होते. स्वारीनंतर वाड्यांत पानसुपारी होऊन साहेबलोक गेल्यावर नजरेचा दरबार झाला.

ता. ३१ डिसेंबर रोजीं रेसिडेंसीतून लिहून आलें कीं, सत्वास नेमावरचे सरहद्दीसंबंधाचे अपील घेणें लाटसाहेबांनीं मंजूर केलें आहे.

**इसवी इ. स. १८८४ :**

खरगोणचा एक शेठ भगवतीदास नांवाचा त्याजवर कांहीं आरोप आले होते; परंतु तो छावणींत जाऊन बसला होता. एके दिवशीं तो शहरांत आला. तेव्हां मोठें बाळासाहेबांनीं त्यांस धरून कैद केलें. या बाबतीत बरीच तहरीर झाली. शेवटीं त्यांस सोडावे लागले. ता. ५ जानेवारी इ. स. १८८४ रोजीं मिठाचा करार लाटसाहेबांकडून मंजूर होऊन रेसिडेन्सीतून दरबारांत आला. ता. ८ जानेवारीस बक्षीजी आणि धोंडो शामराव हे कप्तान राबर्टसाहेबांस भेटावयास गेले होते. मिठाबद्दल साहेबांस शुक्रगुजारी दिली. नंतर नानाजी सीताराम मुबादल्याबद्दल जिकर झाला.

ता. ६ फेब्रुवारीस केसरबागेंत श्रीमहादेवाचे मूर्तीची स्थापना श्रीमंत सरकार व पार्वती बाईसाहेबांनीं केली. कामगार मंडळी हजर होती.

ता. १२ रोजीं बडोद्याहून भोंसले साखर घेऊन आले. सबब सरकारांनीं दरबार करून साखर घेतली.

ता. २९ मार्च. रोजीं डयुक आफ आलबेनी इंग्लंडांत खिस्तवासी झाले. आपलेकडे एक दिवस हरताळ झाला.

ता. ६ रोजीं हैदराबादचे आमीर कबीर खुरशादजहां बहादूर आले आणि छावणींत उतरले. ता. ८ रोजीं सरकारचे भेटीस ते लालबागेंत आले. अप्पासाहेब होळकर व अजमदअली सिटी म्याजिस्ट्रेट हे सामोरे गेले. गार्ड आफ् आनरनीं सलामी दिली. महाराजांचे पायात दर्द असल्यानें ताजीम देऊं शकले नाहीत. थोडा वेळ गोष्टी होऊन पानसुपारी झाल्यानंतर रूखसत झाले. हे आमीर नंतर उज्जेनीस गेले.

ता. ७ जून रोजीं बक्षीजींस हुकूम झाला कीं धोंडो शामराव देशीं गेले आहेत. सबब तुम्ही सिमल्यास जावे. ता. १७ जून रोजीं सखाराम गोपाळ यांसह बक्षीजी अंडरसेक्रेटरी मिस्टर लिवार्नरसाहेबांकडे गेले. ता. १९ रोजीं आनरेबल गिब्सनसाहेबांनीं शिष्ट मंडळास कळविलें कीं, महाराजसाहेबांनीं यावेळीं सिमल्यास येऊं नये, कारण कांहीं फायदा होणार नाही.

ता. ५ जुलाई रोजीं महाराजसाहेबांच्या जन्मगांठीचा म्हणून दरबार झाला.

ता. १० जुलाई रोजीं कर्नल ब्यानरमनसाहेबांनीं बक्षीजींस बोलावून सांगितलें कीं, मोठे बाळासाहेबांनीं ब्यांकचे चपराशाची खराबी केली, त्याबद्दल राजीनामा दिला पाहिजे. बाळासाहेब लोकांवर मारपिटाई करितात त्याबद्दल साहेबांनीं खेद प्रदर्शित केला. ह्या शिकायती थेट लाटसाहेबांपावेतों पोहचल्या, हें बरें नाहीं. ता.१९ जुलाई रोजीं सरकारांनीं लाटसाहेबांस तार केली कीं, बाळासाहेबांकडून झालेल्या गलत्यांबद्दल कामनसेशननें राजीं करवीत आहोंत. कर्नल ब्यानरमनसाहेबांस पत्र लिहिलें आहे त्यावरून कळून येईल. अखबारवाल्यानें खोटी अफवा उठविली आहे. आम्ही रावसाहेब मंडलिकांसारखे कारभारी मुकरर करणार आहोत.

कारभारी नेमण्याबद्दल सरकारांचा पत्रव्यवहार ता. १५ जुलाईपासोन १५ आक्टोबरपर्यंत चालला होता. सर टी. माधवरावजीस विचारणा झाली. त्यांनीं नाकारले. आर. रघुनाथराव, पेस्तनजी, यांच्या अटी सरकारांस मान्य होईनात. यानंतर दादाभाई नवरोजीं, माधवरावजी रानडे, गोपाळ हरी देशमुख, गणेश शास्त्री, धरमनारायण आणि कृष्णाजी नारायण नूलकर इतक्यांची नांवें सुचविण्यांत आली. परंतु कांहींच्या अटी सरकारांस मान्य होईनात व मध्य प्रांताचे असिस्टंट कमिशनर नारो भिकाजी जोगळेकर हे आपण होऊन आले. परंतु सरकारांनीं कानाडोळा केला. असा घोळ पडून शेवटीं मुंबईचे नाना मोरूजी इंदुरीं आले व सरकारांची भेट झाली. ता. २१ आक्टोबर रोजीं सरकारांनीं लाटसाहेबांस तार केली कीं, नाना मोरूजीस आम्ही कारभारी नेमले. ह्याप्रमाणें तीन चार महिने पडलेला घोळ आणि तोही अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें, तो आम्ही लिहून काढला. राज्यकारभार आहे तेथें कांहींना कांहीं लहानमोठ्या घडामोडी चालायच्याच.

ता. १८ आगस्ट रोजीं मोठे बाळासाहेब बडवाईस गेले. ता.२४ आगस्ट रोजीं सरकारस्वारी व महाराणी साहेबांच्या स्वाऱ्या सिंहस्थासाठीं नाशिकास रवाना झाल्या. ता. ८ सप्टेंबर रोजीं स्पेशल ट्रेननें स्वाऱ्या परत आल्या.

ता. २७ आक्टोबर रोजीं दिवस चांगला असल्यानें नाना मोरोजीं यांस कारभारीपणाचा चार्ज घेण्याचा हुकूम झाला ते माणिक चौकांत उतरले होते. तेथें बळवंतराव शिंत्रे व अनंतराव वामन यांस त्यांना घेण्यास पाठविले. वाड्यांत येतांना उत्तराभिमुख व्हावें अशी योजना केली होती. त्यांस प्रथम श्रीमार्तंडाचे दर्शन घेण्यास नेले. नंतर मासाहेबांचे गोखड्यांत नेले. त्यांजकडून अकरा कागदांवर दस्कत करविले म्हणजे कामाचे सुरुवातीचा मुहूर्त झाला. ता. ३० आक्टोबर रोजीं मोहरमचा दरबार झाला. ता.५ नोव्हेंबर रोजीं मोठे बाळासाहेबांची जन्मगांठ सबब नजरेचा दरबार झाला.

ता. १४ डिसेंबर रोजीं सर लेपल ग्रीफन साहेबांकडून तार आला (=तार आली) कीं, लार्ड रिपन साहेब हे महाराजसाहेबांस मुंबई मुक्कामीं खुशीनें भेटतील. परंतु महाराजांनीं कामासंबंधीं गोष्ट काढूं नये. ता. १८ डिसेंबर रोजीं सरकारांची स्पेशल ट्रेन भायखळा स्टेशनवर पोहचली, स्वारी माणिकजी पेटीटचे बंगल्यावर उतरली. सर लेपल ग्रीफन साहेबांचे पत्र आलें कीं, शनिवारीं ता. २२ रोजीं प्रातःकाळीं लाटसाहेब सरकारांस भेटतील. गव्हर्नमेंट हौसवर (=हाऊसवर) झालेल्या इव्हिनिंग पार्टींत सरकार हजर होते. ता. १९ रोजीं सरकार खासगी रीतीने तीन वाजतां भेटण्याकरितां गेले. पळसीकर व बापूसाहेब समागमें होते. ता. २१ रोजीं स्वारी नाना मोरुजीचे येथें पानसुपारीस गेले. सरकारांनीं आपले अंगांवरील शेला त्यांस दिला व सांगितले कीं बाकी वस्त्रें इंदुरास देऊं.

सरकारांनीं माणेकजी खरशेटजीस रात्रीं खाना दिला. ता. २२ रोजीं स्वारी चर्नी रोडवर समुद्रस्नानास गेली. ता. २४ रोजीं मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांची भेट झाली. त्यांचे सेक्रेटरी पेशवाईस आले होते. तेथें गेल्यावर गव्हर्नरसाहेबांकडून सलामीचे फेर २१ झाले. भेटींत सरकारांनीं आपले पाटीलकी हक्काबद्दल जिकर काढला होता. थोडे वेळानीं गव्हर्नरसाहेबांनीं

परत भेट दिली. योग्य तो सन्मान होऊन पानसुपारी झाली. नंतर बापूसाहेब गव्हर्नमेंट हाऊसपावेतों पोहचविण्यास गेले होते.

ता. २५ डिसेंबर : स्पेशल ट्रेन चिंचपोकळीवरून एक वाजतां रवाना झाली. गार्ड आफ आनर स्टेशनवर हजर होता. सायंकाळीं नाशकास पोंहचले. नारो भिकाजी डेप्युटी कलेक्टर पेशवाईस आले. ता. २८ रोजीं मुक्काम श्रीक्षेत्र त्रिंबक. प्रातःकाळीं कुशावर्त तीर्थांत स्नान करून श्राद्ध केलें. नंतर स्वारी श्रीगंगाद्वारीं दर्शनास गेली. स्वारी नाशिकास येऊन स्पेशल ट्रेननें इंदुरास दाखल झाली.

**इ. स. १८८५**

ता. १५ जानेवारी इ. स. १८८५ रोजीं लार्ड चर्चिल ग्वाल्हेरीस रवाना झाले. बक्षीजी आणि पळसीकर दिवाण स्टेशनवर गेले होते. बडेसाहेबही होते.

ता. ९ फेब्रुवारीस दाजीसाहेब खासगीवाले दिवाण दोन प्रहरा कैलासवासी झाले.

ता. २१ रोजीं श्रीमंतांची स्वारी अलाहाबादेस जाण्यास राणी साहेबांसह रवाना झाली. बरोबर पोलिटिकल आफिसर म्हणून मेजर बारसाहेब होते. खांडवा स्टेशनवर राजे दिनकरराव हे सरकारांचे भेटीस आले होते. ता.२३ रोजीं मुक्काम अलाहाबाद. प्रातःकाळीं सरकारस्वारी ले.गव्हर्नराचे भेटीस गेली होती. त्यांजकडील गार्ड आफ आनरनी सलामी दिली. त्यांजकडून सरकारांच्या आर्दलींत (=आर्डर्लींत) नऊ स्वार आले होते.

ता. १२ नोव्हेंबर रोजीं लाटसाहेब येणार म्हणोन तयारी झाली. बक्षीजी, जनरल बापूसाहेब व वकील स्टेशनावर गेले. पांच वाजतां महाराजसाहेब उभयतां बाळासाहेबांसह स्टेशनावर आले. धार, देवास दोन्ही पाती, जावरा आणि लहान-लहान संस्थानिक स्टेशनवर आले. ब्रिटीश आफिसर्सही हजर होते. साडेपांच वाजता लाटसाहेबांची स्पेशल आली. आपल्याकडील ३१ फेर सलामीचे झाले. लाटसाहेब व सरकार एकाच गाडीतून रेसिडेन्सीत गेले. रेसिडेन्सीचे पायऱ्यांपासून सरकारांनीं रुखसत घेतली व वाड्यांत आले. नाना मोरूजी, पळसीकर दिवाण, जनरल बापूसाहेब आणि बक्षीजी सव्वादहा वाजतां मिजाजपुरीस गेले. ता. १३ नोव्हेंबर रोजीं सरकार आणि उभयतां बाळासाहेब साडेदहा वाजतां रेसिडेन्सीत लाटसाहेबांचे भेटीस गेले. नऊ सरदार बरोबर होते. रेसिडेंसीचे हद्दीपावेतों असिस्टंट पेशवाईस आले. नंतर गाडीतून उतरण्याचे जागीं मेजर बारसाहेब आले. कोठीचे पायऱ्यावर फारेन सेक्रेटरी आले व बिछायतीपर्यंत लाटसाहेब सामोरे आले. महाराजांस उजवीकडे बसविले व लाटसाहेब डायसवर बसले. सरकारचे खाली मेजर बारसाहेब व उभयतां बाळासाहेब बसले व नंतर सरदार मंडळी बसली. सलामीकरितां युरोपियन गार्ड आफ आनर होता. पानसुपारी झाली. साडेचार वाजतां लाटसाहेबांनीं परतभेट दिली. बक्षीजी व सरदार मंडळी पेशवाईस गेले होते. लाटसाहेब गाडीतून उतरले त्या ठिकाणीं महाराजसाहेबांनीं पेशवाई केली. येतां जातां ३१ फेर सलामीचे झाले. गार्ड आफ आनर हजर होते. रात्री छावणींत सरकारतर्फे मेजवानी होती. सरकारस्वारी रात्री रेसिडेन्सीत गेली. आतषबाजी चालली.

ता. १४ नोव्हेंबर रोजीं लाटसाहेब रवाना झाले. दीड वाजतां लार्ड डफरीन साहेबांची स्पेशल जोतपुराकडे रवाना झाली.

ता. १७ नोव्हेंबर रोजीं श्रीमंत कृष्णराव पवार यांस प्रातःकाळीं बिजासनीजवळ सर्व फौजेची कवायत दाखविली.

**इ. स. १८८६ सुरू :**

ता. २९ एप्रिल रोजीं सर ग्रीफनसाहेबांनीं बक्षीजींस सांगितले की, ''महाराजसाहेब जर मोठे बाळासाहेबांस रियासतीचें काम सांगतील तर बरें होईल.''

ता. ३० रोजीं सदरहू हकीगत बक्षीजींनी सरकारांस कळविली व विनंती केली कीं, ही वेळ चांगली आहे. बडेसाहेब अनुकूल आहेत. या वेळेस मोठे बाळासाहेबांस कामांत लावणे फार चांगलें आहे. सरकारांनींही कबूल केलें.

ता. २५ मे रोजीं बादशाहाजादीचे जन्मगांठीबद्दल रेसिडेन्सीत दरबार झाला. सरकारांकडून मोठे बाळासाहेब गेले होते. सरकारांस ज्याप्रमाणें सलामी, पेशवाई मान मिळतो तद्वतच मोठे बाळासाहेबांस मान मिळाला.

ता. २८ मे रोजीं संस्थान नरसिंगगडचे सुप्रिडेंट यांनीं सरकारांस भेटून मोहर नजर केली. सरकारांनीं त्यांस साडेतीन वस्त्रें दिली.

ता. १ जून : दोन दिवसांपासून सरकारांची तब्येत बिघडून दोन तीन दस्ताही लागल्या आणि बैचेनी फार झाली. दोन्ही बाळासाहेब व कामवाले गोळा झाले. ता. २ जून रोजीं असे ठरलें कीं, दोन-दोन कामवाल्यांनीं नेहमी हजर राहवे आणि दोन-दोन तासांनी बदली करावी. ता. ५ जून रोजीं गणपतसिंग डाक्टरचे औषध सरकारांनीं घेतले. मोठे बाळासाहेबांस सरकारांनीं आजपासून काम पाहण्याची परवानगी दिली. ता. ६ जून रोजीं कप्तान फ्रांकसाहेब सरकारांचे भेटीस आले. सरकारांनीं त्यांस सांगितले कीं, आज तिसरें प्रहरीं मोठें बाळासाहेबांनीं दरबार करावा आणि सर्व कामवाल्यांस बोलावून खात्री करवावी कीं, मागील गोष्टी विसरून जाव्या आणि कामवाल्यांसीं माफी मागून काम सुरू करावे. चार वाजतां आम्ही सर्व कामवाले बाळासाहेबांकडे गेलो. बाळासाहेब बोललें कीं, आम्ही आजपासून रियासतीचे काम पाहणें सुरू केलें आहे तरी सर्व कामवाल्यांनीं आम्हांस मदत दिली पाहिजे. याप्रमाणें कांहीं वेळ भाषण होऊन दरबार बरखास्त झाला. ता. १४ जून रोजीं सर लेपल ग्रीफनसाहेब मोठे बाळासाहेबांचे भेटीस आले होते. मामूलप्रमाणें मानसन्मान होऊन परत गेले.

ता. १७ जून रोजीं प्रातःकाळींच महाराज बेहोष झाले. १० वाजतां महाराजांस खालीं आणले. बरोबर साडेदहा वाजतां प्राणोत्क्रमण झालें. मिती ज्येष्ठ वद्य ८ गुरुवारीं लालबागेतून स्वारी वाड्यांत आली तेव्हांपासून कैलासवासी कृष्णामासाहेब ज्या खोलींत राहत होत्या त्याच खोलीत श्रीमंत महाराजांनीं वास्तव्य केलें होतें. महाराजांस खालीं श्रीगौरीशंकराचे चौकांत आणलें व स्वारी तयार झाली. छावणींत जाऊन सर लेपल ग्रीफन साहेबांस इतल्ला

दिला आणि कळविलें कीं जनाजाचे स्वारीबरोबर एजंट गव्हर्नर जनरल जात असतात. अशी रीती आहे, तर आपणही आलें पाहिजे हे म्हणणें मान्य करून ते वाड्यांत आले. दोन वाजतां जनाजाची स्वारी निघाली. सर्व फौज आली होती. जरीपटकाहीं पुढें होता. मासाहेबांचे छत्रीजवळ दहन दिले. बडेसाहेब पुलापावेतों पायीपायी बरोबर चालत होते. नंतर ते गेले. मोठे बाळासाहेबांनीं दहन दिलें. सलामीच्या तोफा जितकें वय होते तितक्याच झाल्या. तीन फेर बादल पलटणाचे बंदुकीचे झाले. तिघे महाराणीसाहेबांस फारच रंज झाला व कामवाले व रयतीसही फारच रंज झाला. कारण असा लोकप्रिय राजा होणें कठीण.''

ता. १८ जून रोजीं कांहीं रक्षा ओंकारेश्वरीं व कांहीं श्रीक्षेत्र प्रयागीं पाठविली. पाराजी होळकर ह्यानीं क्रियाकर्मांतर सुरू केलें. सर लेपल ग्रीफन मातमपुरसीकरितां आले होते.

ता. २९ जून रोजीं तेराव्याची पंगत झाली. मोठे बाळासाहेबांस कामवाल्यांनीं पागोटें व दुपटे नजर केलें. तिसरें प्रहरीं उभयतां बाळासाहेब देवदर्शनास गेले.

ता. १ जुलाई रोजीं सर लेपल ग्रीफन साहेबांनीं ग्वाल्हेरीहून तार दिली कीं मोठे बाळासाहेबांस पूर्ण आखत्यार दिला जाईल. त्याप्रमाणें ता. १२ रोजीं मोठे बाळासाहेबांस त्याप्रमाणें आधिकार मिळून गादीनशीन झाले व श्रीमंत महाराज राजराजेश्वर शिवाजीराव होळकर झाले.



**प्रकरण २९ वें**

# उपसंहार

मागील प्रकरणांत श्रीमंत महाराज राजराजेश्वर तुकोजीराव होळकर (द्वितीय) होळकर सरकार यांचे निधनाची दुःखद कथा निवेदिली. त्यानंतर त्यांचे चरित्र आणि कारकीर्दीचे सिंहावलोकन यावयाची हा नित्याचा क्रम. तोच अंगिकारावयाचा. पण कल्पिलेल्या अखिल कार्याचा हा शेवटला भाग होय. त्या दृष्टीनें अखंड कार्याचा विचार झाला पाहिजे; आणि दुसरें असें कीं, कोणत्याही व्यक्तीची योग्यता ठरविण्यापूर्वी परिस्थितीचा विचार झाला पाहिजे. तुकोजीराव महाराजांची योग्यता ठरविण्यापूर्वी कोणत्या परिस्थितीतून, त्यांनीं कोणती स्थिती निर्माण केली हे पाहिलें पाहिजे. तेव्हां या वरील दोन्हीं कारणांनीं आम्ही एकंदरीत अखिल होळकर राजवटीचा समारोप येथें करण्याचें योजिलें आहे.

इ. स. १७०८ हे वर्ष अखिल हिंदुस्थानाच्या इतिहासांत महत्त्वाचें आहे.

१ औरंगजेब बादशहा मृत्यु पावले; एकवीस सुभ्यांचे राज्य, क्रोडोगणती रुपये खजिन्यांत आणि क्रोडोगणतीचें वार्षिक उत्पन्न. मृत्युसमयीं कांहींयेक व्यवस्था केली नाही. मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें वारसा अमक्याचाच असें कांहीं ठराविक नाही, बळी तो कानपिळी ही चाल चालत आली. सारांश, औरंगजेबाचे पश्चात दिल्लीच्या तक्ताबद्दल कज्जे उभें राहिले.

२ एकवीस सुभ्यांचे सुभेदार हे बादशहानें नेमलेले नोकरी; पण आतां बळी बादशहा राहिला नाही; घरांतच तंटे उभे राहिले; तेव्हां ह्या सुभेदारानीं संधी साधून आपआपलीं स्थानें स्थिर करून ती वंशपरंपरेनें चालण्याची प्रथा पाडली.

३ छत्रपती शिवाजी महाराजांनीं स्वराज्यांत हिंदुपतपादशाही इ. स. १६७४ त स्थापिली. त्यांच्या पश्चात ती खिळखिळी करण्याचा आटोकाट प्रयत्न औरंगजेबानें केला. तोडलेला तरु जसा अधिक जोमाने फोफावतो त्याप्रमाणें ही हिंदुपदपादशाही रामचंद्रपंत अमात्य, संताजी घोरपडे आणि धनाजी जाधव यांच्या बुद्धीबाहुबलानें अधिक जोमाने वाढूं लागली. अशाच वेळीं कांहीं विशिष्ट धोरणानें शाहूमहाराजांची जवळजवळ वीस वर्षांनी मोगलाईतून मुक्तता झाली. मोगलांचा कावा मराठेशाहींत फूट पाडावी पण रामचंद्रपंत अमात्य आणि बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते या उभयतांच्या चतुरस्त्रतेनें तो कावा फिसकटला. इ. स. १७१८ त मराठ्यांनीं नर्मदा ओलांडून दिल्ली गांठली. हा जो प्रवाह फोफावला त्यांत स्वराज्याची सनद आणि मोगलाईत चौथाई ही संपादिली गेली. सारांश, मोगलाईचा ऱ्हास, हिंदुस्थानांत फुटकळ स्वतंत्र संस्थानें आणि मराठ्यांचा उत्तरेकडे उत्कर्ष ही एकाच काळाचीं दृष्यें होत.

४ ईस्ट इंडिया कंपनी इकडेस व्यापारासाठी इ. स. १६०० त आली होती. त्यांच्यांत आणि त्यांच्या देशबांधवांत एक शतकभर चुरस आणि चढाओढ चालू होती. पण काळवेळ ओळखून त्यांनीं समेट घडून आणला आणि ''युनायटेड ईस्ट इंडिया कंपनी'' इ. स. १७०८ त जन्मास आली. अशा या वरती वर्णिलेल्या चार शक्ती कमी अधिक प्रमाणांत हिंदुस्थानांत अठराव्या शतकाच्या प्रथम पादारंभीं वावरत होत्या.

दिल्ली दरबार कमकुवत होऊं लागला. इ. स. १७०८ नंतर मोगलशाहींतून फुटून स्वतंत्र झालेल्या सुभेदारांची राजनीती मोगलशाहीची अव्वल प्रत होती. त्या नमुन्याखालीं सर्व भरतखंड त्रस्त झालेला होता. अशा वेळीं नव्या व विशाल दृष्टीची फार जरूरी होती. ती नवी दृष्टी श्रीसमर्थ रामदास स्वामी आणि छत्रपती श्रीशिवाजी महाराज यांस लाभली होती. या दृष्टीच्या जोरावर त्यांनी नवी सृष्टी उभारली. समर्थांची आध्यात्मिक सृष्टी आणि छत्रपतींची आधिभौतिक सृष्टी ही दिसायला दोन, पण एकाच वस्तूची एकमेकांस पूरक अशी रूपे होती. इ. स. १७१८ त ही नवी सृष्टी नर्मदा ओलांडून उत्तर-दक्षिण वावरूं लागली. त्या वावरण्यांत मल्हारजी होते. म्हणजे पर्यायाने या आध्यात्मिक आणि आधिभौतिक वातावरणाचे ते वारस होते; आणि हेच मल्हारजी होळकर, होळकर राजवटीचे आद्य जनक होते. तेव्हां आपणास असें म्हणता येईल कीं, मल्हारजी आणि त्यांची राजवट ही समर्थ रामदास आणि छत्रपती शिवाजी महाराज यांनी जन्मास आणिलेल्या आणि सुधारून वाढविलेल्या हिंदवी संस्कृतीची उत्तरेंकडील वाढ होय.

ही विचारसरणी मान्य झाल्यास मल्हारजींनीं घालून दिलेला पाया पुढील पिढ्यांनीं कसा आणि किती संरक्षिला आणि संवर्धिला याचे विवेचन करणें म्हणजेच ''भारतीय इतिहासांत होळकरांचे स्थान'' ठरविणें होय आणि त्या मार्गाकडे, आतापर्यंत मिळविलेल्या व लिहून काढिलेल्या माहितीच्या सहायानें, आम्ही वळतों.

**मल्हारजींचा पाय नेहमी रिकेबीत असें. जमिनीवरील लढायांत आणि समुद्रावरील लढायांत त्यांनीं क्षात्रतेज चांगलेच चमकविलेः पण ते केवळ आडदांड लढवय्ये नव्हते.**

**''मनसुब्यांचे कार्यास त्वरेस मोल आहे'' हे जाणून उमजून ते उत्तम मुत्सद्दीही झाले होते. योद्धा आणि मुत्सद्दी या गुणांनी अलंकृत झालेले मल्हारजी हे समकालीन लहानाथोरांचे सर्वतोमुखीं ''भीष्माचार्य'' झाले होते.** सुदैवानें त्यांच्या पत्नी सौभाग्यवती गौतमाबाईही खऱ्याखुऱ्या वीरपत्नी होत्या. भाऊसाहेबांचे बखरीतील ''सुभेदार शिंद्यांची मुले यांनीं येवढा पराक्रम करून मारतां मारतां मेले. तुमचे दिवस समीप आले तरी हिंमत धरून मारतां मारतां मरावे. विलाप स्त्रीजातीनें करावा. आपले पदरी लौकिक भारी. तुम्ही आपले घोंगड्या विणावयाचे स्वकर्म करित असतां तर सहजच वाचावयाची आस्था करावी. वाटा शूराचा आहे, वाण सतीचे घेतले ते तैसे सांभाळावे.'' हे शब्द कोणतेही साध्वी व वीर स्त्रीला शोभण्यासारखे आहेत. सारांश, मल्हारजी आणि गौतमाबाई यांनीं जें उदाहरण घालून दिलें तेंच देवी अहिल्याबाईनीं आपल्या पवित्र चारित्र्यानें, उदार धर्मवृत्तीनें आणि मुत्सद्दीपणानें वळवून गिरवून सर्व जगाकडून ''देवी'' म्हणून धन्यता मिळविली. करारीपणानें सौभाग्यवती रखमाबाई (पहिले तुकोजीरावांचे कुटुंब) यांनीं आपआपलेपरी वर्तन चालविले व गौतमाबाईंचे अनुकरण केलें. तुकोजीराव (पहिले) ''होळकरांची दौलत पहिल्यापासून सरळ चाकरी करून दाखवावी, तेच सर्वस्वी लक्ष आहे,'' तसेंच ''याप्रसंगीं आम्ही सोडून जाऊं असें म्हटल्यास लौकिकांत वाईट दिसून राज्याची हानी होते.'' हे उद्‌गार शूरत्वाची आणि स्वामीनिष्ठेची खाण होत.

पुढें काळ बदलला. दुसरें बाजीरावसाहेब आणि दौलतराव शिंदे पूर्व विस्मरले आणि घरांतच बखेडे सुरू झाले. अशा स्थितींत उपासमार पडली तरी ''चिराचा चिरा त्यांनीं बसवावा'' आणि ''हिंदुधर्माचा वारसा कोठें राहिला नाही'' हे विचार-उच्चार-आणि तदनुरूप आचार शूरवीर यशवंतराव महाराजांची स्वामीनिष्ठा आणि धर्मनिष्ठा दर्शवितात. ''खूप शर्तीने राज्य राखिले शूर यशवंतानें'' हेंच खरे. मगराच्या तोंडांत गेलेलें माणिक त्यांनी माघारें मिळविले. यांच्या पश्चात गौतमाबाई आणि केसरबाई या बाया दौलतीची आणि खासगीची कामें, पडद्यांत बसून का होईना पण, डोळ्यांत तेल घालून पाहत होत्या. त्या वेळी त्यांचे क्षात्रतेज कधीमधीं उमटून बाहेर संचरे पण परिस्थिती घरची आणि दारची अगदीच प्रतिकूल. घरचीच माणसें पूर्व स्मृतीला पारखी होऊन आकुंचित दृष्टीची झाली. सारांश, राजघराण्यांत क्षात्रवृत्ती दाखविण्यास क्षेत्र नाही, वीर पत्न्यांस उत्साह देण्यास व धरण्यास साधनें नाहीत, अशा चोहीबाजूंनीं वाटा बंद होऊन नुसते जीवित्व कंठणें एवढेच राहिले होते. या स्थितीत तुकोजीराव द्वितीय या घराण्यांत प्रवेशले. कृष्णा मासाहेबांस सत्पुत्र लाभला आणि या सत्पुत्रास हामिलटन साहेबांसारखा सद्‌गुरूही लाभला. आपल्या आर्य संस्कृतीचे उत्तम अंग ''प्रजेचा माबाप'' (guardian of the people) ह्या रूढीचे व्यावहारिक ज्ञान तुकोजीरावांस जर मातोश्री साहेबांपासोन मिळाले, तर पाश्चात्य संस्कृतीच्या उत्तम अंगाचे ज्ञान म्हणजे An eye to perceive, a head to conceive and a hand to execute "go to form a statesman."

अर्थ : ''वस्तुस्थितीचे यथार्थ आकलन, निष्पन्न काय करायाचे याचा कयास : आणि

तो कयास कृतीत उतरायाचा'' ह्या तीन गुणांचा संगम म्हणजेच मुत्सद्दी. ते ज्ञान हामिलटन साहेबांच्या कृपाछत्राखालीं प्राप्त झालें. श्रीमंतांची मूळची प्रवृत्ती ज्ञान घेण्यास पात्र असल्यामुळें हा संगम उत्कृष्ट बनला. तीस वर्षांचे परिश्रमानें श्रीमंतांनीं आपले पूर्व वैभव पुनःश्च प्रस्थापित केलें. पण काल हा नेहमीच फिरत असतो. मालकम, मनरो, एलफिस्टन ह्यांचा काल उच्च ध्येयाचा. आपल्या छत्राखालीं हिंदुस्थानाचा उद्धार करावा अशी त्यांची मनापासून तळमळ. चुका झाल्या असल्या तरी त्या डोक्याच्या, अंतःकरणाच्या खचित नव्हत. हामिलटन साहेबही ह्याच परंपरेचे. पण ही परंपरा येथेंच थांबली. पुढें येणारे मंडळीत अधिकारित्वाची कल्पना अधिक वावरूं लागली. त्यांचेच एकदेशीय पाश्चात्य ज्ञान एतद्देशियांसही मिळूं लागले. हक्क आणि कर्तव्याचे ज्ञान भारतीयातही येऊं लागले आणि याचा परिणाम इ. स. १८६० पासून अखिल भारताच्या राजकारणावर होऊं लागला. ही परिस्थिती ओळखून, फाटाफूट होऊं नये या सद्हेतूनें प्रेरीत होऊन सर टी.माधवराव यांनीं ''प्रजा आणि राजा'' यांस उद्देशून जे भाषण केलें ते या प्रकरणाचे शेवटीं आम्ही जोडले आहे. हेतू कसेही असोत. तुकोजीराव महाराज ह्यांच्या राजकीय आकांक्षावर रंज चढून त्यांचे तेज त्या बाजूने जितके दिसावे तितके दिसलें नाही हे खरे, पण अंतर्व्यवस्थेत ते चांगलेच दक्ष होते हे कोणीही कबूल करील.

विद्यार्जनाचे व विद्यादानाचे महत्त्व त्यांनीं चांगलेंच ओळखले होते. तन मन धनानें या कामी ते खपले; बाहेरच्या विद्वानांस आणून राज्यात स्थायिक केलें. परप्रांतीं विद्यार्थी पाठविले. स्वदेशातील नामांकित विद्वानांस आमंत्रणें देऊन त्यांची व्याख्यानें करविली. व्याख्यानास स्वतः हजर राहण्याची खबरदारी घेतल्यामुळें अधिकारीवर्गही व्याख्यानास हजर राही. बहुश्रृतपणा वृद्धिंगत झाला; आणि त्याचा परिणाम राज्यकारभारावरही झाला. दादाभाई नवरोजीं, मंडलिक, तेलंग प्रतापचंद्र मुजूमदार अशा थोर कतृर्त्ववान माणसांचे पाय या कारकीर्दीत इंदुरास लागले. कीर्तने, सरवटे, लेले, मुळे अशा सुविद्य शिक्षकांचा लाभ येथील विद्यार्थीगणास मिळाला. जांभेकरांसारखे इंजिनियर आणि गणपतसिंगांसारखे डाक्टर आपआपल्या धंद्यांत अल्प खर्चात विद्यार्थीगण तयार करीत होते. जमीन बाबींकडेही सरकारचे लक्ष गेले. प्रथमप्रथम रेसिडेन्सीकडून विरुद्ध टीका झाल्या. पण त्याच रेसिडेन्सीकडून शेवटी उद्‌गार निघाले कीं, ''महाराज फार धूर्त आहेत. ते ताणतात पण तुटू देत नाहीत. त्यांच्या ताणण्यानें शेतकरीवर्ग उद्योगी बनला हें मात्र कबूल केलें पाहिजे''

महाराजांचे लक्ष केवळ आपल्या संस्थानापुरतेच नव्हते. आपण मराठेशाहीचे अंशभाग आहोत ही जाणीव त्यांच्यात तीव्रतेनें बसत होती. गायकवाड प्रकरणांत त्यांनीं अंगिकारिलेलें धोरण, दक्षिणेंत गेलेवेळीं पुण्यास भरविलेले दरबार आणि धारसंबंधीं स्वीकारलेले धोरण त्यांच्या पूर्व इतिहासाच्या प्रेमाचे दर्शक होत. पेशवीणबाईंची आपले राजधानींत केलेली व्यवस्था, जंगली महाराजांचा (छत्रपतीचे वंशज) आदरसत्कार, अक्कलकोट आणि सावंतवाडी या संस्थानिकांस दाखविलेला आपलेपणा ही त्यांच्या उदार राजनीतीचीं दर्शक होत. त्यांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानांतील विद्वानांस इंदूर जसें माहेरघर झाले होते, तसेंच

राजेरजवाडे, नबाब आणि महाराजे यासही इंदूर हे आपुलकीचे झाले होते. पंक्तीप्रपंच कोठेंच नव्हता. सारांश, आध्यात्मिक आणि आधिभौतिक नूतन सृष्टीचा जो परिपाठ मल्हारजींनीं घालून दिला तोच परिपाठ तुकोजीराव महाराजांनीं चालू ठेवलेला आपणास दिसून येईल. क्षात्रवृत्तीस अवसरच नव्हता तेथें त्यांचा इलाज नव्हता. पण शांततेच्या काळांत प्रजेचा प्रतिपाळ, अनाथांचा परामर्श, स्वकीयांबद्दल कळकळ आणि स्वधर्माचें संरक्षण हे त्यांनी यथायोग्य केलें असेंच म्हणावें लागेल.

शेवटीं, या पावणे दोनशें वर्षांच्या राजवटींत या घराण्यातील स्त्री-पुरुषांनीं स्वधर्मसंरक्षण व संवर्धन, धामधुमीच्या वेळीं तसेंच शांततेच्याही काळांत करून केवळ आपल्या प्रांतापुरती अल्पस्वल्प नजर न ठेवितां अखिल भरतखंडाची सेवा केली असेंच आपल्यास साधार म्हणता येईल. हिंदुस्थानच्या इतिहासांत या राजघराण्याचें स्थान उच्च व अढळ आहे.

कामाची अवधी ठरली होती त्याप्रमाणें येथें आम्ही थांबतों.

ह्या राजघराण्यानें काय संपादिले आणि काय दिलें याची माहिती मागील प्रकरणांतून ठिकठिकाणी निवेदिली आहेच. स्वकष्टाने संपादिले आणि देताना दक्षणी, एतद्देशीय, अगर मुसलमान असा भेदभाव धरला नाहीं. हिंदुधर्माच्या पंथ उपपंथांत भेद केला नाही. धारातीर्थी पडले त्यांच्या कुटुंबाचा परामर्श घेतला, उपयुक्त कलांस आणि विद्यांस अग्रहार देऊन स्थिरस्थावर केलें. अशा ह्या उदारचरित राजघराण्याचा सदा विजय होवो, अशी श्रीजगच्चालक प्रभूच्या चरणीं आमची सदैव प्रार्थना राहील. श्रीराजराजेश्वरार्पणमस्तुः

कै. सर टी. माधवराव व कै. न्यायमूर्ती माधवराव रानडे यांनीं या कारकीर्दीस उद्देशून काढिलेले विचार मननीय आहेत. पहिले ''सर'' आहेत; दुसरें ''रावसाहेब'' या नावानें प्रसिद्ध आहेत. पहिल्यांचा लेख इ. स. १८७२ चा, तर दुसऱ्यांचा इ. स. १८८२ चा. पहिलें ''तत्कालीन'' आहेत, तर दुसरें ''तात्त्विक'' आहेत. हे भेद जमेस धरावे आणि हे उतारे कै. महाराज तुकोजीराव द्वितीय यांचे कारकीर्दीवर कसा प्रकाश पाडतात ते पहावे.

Raja Sir T. Madhavrao :-

With the ruled, it must be a postulate that rulers err from ignorance, and in spite of their efforts to avoid mistakes.

By the rulers it must be taken for granted, that when subjects petition and expostulate it is not in a spirit or disputation or cavilling, much less of disaffection and disloyalty, but only to enlighten those holding sway over them and in a peaceful and constitutional manner, to have their wishes understood and their grievances made known.

("EMINENT INDIANS ON INDIAN POLITICS" P. 396)

मथितार्थ हा कीं ''प्रजाजनांनीं ध्यानीं धरावे कीं, चुका होऊं नये अशी सत्ताधाऱ्यांची उत्कट इच्छा असूनहीं अज्ञानामुळें त्यांच्या कडून चुका घडतात'' सत्ताधाऱ्यांनीं विश्वास

धरावा कीं प्रजाजनांकडून अर्ज येतात ते राजनिष्ठेच्या अभावीं अगर लोकक्षोभाच्या भावीं येतात असें नसून, दुखते कोठें-बोचतें कसें-हे स्वानुभवजन्यज्ञान अधिकाऱ्यांपुढें मांडावे आणि दुरुस्ती करून घ्यावी याच एका हेतूने दुःख वेशीवर टांगले जाते.''

The late Justice Ranade :

With a Prince brought up as His Highness the present Maharaja of Indore assisted by a responsible and respected Minister, with a Council of officers representing the heads of all departments and the leaders of the non-official classes, with the and revenue and other sources of income settled on moderate and fixed principles, with a careful seperation of the Khasgi from the State department, and a proper distribution of the Civil and Military, Judicial and Executive functions in separate hands, carefully selected from among the subjects of the state after due examination, with written laws, and annual publication of accounts, with a policy of conservation of the rights and distinctions of the sardars and privileged-classes, and of strict regard to keep up their connection with the soil, with every care taken to associate people in the work of practical administration as local justices, panchas, jurors, Municipal and Taluka councillors etc: what is here prevent Native States from becoming models to British-India for the quiet contentment of their subjects, and the great school of self-education and progress in political emancipation ?

(POONA SARVAJANIK SABHA - Quarterly)

न्यायमूर्तींच्या लिखाणाचे धोरण तत्कालापुरतेच नसून भविष्य काळासही अनुलक्षून आहे. प्रथम, इंदूरचे तत्कालीन राजे तुकोजीराव महाराज (द्वितीय) यांच्या शिक्षणाची शिस्तीची तारीफ तर केली आहेचः पण त्यात भर कोणती घातली पाहिजे याचे स्पष्ट दिग्दर्शन केलें आहेः (१) जनतेस मान्य व जबाबदारीची जाणीव असलेला असाच कारभारी (दिवाण) असावा. (२) मंत्रिमंडळ असावें. यात सर्व खात्यांचे मुख्य मुख्य अधिकारी तर असावेच, पण त्यांचे जोडीस जनतेचे पुढारीही बसावेत. (३) जमीन-महसूल व इतर उत्पन्नाच्या बाबी या त्या त्या शास्त्रांच्या तत्त्वानुसार ठरविल्या जाव्या. (४) खासगी व दौलत या बाबी अलग अलग विवेकपूर्वक ठरवून द्याव्या. (५) मुलकी, लष्करी, न्यायदान व अंमलबजावणी ही खाती एकमेकांपासून अलग व स्वतंत्र असावीत. या खात्यांतील अधिकारी नेमावयाचे ते संस्थानांतील प्रजाजनांपैकीं असून त्यांच्या परीक्षा घेतलेल्या असाव्यात.(६) कायदे लिखित प्रसिद्ध केलेले असावेत. (७) वार्षिक जमाखर्च प्रसिद्ध होऊन जाहीर झाले पाहिजेत. (८) सरदार, जहागिरदार, इत्यादि वरिष्ठ वर्गाचे हक्क,

मानमरातब राखण्याकडे लक्ष व पाळण्याचे धोरण असावे. राज्याशी जडलेले त्यांचे हितसंबंध अबाधित राखण्याचे ध्येय व धोरण असावीत. (९) स्थानिक पंचायती, जूर्स, म्युनिसिपालिट्या व तालुका यांच्या दैनंदिन चालणाऱ्या कारभारात जनतेस चढतां-वाढतां अधिकार सुप्रत करावा. (१०) या मार्गाचा अवलंब केल्यानें प्रजेचा संतोष व आबादी तर लाभेलच पण राजकारणाच्या व्यावहारिक शिक्षणाचा प्रसार होऊन जनतेस इष्ट व हितकारक स्वातंत्र्य लाभत जाईल हा मोठाच उत्कर्ष होईल. (११) हा मार्ग चोखाळल्यानें एतद्देशीय राज्यें ब्रिटिश राज्यास मार्गदर्शक तर होतीलच. पण एकंदर भारतवर्षाचे सौभाग्य वाढविण्याचें श्रेय संपादतील यांत संशय नाहीं.''

साठ-पासष्ट वर्षांपूर्वी न्यायमूर्तींनीं दिलेला हा संदेश, राजघराण्याच्या पूर्वपुण्याईनें हीरकोत्सव रूपानें फलद्रूप होवो, असें नम्रतापूर्वक प्रार्थून हा सर्व ग्रंथ त्या राजघराण्यास सादर करितों.

श्री गुरु पौर्णिमा, ता. १४-७-१९४६ **– वा. वा. ठाकूर**



# संदर्भग्रंथ सूची

**मराठी :**

१. होळकरशाहीच्या इतिहासाचीं साधनें - भाग १ व २
संपादक : वा. वा. ठाकूर, इ. स. १९४४-१९४५
२. होळकर सरकारचे हुजूर फडणीशी दप्तर
३. जहागिरदार, सरदार, दरखदार, जमीदार, मंडलोई व कानगो यांची दप्तरे
४. महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें भाग १ व २
द. ब. पारसनीस, इ. स. १९१०-१९११
५. होळकरांची कैफियत - संपादक अ. ना. भागवत, द्वितीय आवृत्ती, १९३०
६. होळकरांची कैफियत - य. न. केळकर, प्रथम आवृत्ती, १९५४
७. रियासतकार गो. स. सरदेसाई कृत मराठी रियासत
८. पुणें रेकॉर्डपैकीं सिलेक्शन ग्रंथमाला
९. वा. वा. खरे कृत ऐतिहासिक संग्रह
१०. इतिहासकार वि. का. राजवाडे यांचे ऐतिहासिक ग्रंथ
११. चॅरिटेबल डिपार्टमेंट क्लासिफिकेशन देवस्थान लिस्ट
१२. शिंदेशाहीच्या इतिहासाचीं साधनें
१३. रा. चंद्रचूड दप्तर
१४. पुणें एलिनेशन रेकॉर्डपैकीं सरंजाम, झाडे, राजमंडळ, स्वारीचे हिशेब, वगैरे
१५. ज्ञानकोश - डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर
१६. श्री. अ. ना. भागवत यांनी संशोधन केलेले कागदपत्र
१७. मराठ्यांचे इतिहासकार - अ. रा. कुलकर्णी
डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २०११
१८. आदर्श मराठी शब्दकोश - डॉ. प्र. न. जोशी
विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे, २००७
१९. ऐतिहासिक शब्दकोश - य. न. केळकर
डायमंड पब्लिकेशन्स, पुणे, २००६
२०. उर्दू-मराठी शब्दकोष- संपादक श्रीपाद जोशी, प्रा. एन. एस्. गोरेकर,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, १९६८
२१. सुखी माणसाचा सदरा (लेख) - प्रा. अविनाश सप्रे, महाराष्ट्र टाईम्स, मुंबई
दि. २० एप्रिल २०१८

**English :**

1. A Memoir of Central India Including Malwa,
Sir John Malcolm, London, 1824 A.D.
2. Malwa in Transition - Dr. Rahguveer Singh
3. A Study of Holkar State Coinage
Dr. P. K. Sethi, Dr. S. K. Bhatt, R. Holkar, Indore, 1976
4. Bombay Gazetteer



# शब्दार्थ / टीपा

| प्रकरण | पृष्ठ क्र. | शब्दार्थ / टीपा |
| --- | --- | --- |
| १ लें | ३ | **आळा** - दबदबा, नियंत्रक, धाक |
| | | **पेशजीपासून** - पूर्वीपासून |
| | | *भारमल यांचा हबशी वगैरे माणसांत आळा पेशजीपासून आहे.* |
| '' | ६ | **बहाली** - जबाबदारी देणे, नेमणूक करणे |
| '' | ७ | **धूळधुमासा करणें** - खराब करणे |
| | | *अंबाड वगैरे जागा धूळधुमासा करून दिल्या.* |
| | | **दामदस्त** - एकूण एक |
| २ रें | १० | **जमियत** - जमाव, गर्दी |
| '' | ११ | **धरणींपारणीं** - बंड, असहकार करणे, धरणे देणे |
| | | *फौजेची बाकी तुंबल्यामुळे धरणीपारणीं हा नित्यक्रम होऊन बसला होता.* |
| | | **जाबता –** पहारा, राखण |
| '' | १२ | **आवताब** - ठावठिकाणा |
| | | **रोजरोजीना** - रोजची मजुरी |
| '' | १४ | **निवारसी** - बेवारस |
| '' | १६ | **कोम** - कोंब |
| ३ रें | १९ | **शिबंदी** - हंगामी फौज |
| | | **कलमजारी** - फौजेची संख्या कमी करणे |
| | | *शिबंदीची कलमजारी केली.* |
| | | **झुरमठ –** चकमक |
| | | **हटी –** झोपडी, कुटी |
| | | **सरफराज होणें –** बढती मिळविणे |
| | | **जाप्ता –** पहारा, अंमल |
| '' | २० | **जुमस खाणें** - धास्ती घेणे |
| | | **कृत्रिम करणें** - बेईमानी वा कपट करणे |
| '' | २२ | **खातरतसल्ली** - खात्री |
| | | **हमराह करणें** - एकमेकांच्या सोबतीने कूच करणे |
| '' | २३ | **खिल्लत** - सन्मानाचा पोशाख |
| | | *करमदीनखां यांना खिल्लत मिळाली.* |
| '' | २४ | **असबाब –** चीजवस्तु, मालमत्ता |
| | | *शत्रूचा असबाब लुटून घेतला.* |

| प्रकरण | पृष्ठ क्र. | शब्दार्थ / टीपा |
|---|---|---|
| ३ रें | २८ | **खलेल** – दांडगाई, दंगा, खलल |
| '' | ३२ | **ताराज करणें** – उध्वस्त करणे<br>*मुलूख मारून ताराज केला.* |
| ४ थें | ४० | **खिस्सा** – उपसर्ग, तंटा, त्रास (मूळ शब्द खिसा) |
| '' | ४१ | **दमादिलासा** – धीर |
| '' | ४७ | **दरखा** – दरकदार वा सरदार यावरील सरकारी कर वा पट्टी |
| ५ वें | ६८ | **दरोबस्त** – एकूण एक |
| | | **इन्दुवार** – सोमवार |
| | | **सबकार** – अनुकूल, मनाजोगते (मूळ शब्द सबकल)<br>*ज्या ठिकाणीं शत्रूशी मुकाबले पडत गेले तेथें सबकार पडत गेले.* |
| ६ वें | ६९ | **गिर्दवाणी** – चहू बाजूंनी नाकेबंदी |
| '' | ७९ | **जलचर** – इंग्रज, जहाजाने आलेले |
| '' | ८१ | **खलश** – मतभेद, भांडण |
| ८ वें | १०२ | **एखलास** – मैत्री, स्नेहसंबंध<br>**निसरसांड करून** – काळजी सोडून<br>*इकडील निसरसांड करून लोभावर दृष्टी देऊन शत्रुशीं ऐक्यता केली.* |
| '' | १०३ | **किलाफ** – संशय<br>**ताम्र** – इंग्रज, तांब्याच्या रंगाचे |
| '' | १०५ | **मौकूफ** – तहकूब<br>**मौसूफ** – मजकुर<br>*महाराजे मौसूफ करार करतात कीं....* |
| '' | १०६ | **इस्तहारनामा** – कबुलीजबाब |
| '' | १०६ | **आबादी इस्तवारी** – देखरेख, व्यवस्था |
| | १०७ | **इतला** – खबर, सूचना (मूळ अरबी शब्द इतल्ला)<br>*तुमच्या ताब्यांतील फौजेचे खर्चाचे आकारात कमी जास्त करणें जाहल्यास इकडील इतल्यानें करीत जाणें.* |
| ९ वें | १०८ | **मामलत** – सरकारी वसुली |
| '' | १०९ | **मुस्तेदी** – तयारी |

